

# अमरवाणी

शत निष्को धनाढ्यश्च,
शतग्रामेण भूपतिः,
शताश्वः क्षत्रियो राजा,
शतश्लोकेन पंडितः । ॥ १ ॥

[शंभर सोन्याची नाणी 'निष्क' ज्याच्याजवळ असतील तो श्रीमंत म्हणवितो, शंभर गावांचा धनी तो जमीनदार होतो, शंभर घोडे ज्याच्याकडे आहेत तो क्षत्रिय राजा होतो आणि जो शंभर श्लोक लिहितो तो पंडित म्हणून प्रसिद्धी मिळवितो.]

शकटम् पंच हस्तेषु,
दश हस्तेषु वाजिनम्,
गजम् हस्त सहस्त्रेषु,
दुर्जनम् दूरतः त्यजेत् । ॥ २ ॥

[गाडीपासून पांच हातावर, घोड्यापासून दहा हातावर आणि हत्तीपासून हजार हातावर (माणसाने रहावे ; परंतु) दुर्जनाला (शक्य तितके) दूरच ठेवावे.]

कृषितो नास्ति दुर्भिक्षम्,
जपतो नास्ति पातकम्,
मौनेन कलहो नास्ति,
नास्ति जागरतो भयम् । ॥ ३ ॥

[शेतकी करणाऱ्याला दुष्काळाची भीती नसते. (रामनाम) जपणाऱ्याला पापाची भीती नाही. मौन धारण करणाऱ्याला भांडणाचे भय नाही आणि (नेहमी) जागा (जागरूक) असतो त्याला कसलेच भय नाही.]

फरक



# शेतकरी आणि लांडगा

**फ्रा**न्स देशात आज जेथे मोठे मैदान आहे तेथे एके काळी दाट अरण्य होते. ते जंगल एकदा जळून भस्म होऊन गेले. त्याची गोष्ट सांगतात ती अशी :

जंगलाच्या किनाऱ्याला एक गरीब शेतकरी व त्याची बायको रहात असत. एकदा तो शेतकरी दोन पाव रोट्या घेऊन जंगलातून घरी परत येत असतां वाटेत एक लांडगा आड येऊन उभा राहिला. तो लांडगा हडकुळा होता आणि आपले भयंकर तोंड उघडून गुरगुरू लागला. त्याचे सुळे पाहूनच शेतकऱ्याला धडकी भरली. त्याने एक युक्ती केली. तो लांडग्याला म्हणाला–"लांडगोबा! भूक लागली आहे नाही का तुम्हांला? मी रोटीचा हा तुकडा घालतो तुम्हांला." त्याने एका रोटीतला मोठासा तुकडा काढून लांडग्यासमोर टाकला. लांडगा तो तुकडा खाऊ लागला. इकडे शेतकऱ्याने हळूच पाय काढला.

परंतु फार दूर जाण्यापूर्वीच लांडगा त्याच्या पाठोपाठ आला. "लांडगोबा! आणखी हवं का खायला?" असे विचारून शेतकऱ्याने आणखी एक तुकडा टाकला आणि पुढे पळत जाऊ लागला.

परंतु लांडगा का त्याला सोडणार? शेतकरी असाच रोटीचा तुकडा प्रत्येक वेळी टाकीत जात होता आणि लांडगा त्याचा पाठलाग करीत पाठीमागून येत होता.

शेवटी शेतकरी धापा टाकीत कसाबसा घरी येऊन पोचला. लांडगा त्याच्या पाठोपाठ त्याच्या घरासमोर येऊन बसला.

शेतकऱ्याच्या बायकोने नवऱ्याला रिकाम्या हाताने घरी परत आलेला पाहून विचारले–"हे काय हो! रोट्या नाहीत

फ्रान्स देशातील लोककथा



का आणल्या? मी कसा छान रस्सा तयार करून ठेवला आहे!"

विचाऱ्याचा वरचा श्वास वर व खालचा खाली झाला होता. त्याने लांडगा खुणेने दाखविला.

"लांडगा का, अगो बाई! नशीब बलवत्तर म्हणून वांचलात!" ती म्हणाली.

"आपल्या साठी आणलेल्या रोटया त्याला घालून टाकल्या!" शेतकरी म्हणाला.

"दोन्ही गिळल्या का त्या लबाडाने? तुम्ही आत येऊन दार बंद करा पहिल्याने" ती म्हणाली.

शेतकऱ्याने दार बंद करताना रोटीचा जो तुकडा उरला होता तो देखील लांडग्यासमोर टाकून दिला. म्हणाला– "लांडगोबा! हा सुद्धां तुम्हीच खा!"

लांडग्याने तो तुकडा खाऊन टाकला आणि बराच वेळ घराबाहेर बसून राहला.

घरात बसून नवराबायकोने फक्त रस्साच खाऊन मनाचे समाधान करून घेतले. खातांना शेतकऱ्याची बायको लांडग्याला शिव्या देत राहली. लांडगा बाहेर बसून सर्व ऐकत होता आणि नवराबायकोचा आवाज बंद झाल्यावर जंगलात निघून गेला.

कित्येक महिने लोटले. नवराबायको खूप काम करून जे पीक निघे ते विकीत. जवळ चार पैसे जमा झाले. त्यांनी एक गाय विकत घ्यायचे ठरविले.

शेतकरी पैसे घेऊन आठवड्याच्या बाजाराला निघाला. बाजारात पोचल्यावर आपल्या आवडीची गाय मिळते का पहात शेतकरी हिंडत असता एक काटकुळा उंच गृहस्थ त्याला भेटला व त्याने त्याला विचारले–"काय बुवा! गाय विकत घेतो आहेस वाटते?"

"होय हो! मला चांगली गाय हवी आहे. परंतु चांगली गाय विकत घ्यायला पुरेसे पैसे नाहीत माझ्याजवळ!" शेतकरी म्हणाला.

"आमच्या गोठ्यात चांगल्या दुभत्या गाई आहेत. एखादी तुम्हांला पसंत पडली तर पहा!" तो मनुष्य म्हणाला.

शेतकरी त्या [illegible] त्याच्या सुंदर घरी गेला. घराच्या मागे गोठा होता.

"या गाईतली तुम्हांला जी पसंत पडेल ती घ्या." तो गृहस्थ म्हणाला.

शेतकऱ्याने त्याला पसंत पडलेली गाय निवडली.

"तुम्ही चांगली गायच निवडली गाईची पारख आहे तुम्हांला!" असे सांगून त्या गृहस्थाने एक दोरी आणून गाईच्या गळयात बांधली आणि दोरीचे दुसरे टोक शेतकऱ्याच्या हातात दिले. नंतर त्याने आपल्या एक डबी काढून शेतकऱ्याला दिली व म्हणाला–"ही डबी तुम्ही तुमच्या मालकिणीला माझी भेट म्हणून द्या! या डबीत काय आहे, ते एकांतात डबी उघडून पहायला तिला सांगा."

शेतकऱ्याने आश्चर्यचकित होऊन विचारले–"तुम्ही माझ्यावर इतकी कृपा केली ती कशासाठी?"

तो गृहस्थ स्मित करून म्हणाला– "तुम्ही एकदां माझ्यावर दया करून मला दोन रोटया खायला घातल्या होत्या, आठवतात का? मी तोच लांडगा होतो. मी भल्याशी भला व वाईटांशी वाईट आहे, बरे का! तर तुम्ही आतां घरी जा."

ते ऐकून शेतकऱ्याला आनंदाबरोबर आश्चर्य ही वाटले. तो गाईला घेऊन जंगलातल्या वाटेने आपल्या गांवी जायला निघाला. वाटेत शेतकऱ्याला राहवेना. या डबीत काय बरे असेल हे पाहून घ्यावे असे त्याला फार वाटू लागले. त्यात ती डबी



फक्त बायकोनेच ती सुद्धा एकांतात उघडावी असे त्या गृहस्थाने कां सांगावे हे त्याला कळेना. त्याने डबी खिशातून बाहेर काढली. डबी हलवून पाहिली, खालीवर लक्षपूर्वक पाहिली. वास घेऊन पाहिला, पण डबीत काय आहे, हे कळले नाही.

आपली बायको आणि आपल्यामध्ये परस्पराना न कळणारे असे गुपित काहीच नाही म्हणून डबी उघडून पाहील्यावर तिच्यात काय आहे ती नक्कीच आपल्याला सांगेल. परंतु ते भाग्य संध्याकाळी घरी पोचेपर्यंत आपल्याला नाही. इतका वेळ कां थांबा? म्हणत डबीत काय आहे, हे डबी उघडून पहायचे शेतकऱ्याने मनाशी ठरविले.

त्याने गाईला चरायला सोडून दिले आणि एका झाडाखाली बसून हळूच डबीचे झांकण उघडले. परंतु दुसऱ्या क्षणाला त्याने डबी दूर फेकून दिली आणि स्वत: दूर पळून गेला. कारण डबीतून भक्कदिशी एक ज्वाळा बाहेर आली. ती ज्वाळा झाडाच्या फांद्यांपर्यंत पोचली आणि सर्व झाड जळू लागले.

[illegible] माझ्या बायकोने जर का डबी उघडली असती तर तिचे सर्व केस व तोंड आणि नंतर ती स्वत: जळून गेली असती की! त्या दिवशी रस्सा खात असतां माझ्या बायकोने लांडगोबाला ज्या शिव्या दिल्या त्याचा सूड घेण्यासाठी का त्याने हे करायचे ठरविले होते?" शेतकऱ्याच्या मनात असा विचार आला व आपण आतांच डबी उघडून पाहिली व बायकोचा जीव वांचला, याचा विचार करून त्याच्या मनाचे समाधान झाले.

त्यानंतर त्या झाडाची आग दुसऱ्या झाडाला, मग तिसऱ्याला आणि नंतर सर्व झाडांना लागली आणि सर्व जंगल भस्म झाले.

शेतकरी आपली गाय घेऊन घरी आला. त्याने बायकोला घडलेले वृत्त सांगितले. दोघे चकित होऊन परस्परांकडे पाहू लागले. गाय चांगली होती म्हणून दोघांचे पुढील आयुष्य सुखात गेले.





# कष्टाचे फळ

रामू व महबूब नावाचे दोघे मित्र एका गावी रहात असत. त्यांनी दोघांनी मिळून एक शेत विकत घेऊन त्यात मळा करण्याचे ठरविले.

रामूला कामाची फारशी माहिती नव्हती. म्हणून तो 'ठविले अनंते तैसेची रहावे', असे मानून स्वस्थ पडून राही.

परन्तु महबूबला कामाची माहिती होती ता सकाळपासून सध्याकाळपर्यंत खूप मेहनत करी. दोपरभर जमीन खणून त्याने भाजीपाला लावला व काही फळ झाडेपण लावली. देवाच्या कृपेने भाजीपाला निघू लागला आणि काही दिवसांनी फळझाडांना फळपण लागू लागली.

मळयात उत्पन्न निघू लागल्यावर त्याची वांटणी कशी करायची हा प्रश्न दोघांसमोर उत्पन्न झाला. जे उत्पन्न निघेल ते दोघांनी सारखे वांटून घ्यायचे ठरले होते.

"मी रात्रंदिवस काबाडकष्ट करून मळा उभा केला म्हणून उत्पन्न निघू लागले आहे." महबूब म्हणाला.

"मी अनन्य भावे देवाची प्रार्थना करीत होतो म्हणून तुझ्या मेहनतीचे हे फळ निघाले. तेव्हां अर्ध्याहून जास्त वाटा मला मिळाला पाहिजे." रामू म्हणाला.

दोघांमध्ये बराच वेळ या गोष्टीवर वादविवाद झाला. शेवटी दोघांनी गावच्या पाटलाकडे जाऊन त्यांचा जो निवाडा होईल त्याप्रमाणे करण्याचे मान्य केले.

पाटलाने दोघांचे म्हणणे शांतपणे ऐकून घेतले आणि म्हणाला—"मी तुम्हां दोघांना एक लहानसे सोपे काम सांगतो. ते काम तुम्ही रात्री करा आणि उद्या सकाळी येऊन भेटा. तेव्हां मी वांटे कसे करायचे हे सांगतो."

पाटलाने दोघांना प्रत्यकी दोन दोन पोती भात दिले आणि म्हणाला—"हे भात

सौ. शांता स. सबनीस

कांडून उद्यां सकाळी तांदूळ होतील ते घेऊन या."

पोती घेऊन रामू व महबूब आपापल्या घरी निघून गेले.

रामूने भात कांडण्यासाठी काय करायचे याचा विचारसुद्धा केला नाही. तो सर्व भार त्याने देवावर सोडला. तो देवाचे ध्यान धरून बसला आणि त्यानंतर जाऊन झोपला.

महबूब दिवसभर भात कांडीत राहला आणि फक्त एक पोतेच तो कांडू शकला.

त्या दिवशी रात्री पाटील दोघे काय करीत आहेत हे त्यांच्या घरीं पाहून गेला. रामू घोरत पडला होता आणि महबूब काम करीत होता.

दुसऱ्या दिवशी ठरल्याप्रमाणे रामू व महबूब आपापली पोती घेऊन पाटलाकडे आले. पाटलाने रामूची दोन्ही पोती उघडून पाहिली, पण दोन्हीत तांदळाचा एक दाणा देखील नव्हता. देवावर भार टाकून रामू बसला होता. देवाने काहीच केले नाही हे पाहून त्याला आश्चर्य वाटले.

[illegible] पोत्यांपैकी एकात तांदूळ होते आणि एकात भात होते.

"पाहिलेस का रामू, श्रम केल्याशिवाय फळ मिळत नाही. तू देवावर भरंवसा टाकलास. परंतु देवाने कृपा केली नाही. देवाची कृपा असती तर तो तुझ्याकडून मेहनत करविता आणि तुला श्रमाचे फळ देवविता. महबूबने मेहनत केली, म्हणून तांदूळ समोर दिसत आहेत. त्याने मळ्यात घाम गाळून काम केले आहे. म्हणून त्यात जे उत्पन्न निघाले आहे, ते सर्व त्याला मिळाले पाहिजे. तू महबूबबरोबर मळ्यात काम केले असतेस तर उत्पन्न आणखी चांगले निघाले असते. यापुढे तरी दोघे अंग मेहनत करून मळा वाढवा, म्हणजे श्रमाचे फळ देव नक्कीच देईल." पाटलाने रामूची कान उघाडणी केली.

त्यानंतर रामू महबूब बरोबर नियमित पणे मळ्यात काम करू लागला आणि जे उत्पन्न निघाले दोघांनी सारखे सारखे वाटून घेतले.





# यक्ष पर्वत

[ ६ ]

[ केसाळ भुताला पाहून लुटेरे पळू लागले. त्यांच्यापैकी काहीजण जोंधळ्याच्या कणसांची पोती नदीत नेऊन फेकू लागले. भुताने सुचना दिल्याबरोबर मांत्रिक हातातल्या मशाली फेकून देऊन खड्गवर्मा व जीवदत्त दोघांना भस्म करून टाकतो असे सांगीत गुहेत शिरला. पुढे-]

आता आपण गुहेत जाऊन तो मांत्रिक आपला मंत्रदंड घेऊन येईपर्यंत त्याची वाट पहावयाची की आत शिरायचे याचा विचार करीत जीवदत्त गुहेपासून थोड्या अंतरावर वाट पहात उभा असता खड्गवर्मा त्याला म्हणाला–"जीवदत्त! तुझे रूप रंग पाहूनच तो मांत्रिक घाबरून गेला आहे रे. तुला क्षत्रिय म्हणावे तर तू मांत्रिकासारखे केस बांधले आहेस व तुझ्या जवळ एक कुबडी पण आहे. म्हणून तो आत पळून गेला आहे."

जीवदत्ताचे लक्ष त्या वेळी गेंडा जातीच्या लोकांच्या भीतीने पळणाऱ्या केसाळ भुताकडे होते. पहिल्याने सर्व लुटेऱ्यांना पळवून लावणारे भूत आता स्वतःचा जीव वाचविण्यासाठी पळत येत होते. ते पाहून जीवदत्तला हंसू आले. म्हणाला–"फक्त क्षत्रियांनाच नव्हे तर मांत्रिकाना सुद्धा



दहशत वाटावी. एवढ्यासाठीच मी आपले केस वाढवून उलटी शेंडी बांधली आहे आणि हातात ही कुबडी ठेवतो आहे. आता पुढे काय करायचे हाच आपल्या-समोर प्रश्न आहे. आपण पुढे जाऊन हा मांत्रिक आहे कोण, काय करतो, जरा पाहून येऊ या."

"मग उशीर कशाला?" म्हणत खड्ग-वर्मा पुढे निघाला.

त्याच वेळी जीवदत्तने मागे वळून पाहिले. कोणी लुटेरा त्याला दिसला नाही. भुताने कपड्यांना आगच लावल्याने काही जण भाजून तेथेच पडले आणि उतरणी-वरून नदीकडे लोळत घसरत गेले. काही

असता नदीत पडले.

परंतु गेंडा जातीचे तरुण त्या भुताला आपल्या भाल्याने पळवीत होते. ते मुळीच घाबरले नव्हते. भूत स्वतःला वाचवीत "गुर गुर" करीत गुहेच्या बाजूला पळत येत होते.

ते पाहून खड्गवर्मा म्हणाला—"हे भूत आहे असे का वाटते तुला, की कोणाला तरी हा विचित्र वेष करून त्या मांत्रिकाने गरीब लोकांना ठार करायला व भीती दाखवायला पाठविले आहे म्हणावयाचे?"

"मनुष्य असून भुतासारखे वागणे शक्य आहे का त्याला? तरी आपण त्याला भूतच मानू या. अरे, ते आपल्या गेंडा जातीच्या लोकांना पाहून पळू लागले व त्यांची त्याला भीती वाटू लागली हे नाही का पाहिलेस तू?" असे म्हणत जीवदत्त भुताला धरण्या-साठी गुहेकडे पळू लागला.

दोघे गुहेच्या खालच्या पायथ्याशी येऊन पोचले. परंतु ते भूत मोठमोठ्या खडका-वरून झपाझप चढत गुहेकडे पळू लागले. त्याचा पाठलाग करीत येत असलेले गेंडा जातीचे लोक आपापल्या गेंड्यावर उभे राहून त्या भुताला भाले भोसकून ठार करण्याचा प्रयत्न करू लागले. त्यांच्यापैकी एकाने त्या भुताच्या अंगावर आपला





परंतु खाली पडला आणि डोंगरावरून खाली सरकत डोंगराच्या पायथ्यापर्यंत आला.

गेंडा जातीच्या तरुणांपैकी एकजण गेंड्यावरून उतरून जीवदत्त उभा होता तेथपर्यंत आला आणि म्हणाला—"मालक! मोठी चूक झाली. आपल्याजवळ एखादी चांगली दोरी असती तर त्या भुताला पकडून बांधून ठेवता आले असते. आमचे भाले त्या भुताला बोचल्यासारखे दिसत नाहीत. त्याच्या अंगभर जे केस आहेत त्यामुळे न बोचले."

"तू म्हणालास तसे त्या भुताला आपण या खेपेस दोरीचा फास टाकून पकडू या आणि बांधून ठेवू या. तुम्ही येथेच थांबा. आम्ही दोघे गुहेत जाऊन त्या भुताला व त्याच्या मालकाला शक्य झाले तर पकडून घेऊन येतो." जीवदत्त म्हणाला.

त्याप्रमाणे जीवदत्त व खड्गवर्मा मोठ-मोठ्या खडकावर चढून गुहेच्या तोंडाजवळ येऊन पोचले. थोडे आधी ते भूत गुहेत शिरले आणि म्हणाले—गुरुवर्य! ते लोक एक शिंगी म्हसोबावर चढून येत आहेत. ते यमदूत आहेत असे वाटते. आणखी दोघे मनुष्यच दिसत आहेत. ते सर्व आपल्या गुहेत शिरणार आहेतसे वाटते. त्यांना



सर्वांना लवकर भस्म करून टाकण्याची मेहरबानी करावी."

परंतु गुहेतून काहीच उत्तर आले नाही. केसाळ भूत भीतीने थरथर कांपत आत जात होते. त्याने एकदा मागे पाहिले. त्याला जीवदत्त व खड्गवर्मा जवळ येत असलेले दिसले. तेव्हां त्याने मोठ्याने उडी मारली आणि ओरडत गुहेत शिरले.

जीवदत्त हातातली कुबडी घट्ट धरून पुढे जात मोठ्याने ओरडून म्हणाला—"ए भुता! असा पळून जाऊ नकोस! मी येतो आहे तुझ्या समाचाराला. तुझ्या गुरूचे गुरू आम्ही येतो आहो, थांब. त्याला सुद्धा बाहेर ये म्हणावे." तेव्हा गुहेत कोणी-



तरी बोलल्याचा आवाज ऐकू आला. त्या पाठोपाठ "ठीक येतो गुरुवर्य!" असा आवाज आत जात असलेला ऐकू आला.

जास्त विचार करीत न थांबता जीवदत्त व खड्गवर्मा गुहेत शिरले. गुहेच्या आत एका जागी चारपांच फूट लांबरुंद अशा खड्ड्यात विस्तव जळत होता आणि त्यातून ज्वाळा येत होत्या. तेथून थोड्या अंतरावर मशाली पडल्या होत्या. त्यांच्या उजेडात जीवदत्त व खड्गवर्मा दोघांनी ते भूत व मांत्रिक कोठे दिसतात का हुडकून पाहिले. सामान्य पणे दहाबारा फूट रुंद व सुमारे वीस फूट लांब अशा त्या गुहेत त्यांना पळून जाण्यासारखे भोक किंवा दार दिसले नाही. तर मग ते दोघे गुरुशिष्य कोठे बरं लपून बसले असावेत?

"जीवदत्त! त्या दोघांना अदृश्य व्हायला मंत्रशक्ती प्राप्त असेल असे वाटते का तुला?" खड्गवर्माने होऊन विचारले.

"छे छे! इतकी मंत्रशक्ती त्यांना प्राप्त असती तर चोरांनी लुटून आणलेली जोंधळ्याच्या कणसांची पोती पळवून न्यायला ते कां आले असते? आणि त्या चोरांना पळवून लावायला त्यांना इतकी खटपट कां करावी लागली असती? या गुहेबाहेर जायला आणखी एखादी चोरवाट नक्कीच असली पाहिजे. जरा लक्षपूर्वक दगडाच्या भिंती पाहू या आपण." जीवदत्त म्हणाला.

त्यानंतर जीवदत्त व खड्गवर्मा भिंतीतला प्रत्येक दगड आत ढकलून तो सरकतो का पाहू लागले. सुमारे अर्धा तास प्रयत्न करून पाहिल्यावर त्यांना एका जागी एक चौरस दगड आत सरकत असल्याचे आढळले. तो दगड जमिनीपासून चारपांच फूट उंचीवर होता.

दगड हालला व थोडा मागे सरकलेला पाहून जीवदत्त खड्गवर्माला हळूच म्हणाला— "तू घाई करू नकोस. संभाळून तो ढकलला पाहिजे. तो मांत्रिक व त्याचा शिष्य ते केसाळ भूत निसटून गेले ती चोरवाट आपल्याला आता मिळालीच आहे. परंतु ते इतक्या थोड्या वेळात दगडाआड पलीकडे



जाऊन पुन्हा दगड जागच्या जागी कसे काय सरकवू शकले बुवा? मला वाटते ते दोघे लबाड आपल्याला फसविण्यासाठी दगडा आड लपून बसले असावेत आणि आपण गुहेत आल्यावर झडप मारून आपल्याला ठार करण्याच्या विचारात असावेत."

"तू म्हणतोस त्याप्रमाणे ते आपण आत शिरल्यावर पाठीमागून येऊन आपल्यावर अचानक झडप मारण्याच्या विचारात असा-वेत." खड्गवर्मा म्हणाला.

"होय मला तोच संशय आहे." जीवदत्त म्हणाला.

"तरमग तू एक काम कां नाही करीत? आपण दोघे मिळून दगड मागे जोराने ढकलू त्या वेळी तू चटदिशी थोडा बाजूला सरकून उभा रहा. मी जळत्या मशाली आतल्या बाजूला फेकतो. पाहूं या काय होते ते. त्यांनी आपल्यावर हल्ला केला नाही तर आपल्याला त्या मशालीच्या उजेडात समोर पहात सावधगिरीने पुढे जाता येईल. काय वाटते तुला?" खड्गवर्माने विचारले.

"इतकी मोठी युक्ती करण्याची गरज नाही वाटत मला. तरी पण तू म्हणतोस तेच यावेळी ठीक वाटते आहे, मला सुद्धा." जीवदत्त म्हणाला.

जीवदत्तने होकार दिल्याबरोबर खड्ग-वर्मा मागे गेला आणि मशाली पडल्या



होत्या त्यातल्या दोन उचलून पेटवून घेऊन आला. त्या छान जळू लागल्या व त्याचा छान उजेडपण पडला.

खड्गवर्मा व जीवदत्त दोघांनी या खेपेस आणखी जोर लावून तो दगड ढकलला. तो दगड हळूहळू मागे सरकला, पण मागे जाऊन पडला नाही. खिडकीचे दार बाजूला सरकावे तसा तो बाजूला झाला आणि आत जायला चांगली वाट झाली. खड्गवर्माने चटदिशी मशाल हातात घेतली. आणि आत फेकली. नंतर त्याने दुसरी मशालसुद्धा आत फेकली. क्षणभर दोघे गुहेच्या भिंतीला टेकून काय होते ते पहात उभे राहले. त्यांनी घाई गर्दी केली नाही की घावरले नाहीत.



पलीकडून काहीच आवाज आला नाही. आणखी एक मिनिट भर तसेच उभे राहून खड्गवर्मा मोठ्याने हसून म्हणाला–"अरे जीवदत्त! ते दोघे आपल्या हातातून पुष्कळ दूर निसटून गेले आहेत एवढेच नव्हे तर त्यांनी आपल्याला खूप फसविले आहे. आपण मूर्खच ठरलो. त्यांना निसटून जायला गुहेत आणखी एक चोरवाट आहे, असे मला वाटते."

"तेच असावे. नाहीतर आपण गुहेत शिरल्याबरोबर आपल्याला ठार करायला ते दबा धरून बसून राहले नसते का?" जीवदत्त म्हणाला.

"आतां आणखी सावध राहले पाहिजे पलीकडे उजेड आल्यासारखे वाटते आहे."

[...] येत होता त्या भोकात तलवारीचे टोक ठेवून बाहेर डोकावून पाहू लागला. त्याच वेळी जीवदत्तने त्याच्या पाठीमागे उभा राहून त्या भोकातून बाहेर एक भाला जोराने फेकला.

खड्गवर्माला, त्याने फेकलेल्या मशाली-च्या उजेडात भुयारातल्या एका वाटेशिवाय दुसरे काही दिसले नाही. कोणी मनुष्यतर नव्हताच. जीवदत्तने देखील लक्षपूर्वक पाहिले व म्हणाला–"खड्गवर्मा! आता आपण त्या भुयाराच्या वाटेने पुढे जाऊ या ते दोघे लबाड तिकडेच कोठेतरी लपले असावेत. त्यांनी आपल्याला विनाकारण पुष्कळ त्रास दिला आहे. त्यांची शिकार करूनच आपण परतायचे." असे म्हणत तो भुयारात शिरला. खड्गवर्मा सुद्धा त्याच्या पाठोपाठ निघाला.

त्या दोघांना वाटेत दगड धोंड्याशिवाय दुसरे काहीच आढळले नाही. खड्गवर्मा एका हातात मशाल व एका हातात तलवार घेऊन जीवदत्तच्या बरोबर जात होता. जीवदत्त भुयाराच्या भिंतीत आणखी कोठे चोरवाट तर नाही हे आपल्या कुबडीने वाजवून पहात पुढे जाऊ लागला. दोघे त्या भुयाराच्या वाटेने तसेच चालत राहले आणि दोनतीन मिनिटातच भुयाराच्या



[...] दोघांना समोर एक विस्तीर्ण प्रदेश दिसला. त्या प्रदेशात लहान मोठी पडकी जुनाट घरे त्यांना दिसली. त्या सर्वांहून जास्त जुना व पडका एक बुरुजपण त्यांना दिसला.

जीवदत्त ते ओसाड गाव पाहून व त्या गावातली पडकी घरे व बुरुज पाहून चकितच झाला व खड्गवर्माला म्हणाला–"पाहिलेस खड्गवर्मा सूर्योदयाची वेळ झालेली दिसते आहे. आपण गुहेत शिरलो आणि भुयाराच्या वाटेने चालत आपण कोठे येऊन पोचलो, पाहिलेस का?"

"हे पडके गाव आहे म्हणतोस? आहेत खरी काही जुनाट पडकी घरे." खड्गवर्मा म्हणाला.

जीवदत्तला वाटले होते तसे तो मांत्रिक किंवा त्याचे ते भूत तेथल्या पडक्या इमार-तीत कोठे लपून बसले नव्हते. ते दोघे एका पडक्या इमारतीजवळ एका मंडपात एका उच्चासनावर बसलेल्या एका पुजारिणी-समोर गुडघे टेकून बसले होते. त्यांच्या आजूबाजूला काही भयंकर रूप व वेष असलेले लोक उभे होते.

पुजारिणी आपले दात ओठ चावून मांत्रिकाला दरडावून बोलत होती. म्हणाली–"ए मांत्रिका आणि ए मूर्ख भुता! रहा उभे! तुमच्या दोघांच्या मूर्खपणामुळे या



पवित्र नगराचे गुपित मानव जातीतील लोकांना, थोडे का होईना कळले आहे."

"हे महाशक्ति! तुझी आज्ञा असेल तर मी त्या दोघांना धरून आणून या भुता समोर आणून टाकतो. ते त्यांना कच्चे चावून टाकील." असे मांत्रिक म्हणाला. पण तसे म्हणत असता त्याचे सर्व अंग भीतीने हादरले.

पुजारिणी भयंकर हास्य करून म्हणाली–"त्याचा आहार तोंडासमोर येऊन पडेपर्यंत न खाण्या इतके आळशी झाले आहे तुझे हे कमाल भूत! महाभूताच्या कृपेने ते दोघे मानव आपल्या दोघांच्या प्रयत्ना शिवायच आपल्या नगरात शिरले आहेत. ते दोघे कोण

आहेत ? कोठून आले वगैरे गोष्ट कळल्या-शिवाय तुझ्या या भुतासमोर त्यांचा बळी देणे शहाणपणाचे काम होणार नाही. लक्षात ठेव." असे म्हणत पुजारिणीने आपल्या हातातले त्रिशूल जोराने जमिनीवर ठोकले.

"होय महाशक्ती! कळले आम्हांला तू म्हणालीस ते." तेथे हजर असलेले सर्व लोक एका स्वरात ते वाक्य म्हणाले.

पुजारिणीने एकदा सर्वांकडे लक्षपूर्वक पाहिले व म्हणाली–"मी आतां सांगते आहे ते ऐका मूर्ख हो! त्या दोघां मानवांच्या केसाला ही कोणत्याही प्रकारे धक्का पोचू न देता त्यांना धरून माझ्या समोर हजर केले पाहिजे. सूर्योदय झाला आहे. ते दोघे या पडक्या इमारतीत कोठे काय आहे पाहण्यासाठी येतील. तुमच्यापैकी काहीजण त्यांच्या पाठोपाठ त्यांना कळू दिल्या-शिवाय जा व ते आपसात काय बोलत आहेत ते ऐका. सूर्य डोक्यावर येईल त्या सुमुहूर्तावर त्यांना माझ्यासमोर घेऊन [illegible] फिरू द्या.

"तुझी आज्ञा शिरसावंद्य, महाशक्ती!" असे म्हणत तिचे चौघे चाकर, मांत्रिक व त्याचे केसाळ भूत मंडपा बाहेर आले.

"गुरुवर्य! मी पाठीमागून जाऊन त्या दोघांना धरतो आणि कच्चे खाऊन टाकतो. त्यांच्यामुळे माझ्यावर महाशक्ती पुजारिणी रागावली आणि तिच्या तोंडून मला मुका-ट्याने ती म्हणाली ते ऐकून घ्यावे लागले." केसाळ भूत म्हणाले.

"त्याहून जास्त पाण उतारा माझा झाला." असे म्हणत मांत्रिकाने हातातल्या तलवारीची मूठ जरा घट्ट दाबून धरली आणि म्हणाला–"ते पहा, दोघे भुयाराच्या तोंडाशी बसले आहेत. आपण दोघांना ठार करून जंगलात फेकून देऊन पळून जाऊ या. चल ये!" असे सांगून मांत्रिक जीवदत्त व खड्गवर्मा बसले होते त्या बाजूला आपल्या केसाळ भुताला घेऊन निघाला.

(क्रमशः)





# कीर्तिरूपेऊगाचे

विक्रमादित्याने हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौनपणे स्मशा-नाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा! तू कोणती सिद्धी मिळावी म्हणून प्रयत्न करतो आहेस, कोणास ठाऊक, परंतु गुण-कीर्तीने जी सिद्धी प्राप्त केली ती स्वतः नष्ट करून टाकली, तसे तू काही करू नकोस. मी त्याची गोष्ट तुला सांगतो, लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

प्राचीन काळी शोणावती नदीच्या काठी एका गावी सदानंद नावाचा एक वीणा-वादक रहात असे. तो वीणावादनात इतका निष्णात होता की लोक त्याला सरस्वतीचा अवतार म्हणत. मोठ मोठे राजेरजवाडे त्याला आपल्या दरबारात बोलावून त्याचा सत्कार करीत. परंतु सदानंदाला धनलोभ

## वेताळाच्या गोष्टी

किंवा कीर्तिलोभ थोडा देखील नव्हता त्याच्या मनात फक्त एकच इच्छा होती की आपली विद्या शिकवून चांगला शिष्यवर्ग निर्माण केला तर आपली विद्या अजरामर होईल. त्याप्रमाणे सहस्रावधी शिष्य त्याच्या जवळ शिकून दरबारी गायक झाले आणि त्यांनी मोठी कीर्ती मिळविली.

हळूहळू वृद्धापकाळ येऊ लागला, म्हणून त्याच्याकडे शिकायला येणाऱ्या शिष्यांना तो आपल्या जुन्या शिष्यांकडे शिकायला पाठवू लागला. त्या सुमारास गुणकीर्ति नावाचा एक तरुण मुलगा वीणा शिकायला सदानंदकडे आला आणि म्हणाला–"आपणच मला वीणा शिकवावी. मी इतरांकडे शिकायला जाणार नाही."

सदानंद त्याला म्हणाला–"मुला! अरे मी म्हातारा झालो. बोटे थरथर कापू लागली आहेत. देशभर माझे शिष्य पसरले आहेत. तू त्यांच्या पैकी वाटेल त्याच्या जवळ जाऊन शीक."

परंतु गुणकीर्ति हात जोडून म्हणाला–"गुरुवर्य! मी आपणालाच गुरु मानतो. आपल्या शिष्यांपैकी एकाला देखील आपली विद्या पूर्णपणे अवगत झालेली नाही. ती शिकून आपली कीर्ती अजरामर करावी या महत्वाकांक्षेने मी आपणांकडे आलो आहे."

सदानंद म्हणाला–"मुला! तुझा उत्साह दांडगा आहे. परंतु तुला आपली विद्या पूर्णपणे शिकवून देईपर्यंत मी जीवंत राहीन मी नाही, याची खात्री मला नाही. तरी मी तुझ्या उत्साहावर विरजण घालीत नाही. मी तुला शिकवितो."

गुणकीर्तीने गुरूची कृपा होताच खूप मेहनत करून वीणा शिकायला सुरवात केली.

परंतु सदानंदाला वाटू लागले की या शिष्याला विद्या पूर्णपणे अवगत होण्यापूर्वीच आपल्याला मरण येणार. त्याने अंथरुणच धरले आणि गुणकीर्तीला खाटेजवळ बोलावून म्हणाला–"बाळा गुणकीर्ती! जगाचा निरोप घ्यायची वेळ अगदी जवळ येऊन ठेपली आहे. तुझी विद्या अपूर्णच राहणार याचे मला फार फार वाईट वाटत आहे. तीन चार वर्षे आधी आला असतास तर मी तुला माझ्याहून मोठा वीणाचार्य केला असता. परंतु ते भाग्य मला नाही व तुला पण नाही. आमच्या घरी वडिलोपार्जित अशी एक विचित्रवीणा आहे. त्या वीणेवर प्रत्येक स्वर तीन तीन तऱ्हेने तीन तीन स्थानी वाजतो. त्या वीणेवर कोणीही वाजविले तरी ऐकणारा मंत्रमुग्ध होऊन जातो. मी ती वीणा तुला देतो. ती वीणा तू वाजविलीस तर राजेरजवाडे तुला बोलवून आपल्या दरबारी तुला स्थान देतील. थोर वीणावादक देखील तुला थोर वीणाचार्य म्हणून तुझा गौरव करतील." असे सांगून सदानंदने गुणकीर्तीला ती वीणा दिली आणि डोळे मिटले.

गुणकीर्तीने आदरपूर्वक गुरूची उत्तर क्रिया वगैरे केली आणि विचित्र वीणा घेऊन







राजाकडे गेला आणि स्वतःला दरबारी वीणावादक म्हणून नेमण्याची विनंती केली.

राजाने त्याच्या वीणावादनाचा खास-कार्यक्रम आपल्या दरबारात ठेवला. गुण-कीर्ती आपल्या गुरुजवळ जेवढे शिकला होता तेवढेच त्या विचित्र वीणेवर वाजवू लागला. परंतु राजा व सर्व दरबारी मंत्रमुग्ध झाले. राजाने गुणकीर्तीला आपला दरबारी वीणाचार्य म्हणून नेमले. थोर वीणावादक त्याची वीणा ऐकून, गुणकीर्तीची प्रशंसा करू लागले. त्याच्याजवळ शिकण्या-साठी दूरदुरून विद्यार्थी येऊ लागले. परंतु त्यांना टाळण्यासाठी गुणकीर्तीला निर-निराळी कारणे सांगावी लागली.

गुणकीर्तीची कीर्ती एक फार मोठा प्रतिभाशाली वीणावादक म्हणून चहूंकडे पसरली. त्याला समाजात प्रतिष्ठा मिळाली, धनवैभव प्राप्त झाले. परंतु एकांतात गुणकीर्तीला मनांतल्या मनात लाज वाटे आणि त्याचे मन अशांत होई.

मध्यंतरी राजाने त्याला बोलावून राज-कन्येला वीणा शिकवा म्हणून सांगितले आणि म्हणाला–"तिने तुम्हांला मनात वरले आहे. तेव्हां नकार देऊ नका."

ते ऐकून त्याच्या मनात एक मोठे वादळच सुरू झाले. तो विचित्रपणे वागू लागला आणि कोणाला काही सांगितल्या शिवाय आपली विचित्र वीणा घेऊन नदी काठी गेला. त्याने ती वीणा दगडावर आपटून फोडून टाकली आणि नदीत फेंकून देऊन सरळ आपल्या गुरूच्या आश्रमात निघून गेला. तेथे पूर्वी ज्या वीणेवर तो वीणा वाजवायला शिकत असे त्या वीणेवर गुरूने शिकविलेल्या रागरागिण्या वाजवून साधना करू लागला. गुरूचे स्मरण करून त्याने जी साधना केली त्यामुळे त्याला यश आले आणि थोड्याच दिवसात साधना पुरी झाल्याचे समाधान त्याला वाटू लागले. तो खरोखरच एक मोठा वीणाचार्य झाला. नंतर राजाच्या दरबारात जाऊन त्याने साध्या वीणेवरच विचित्र वीणेवर वाजवून [illegible] करून वाहवाही मिळविली.

त्यानंतर त्याने राजकन्या कलावतीला वीणावादन शिकवून एक मोठे गुरुकुल स्थापन केले आणि दूरदुरून येणाऱ्या शिष्य-मंडळीस शिकवायला सुरवात केली. राजाने राजकन्येचे त्याच्याशी लग्न करून दिले.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला–"राजा! गुणकीर्ती किती खुळा होता नाही का रे? विचित्र वीणा तोडून नदीत फेंकून देणे शुद्ध खुळेपणाच नाही का? त्याला मेहनत करून पूर्ण पांडित्य मिळाले नसते तर त्याचे सर्व आयुष्य नष्टच झाले असते नाही का? तो असे कां वागला हे माहीत असून तू या प्रश्नांची समाधानकारक उत्तरे दिली नाहीस तर तुझ्या डोक्याची शंभर छकले होऊन तुझ्या पायावर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला–"गुणकीर्ती खुळा नव्हता. साध्यसाधन शुद्धीवर त्याचा विश्वास होता. सदानंदासारखे वीणाचार्य व्हावे हे त्याला मनापासून वाटत होते. परंतु गुरूने मध्येच परलोकगमन केले आणि गुणकीर्तीचे पांडित्य म्हणून जे होते ते त्या विचित्र वीणेवरच अवलंबून होते. म्हणजे ते खरे पांडित्य नव्हतेच. प्रतिभावान मानी कलाकार साधनेला जितके महत्व देतो तितकेच साध्यदेखील शुद्ध मानतो. परंतु त्याचे साध्य दूषित झालेले पाहून त्याचे मन अशांत झाले. त्याने शुद्ध साधना करून शुद्ध साध्य प्राप्त करण्याचे ठरवून खरी साधना केली. त्याने एकलव्यासारखे गुरूचे स्मरण करून साध्यप्राप्ती केली आणि खरा वीणाचार्य झाला. केवळ विचित्र वीणेवर त्याला जी कीर्ती मिळाली होती ती खोटी होती हे कळल्यावर तिकडे दुर्लक्ष करणे त्याला शक्यच नव्हते. आयुष्यभर तो दुःखीच झाला असता."

अशा तऱ्हेने राजाचे मौनभंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि पुन्हां झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)



# तीन शिंका

एका लाकूडतोड्याचे नाव मूढमती असे होते. तो पहिल्याच दिवशी आपले गाढव घेऊन जंगलात गेला आणि एका झाडावर चढून, ज्या फांदीवर चढला होता तीच तोडू लागला.

त्या वाटेने जाणाऱ्या एका मनुष्याने ते पाहिले व त्याला म्हणाला–"अरे वेड्या ! ती फांदी तोडू नकोस, तूच खाली पडशील." परंतु मूढमतीने त्याच्या बोलण्याकडे दुर्लक्ष केले आणि फांदी तुटल्यावर फांदीबरोबर खाली जमिनीवर येऊन पडला.

मूढमतीने विचार केला की तो मनुष्य कोणी चांगला ज्योतिषी असला पाहिजे म्हणून तो लगेच उठला आणि पळत जाऊन त्या माणसाला भेटून विचारू लागला– "काय हो, मला मरण केव्हां येईल, सांगाल का ?"

हा कोणी तरी मूर्खराज दिसतो आहे, असे समजून तो मनुष्य म्हणाला–"तुझ्या गाढवाला तिसरी शिंक आली म्हणजे तुला मरण येईल." असे सांगून तो पुढे निघून गेला.

नंतर मूढमती गाढवाला घेऊन घरी परत येत असतां वाटेत एका जागी कचऱ्याच्या ढिगाला आग लावलेली होती. धूर नाकात जाऊन गाढवाला शिंक आली. मूढमतीने घाबरून जाऊन आपले डोक्याचे पागोटे गाढवाच्या नाकाला गुंडाळून ठेवले. कोंडल्यासारखे झाले, म्हणून गाढव पुन्हां एकदां शिंकले. म्हणून मूढमतीने गाढवाच्या नाकपुड्यात पाचोळा खुपसून नाक बांधून ठेवले. म्हणून गाढव जास्तच जोराने शिंकले.

मूढमती घाबरून बेशुद्धच होऊन पडला. एका माणसाने तोंडावर पाणी शिंपडल्या-बरोबर, मूढमती शुद्धीवर येऊन उद्गारला–"मी स्वर्गात आहे की नरकात ?"





# शेराला सव्वाशेर

एका गावी शंभू नावाचा एक लबाड मनुष्य रहात असे. खोट्या साक्षी देऊन त्यांवरच त्याचा उदर निर्वाह चाले. खोटी साक्ष द्यायला मिळाली नाही की तो भांडणे लावी व त्याला जो जास्त देई त्याच्या बाजूने साक्ष देऊन आपले काम भागवून घेई.

परंतु हळूहळू गावकऱ्यांना शंभूची लबाडी कळू लागली व सर्व त्याला 'कळीचा नारद' म्हणून त्याची थट्टा करू लागले. म्हणून शंभू दूरच्या एका गावी जायला निघाला.

शंभू जात होता त्याच वाटेवर थोडा पुढे एक वाणी तुपाचा एक डबा घेऊन जात असलेला त्याला दिसला. त्याच वेळी एक मजूर पाठीमागून येत असलेला शंभूला दिसला. दोघाना पाहून शंभूला एक शक्कल सुचली तो थोडावेळ थांबला व मजूर जवळ आल्यावर त्याला म्हणाला–"मी तुला तुझ्या फायद्याची गोष्ट, तू करणार असलास तर, सुचवितो."

"फायद्याची गोष्ट असेल तर कां नाही करणार?". तो मनुष्य म्हणाला

तेव्हां शंभू म्हणाला–"तो पहा, समोर डोक्यावर तुपाचा डबा घेऊन वाणी चालला आहे ना? तू तो डबा तुझा आहे असे सांगून त्याच्या हातातून हिसकावून घे. वाण्याने फिर्याद केली तर मी तुझ्या बाजूने साक्ष देऊन तुला तो डबा मिळवून देईन. त्याबद्दल तू मला फक्त दोन रुपये दे, तुला सबंध डबा मिळेल."

त्या माणसाला ती युक्ती आवडली. त्याने वाण्याच्या डोक्यावरचा तुपाचा डबा हिसकावून घेतला आणि म्हणाला–"चोरा, माझा डबा कोठे घेऊन चाललास रे?"

"वा रे वा! बराच आहेस की रे! दंगामस्ती करून माझा डब्बा बळकावणार

श्री बिन्दु माधव गुणे

का? चल, पाटलाकडे!" वाणी त्या मजुराला म्हणाला.

"चल रे, भीती दाखतोस का मला पाटलाची! मी माझा डबा आहे, हे सिद्ध करून दाखवीन!" मजूर म्हणाला.

दोघे शेजारच्या गावी पाटलाकडे गेले. त्यांच्या पाठोपाठ शंभूदेखील गेला.

दोघांचे म्हणणे ऐकून घेऊन पाटील म्हणाला–"तुम्हां दोघांपैकी कोणाचे म्हणणे खरे आहे आणि कोणाचे खोटे, हे काही कळत नाही मला!"

तेव्हां मजूर म्हणाला–"कां हो, मी चार मुलांचा बाप आहे, खोटे कशाला बोलू? मुलीच्या सासरी मी तुपाचा डबा घेऊन चाललो होतो. तेव्हां हा वाणी मध्ये म[illegible] हिसकावून घेऊन गेला. म्हणून मी याला ओढून घेऊन आपणांकडे आलो आहे."

पाटलाने त्याला विचारले–"तू म्हणतोस ते कोणी प्रत्यक्ष डोळ्यांनी पाहिले आहे का?"

"हो! कोणीतरी एक जण आमच्या बरोबर त्याच वाटेने येत होता खरा. मिनिटभर थांबा, त्याला बोलावून घेऊन येतो." असे सांगून मजूर बाहेर आला आणि शंभूला बोलावून घेऊन आत गेला.

पाटलाने त्याला विचारले–"या दोघांना ओळखतोस का?"

"मला हे कोण हे मुळीच माहीत नाही. मी येत होतो त्या वाटेवर या दोघांना भांडताना मी पाहिले होते." शंभू म्हणाला.

"तरमग हा डबा कोणाचा आहे, सांग. कोणी कोणाकडून बळजबरीने हिसकावून घेतला?" पाटलाने शंभूला विचारले.

"हा मजूर घेऊन येत होता आणि या वाण्याने बळजबरीने तो घेतला हे मी स्वतः डोळ्यांनी पाहिले." शंभू म्हणाला.

शंभूच्या साक्षीच्या आधारे पाटलाने तुपाचा डबा त्या मजुराला देवविला.

वचन दिल्याप्रमाणे मजुराने डबा मिळाल्यावर शंभूला दोन रुपये दिले. नंतर तिघे त्याच वाटेने चालू लागले. मजूर आनंदाने पुढेपुढे चालत होता आणि त्याच्या मागून शंभू व वाणी चालत होते.

शंभूची लबाडी वाण्याने ओळखली आणि शंभूच्या लबाडीचे उत्तर लबाडीनेच द्यायचे असे त्याने मनाशी ठरविले. शंभूला गप्पात गुंतवून वाणी त्याला म्हणाला– "काय रे, तू माझ्याहून जास्त हुशार आहेस, असे मी समजत होतो. पण तुझ्याहून तो मजूरच जास्त वस्ताद निघाला की! तुझ्या हातावर दोन रुपये ठेवून त्याने तुपाचा सबंध डबाच लांबविला की?"

ते ऐकून शंभू थबकला.

वाणी पुन्हा पुढे म्हणाला–"तुझीच युक्ती मी सुद्धा केली होती. पण मी तुपाचा हा डबा मिळविला होता. दोन रुपड्यांवर समाधान मानून स्वस्थ बसलो नाही! एकाने हा डबा एका तुपाच्या दुकानात विकत





घेतला. दुकानदाराला तो डब्याची किंमत देऊ लागलेला पाहून मी त्याला ती न द्यायला खुणेने सुचविले. माझी खूण बरोबर ओळखून तो दुकानदाराला म्हणाला, होय हो, मी तर तुम्हांला आधीच पैसे दिले नाही का? दुकानदाराने विचारले–"कोठे हो?" दोघांचे भांडण सुरू झाले आणि लोकांची गर्दी जमली. तेव्हां मी दुकानदारालाच दरडावून म्हटले–"बराच आहेस की रे! आत्तां याने माझ्या समोर तुला पैसे नाही का दिले?" जमलेले लोक दुकानदारालाच नावे ठेवू लागले व तुपाचा डबा त्या माणसाला मिळाला. तो डबा घेऊन निघालेला पाहून मी त्याच्याबरोबर निघालो. तो माझ्या हातावर दोन रुपये ठेवून पुढे जाऊ लागला तेव्हां मी त्याला विचारले–"काय रे! मला तू काय खुळा समजलास, या दोन रुपयावर समाधान मानून जायला?" असे सांगून मी त्याच्याच हातावर दोन रुपये ठेवले आणि डबा घेऊन निघालो. तू माझीच युक्ती केलीस, पण [illegible] तू कच्चाच निघालास!"

वाणी म्हणाला ते ऐकून शंभूने वाण्याला विचारले–"मग मी काय करू म्हणतोस?"

"मजुराने जे केले ते तू कर! मी तुझ्या पाठीशी आहे. मी मदत करीन त्याचा मोबदला तू देशीलच!" वाणी म्हणाला.

शंभू झपाझप पुढे गेला आणि मजुराच्या वाटेवर आडवा उभा राहून त्याला म्हणाला–"तू माझा डबा बराच दूर उचलून घेऊन आलास. आता तो मला देऊन टाक!"

"मी तुझ्या साक्षीबद्दल तुला द्यावयाचा मोबदला तुला दिला ना? आतां मुकाट्याने चालू लाग!" मजूर म्हणाला.

शंभूने मारहाण करून डबा नेण्याचे ठरविले. मजुराने डबा बाजूला ठेवला आणि शंभूला मारायला धावला. दोघांची मारामारी ऐन रंगात चालू असता वाणी डबा उचलून घेऊन केव्हां निघून गेला हे दोघांना ही कळले नाही. डबा नजरेआड झालेला पाहून दोघे शुद्धीवर आले.




# महाकवी व आंबा

गालिब नावाच्या सुप्रसिद्ध महाकवीला आंबा फार आवडे. एकदा गालिब बादशाहबरोबर एका अमराईत गेला. झाडांवर खूप आंबे लागलेले होते, इतके की फळांच्या भाराने झाडे वाकली होती.

गालिब प्रत्येक झाडावरची फळे फार लक्षपूर्वक पहात असलेला पाहून बादशाहने महाकवीला विचारले–"महाकवी! आपण इतके ध्यान देऊन झाडांकडे काय पाहता आहां?"

"माझ्या वाडवडिलांची नांवे कोणत्यातरी झाडावर आहेत का पहात होतो." गालिब म्हणाला.

झाडावर वाडवडिलांची नावे असली तर त्या झाडाची फळे आपली होतील अशी गालिबाची कल्पना असावी, असे समजून बादशाहने माळ्याकडून आंबे काढवून पाट्या भरविल्या आणि आंबे गालिबकडे पाठवून दिले.

एक दिवशी गालिब घरासमोर आंबे खाऊन कोयी बाहेर फेकून देत होता. ठीक त्या वेळी आंबे आवडत नसणारा गालिबचा मित्र तेथे आला. त्याच्या पाठोपाठ एक गाढव त्या गल्लीत आले. ते गाढव कोयींचा वास घेऊन पुढे निघून गेले, कोयीला तोंडसुद्धा लावले नाही. ते दाखवून गालिबचा मित्र त्याला म्हणाला–"पाहिलेस गालिब, गाढवेसुद्धा आंब्याला तोंड लावीत नाहीत."

"होय रे बाबा! गाढवांनाच आंबे आवडत नाहीत, खरे आहे!" गालिबाने व्यंग्योक्ती केली.





# एक दिवसाचा सुलतान

[ ४ ]

जखमा चांगल्या भरून आल्यावर अबू अल हसनला घरात करमेनासे झाले. तो पूर्वीसारखा सूर्यास्ताच्या सुमारास पुलाच्या टोकाला बसून कोणी अपरिचित अतिथि भेटतो का, वाट पहात बसला.

तो पुलावर जाऊन बसला त्याच दिवशी खलीफादेखील वेष पालटून नेमके तेथे आले. हसनला एक म्हातारा व्यापारी एका बलदंड दांडग्या गुलामाबरोबर येत असलेला दिसला. एकदां ज्यांची ओळख झाली त्यांच्याशी न बोलण्याची हसनला सवय होती त्यामुळे हसन त्यांच्याकडे न पाहता तोंड फिरवून नदीकडे पाहू लागला. परंतु खलीफा त्याला सोडायला तयार नव्हते. त्याच्यामुळे फार चांगली करमणूक झाली होती. वेड्यांच्या दवाखान्यात नोकरांनी त्याला वेडा म्हणून ठेवून जे जे कष्ट दिले त्या सर्व गोष्टींची माहिती खलीफांना मिळत आली होती. म्हणून हसनला या ना त्या तऱ्हेने कोणते तरी इनाम बक्षिस देऊन त्याचा सत्कार करण्याचा विचार त्यांच्या मनात होता.

खलीफा जवळ जाऊन आपली दाढी अगदी त्याच्या खांद्यावर ठेवून त्याला म्हणाले–"मित्रा! अबू अल हसन! कसे काय बरं आहे ना! तुला घट्ट आवळून आलिंगन करावे असे वाटते आहे."

हसन नदीवरची दृष्टी फिरविल्याशिवाय म्हणाला–"तू कोण काय मला माहीत नाही. चालू लाग पुढे!"

"अरे, असे काय हसन! मी तुझा पाहुणा! विसरलास का इतक्यात?" खलीफांनी विचारले.

"अल्ला कसम, मी तुला नाही ओळखले!" हसन म्हणाला.

"मी तुला चांगले ओळखले. आपण तुझ्या घरी त्या दिवशी किती गप्पा गोष्टी केल्या? एक महिनासुद्धां झाला नसेल. तू मला ओळखत नाही म्हणतोस, पण मी ते कसे कबूल करीन?" खलीफांनी तितक्या आपुलकीने विचारले.

या खेपेस हसन एक शब्ददेखील बोलला नाही. त्याने फक्त बोटाने खूण केली, चालता हो! परंतु खलीफांनी माघार घेतली नाही. त्यांनी हसनच्या गळ्याला दोन्ही हातांनी मिठी मारली आणि म्हणाले–"हे नाही बुवा आपल्याला आवडत! मला आपल्या घरी पुन्हां बोलावून घेऊन जाऊन माझ्यावर तुला एवढा राग येण्याचे कारण काय, तू सांगेपर्यंत मी तुला नाही सोडणार!"

आतां मात्र हसनला भयंकर राग आला आणि म्हणाला–"तुझे पापी तोंड नको पहायला? मला तुझ्यामुळे इतके कष्ट सोसावे लागले आणि पुन्हां माझा पाहुणा म्हणून येणार म्हणतो आहेस तू? तुझे तोंडसुद्धा पाहण्याची इच्छा नाही!"

खलीफांनी हसनला प्रेमाने पोटाशी आवळून विचारले–"इतका कसला राग बुवा, माझ्यावर? माझ्यामुळे तुला कष्ट सहन करावे लागले असतील तर ते मी जाणून बुजून काही केल्याने झालेले नाही, एवढे खास समज!" खलीफा म्हणाले



आणि हसनच्या शेजारीच पुलावर हसनच्या खांद्यावर हात ठेवून बसले.

आतां मात्र हसन थोडा नरमला. म्हणाला–"त्या दिवशी रात्री तू दार बंद केल्याशिवाय निघून गेलास त्याचा घोर परिणाम कसा झाला, मला कोणकोणते कष्ट सहन करावे लागले मी तुला सांगतो." असे म्हणत त्याने घडलेले वृत्त सविस्तर सांगितले. खलीफांच्या महालात त्याला स्वप्नात कधी न पाहिलेले व अनुभवलेले जे अनुभव आले ते तो सांगत असता खलीफांना आपले हसू आवरेना.

ते पाहून हसन म्हणाला–"मी सांगतलें ती सर्व तुला थट्टा वाटली की मी काही



कपोलकल्पित सांगतो आहे असे वाटले? तुला खरे वाटत नसेल तर हे माझ्या पाठीवरचे चाबकाचे वण पहा." असे सांगून हसनने आपला पाठीवरचा सदरा वर करून पाठीवरचे वण दाखविले.

ते वण पाहून खलीफांच्या डोळ्यांना पाणी आल्याशिवाय राहले नाही. ते हसनला आणखी जास्त प्रेमाने घट्ट आवळून म्हणाले— "भाई! आज रात्री मला पुन्हा बोलावून घेऊन जा. तुझ्या आतिथ्यासाठी पुन्हां माझे मन किती आतुर झाले आहे. त्याबद्दल अल्ला तुझे दहाहजारपट बरे करील, मी तुला छातीवर हात ठेवून सांगतो." एका अपरिचिताला एकच वेळ आतिथ्य देण्याचे

तो खलीफांना म्हणाला—"मी तुला नक्कीच आपला अतिथि म्हणून बोलावून नेतो. परंतु माझी एकच एक प्रार्थना आहे, परत जातांना दार बंद करायचे विसरू नकोस."

खलीफांनी "ठीक, कबूल!" असे सांगून फार कष्टाने आपले हसू आवरले.

दोघे हसनच्या घरी गेले. एका गुलामाने त्यांना जेवण वाढले आणि नंतर त्यांना प्यायला मद्यादि पेये दिली. दोघे गप्पात रंगले होते. मध्येच खलीफांनी हसनला विचारले—"काय रे! सुंदर स्त्रियांवर तुझी नजर कधीच जात नाही का? तुला लग्न करावेसे वाटत नाही का?"

"मला मित्रमंडळीच जास्त आवडतात. गप्पा मारायला मित्र, प्यायला उत्तम पेये आणि खायला मिष्टान्ने असल्यावर मला आणखी कसली देखील गरज भासत नाही. मला बायका आवडत नाहीत असे देखील नाही. त्या दिवशी स्वप्नात सैतानाने ज्या सुंदर सुंदर तरुण स्त्रिया दाखविल्या? त्यांच्यासारखी एखादी हसत खेळत दुसऱ्याची सेवा करणारी, इतरांची मने ओळखून कामें करणारी मला मिळाली तर मी तिला विकत घेऊन तिच्याशी लग्न करून संसारही करीन. परंतु तशा सुंदर मुली फार तर खलीफांच्या अंतःपुरात किंवा जफर सारख्या

म्हणून मी खोटी आशा बाळगून कधीच राहिलो नाही. सामान्य स्त्रीच्या नकट्या नाकाकडे पहात जीवन घालविण्यापेक्षां मित्रांच्या संगतीत गमतीत दिवस घालविणेच मला जास्त आवडते."

हसन अशा तऱ्हेने गप्पात रंगला असतां खलीफांनी एका पेल्यात पेय ओतून त्यांत भूल येणारे औषध हसनच्या नकळत घातले व त्याला तो पेला दिला. हसन ते पेय प्याल्याबरोबर बेशुद्ध होऊन पडला.

खलीफांनी खूण केल्याबरोबर त्यांच्या बरोबरच्या गुलामाने हसनला उचलले आणि त्याला घराबाहेर घेऊन गेला. त्याच्या पाठोपाठ खलीफा पण बाहेर आले. परंतु या खेपेस त्यांनी विशेष काळजीपूर्वक हसनने सांगितल्याप्रमाणे दार बंद केले.

खलीफा व हसनला उचलून घेऊन जाणारा गुलाम दोघे गुप्तद्वाराने खलीफांच्या खास दालनात येऊन पोचले. खलीफांनी मागल्या खेपेसारखे आपले कपडे त्याला घालायला सांगून त्याला आपल्या पलंगावर झोपविले. मंसूरला बोलावून पहाटेच्या नमाजापूर्वी उठविण्यास सांगून ते स्वतः शेजारच्या खोलीत जाऊन झोपले.

दुसऱ्या दिवशी पहाटे मंसूरने खलीफांना जागे केले. खलीफा हसन झोपला होता



त्या खोलीत गेले. हसन घोरत पडला होता. त्याला कोणी उचलून नेले असते तरी कळले नसते. हसनने मागच्या खेपेस ज्या ज्या खोलीत ज्या ज्या तरुण मुलींना पाहिले होते त्या सर्वांना खलीफांनी बोलवून आणायला सांगितले. त्यांनी वाद्ये वाजविणारींना आणि गाणारींणींना बोलावून त्यांना यथास्थानी बसायला सांगितले. त्यांनी काय काय करायचे हे त्यांना सांगून आणि हसनला शुद्धीवर आणण्यासाठी एक विशिष्ट औषध हुंगविण्यास सांगून खलीफा स्वतः आड लपून बसले.

औषध हुंगवल्याबरोबर हसन शुद्धीवर आला. त्याच वेळी दिव्य संगीत सुरू झाले.

काही वेळ डोळे मिटूनच हसन ते संगीत ऐकत राहला. नंतर त्यानं डोळे उघडून एकदा चारीबाजूला पाहिले. त्याने मागे पाहिलेलीच खोली, तोच पलंग बिछाना, तीच शोभा, नक्षी वगैरे होती. आणखी आश्चर्य म्हणजे त्याच्या चारी बाजूला त्याच तरुण मुली होत्या. त्याने उठून बसून डोळे चोळले व पुन्हां पाहिले.

गाणे बंद झाले. खोलीत सर्व मुली डोळे जमिनीकडे करून उभ्या राहल्या. "हसन, वेडया मुला,। पुन्हां तेच दृश्य रे! आज हा स्वर्गिक आनंद, उद्यां चाबकांचा मार, हातकडयाबेडया आणि अंधार कोठडी. म्हाताऱ्या, पुन्हां तू दार बंद केल्याशिवाय निघून गेला होतास का रे? नरकात टाकले पाहिजे तुला [illegible] टाकले पाहिजे एकेकाला. ह्या दुष्टांच्या गावावर नांगर फिरविला पाहिजे." हसन मोठमोठ्याने ओरडू लागला आणि त्याने कित्येकदा डोळे बंद करून पुन्हा उघडून पाहिले. नंतर तो मनातल्या मनात विचार करू लागला–"अरे दुर्दैवी पोरा? डोळे मिटून पडून रहा. सैतान तुला सोडीपर्यंत डोळे उघडू नकोस. या मुलींकडे तू वांकडया नजरेने पाहिलेस म्हणजे तुझी जी गत होईल ती तुला माहीतच आहे." असे म्हणत चादर तोंडावरून पांघरून घेऊन त्याला छान झोप लागली आहे हे दाखविण्यासाठी घोरण्याचे सोंगदेखील त्याने केले. हे सर्व पडद्याआड बसून खलीफा पहात [illegible] येत होते.

पण हसनला अशी झोप येणे शक्य आहे का? एक सुंदर मुलगी त्याच्याजवळ येऊन त्याला गोड शब्दात म्हणाली–"सरकार! नमाजाची वेळ झाली.

"चालती हो, सैतान!" असे पांघरुणाच्या आंतूनच हसन म्हणाला.

हसनने पांघरुणाबाहेर तोंड काढून तिच्याकडे एकदाच पाहिले. गन्ना दासी शेजारी अंथरुणावर बसलेली होती. बाकी सर्व तरुण मुली रांगेत उभ्या होत्या. त्या सर्वांची नावे हसनला माहिती नव्हती.

"तुम्ही कोण आणि मी कोण?" हसनने त्यांना विचारले.

सर्वांनी एकदम एका स्वरात उत्तर दिले–"आपण आमचे सरकार खलीफा हारुनुल रशीद!"

"तुम्ही सर्व एका स्वराने खोटे बोलता आहां! मी अबू अल हसन नाही का?" हसनने त्यांना विचारले.

"क्षमा करावी आमच्या उमटपणाबद्दल! आपण आमचे मालक, सरकार आहां!" त्या एका स्वरात म्हणाल्या.

तो गन्ना दासीकडे वळून म्हणाला– "ए पोरी, माझा हा कान जरा चाव पाहू."

गन्नाने कान खूप जोराने चावला. हसन खूप मोठ्याने ओरडला–"होय! मीच हारुनुल रशीद!"





पुन्हा गायन सुरू झाले. सर्व मुली हातात हात घालून हसनच्या पलंगाभोवती 'थय थय' नाचू लागल्या. हसन स्वतःला आवरू शकला नाही. खाकेत कुशी घेऊन तोदेखील नाचू लागला.

खलीफा खदखदां हसत स्वतःला आवरू शकले नाहीत आणि पडद्याआडून बाहेर येऊन हसनला म्हणाले—"कमाल केलीस रे हसन ?"

नृत्य एकदम बंद झाले. सर्व मुली बाहुल्यांसारख्या जागच्या उभ्या झाल्या. चहूंकडे एकदम शांत झाले. सर्वांबरोबर हसन देखील चकित होऊन जागच्या जागी उभा राहिला. खलीफांना पाहताच तेच म्हातारे व्यापारी होते हे त्याला आठवले. क्षणार्धात वीज चमकून जावी तसे त्याला सर्व आठवले.

त्याला खलीफांनी आपल्या करमणुकी-साठी नाचविले होते हे कळले असूनही त्याला काहीच न कळल्याचे सोंग करून तो खलीफांवर जणू मारायला धावत [illegible] मी काय करीन माहीत आहे का तुला म्हाताऱ्या ?"

खलीफा जोर जोराने हसत हसनला आपल्या बाहुपाशात आवळीत म्हणाले—"भाई! तू जितके कष्ट सहन केलेस त्याबद्दल तुझ्या मनात जी इच्छा होती ती पूर्ण करण्यासाठी तुला मी माझ्या नातेवाइकांच्या मालिकेत स्थान देण्याचे ठरविले आहे."

नंतर खलीफांनी आपल्या वस्त्रांतील काही उत्तमोत्तम वस्त्रे निवडून ती हसनला अंगात घालायला दिली आणि त्याचा सत्कार करून म्हणाले—"माग! तुला काय हवे ते माग, मी द्यायला तयार आहे!"

हसनने खलीफांना लवून मुजरा केला आणि म्हणाला—"मी जिवंत असेपर्यंत आपल्या छत्रछायेत आपला दास म्हणून राहण्यास मिळाले तरी मी आपले थोर भाग्य समजेन."

(पुढल्या अंकात संपूर्ण)



# निरुपयोगी अष्टावक्र

फार पूर्वीची गोष्ट आहे, कलिंग देशाचा राजा धीरसिंह हा एका भयंकर चर्मरोगाने आजारी पडला. पुष्कळ औषधोपचार करून ही आजार कमी होण्याऐवजी वाढतच गेला. तेव्हां दरबारी वैद्य राजाला म्हणाला—"महाराज! एक रामबाण औषध आहे. ते औषध म्हणजे एखाद्या निरुपयोगी माणसाचे रक्त काढून आपल्या शरिरात सोडायचे. त्याच्याशिवाय हा आजार दूर होणे अशक्यच आहे."

राजाचे नोकर अशा एका निरुद्योगी अगदी निरुपयोगी माणसाला शोधून घेऊन आले. त्याचे नाव अष्टावक्र असे होते. त्याला कोणतेही काम करतां येत नव्हते. त्याला नुसते पाहून त्याच्या आईबापांना, कोणत्या पापाचे फळ भोगावे लागते आहे, कोण जाणे, असे वाटे.

राजाने अष्टावक्रला जवळ आलेला पाहिले व तोंड फिरवून बसला. त्याला अष्टावक्र म्हणाला—"मला अगदी निरुपयोगी ओझे समजून माझे आईबापसुद्धां तोंड फिरवून बसत. पण आतां मी उपयोगी ठरलोच, किंबहुना एका भयंकर रोगाला माझ्या रक्ताशिवाय दुसरे औषध नाही, म्हणे." ते ऐकून राजाने अष्टावक्रला सोडून द्यायला सांगितले व एका गरिबाला दुःखी केल्याबद्दल वैद्याला रागावून म्हणाला—"दुसरे एकादे औषध सांगा, वैद्यबुवा !"





# राणी-दासी

वैशाली नगरीत हिरादत्त नावाचा एक श्रीमंत मनुष्य रहात असे. त्याला फार उशिरां म्हणजे चाळीसाव्या वर्षी एक सोन्या सारखी सुंदर मुलगी झाली. हिरादत्तला अपरंपार आनंद झाला.

परंतु एकाएकी आकाश कोसळल्यासारखे झालें. एकदां उकडत असल्यामुळे मुलीला तिच्या पाळण्यासकट बाहेर उघड्यावर ठेवण्यात आले असतां एका घारीने झडप मारली आणि मुलीला तिच्या कपड्यां-पांघरुणासह उचलून घेऊन गेली. घारीची शिकार करून मुलीला शोधून आणून देणारास हिरादत्तने एक फार मोठे बक्षिस जाहीर केले. परंतु सर्व प्रयत्न फुकट गेले.

खरी गोष्ट अशी होती की मुलीला उचलून घेऊन जाणारी घार नव्हती. शाप लागल्यामुळे इहलोकात विहार करणारी ती एक यक्षिणी होती. पक्षीरूप घेऊन आकाशात विहार करीत असता तिला हिरादत्तची मुलगी दिसली. मुलीचे रूप पाहून तिला स्वतःच्या मुलीसारखे वाढवावे असे यक्षिणीला वाटले.

यक्षिणीने तिला वाढविले म्हणून त्या मुलीचे नाव शकुंतकुमारी पडले. ती यक्षिणीच्या देखरेखीखाली अनेक गोष्टी शिकली आणि तिला सोळावे वर्ष लागले तेव्हां ती एक अप्रतिम सुंदर दिसू लागली.

एकदां ती यक्षिणी शकुंतकुमारीला म्हणाली—"बाळ! मला लागलेल्या शापाचा अवधी संपत आला आहे. आतां मला आमच्या यक्षलोकात जावे लागणार. देवाने तुला सुंदर रूप आणि बुद्धिचातुर्य पण पुष्कळ दिले आहे. कोणी राजकुमार तुझ्याशी लग्न करून घ्यायला तयार होईल. तू या वाटेने सरळ जा, म्हणजे तू तुझ्या आईवडिलांच्या वैशाली नगरी पोचशील. आईवडिलांच्या संमतीने योग्यवर शोधून तू लग्न कर आणि मी शिकविलेल्या सर्व विद्यांचा जरूरीप्रमाणे उपयोग करून सुखी हो." असे सांगून यक्षिणी यक्षलोकीं निघून गेली.

शकुंतकुमारी जंगलातच लहानाची मोठी झाली असली तरी सुसंस्कृत लोकांत वाग-ण्याची पद्धत तिला यक्षिणीने शिकविली होती. म्हणून सुसभ्य समाजात पाऊल टाकण्यास तिला मुळीच त्रास झाला नाही. ती वैशाली नगरीकडे निघाली.

जंगलातून जात असतां तिला एका जागी एक अत्यंत सुंदर राजवाडा दिसला. त्या वाड्यात हत्ती, घोडे, द्वारपालक, दासदासी—सर्व घोरत पडलेले होते. म्हणून ती सरळ आत एका शैयागृहात गेली.

तेथे एक अत्यंत सुंदर राजकुमार एका हस्तीदंती पलंगावर झोपलेला होता. त्या खोलीत भिंतीला त्या राजकुमाराचे एक चित्र टांगलेले होती. परंतु चित्रात त्याच्या गळ्यात एक रत्नहार होता. पण तो झोपला असतांना त्याच्या गळ्यात तो नव्हता. तेथे जवळच एक पेटीत तो हार होता. तो हार आणि राजकुमाराची झोप याचा नक्कीच काही तरी संबंध असावा, असे शकुंतकुमारीला वाटले. म्हणून तिने तो हार उचलून त्याच्या गळ्याजवळ नेला



मात्र राजकुमार झोप मोडल्यासारखी हाल-चाल करू लागला. म्हणून शकुंतकुमारीने चटदिशी हात मागे घेऊन तो हार पुन्हां पेटीत जागच्या जागी ठेवून दिला.

नंतर तिने विचार केला की तिच्या तोंडावर आणि कपड्यावर साचलेली धूळ धुवून टाकावी. म्हणून ती आंघोळ करण्याचे मनाशी ठरवून नेसायला कोठे चांगले पातळ व पोलके मिळते का पाहण्यासाठी एका खोलीत गेली. तिला मनासारखी साडी पोलके मिळाले ते घेऊन ती शेजारच्या सरोवरात स्नानाला गेली.

सरोवराच्या वाटेवर तिला रडके उदास तोंड करून जात असलेली एक खुजी दिसली.

श्री पी. सी. सरकार, जादुगार

शकुंतकुमारीने तिला विचारले–"का ग, अशी कां बसली आहेस?"

ती म्हणाली–"माझे नशीब फुटके! माझ्या नवऱ्याने मला घराबाहेर हाकलून लावले. माझे रूप असे आहे ना! या जंगलात वाघ वगैरे रानटी जनावरे आहेत ना. त्यांची भीती वाटते मला."

"तू तसे भिण्याचे काहीच कारण नाही. तू या वाटेने जा तुला एक राजवाडा दिसेल. तू आत जाऊन बस. मी आलेच आंघोळ करून परत." असे सांगून शकुंतकुमारीने तिला वाट दाखविली.

ती खुजी बाई राजवाड्यात राजकुमाराच्या खोलीतच सरळ जाऊन पोचली. तिचे लक्ष भिंतीवरच्या चित्राकडे व झोपलेल्या [illegible] त्याच्या गळ्यात हार न पाहून शकुंतकुमारीसारखेच हार व राजकुमारी यांचा परस्पर काही संबंध असावासे तिला वाटले.

तिने तो हार राजकुमाराच्या गळ्याला लावल्याबरोबर राजकुमार स्वप्नातून जागा झाल्यासारखा उठून बसला व त्या खुज्या स्त्रीचे आभार मानून म्हणाला–"तू माझा उद्धार केला आहेस. आतां मी तुझ्याशी लग्न करायला तयार आहे. मला तू पुनर्जन्म दिला आहेस. या उपकाराची फेड मी करावी म्हणतो."

ती खुजी स्त्री म्हणाली–"मी तरी एक राजकन्याच आहे. माझी दासी स्नानाला गेली आहे. थोड्याच वेळाने येईल."



खुजीने [illegible] शकुंतकुमारी स्नान करून आल्यावर राजकुमाराला ती दासी असावीशी वाटले. पण तिचे रंगरूप पाहून त्याला आश्चर्य वाटल्याशिवाय राहिले नाही की ही खुजी राजकन्या कशी आणि ही रूपवती दासी कशी?

शकुंतकुमारीने परत आल्यावर राजकुमार जागा असल्याचे पाहिले व ती फसल्याचे तिला कळले. ती राणी होणार होती आणि दासी झाली. खुजी तिला पाहताच राजकुमाराला म्हणाली–"ती पहा, माझी दासी!"

शकुंतकुमारीने खुजीवर खूप राग काढला आणि घडलेली गोष्ट राजकुमाराला सांगितली.

राजकुमार म्हणाला–"तुम्हा दोघात राणी कोण आणि दासी कोण हे मला नाही माहीत. मला पुनर्जन्म हिच्याकडून मिळाला. हिचे ऋण फेडणे माझे कर्तव्य आहे."

"परंतु मला हिने फसविले आहे. मी राणी आहे व ही खुजी दासी आहे, हे सिद्ध करून दाखविणे तितकेसे कठीण नाही. 'राणी' आणि 'दासी' अशा मी निरनिराळ्या चिठ्ठ्या तयार करून देते. नंतर डोळे मिटून चिठ्ठ्या उचलते. ज्या चिठ्ठ्या मी उचलीन त्यावरून मी राणी की दासी हे कळेल." शकुंतकुमारीने उपाय सुचविला.

राजकुमाराने तशी परीक्षा करून पाहण्यास होकार दिला.



नंतर शकुंतकुमारीने काही चिट्ठ्या तयार केल्या. त्यांच्या वर 'राणी' व 'दासी' अशी निरनिराळी नावे लिहून त्या चिट्ठ्या एका पेटीत ठेवून दिल्या. नंतर डोळे मिटून तिने एकेक चिठ्ठी काढली. तिने काढलेल्या सर्व चिट्ठ्यांवर 'राणी' लिहिलेले होते. उरलेल्या सर्व चिट्ठ्यांवर 'दासी' लिहिलेले होते.

ते पाहून खुजी बाई थरथर कांपू लागली व ती खोटे बोलली होती हे तिने कबूल केले. शकुंतकुमारीने तिला क्षमा केली व आपली दासी म्हणून ठेवून घेण्याचे कबूल केले. राजकुमाराचे शकुंतकुमारीशी थाटात लग्न झाले. लग्नाला वैशालीहून शकुंतकुमारीचे आईवडील आले होते. कित्येक वर्षांपूर्वी बालपणी नाहीशी झालेली मुलगी परत मिळालेली पाहून आईवडिलांना परमानंद झाला.

शकुंतकुमारीने आपली सर्व कथा आपल्या आईवडिलांना सांगितली. तिची आई [illegible] पराभव केलास हे खरे आहे. पण या चिट्ठ्या तू डोळे मिटून कशा काय बरोबर उचलल्यास? त्यांत नक्कीच काही तरी युक्ती असली पाहिजे. ती सांग!"

शकुंतकुमारी स्मित करून म्हणाली— "आई, तशी ती काही मोठी युक्ती नव्हती. सॉयिस्कर असे बेताच्या जाड पुठ्याचे चौकोनी लांब तुकडे कातरीने कापून तयार केले. त्यांच्या मध्यभागी 'राणी' लिहून दोन्ही टोकांना 'दासी' लिहिले. नंतर प्रत्येक तुकड्याचे फाडून सारखेसारखे तीन तीन तुकडे केले. 'राणी' लिहिलेल्या तुकड्यांच्या दोन बाजू खडबडीत होतात तर 'दासी' लिहिलेल्या तुकड्यांना एक बाजू खडबडीत व एक छान कातरलेली होते. म्हणून 'राणी' लिहिलेले तुकडे दोन खडबडीत बाजूंवरून ओळखणे सोपे होते. खुजीने मला फसविले म्हणून मी तिला फसविले."





# मेहनतीचे फळ

गोविंदपुर नावाच्या गावी गोपू नावाचा एक शेतकरी रहात असे. त्याचा स्वभाव थोडा तापट होता. परंतु घाम गाळून मेहनत करणारा कोणी नोकर असला की तो त्याचा फार आदर करी.

गोपूने आपल्या शेतावर काम करण्यासाठी सोमू व श्यामू नावाच्या दोघां गरीब तरुण मुलांना नोकर म्हणून ठेवले. सोमू कंबर मोडून काम करणारा इमानदार मेहनती नोकर होता तर श्यामू त्याच्या अगदी उलट आळशी लबाड होता.

गोपूने आपल्या शेताची वांटणी करून दोघांना काम करायला सांगितले. दोघे दुसऱ्या दिवशी उजाडताच बैल व नांगर घेऊन शेतावर गेले. सोमू वेळ न घालविता काम करू लागला. श्यामू मात्र झाडाखाली पडून झोपत राहिला. संध्याकाळच्या सुमारास सोमू आपले बैल घेऊन तळ्यावर गेला. बैलांना स्वच्छ धुवून काढून त्याने स्वत:च्या अंगावरचा चिखल सुद्धा स्वच्छ धुवून काढला. त्याच वेळी श्यामू आला व त्याने बैलांच्या व आपल्या अंगावर चिखल फासून घेतला आणि सोमूच्या आधीच घरी परत आला. श्यामूला पाहून गोपूला त्याने खूप मेहनत करून काम केल्यासारखे वाटले व त्याने आपल्या बायकोला बोलावून त्याला पोटभर जेवायला वाढायला सांगितले.

त्याच सुमारास सोमू बैलांना घेऊन आला. बैलांच्या अंगाला किंवा सोमूच्या अंगाला धूळ किंवा चिखल काहीच दिसला नाही. ते पाहून याने मुळीच काम केले नाही असे त्याला वाटले.

गोपूच्या बायकोने सोमूला बेताचे जेवायला वाढले. असे कित्येक दिवस चालू होते.

गोपूची मुलगी कमला हुशार मुलगी होती. नोकर जेवायला बसले म्हणजे सोमूला

श्री गो. स. देसाई



शेताचे व श्यामूला 'ओ' येईपर्यंत आई बाढते हे ती दररोज पाही. नोकरांना ओळखण्यात बाबा चुकले तर नाहीत, अशी एक अंधुक शंका तिच्या मनात आली. मनातली शंका दूर करून घेण्याच्या हेतूने कमला एक दिवशी शेतावर गेली. सोमू शेतात काम करीत होता तर श्यामू दूर झाडाखाली घोरत पडलेला दिसला.

बापासारखाच कमलाला मेहनती मजूर आवडे. तिने सोमूला हाक मारून त्याची विचारपूस केली आणि त्याचे काम पाहून तिला फार आनंद झाला. श्यामू अंगाला चिखल फासून दररोज कसा फसवितो हे तिला कळले.

घरी आल्यावर ती आपल्या बापाला म्हणाली–"बाबा! अहो शेतात सर्व काम एकटा सोमूच करतो. श्याम झाडाखाली घोरत पडलेला असतो. घरी येताना मात्र अंगाला चिखल फासून येतो. त्याला पाहून तुम्हाला वाटते की खूप मेहनत करून येतो आहे बिचारा आणि डोळे मिटून तुम्ही त्या बैलाला पोसता आहां. या उलट सोमू इतकी मेहनत करतो आहे तर त्याला पोटभर जेवायला सुद्धा मिळत नाही.

संध्याकाळी श्यामू अंगभर चिखल फासून घरी आल्यावर गोपून त्याला विचारले–"काय रे, तू शेतात मुळीच काम करीत नाहीस आणि चिखलमाती मात्र खूप फासून येतोस? ही फसवेगिरी माझ्याजवळ नाही चालायची!"

"मालक! कोणी तरी माझ्याविरुद्ध खोटी कागाळी केली आहे सांगाल का कोणी आपणांला सांगितले ते?" श्यामूने विचारले.

तेवढ्यात सोमू पण शेतावरून परत आला. त्याला गोपून विचारले–"काय रे सोमू? हा श्यामू शेतात काम करतो का?"

"मी नाही पाहिले मालक त्याला काम करताना." सोमू म्हणाला

"मग तू इतके दिवस ही गोष्ट मला कां नाही रे सांगितलीस?" गोपूने विचारले.

"मालक, आपण विचारले नाही, म्हणून मी सांगितले नाही. त्याच्यावर नजर ठेवायला आपण कधी सांगितले होते का?" सोमूने विचारले.

गोपू श्यामूकडे वळून म्हणाला–"श्यामू! तुझी ही फसवेगिरी माझी मुलगी कमला स्वत:च्या डोळ्यांनी पाहून आली आहे!"

श्यामू थोडादेखील न घाबरता म्हणाला–"मालक! बोलू नये ते मला बोलावे लागणार आहे. प्रथम माफ कराल तरच बोलेन."

"बोल, बोल! काय सांगायचे ते!" गोपू म्हणाला.

खरी गोष्ट अशी आहे मालक, आपल्या मुलीला सोमूजवळ सलगी करून बोलताना मी पाहतो. पण मालकासमोर कसे बोलायचे म्हणून मी कधी तोंड उघडले नाही. मी त्यांच्या विरुद्ध काही बोललो तर बिंग बाहेर पडेल म्हणून दोघांनी हे कारस्थान केले आहे." श्यामू म्हणाला.

गोपू स्वभावाचा तापट होताच. मागेपुढे त्याने काही पाहिले नाही आणि सोमूला एक काठी घेऊन झोडपून काढले. नंतर कमलाला म्हणाला–"पुन्हा कधी तुला शेताकडे वळलेली पाहिली की तंगडाच तोडीन, लक्षात ठेव!"

त्या दिवशी सोमूला जेवायला वाढू नकोस असे त्याने बायकोला बजावून सांगून ठेवले.

त्याने मारलेली थाप फुकट न गेल्याचे समाधान श्यामूला झाले.





श्यामूने सर्व खोटे सांगितले होते. परंतु तेवढ्याने कमलाचे मन बिलकुल पालटून गेले. सोमूच्या विषयी तिच्या मनात प्रेमांकुर नव्हता तो रुजला व त्याबरोबर दया व सहानुभूति उत्पन्न झाली. त्यादिवशी रात्री कोणाला काही सांगितल्याशिवाय ती जेवण घेऊन सोमू झोपला होता तेथे गेली आणि त्याला तिने जेवून घ्यायला सांगितले. नंतर परत येऊन रात्रीच तिने आईला सोमू खरा असल्याचे व श्यामू लबाड असल्याचे पण सांगितले आणि म्हणाली–"बाबा! त्याच्या बोलण्यावर विश्वास करून मला वाटेल ते बोलले आणि सोमूला विनाकारण त्यांनी बडविले."

विश्वास बसला. मुलगी कधी तिच्याजवळ खोटे बोलली नव्हती. दुसऱ्या दिवशी दोघे नोकर कामावर निघून गेल्यावर ती नवऱ्याला म्हणाली–"तुम्ही दोघां नोकरांना काम वांटून दिलेत आणि मी दररोज त्यांना खायला घालते. कोणी किती काम केले आहे, एकदां पाहून नको का यायला?"

बायकोने सांगितलेली गोष्ट गोपूला पटली. तो त्याप्रमाणे दुपारच्या सुमारास शेतावर गेला. सोमू स्वतःच्या शेतात लक्षपूर्वक काम करीत होता. श्यामू झाडाखाली घोरत पडला होता. मुलीने सांगितले ते अक्षरशः खरे दिसले त्याला. आपण केवढी मोठी चूक केली. एका गरीब निरपराध नोकराला मारले. चोराला सोडून संन्याश्याला बडविले.

गोपू पश्चात्ताप करीत घरी परतला आणि आपली चूक बायकोजवळ कबूल करून म्हणाला–"या चूकीचा सुधार कसा काय करायचा, सांग, पापाचे प्रायःश्चित्त झालेच पाहिजे!"

"मी आता काय सांगू? तुम्हीच घाईत काही तरी करून बसता आणि मग पश्चात्ताप करीत बसावे लागते. सोमू आपल्या घरच्या माणसासारखा आहे.

तुम्ही एवढे मारलेत, पण उलट एक शब्ददेखील तोंडाबाहेर काढला का त्याने? आपल्याला मुलगा नाही. मुलीला कोठे तरी पाठवावी लागणार. त्यापेक्षा सोमूशी लग्न करून देऊ म्हणजे मुलगी घरी राहील व घरजांवई मिळेल!"

बायकोने सुचविले ते ऐकून गोपूच्या मनाचे समाधान झाले. संध्याकाळी दोघे नोकर घरी परत आले तेव्हां गोपू श्यामूला म्हणाला–"अरे, आज आतां तू सोमूला तेल लावून चांगली मालीश कर आणि त्याला ऊन पाण्याने आंघोळ घाल!"

"काय म्हणता? मी तेल लावून मालिश करू म्हणता? एवढा दमून भागून आलो आहे. मला नाही होणार हे काम!" श्यामू म्हणाला.

"तोंड बंद कर, नाही तर दांत पाडीन. मी सांगितले ते मुकाट्याने कर." गोपू दरडावून म्हणाला.

श्यामू मालकाचा आवाज ऐकून घाबरला व मुकाट्याने त्याने सांगितल्याप्रमाणे सोमूला तेल लावून आंघोळ घातली. सोमूला ते सर्व काय चालू आहे, कळेना.

आंघोळ वगैरे झाल्यावर गोपूने सोमूला घरात बोलाविले आणि आपल्या बरोबर जेवायला बसायला सांगितले. सोमू त्याच्याकडे घाबऱ्या नजरेने पहात असलेला पाहून गोपू म्हणाला–"अरे असा चकित होऊन काय पाहतो आहेस? अरे, तू जांवई होणार आणि असे घाबरून कसे रे चालेल?"

हळूहळू सर्व परिस्थिति सोमूच्या लक्षात आली.

नंतर सुमुहूर्तावर सोमू व कमला दोघांचा विवाह समारंभ मोठ्या थाटाने पार पडला.

श्यामूचे डोळे उघडले. मेहनतीचे फळ मिळाल्याशिवाय रहात नाही. तेव्हांपासून तो अंग मोडून काम करू लागला. त्याच्यात झालेला बदल पाहून गोपूने त्याचा पगार वाढविला.





# रानटी असभ्य

फार पूर्वी बगदाद येथे अहमद नामक खलीफांचे राज्य होतें. अनेक देश जिंकून आपले साम्राज्य सर्व पृथ्वीवर व्हावे असे त्याला वाटे. त्याला मेहेर नावाची एक मुलगी होती. तिला बापाची ही राक्षसी महत्वाकांक्षा मुळीच आवडत नसे. बापासमोर बोलण्याची छाती तिला होत नव्हती.

खलीफाने मुलीचे लग्न करण्याचे ठरविले, ते ऐकून कित्येक तरुण सुलतान व शाहजादे यांच्यात खलीफांच्या मुलीशी लग्न करण्यास जणुकांही चढाओढच सुरु झाली.

मेहेर आपल्या वडिलांना म्हणाली– "बाबा! मी आपल्या आज्ञेबाहेर नाही. परंतु माझी एक विनंती आहे. माझ्याशी लग्न करण्याची इच्छा असणाऱ्या तरुणाने माझ्या एका प्रश्नाचे समाधानकारक उत्तर दिले पाहिजे." खलीफाने ती अट मान्य केली व तसे जाहीर केले.

मेहेरने विचारलेल्या प्रश्नाचे बरोबर उत्तर न देऊ शकल्यास मान खाली होईल असे वाटून बहुतेक सर्व तरुणांनी तिच्याशी लग्न न करण्याचा निश्चय केला. परंतु रजाक नांवाचा एक तरुण राजकुमार मेहेरच्या प्रश्नाचे उत्तर द्यायला तयार झाला.

सर्व वडीलधाऱ्या मंडळींसमक्ष मेहेरने रजाकला प्रश्न विचारण्यापूर्वी संदर्भ कळावा म्हणून गोष्ट सांगायला सुरवात केली.

"पूर्वी कधी इजिप्त देशात अब्दुल समद नांवाचा बादशाह राज्य करीत असे. आपले साम्राज्य वाढविण्याची महत्वाकांक्षा त्याच्या मनात होती. म्हणून त्याने आपले सैन्य वाढविले आणि एका मागून एक देश जिंकण्यासाठी निघाला. आफ्रीका खंडातले अनेक सुलतान त्याचे मांडलिक व्हायचे कबूल करून खंडणी देऊ लागले.

"परंतु अब्दुलचे वर्चस्व मान्य करण्यास तयार नसलेला बेट्सूफा नावाचा एक सुलतान होता. तो अब्दुलशी युद्धास तयार झाला. त्याचे राज्य डोंगराळ प्रदेशात होते आणि त्याचे सैनिक म्हणजे रानात राहणारे रानटी जातीचे लोक होते. ते झाडीतून दऱ्याखोऱ्यातून येऊन छापामारीत व अब्दुलच्या सैन्याला 'त्राहित्राहि' करून सोडीत. समोरासमोर युद्धाला न कधीच उभे रहात नसत.

"खरोखर पाहिल तर बेट्सूफाचे राज्य जिंकून अब्दूलला काही फायदा नव्हता. परतु एका सामान्य सुलतानाने आपले वर्चस्व न मानन आपणास आव्हान करावे हे अब्दुलला मळीच मान्य नव्हते. म्हणून त्याने आपल्या सैन्याला सर्व जंगल छाटून आग लावून टाकण्यास सांगितले.

"सर्व जगली प्रदेश उघडा वृक्षहीन झाल्यावर बट्सूफाला समोरासमोर युद्ध करण्याव्यतिरिक्त उपाय उरला नाही. त्यात हाजप्तच्या सैन्याला जय मिळाला. बेट्सूफाच्या सैन्याची कत्तल झाली आणि प्रेतांचे ढीग जागोजागी पडले.

"बट्सफा जिवत अगर मृतावस्थेत कोठे सापडेल या विचाराने अब्दुलने सर्व प्रेताचे ढीग ढुडकन पाहिले. एकाएकी प्रेताच्या



एका ढिगातून एक काळी भयकर आकृती उभी राहली आणि श्र अतरिक्षाकडे पाहू लागली.

"हा कोण बुवा' असे अब्दुलने आपल्या सेनापतीला विचारले.

"तो म्हणाला–आफ्रिकेतील जंगलात नरमांसभक्षक रानटी जातीचे लोक राहतात. हा त्यांच्याच पैकी कोणी प्रेते फाडून खायला आला असावा.'

"अब्दुलने त्या नरमासभक्षकाला विचारले–'काय रे, तुला हवी तितकी प्रेते येथे पडलेली आहेत ती उचलून घेऊन जाण्या ऐवजी तू असा प्रतामध्ये उभा राहून दूर अंतरिक्षाकडे पाहता आहेस?'

“या सर्वांना खाण्यासाठी ठार करणारा रानटी राक्षस कोण आहे, हे पहात होतो. मला तर एकच एक प्रेत लागते. त्याला विचारून प्रेत घेऊन जायला नको का?” असे तो भयंकर काळी आकृतीवाला म्हणाला.

अब्दुल, खूप जोराने हसून म्हणाला– ‘या सर्वांना ठार करणारा हा काय मी उभा आहे तुझ्यासमोर! पण खायला नव्हे.’

“तो काळी आकृतीवाला चकित होऊन विचारू लागला–‘खायला नाही, तर तू इतक्याजणांना कशासाठी ठार केलेस?’

सुलतान ते ऐकून आपल्या सेनापतीला म्हणाला–‘पाहिलेस, आहे की नाही रानटी माणूस! याला समजावून सांगणे आपल्याला शक्य आहे का?”

“तो काळी आकृतीवाला खदखदां हसत तेथून दूर निघून गेला.”

येथवर गोष्ट सांगून मेहेरनें रजाकला विचारले–“तो काळी आकृतीवाला खदखदां कां बरे हंसला असावा?”

[illegible] म्हणाला– रानटी जातीचा म्हणून मानला जाणारा तो काळी आकृतिवाला असभ्य माणूस भूक लागल्याशिवाय माणसाला ठार करीत नाही. परंतु आपल्याला सभ्य म्हणविणारा अब्दुल फक्त मुलुख जिंकण्याच्या महत्वाकांक्षेने सहस्रावधि माणसांची कत्तल करतो. या दोघामध्ये खरा सभ्य कोण व असभ्य राक्षस कोण हे ओळखणे कोणाला ही अशक्य आहे का, असा विचार करून तो काळी आकृतिवाला हसला.”

रजाकने दिलेले उत्तर समाधानकारक असल्याचे मेहेर त्याला म्हणाली. त्या दोघांचे यथासमयी लग्न झाले.

मेहेरने सांगितलेली गोष्ट ऐकून व तिने विचारलेल्या प्रश्नाचे रजाकने दिलेले उत्तर ऐकून मेहेरच्या बापाचे मन पालटले. त्याने आपल्या मनातली राक्षसी महत्वाकांक्षा काढून टाकली. अशा तऱ्हेने मेहेर चातुर्याने आपल्या बापाच्या मनात पालट घडविण्यास यशस्वी झाली.





# महाभारत

कृष्ण द्वारकेला निघून गेल्याबरोबर उपप्लाव्य येथे धर्मराज आणि विराट राजा युद्धाच्या तयारीला लागले. विराट राजाने व द्रुपदाने सर्व राजांकडेसंदेश पाठविले. संदेश मिळाल्यावर अनेक राजे व महाराजे पांडवांवर त्यांचे जे प्रेम होते त्यामुळे म्हणा किंवा द्रुपद व विराट राजाविषयीं त्यांच्या मनात जो आदर होता त्यामुळे म्हणा, उपप्लाव्य नगरी येऊ लागले.

इकडे युद्धाची तयारी चालू असल्याचे कळल्यावर धृतराष्ट्राच्या दुर्योधनादि मुलांनी देखील आपापल्या नातेवाईक राजांकडे व मित्रमंडळींकडे संदेश पाठवायला सुरवात केली. अशा तऱ्हेने कौरवपांडवांमध्ये होणाऱ्या भावी युद्धासाठी देशभर हालचाली सुरू झाल्या. मोठमोठ्या सैन्यांच्या पदाघाताने सारी पृथ्वी हादरून गेली.

मध्यंतरी द्रुपद राजाने आपल्या पुरोहिताला कौरवांकडे शिष्टाईसाठी पाठविण्याचे ठरवून त्याला सर्व गोष्टी नीट समजावून सांगितल्या. म्हणाला–“मित्रा! तू हुशार व शाहणा आहेस. धृतराष्ट्र आणि धर्मराज दोघांना तू चांगला ओळखतोस. कौरवांनी पांडवांना कसे फसविले हे तुलाच काय, धृतराष्ट्राला पण माहीत आहे. विदुराने धृतराष्ट्राला किती समजावून सांगितले की हे द्यूत खेळणे हिताचे नाही, परंतु आपल्या मुलांच्या हट्टाला बळी पडून त्याने द्यूत खेळण्यास धर्मराजाला निमंत्रण पाठविले. पांडवांना कोणत्याही परिस्थितीत राज्य परत



करावयाचे नाही हे कौरवांनी मनात निश्च-पूर्वक ठरविले आहे. तेव्हां तू धृतराष्ट्राला त्याच्या कर्तव्याची जाणीव करून दे. या कामी विदुराची तुला मदत मिळेल. तू पांडवांच्या न्याय्य हक्काची व जाणीव कौर-वांच्या पक्षातील लोकांना करून होऊन युद्ध करणे बरोबर होईल की नाही याविषयी त्यांच्या मनात द्विधा उत्पन्न करणे तुझे पहिले कर्तव्य आहे असे समज. तुला दुर्योधनाची भीती वाटण्याचे कारण नाही. कारण राजदूत हा अवध्य असतो. याशिवाय तुझ्या पांढऱ्या केसांचा आदर तरी तो करीलच." त्यानंतर द्रुपद राजाचा पुरोहित आपल्या शिष्य मंडळींसह हस्तिनापूरला निघाला.

दूत पाठविले परंतु कृष्णाकडे स्वत: अर्जुन गेला. हेरांकडून पांडवांच्या हालचाली विषयी कळताच दुर्योधन द्वारकेला गेला. अर्जुन व दुर्योधन एकाच दिवशी द्वारकेला येऊन पोहोचले."

दोघे कृष्णाच्या राजवाड्यात पोचले त्यावेळी कृष्ण झोपलेला होता. कृष्णाच्या डोक्याकडच्या बाजूला बसायला चांगलीशी जागा पाहून घाईघाईने दुर्योधन जाऊन बसला. दुर्योधनाच्या पाठोपाठ अर्जुन कृष्णाच्या शैयागृहात आला आणि हात-जोडून कृष्णाच्या पायाच्या बाजूला जाऊन उभा राहिला.

थोड्या वेळाने झोप मोडल्यावर कृष्णाची नजर प्रथम अर्जुनावर पडली व त्यानंतर बाजूला बसलेल्या दुर्योधनाला त्याने पाहिले. दोघांना कुशल वार्ता विचारून व यथोचित अतिथि सत्कार करून कृष्णाने येण्याचे कारण विचारले.

दुर्योधन स्मित करून म्हणाला—"कृष्णा, आमच्या दोघांचे आपसांत जे युद्ध होणार आहे त्यात तुझ्या मदतीची अपेक्षा ठेवून मी आलो आहे. तुझे आम्हां दोघांशी जे नाते आहे ते सारखेच आहे. मी प्रथम तुझ्याकडे आलो आहे. म्हणून तू मलाच मदत केली पाहिजेस!"



आधी आलास हे मान्य, पण मी पहिल्याने अर्जुनालाच पाहिले. म्हणून मी दोघांना मदत करणार आहे. तुझ्याहून अर्जुन वयाने लहान आहे, म्हणून प्रथम तोच काय हवं ते मागून घेईल. माझ्यासारखे दहा लक्ष योद्धे माझ्या सैन्यात आहेत. ते सर्व एका बाजूला व मी एकटा दुसऱ्या बाजूला. मात्र मी हातात शस्त्र धारण करणार नाही, सल्ला देईन—'गोष्टी सांगेन युक्तिच्या चार!' तेव्हां अर्जुना! तू सांग तुला काय पाहिजे?"

अर्जुनाने एकट्या कृष्णाला मागून घेतले व दुर्योधनाने आनंदाने यादव सैन्य मागून घेतले. त्यानंतर तो बलरामाकडे गेला आणि मदत करण्यास विनंती केली.

बलराम त्याला म्हणाला—"दुर्योधना, तुला माहीतच आहे, मी विराट नगरीत लग्नाला गेलो होतो तेव्हां मी तुम्हां दोघां-कडे समान दृष्टी ठेवून विचार करतो असे सांगितले होते. परंतु त्या गोष्टीवर माझे व कृष्णाचे एक मत होऊ शकले नाही. कोणत्याही पक्षाला मदत न करण्याचे मी तेव्हांच ठरविले. तुला माझ्या एकट्याच्या मदतीने मिळणार तरी काय?"

दुर्योधन बलरामा आनंदाने कडकडून भेटला व आता विजयश्री आपल्याच गळ्यात माळ घालणार असे मनातल्या मनात म्हणत



कृतवर्माकडे मदत मागायला गेला. दुर्योधनाला कृतवर्माने एक अक्षौहिणी सैन्य दिले. दुर्योधन अशा तऱ्हेने आपले काम पूर्ण झाल्याचे मानून हस्तिनापूरला आनंदाने परतला.

दुर्योधन निघून गेल्यावर कृष्णाने अर्जुनाला विचारले—"काय रे, मी शस्त्र धारण करणार नाही असे सांगितले होते तरी तू मलाच का मागून घेतलेस?"

अर्जुन म्हणाला—"कृष्णा! तू आपले एवढे मोठे सैन्य म्हणालास, परंतु त्या सैन्याला तू एकटा जिंकू शकशील हे का मला माहीत नाही? तू युद्ध केलेस आणि जय मिळविलास तर कीर्ति तुलाच मिळेल,



मला काय मिळणार? मला कीर्तीचा लोभ आहे, म्हणून तर तू शस्त्र धारण करणार नाहीस हे ऐकून मी तुला मागून घेतले. पण एक मदत मात्र तू केलीच पाहिजेस. तू माझे सारथ्य कर तू सारथ्य केलेस तर हे कौरवांचे असंख्य सैन्यच नव्हे, देवासुर एक होऊनमाझ्याशी युद्धाला आले तरी मी त्यांना जिंकू शकेन. माझी ही एवढी इच्छा पुरी कर, 'नाही' म्हणू नकोस!

"मी तुझी ही इच्छा पुरी करायला तयार आहे!" असे वचन देऊन कृष्णाने अर्जुनाला निरोप दिला

मद्र देशाचा राजा शल्य नकुलसहदेवांचा मामा होता. त्याला पांडवांनी पाठविलेला

एक अक्षौहिणी सैन्य आणि आपले महारथी पुत्र सर्वांना बरोबर घेऊन निघाला. मद्र देशाचे वस्त्रालंकार, वाहने व रथ सर्व दिसायला गमतीदार होते.

शल्य पांडवांच्या मदतीला निघाला असल्याची गोष्ट हेरांकडून कळल्यावर दुर्योधनाने आपल्या लोकांना पाठवून तेथे शल्य ससैन्य पडाव टाकीत आला तेथे, त्याच्या उतरण्याची उत्तम सोय करून दिली. पंचपक्वान्ने तयार करवून जेवणाची उत्तम सोय केली आणि करमणुकीची पण सोय केली. शल्याचा प्रवास फार सुखाचा झाला. ही सर्व व्यवस्था धर्मराजाने आपल्यासाठी केली आहे असे समजून तो म्हणाला–"ही सर्व व्यवस्था ज्यांनी केली आहे त्यांना बोलावून घेऊन या. ते मागतील ते मी त्यांना देणार आहे."

शल्याशेजारीच गुप्तपणे बसलेला दुर्योधन समोर येऊन उभा राहिला. शल्याने त्याचा यथोचित सत्कार करून विचारले–"काय रे हवे आहे तुला? काय वाटेल ते मागून घे. मी ते देण्याचे वचन देतो."

दुर्योधन लगेच म्हणाला–"महाराज! माझ्या सैन्याचे एक सेनापतिपद आपण स्वीकारावे." शल्य होकार देत म्हणाला–"दुर्योधना! आतां तू प्रथम हस्तिनापूरला

आहे त्याच्याजवळ माझे तसे काम ही आहे त्याची भेट घेऊन व त्याच्याजवळ जे बोलायचे आहे ते बोलून मी तुझ्याकडे येतो."

"धर्मराजाला भेटून लवकर यावे महाराज! आमचा विजय आपल्याच हातात आहे." दुर्योधन म्हणाला आणि शल्याचा निरोप घेऊन हस्तिनापूरला परत आला.

त्यानंतर शल्य उपप्लाव्य नगरी पांडवांच्या शिबिरात जाऊन पांडवांना भेटला. धर्मराजाने त्याचे सर्व प्रकारे आदरातिथ्य केले. शल्य नकुलसहदेवांना प्रेमाने भेटला व जवळ बसायला सांगून धर्मराजाला म्हणाला–"ईश्वरकृपेने तुम्ही सर्व अरण्यवास पूर्ण करून सुखरूप परत आलात. त्यातल्या त्यात अज्ञानवासाचा काळ तुम्हांला फार कष्टात काढावा लागला. राज्य घालवून बसल्यावर दुःख नाही तर सुख मिळणार आहे का? कौरवांचा पराभव करून तू सुखी होशील. तुला राज्यप्राप्ती होईल. तुम्हां सर्वांना सुखी पाहून मला परमानंद झाला."

नंतर शल्याने वाटेत दुर्योधनाची व त्याची कशी भेट झाली. त्याने किती उत्तम प्रकारे त्याच्या आतिथ्याची व्यवस्था केली होती व दुर्योधनाला मदत देण्याचे कसे वचन द्यावे लागले हे देखील सांगितले.

सर्व ऐकून घेऊन युधिष्ठिर म्हणाला–"महाराज! आपण ठरविलेत त्यात काही गैर नाही. चित्त प्रसन्न करणाऱ्याची इच्छा





पूर्ण करणे हे थोरांचे लक्षणच आहे. तरी पण माझ्यावर आपण असाच एक उपकार केला पाहिजे. आपण युद्धविद्येत कृष्णासारखेच योग्य व चतुर आहां. कर्णार्जुनांचे युद्ध होईल त्या वेळी आपणास कर्णाचे सारथ्य करावे लागेल, यात मला थोडी देखील शंका नाही. कारण अर्जुनाचे सारथ्य कृष्ण करणार आहे. त्याच्या बरोबरीचे सारथ्य करू शकणारा कौरवांच्या सैन्यात आपणांशिवाय दुसरा कोणी नाही. कर्णाचे सारथ्य करीत असतां आपण अर्जुनाचे रक्षण करावे आणि कर्णाचा युद्धोत्साह भंग होईल असे काहीतरी करावे, एवढीच आपणांजवळ विनंती आहे."

इतकी काळजी करण्याचे वास्तविक काहीच कारण नाही. संधी मिळेल त्या वेळी दुष्ट कर्णाला कसा धडा शिकवायचा ते मी पाहून घेईन आणि अर्जुनाला विजय प्राप्ती मिळेल असाच वागेन."

युधिष्ठिराला व पांडवांना जे कष्ट सहन करावे लागले होते त्याविषयी सहानुभूतीचे दोन शब्द बोलून इंद्राला देखील राज्यच्युत झाल्यानंतर ज्या तऱ्हेचे करावे लागले होते त्याचे वर्णन करीत शल्य म्हणाला–

"मागे त्वष्ट प्रजापतीने इंद्राशी वैर करून त्याला जिकण्याच्या हेतूने विश्वरूप नावाच्या एका राक्षसाची सृष्टी केली. विश्वरूपाला तीन डोकी होती. या त्रिशिर राक्षसाने इंद्राला जिंकण्याचे ठरवून तपश्चर्या यशस्वी झाली तर इंद्रासन तो बळकावील या भीतीने इंद्राने त्याची तपश्चर्या भंग करण्यासाठी एकीहून एक सुंदर अशा अप्सरा पाठविल्या. परंतु विश्वरूपाची तपश्चर्या भंग झाली नाही.

तेव्हां इंद्राने स्वतः जाऊन वज्रायुधाचा प्रहार केला आणि विश्वरूपाला ठार केले. म्हणून भीती उरली नाही. परंतु थोड्याच काळानंतर इंद्रावर त्याहून मोठे एक संकट आले.



इंद्राने आपल्या मुलांचा वध केला या गोष्टीचा त्वष्ट प्रजापतीला भयंकर राग आला व त्याने वृत्रासुर नांवाच्या आणखी एका राक्षसाची सृष्टी केली. प्रलयकाळासारखा महाप्रतापी वृत्रासुर पित्याच्या आज्ञेने स्वर्गावर चालून गेला आणि त्याने इंद्राला युद्धासाठी आव्हान केले. त्याने इंद्राच्या अस्त्राची पर्वा केली नाही व इंद्राला गिळून टाकले. परंतु वृत्रासुराला जांभई आल्याबरोबर इंद्र त्याच्या पोटांतून बाहेर निघून आला आणि इंद्राशी युद्ध करण्याचा विचार सोडून पळून गेला.

त्यानंतर इंद्र सर्व देवांना बरोबर घेऊन वैकुंठलोकी विष्णूकडे गेला आणि त्याच्यावर आलेल्या संकटांतून मुक्तीचा उपाय सुचविण्यास विनंती केली.

विष्णु म्हणाला–"इंद्रा! वृत्रासुराचा वध आतांच होणे शक्य नाही. प्रथम त्याच्याशी सख्य करून घे." विष्णूने तसा सल्ला दिल्यानंतर सप्तर्षी वृत्रासुराला जाऊन भेटले व म्हणाले–"वृत्रासुरा! तुला

शकणार नाहीस. तेव्हां दोघे संधी करून घ्या आणि सुखाने राज्य करा."

वृत्रासुराने इंद्राशी मैत्री करून घेतली आणि त्याच्याशी प्रेमादाराने बोलला व वागला. परंतु इंद्र वृत्रासुराला स्वर्गातून हुसकावून लावण्यासाठी व त्याचा वध करण्यासाठी संधी पाहू लागला. एकदा वृत्रासुर एकटा समुद्रकाठी हिंडायला गेला असतां इंद्राने त्याला गाठले व त्याच्यावर वज्रप्रहार करून त्याला ठार केले.

विश्वरूपाचा वध करून वृत्रासुराचा वध केल्यावर इंद्राला वाटू लागले की त्याने केलेली सर्व पापे त्याला पचली आणि कोणाचीही पर्वा न करता तो मनाला वाटेल तसा हिंडू फिरू लागला. इंद्रामध्ये आलेला हा बदल पाहून इंद्रपदाला आणखी कोणी योग्य आहे का महर्षी विचार करू लागले. त्यांनी नहुराजाला भेटून इंद्रपदवी स्वीकारण्यास व त्रिलोकावर राज्य करण्यास विनंती केली.





# शिवपुराण

[ २१ ]

स्वायंभू मनूच्या काळातील ही गोष्ट आहे. लागोपाठ साठ वर्षे पाऊसच पडला नाही आणि दुष्काळामुळे हाःहाकार उडून गेला. माणसे पटापट मरू लागली आणि जिकडे पहावे तिकडे मेलेली जनावरे पडलेली दिसत. तेव्हां सृष्टीकर्त्या ब्रह्मदेवाने पुन्हां सृष्टी स्थिर करण्याचा मनाशी निश्चय केला.

मनुवंशात जन्मलेला रिपुंजय नांवाचा एक सद्‌गुण संपन्न असा क्षत्रिय वीर होता. ब्रह्मदेव त्याला म्हणाला–"बाळा! मी तुला या सर्व जगाचा अधिपति नेमतो. तू दिवोदास ही उपाधि धारण करून या पृथ्वीवर राज्य कर. वासुकीची मुलगी अनंगमोहिनीशी तुझा विवाह होईल."

ते ऐकून रिपुंजय ब्रह्मदेवाला म्हणाला–"आजोबा! मला एक वर आपण देऊ शकलात तर ही सर्व जबाबदारी मी आनंदाने शिरावर घेईन. भूलोकात पाताळ किंवा स्वर्गलोकातला कोणी येऊन राहता कामा नये!"

ब्रह्मदेवाने तो वर मान्य करून काशी विश्वेश्वराला ती गोष्ट कळविली. विश्वेश्वराने रिपुंजयचा राज्याभिषेक करून दिला आणि कैलासलोकी निघून गेला. रिपुंजय 'दिवोदास' ही उपाधि धारण करून राज्य करू लागला. त्याने देव किंवा दानव कोणी पृथ्वीवर रहायला परवानगी नसल्याची दवंडी पिटविली.

दवंडी ऐकून देव काशीविश्वनाथाकडे आले. त्यांना शंकर म्हणाला–"ब्रह्मदेवाने

शेवटच्या मलपृष्ठावरील चित्र



मला विचारूनच दिवोदासला वर दिला होता. आपण मंदर पर्वतावर जाऊन राहू या."

जगात देवांचे नाव उरले नाही. दिवोदासने काशी येथे आपली राजधानी स्थापन करून आठ हजार वर्षे निर्विघ्न राज्य केले. दीर्घ कालपर्यंत या पृथ्वीला जन्मभूमी मानून जे देव व दानव या पृथ्वीवर रहात होते ते दिवोदासच्या आज्ञेप्रमाणे राबू लागले.

अगदी अशक्य झाले तेव्हां देवांनी आपले गुरु बृहस्पती याला विचारले,–" गुरुवर्य! दिवोदासला राज्यभ्रष्ट कसे करावयाचे, हे सांगण्याची कृपा करावी!"

बृहस्पती म्हणाला–"अग्नी, वायु व वरुण आपल्या पैकीच तर आहेत. त्यांनी [illegible] म्हणजे पृथ्वीवरचे जीवन अस्तव्यस्त होऊन जाईल. प्रथम अग्नीने असहकार करावा."

काशीत कोठेच चूल पेटली नाही. दिवोदासला सूर्यप्रकाशाच्या मदतीने अन्न मिळाले. दिवोदासच्या भोजनाची व्यवस्था झाली, परंतु प्रजा उपाशी होती. ती गोष्ट ऐकून दिवोदास म्हणाला–" हा सर्व गोंधळ देवांनी केलेला आहे. तुम्ही भिण्याचे मुळीच कारण नाही. मी तपोबलाने तुम्हांला अग्नी, वायु व वरुण यांची प्राप्ती करून देतो." असे सांगून त्याने त्याप्रमाणे करून ही दाखविले. देवांच्या माना खाली झाल्या.

परंतु शंकराला काशी सोडून जावे लागले, याचे फार वाईट वाटत होते. दिवोदासाचे राज्य नष्ट व्हावे असे त्याला वाटू लागले त्याने चौसष्ट योगिनींना बोलाविले व म्हणाला–" तुम्ही वेष पालटून काशीला जा आणि तेथील स्त्रियांचे पातिव्रत्य भंग होईल व पुरुषांची धर्मबुद्धी नष्ट होईल असे काही तरी करा. त्या शिवाय दिवोदास राज्यभ्रष्ट होणार नाही."

चौसष्ट योगिनींनी शंकराच्या आज्ञे-प्रमाणे केले. परंतु शंकराने सांगितलेले काम मात्र पूर्ण झाले नाही. तेव्हां शंकराने सूर्याला काशीला जाऊन दिवोदासला धर्मच्युत करण्यास सांगितले."



[illegible] दिवोदासच्या हातून कोठे काही धर्मलोप होतो आहे का फार बारकाईने पाहू लागला. दिवोदासाच्या हातूनच काय, त्याच्या प्रजेच्या हातून ही पापकार्य घडलेले सूर्याला दिसले नाही. काम पुरे झाल्याशिवाय जाणे बरे वाटले नाही म्हणून सूर्य काशीलाच राहला.

त्यानंतर शंकराने ब्रह्मदेवाला पाठविले. म्हणाला–" मी दिवोदासाचे पतन व्हावे या हेतूने चौसष्ट योगिनींना आणि त्यानंतर सूर्याला पाठविले. काम पुरे न झाल्यामुळे सर्वच काशीला अडकून राहले आहेत. तेव्हां आतां तू जा."

ब्रह्मदेव वृद्ध ब्राह्मणाचे रूप घेऊन काशीला दिवोदासाच्या दरबारात गेला. त्याने राजाला आशीर्वाद दिला व म्हणाला–" आपली अनुज्ञा असेल तर यज्ञकार्य सुरू करावे म्हणतो. परंतु काशीला विश्वेश्वरच नाही, म्हणून काशी नगराचा ह्रास होत आहे. शंकराचे आवाहन करणे बरोबर होईल."

दिवोदास काहीच बोलला नाही. ब्रह्मदेवाने दहा अश्वमेध यज्ञ केले आणि शेवटी हार मानून काशी येथेच राहू लागला.

ब्रह्मदेवसुद्धा परत न आलेला पाहून शंकराने भूतगणांना पाठविले. परंतु ते ज्या



कामासाठी आले होते नेमके तेच काम विसरून गेले. त्यांच्यापैकी कपर्थी नांवाच्या एका प्रमुखाने कपर्थीश्वर लिंगाची प्रतिष्ठा केली आणि तेथेच राहू लागला.

शंकराला मंदर पर्वतावर काशीला काय होत आहे, याचे वर्तमानच कळेनासे झाले. योगिनी सूर्य, ब्रह्मदेव आपले स्मरण देखील कसे काय कोणालाही राहिले नाही? भूतगण तेथेच कायमची वस्ती करून राहू लागले की काय? शंकराला फार काळजी वाटू लागली. तेव्हां त्याने गणपतीला बोलावून त्याला सांगायचे ते सर्व नीट समजावून सांगून काशीला पाठविले.

विघ्नेश्वर गणपती काशीला गेला आणि त्याने तेथे निरनिराळ्या प्रकारे उपद्रव सुरू केला. ढुंढीभट्ट नांव धारण करून तो काशी नगरवासियांना भविष्य सांगीत हिंडू लागला. काशी नगरावर फार मोठे संकट येणार अशी अफवा नगरभर पसरली. नंतर गणपती दिवोदासाच्या राजवाड्यात गेला. दिवोदासने त्याला आपल्या राज-पुरोहितात एक प्रमुख स्थान दिले.

राजाने एक दिवशी ढुंढी भट्टाला बोला-वून विचारले–"काशी नगरीत हे जे उपद्रव होऊ लागले आहेत त्याचे कारण काय?"

"महाराज, मला वाटते की आपण काही काळ काशी सोडून बाहेर कोठेतरी जाऊन राहणे श्रेयस्कर होईल. नंतर अठरा दिवसांनी उत्तरेकडून एक ब्राह्मण येईल व तो आपल्याला आपल्या हिता-हिताचा उपदेश करील." ढुंढीभट्ट म्हणाला.

त्यानंतर शंकराने विष्णूला काशी नगरीत पाठविले. विष्णु बुद्धरूप घेऊन काशीला आला आणि काशीच्या नागरिकां-ना नास्तिकवादाचा, बौद्ध मताचा उपदेश करू लागला. अशा तऱ्हेने काशीवासियांची बुद्धि भ्रष्ट झाली. त्यानंतर तो ब्राह्मण रूप घेऊन दिवोदासला जाऊन भेटला आणि त्याला आशीर्वाद दिला. दिवोदासने त्याला विचारले–"हे ब्रह्मर्षी! देव मला व माझ्या प्रजेला नानाप्रकारे त्रास देत आहेत. आतां वृद्धापकाळ आला आहे. मला मोक्ष प्राप्तीचा मार्ग सांगा!"

"हे राजन्! काशी नगरीत लिंग प्रतिष्ठा कर. तुला सदेह कैलासवास लाभेल." विष्णू म्हणाला.

त्याप्रमाणे दिवोदासने आपला मुलगा समरंजय याला आपला वारस नेमून त्याचा राज्याभिषेक केला. नंतर एक मोठे देऊळ बांधून त्यात लिंग प्रतिष्ठा केली. त्याच्या-साठी कैलास लोकांतून विमान आले त्यांत बसून कैलास लोकी निघून गेला. सर्व देव पुन्हां काशीला येऊन राहू लागले. शंकर नंदीवर बसून पुन्हां काशीला आला आणि त्याच्या मनाला शांती प्राप्त झाली.



# १३१. "ट्रेवी फाउंटेन"

हे निर्मळ झऱ्याचे सरोवर रोम नगरात आहे. रोम नगर सोडून जाणारे यात्रिक यात एक नाणे टाकले तर परत या सरोवरावर येतात असा एक विश्वास आहे. या सरोवरात बुडी मारून नाणी जमविणाऱ्या मुलांना हा विश्वास फार फायद्याचा होतो. पाण्याच्या तळाला दगडावर जे खोदकाम केलेले आहे त्यात वरुणदेव आपल्या रथात बसून उडत चालला आहे असे चित्रित केले आहे.



## वर्गणीदारांना महत्त्वाची सूचना!

दर खेपेस पुढील महिन्याचा 'चांदोबा' चालूं महिन्याच्या शेवटच्या आठवड्यांत ग्राहकांच्या पत्त्यावर पोष्टानें पाठविण्यांत येतो. ग्राहकांस आमची अशी विनंती आहे कीं, ठराविक तारखेपर्यंत अंक न मिळाल्यास पोष्ट ऑफिसला लिहून कळवावें व तसें केल्याचें आम्हालाहि कळवावें.

**डाल्टन एजंसीज**

'चंदामामा बिल्डिंगज्' :: मद्रास - २६



# चांदोबा


संस्थापक : नागिरेड्डी

संचालक : 'चक्रपाणी'


या अंकातील 'वेताळ कथा' तिच्या नावाप्रमाणे अगदीच 'राक्षस विवाह' नाही. युक्ती व धाडस यांचे उदाहरण स्वरूप अशी एक सुंदर गोष्ट आहे.

या अंकाबरोबर 'एका दिवसाचा सुलतान' ही दीर्घकथा संपत आहे. पुढील अंकापासून अरबस्तानाच्या लोक कथांपैकी एक नवीन दीर्घकथा सुरू करण्यात येईल.

विद्वान माणसाला देखील व्यवहार कौशल्य असावे लागते हे 'व्यवहार कौशल्य' गोष्टीत वाचावे.


वर्ष : २२ फेब्रुवारी १९७२ अंक : ८



# हरवलेली अंगठी

एका शबर राजाच्या पदरी इल्लू आणि मल्लू नावाचे दोन नोकर होते. दोघे विश्वासपात्र नोकर होते. परंतु राजाची मर्जी कां कोणास ठाऊक, इल्लूवर जास्त होती.

एकदा राजाने दोघांना बोलाविले व म्हणाला–"जा, तुम्ही आपापल्या घरी जाऊन चार दिवस बायकापोरांबरोबर राहून या. चार दिवसांनी एक मेळावा आहे, तेव्हां या." असे सांगून राजाने दोघांना इनाम म्हणून एकेक वस्तु दिली. इल्लूला एक दगड मिळाला आणि मल्लूला सुरणाचा कांदा मिळाला. दोघे आश्चर्य करीत राजाचा निरोप घेऊन आपापल्या गावी निघाले.

इल्लूला राजाने इनाम म्हणून एक दगड कां दिला हे कळले नाही. त्याला त्याबद्दल राग आला. त्याचे ओझे उचलून नेण्यापेक्षां तो कोठेतरी ठेवून देण्याचे ठरवून त्याने एका झुडपात तो ठेवून दिला.

ते पाहून मल्लू म्हणाला–"अरे, हा सुरणाचा कांदा तरी कमी वजनाचा आहे का? पण त्याची भाजी करून तरी खाता येईल. म्हणून तू पाहिजे तर हा घे. मी राजाने दिलेला दगड ठेवून घेतो."

इल्लू त्या गोष्टीस कबूल झाला आणि दोघांनी परस्परांच्या बक्षिसाची अदलाबदल करून घेतली. इल्लूच्या बायकोने सुरणाची भाजी केली आणि दोघांनी ती खाऊन टाकली. मल्लू घरी गेल्यावर चांदण्यात बसून तो दगड खालीवर करून पाहू लागला, तेव्हां त्याला दगडाला एक चीर गेलेली दिसली आणि आत काही चमकल्यासारखा भास झाला. त्याने काळजीपूर्वक तो दगड उघडून पाहिला तेव्हां त्याला आत सोन्या चांदीचे दागिने दिसले.

मल्लूने [illegible] केला, [illegible] राजाची मर्जी होती म्हणून त्याला राजाने हे दागिने गुप्तपणे दिले होते. पण आपलेच नशीब बलवत्तर आहे, म्हणून ते आपल्याला मिळाले.

चार दिवसांनी दोघे महाराजांच्या आज्ञेप्रमाणे मेळाव्यात भाग घ्यायला आले. मेजवानी चालू होती. एका जागी पंगतीत मल्लू बसला होता. त्याच्या अंगावर इल्लूला दिलेले सोन्याचे दागिने पाहून राजाला आश्चर्य वाटले. त्याने त्याला विचारले–"तुला हे दागिने कोठे व कसे काय मिळाले रे?"

मल्लूने घडलेली गोष्ट जशीच्या तशी सांगितली. इल्लूने स्वखुशीने टाकून दिलेला दगड त्याने कसा उचलला आणि सुरणाच्या कांद्याबरोबर इल्लूने दगडाची अदला बदल कशी करून घेतली ते सांगितले. इल्लूने माफी मागितली व राजाने त्याला क्षमापण केली. परंतु राजाला मल्लूला फुकटात मिळालेले दागिने पाहून राग आला. म्हणून राजा मेजवानी संपल्यावर त्याला बोलावून म्हणाला–"तू इल्लूपेक्षा जास्त समजूतदार निघालास म्हणून तुला मी ही अंगठी बक्षिस देतो. ही तू संभाळून ठेव आणि एका आठवड्यानंतर पुन्हां मी बोलवीन तेव्हां घेऊन येऊन मला दाखव. परंतु जर का तू ती दाखविली नाहीस तर तुझे डोके उडविले जाईल."





राजाने आपल्यावर राग काढण्यासाठी हा उपाय केलेला दिसतो आहे हे मल्लूने ओळखले. तरी काही बोलला नाही व ती अंगठी कोणाच्या नजरेस पडू नये यासाठी त्याने ती लपवून ठेवण्याचे ठरविले.

रात्री त्याची बायको व मुले झोपी गेल्यावर त्याने घराच्या भिंतीला एक लहानसे भोक करून त्यात अंगठी ठेवली व ओली माती करून भोक बुजलेले कळणार नाही अशा तऱ्हेने बुजवून सारखे करून ठेवले. उजाडण्यापूर्वी ओली माती वाळून गेली, म्हणून बुजविल्याचे चिन्हसुद्धा राहले नाही. तेव्हां त्याला जिवाला धोका नसल्याचे समाधान वाटले.

[illegible] कोला बोलवून सांगितले की तिच्या नवऱ्याने घरात अंगठी कोठे लपवून ठेवली आहे ती हुडकून आणून दिली तर तिला पुष्कळसे सोने इनाम म्हणून दिले जाईल. त्याने तिला बजावून ठेवले की अंगठीची किंवा ती हुडकून दिल्याबद्दल मिळालेल्या इनामाची गोष्ट तिच्या नवऱ्याला कळता कामा नये. एकदम इतके सोने कोठून मिळाले हे मागाहून जेव्हां त्याला कळेल तेव्हां तो आश्चर्यचकित होईल.

मल्लूच्या बायकोला राजाच्या मनातला खरा हेतु तिच्या नवऱ्याचा जीव घेण्याचा होता हे माहीत नव्हते. म्हणून तिने घरी गेल्यावर नवऱ्याचे कपडे, पेटी वगैरे सर्व जागा हुडकून पाहिल्या, परंतु तिला ती अंगठी सांपडली नाही. म्हणून रात्री नवरा आल्यावर तिने नवऱ्याला विचारले–"का हो, तुमच्याजवळ जी अंगठी आहे ती आम्हांला सुद्धा कळू नये अशी ठेवली आहेत वाटते लपवून?"

मल्लूला बायकोने अंगठी पाहिली असावीशी वाटले. म्हणून एवढेच म्हणाला–"भिंतीत लपवून ठेवली आहे."

दुसऱ्या दिवशी मल्लू कामावर निघून गेला तेव्हां त्याच्या बायकोने घराच्या सर्व भिंती लक्षपूर्वक पाहिल्या आणि जिथेजिथे [illegible] पाहिली. शेवटी एका जागी अंगठी सांपडलीच. तिने ती लगेच राजाला नेऊन दिली.

राजाने अंगठी ठेवून घेतली आणि तिला वचन दिल्याप्रमाणे पुष्कळसे सोने बक्षिस म्हणून दिले. ती आनंदाने ते सोने घेऊन घरी आली आणि घराच्या परसात एक बेताचा खड्डा खणून तिने ते सोने पुरून ठेवून दिले.

बरोबर एका आठवड्यानंतर राजाने नोकराला मल्लूकडे पाठवून अंगठी घेऊन यायला सांगितले.

मल्लूने खुणेच्या जागी भिंत खणून पाहिली पण तेथे अंगठी नव्हती. तो एकदम ओरडला–"आपले आयुष्य आजच संपणार!"

त्याने बायकोला बोलावून, तिने अंगठी कोठे पाहिली आहे का विचारले. परंतु नवरा मारील या भीतीने तिने अंगठीची गोष्ट नवऱ्यापासून लपवून ठेवली. मल्लू निराश होऊन राजाकडे गेला. म्हणाला–"महाराज! माझी अंगठी कोठे दिसत नाही."

राजा म्हणाला–"तरमग, तुला शिक्षा भोगावीच लागणार!"

मल्लू हात जोडून म्हणाला–"मला शिक्षा कबूल आहे. पण एका दिवसाची मुदत दिलीत तर हवी आहे. मी आपली कामे उरकून घेतो व शिक्षा भोगण्यास तयार होऊन हजर होतो."



राजाने एक दिवसाची मुदत दिली व म्हणाला–"उद्यां सकाळच्या आंत अंगठी आणून दाखविली नाहीस तर चांडाळाला तुझ्याच घरी पाठवीन."

मल्लू अत्यंत दुःखी होऊन घरी गेला. त्याने विचार केला की उद्यां मरावेच लागणार. आज ओढ्यावर जाऊन एखादा मोठा मासा पकडून खावा आणि मनातली एवढी इच्छा तरी पुरी करून घ्यावी. त्या-प्रमाणे त्याने गळ आणून पाण्यात टाकला आणि आश्चर्याची गोष्ट म्हणजे एक मासा गिळात अडकला. मल्लूला फार आनंद झाला. त्याने घरी जाऊन स्वतःच मासा कापून शिजवून खायचे ठरविले व बायको येण्यापूर्वी सुरी घेऊन मासा कापला. परंतु त्याचे भाग्य बलवत्तर होते, म्हणून माशाच्या पोटातून अंगठी बाहेर आली. तो अंगठी हातात घेऊन मोठ्याने ओरडला–"माझे आयुष्य वाढले! अंगठी सांपडली."

तो तसाच "आयुष्य वाढले, अंगठी सांपडली!" असा ओरडत राजाकडे गेला आणि अंगठी दाखवून म्हणाला– "महाराज! ही घ्या अंगठी! आतां माझी शिक्षा रद्द करावी."

मल्लूच्या पाठोपाठ मोठी गर्दी राज-वाड्यात शिरली होती. राजाने सर्वांसमक्ष त्याची शिक्षा रद्द केली. परंतु ती अंगठी मल्लूला मिळाली कशी, हे राजाला कळले नाही. त्या दिवसापासून मल्लूच्या विरुद्ध काही न करण्याचे राजाने ठरविले.

झाले असे की मल्लूच्या बायकोने अंगठी आणून दिल्यावर राजाने ती अंगठी उशा-जवळच्या तिवईवर ठेवून दिली होती. त्या दिवशी रात्री एक उंदीर तिवईवर आला व त्याचा धक्का लागून अंगठी पाण्याच्या मडक्यात पडली. दुसऱ्या दिवशी सकाळी राजाच्या नोकरांनी नित्याप्रमाणे मडक्यातले पाणी ओढ्यात फेंकून दिले आणि मडके धुवून ताजे पाणी भरून ठेवून दिले. राजाला ती गोष्ट माहीत नव्हती. म्हणून मल्लूला अंगठी कशी मिळाली हे राजाला कळले नाही व त्याला कल्पनापण करतां आली नाही



# असे कां?

एका गांवी श्यामराव नावाचे इनामदार रहात असत. त्यांना स्वतःचीच फिकीर जास्त असे. इतरांच्या सुखदुःखाची किंवा नांवलौकिकाची पर्वा नसे.

त्या गांवी सोमू नांवाचा एक गरीब तरुण मनुष्य रहात असे. तो शेजारपाजारच्या लोकांना होईल तेवढी मदतच करी. म्हणून गांवकरी त्याची विचारपूस करीत. सोमूने कोणाकडून उपकाराची फेड म्हणून कधी अपेक्षा ठेवली नाही.

एकदा सोमूला परगावी जावे लागले तेव्हां गांवभर लोक परस्परांना विचारीत, सोमू कोठे गेला? ठाऊक? कोठे आजारी बिजारी तर नाही पडला?"

ते ऐकून श्यामराव इनामदारांना आश्चर्य वाटले. त्यांच्या बायकोनेपण एकदा त्यांनाच विचारले–"काय हो, सोमू, बरेच दिवस झाले, दिसला नाही!"

लोकांच्या कृपेवर पोट भरणाऱ्या सोमूची एवढी चवकशी गावकरी करतात आणि सौभाग्यवतीपण करते हे पाहून श्यामराव विचार करू लागले, असे का?"

त्यांनी, स्वतः परगावी जाऊन लोक आपली अशीच चवकशी करतात का पाहण्याचे ठरविले आणि एक आठवडाभर परगावी निघून गेले. परंतु परत आल्यावर त्यांना कोणी विचारले नाही की इनामदार, इतके दिवस कोठे दिसलात नाही वगैरे! त्याच वेळी रामू नावाचा एक शेतकरी समोरून येतांना दिसला. इनामदारांनी त्याला विचारले–"काय रे, गावातली काही खबरबात?"

"अहो, कळले का तुम्हांला? सोमू कालच परत आला!" रामू म्हणाला.

"मी एक आठवडाभर गावात नव्हतो रे!" इनामदार म्हणाले.

"असे होय! पण कोणी काही म्हणाला नाही!" रामू म्हणाला.

इनामदारांच्या तरी लक्षात आले नाही का हा फरक असा कां?





# अमरवाणी

उत्तमम् स्वार्जितम् वित्तम्,
मध्यमम् पितुरार्जितम्,
अधमम् भ्रातृवित्तंच,
स्त्री वित्त मधमाधमम्   ॥ १ ॥

[ स्वतः मिळविलेले धन उत्तम प्रतीचे धन असते; पैतृक संपत्ती मध्यम प्रतीचे धन असते; भावाची मिळकत अधम प्रतीचे धन असते आणि स्त्रीचे धन हे अधमात अधम धन होय ! ]

उत्तमम् कुल विद्याया,
मध्यमम् कृषि वाणिजात्,
अधमम् सेवकावृत्तेः,
मृत्यु श्चौर्योपजीवनात्   ॥ २ ॥

[ विद्यार्जन हे उपजीविकेचे उत्तम साधन, कृषिवाणिज्य मध्यम दर्जाचे आणि कोणाची सेवा अधम दर्जाचे (आहे.) परंतु चोरीचा धंदा करून जगण्यापेक्षां मरण आलेले (श्रेयस्कर होय) ! ]

उत्तमे क्षणकोपस्यात्,
मध्यमे घटिकाद्वयम्,
अधमे स्या दहोरात्रम्,
पापिष्ठे मरणांतकम्   ॥ ३ ॥

[ उत्तम माणसाचा राग क्षणभर टिकतो; मध्यम माणसाचा दोन घटकाभर राहतो; अधम माणसाचा राग एक दिवस् व रात्रभर असतो; परंतु जो पापी मनुष्य असतो त्याचा राग मरेपर्यंत टिकतो. ]



# यक्ष पर्वत

[ ७ ]

[मांत्रिक व केसाळ भूत दोघांना हुडकत निघालेले खड्गवर्मा आणि जीवदत्त शत्रू न दिसल्याने गुहेत निराश होऊन बसले नाहीत. गुहेत त्यांना चोरवाट सांपडली आणि त्या वाटेने ते चालत चालत गुहेच्या दुसऱ्या टोकाला आले. तेथे त्यांना एक जुनाट पडके नगर दिसले. त्या नगरातल्या पुजारीणीने खड्गवर्मा आणि जीवदत्त दोघांना धरून घेऊन यायला मांत्रिकाला आज्ञा केली आणि तो निघाला. पुढे—]

**त्या** जुनाट पडक्या नगराकडे आश्चर्य-चकित होऊन पहात जीवदत्त हे नगर कोणत्या काळातले व याची अशी दुर्गत कां झाली असावी या विषयी विचार करू लागला. परंतु खड्गवर्माच्या मनात त्या मांत्रिकाला आणि त्याच्या बरोबरच्या त्या केसाळ भुताला ठार करून त्या गुहेतून लवकर निघून जावे हा एकच एक विचार येत होता, दोन तीन मिनिटे दोघे आपल्याच विचारात गर्क होऊन मौन उभे होते. त्याच वेळी ते उभे होते त्या जागेच्या दगडी भिंतीवर कोणती तरी जड वस्तू जोराने येऊन आदळल्याचा 'धम्म' असा आवाज झाला.

तो आवाज ऐकताच खड्गवर्मा चटदिशी उठून उभा राहीला व जीवदत्तला म्हणाला—



"जीवदत्त! कसला रे तो आवाज? ते दोघे दुष्ट आपल्यावर चोरासारखे हल्ला करण्याच्या विचारात आहेत की काय?"

"त्या मांत्रिकाला व त्याच्या त्या केसाळ भुताला दिवसा ढवळ्या आपल्यावर असा हल्ला करण्याची हिंमत होईल असे वाटते का तुला? तरी आपण सावध राहीले पाहिजे." असे म्हणत जीवदत्त भितीजवळ जाऊन पाहू लागला. त्यांनी भितीवरून पलीकडे डोकावून पाहिले त्याच वेळी मांत्रिक त्या भितीवर उडी मारून चढून दरडावून म्हणाला–"या रे मानवांनो! तुम्हां दोघांना केसाळ भूतासमोर आता बळी [illegible] तलवार दोघां वर फेकली.

खड्गवर्माने आपल्या तलवारीने मांत्रिकाने फेकलेली तलवार बाजूला ढकलून दिली व म्हणाला–"मूर्ख मांत्रिका! तू बळी देणार कोणाचा? स्वतःच मृत्यूच्या मुखात उडी घेतली आहेस." असे म्हणत त्याने मांत्रिकाचा हात धरून त्याला खाली ओढले. मांत्रिक 'ओय ओय' ओरडत खाली आदळला. त्याला उठवेच ना.

भितीच्या या बाजूला ही गोष्ट चालू असता पलीकडे कोणी तरी बोलल्याचा भास झाला–"अरे, खुळचा मांत्रिका! त्यांना ठार करू नकोस! पुजारिणीने त्यांना जिवंत धरून आणायला नव्हते का सांगितले?"

मध्यंतरी त्याच्या गुरूवर आलेला प्रसंग माहित नसल्यामुळे केसाळ भूत "बळी, बळी, बळी" असा ओरडत माकडासारखा उडी मारून भितीवर चढून उभा राहला.

आपल्या गुरूला जमिनीवर तळमळत पडलेला पाहून केसाळ भूत माकडासारखे 'किचकिच' करीत असतां जीवदत्तने त्याला त्याचे दोन्ही पाय धरून खाली ओढले व ते खाली पडू लागल्याबरोबर त्याच्या कंबरेत इतक्या जोराने लाथ मारली की ते कंबरडे मोडून खाली पडले. नंतर खड्गवर्माला [illegible] म्हणाला–"खड्गवर्मा! [illegible] आपण येथे जास्त वेळ थांबण्यात [illegible] नाही. [illegible] प्रदेशात सर्वच मांत्रिक दिसत आहेत. भितीपलीकडला आवाज तू ऐकलासच. आपण त्या पडक्या घरांमध्ये कोठे तरी त्यांच्या दृष्टीआड निघून जाऊ या."

त्याप्रमाणे दोघे त्या पडक्या घरांकडे धावले. एका दारात उभे राहून मांत्रिकांची टोळी पाठीमागून येत तर नाही हे पाहून घेतले. त्यांना भितीजवळ दोन्ही हातांनी कंबरडे धरून कण्हत उभे असलेले केसाळ भूत आणि उठता येईनासे झाले म्हणून दोन्ही हात जमिनीवर आपटीत आणि ओरडत पडलेला मांत्रिक त्या दोघांशिवाय आणखी कोणी दिसला नाही.

"भितीपलीकडून आलेली सूचना ऐकलीस ना तू? त्या सूचनेवरून आपल्याला या पडक्या इमारतीत राणीसारखी राहणारी पुजारिणी कोठेतरी राहते आहे आणि तिने आपल्याला ठार करू नका, असे सांगितल्याचे कळले. तेव्हां आपण सावधगिरीने ती पुजारिणी कशी काय आहे व कोठे आहे हे पाहून तिलाच धरता आले तर पाहू या." जीवदत्त म्हणाला.

त्यानंतर दोघे, शत्रू कोठून अचानक हल्ला करतात याचा अंदाज लावीत जागच्या जागी उभे राहीले. परंतु कोठून ही शत्रू येत असल्याची चाहूल लागली नाही. केसाळ भूत व मांत्रिक आपल्या नशिबाला दोष देत तडफडत होते. त्या आवाजा-





शिवाय इतर कोणता ही आवाज त्यांना ऐकू आला नाही.

खड्गवर्मा, दोघे उभे होते त्या दाराकडे लक्षपूर्वक पाहून म्हणाला–"जीवदत्त! ही लाकडी बळकट दारे पाहिलीस का? या दारांपलीकडे इमारतीत जायला नक्कीच वाट असणार. उघडून पाहू या का?"

"त्याशिवाय दुसरे करण्यासारखे आहे तरी काय? त्या मांत्रिकाला आणि त्या भुताला त्यांच्या नशिबावर सोडून देऊ या आणि इतर कोण कोठे आहेत, हे पाहूं या. दारे जरा सावधगिरी बाळगूनच उघडली पाहिजेत. कारण मांत्रिकांची टोळी दारां-

धरून बसली असेल."

खड्गवर्माने एका हातात तलवार उपसून धरली आणि दुसऱ्या हाताने दार जोराने लोटले. परंतु दारांचा 'किरकिर' असा थोडा आवाज झाला, तरी ती उघडली मात्र नाहीत.

"दारे आंतून कडी लावल्यामुळे बंद असतील. परंतु ते आपल्या लक्षात कसे काय आले नाही?" असे म्हणत जीवदत्तने दोन्ही हातांनी खूप जोराने दोन्ही दारे लोटली. तेव्हां जोराने 'खाड्कन्' करीत दारे एकदम उघडली.

दोघे उंबरठा ओलांडून आत गेले. ते एक मोठे अगदी रिकामे दालन होते. त्यात गेल्या कित्येक वर्षात कोणी मनुष्य राहिल्याचे चिन्ह सुद्धा दिसत नव्हते. जिकडे पहावे तिकडे जळमटे होती आणि लोंबकळायला जागा होती तेथे वटवाघळे लोंबत होती. दालनाच्या टोकाला एक दार मोडकळीस येऊन सरकलेले आणि सताड उघडे असलेले दिसले.

"आतां वाट पाहण्यात अर्थ काय? गळ्यापर्यंत बुडल्यावर पाणी थंडगार आहे म्हणत पडून राहण्यात काही अर्थ आहे का? या पडक्या इमारतीतल्या कोणत्या तरी खोलीत मांत्रिकांची राणी ती पुजारीण असेलच." जीवदत्त म्हणाला.

ते एक जास्तच भयकर स्थितीत असलेले दालन होते. त्या दोघांना आलेले पाहून चार पाच घुशी 'हुक' 'हुक' करीत खोलीत इकडे तिकडे घाबरून पळू लागल्या. घारी एवढे मोठे गलेलठ्ठ झालेले एक वटवाघूळ बाणासारखे खालीं जमिनीवर येऊन एका घुशीला उचलून घेऊन वरच्या एका उघड्या खिडकीतून बाहेर उडून गेले.

"बाप रे बाप! केवढ्या मोठमोठ्या घुशी आहेत रे! या पडक्या इमारतीत राहून काय खाऊन या घुशी अशा टरटरून फुगल्या असतील?" खड्गवर्मा म्हणाला.

"मला वाटते, पुजारिणी आपल्या शिष्यांपैकी निरुपयोगी ठरलेल्यांना खंडखंड करून कापून यांना खायला घालीत असावी!" असे म्हणत जीवदत्त जोराने हंसला आणि पुढे म्हणाला–"चल पुढे जाऊं, आणखी कोण कोणत्या गंमती पहायला मिळतात कोण जाणे?"

दोघे असेच काही वेळ एका दालनातून दुसऱ्या दालनांत जात जात जेथे जेथे पायऱ्या होत्या तेथे तेथे वर चढून पहात पुष्कळ फिरले. परंतु कोठे देखील त्यांना मनुष्य वस्ती असल्याचे चिन्ह दिसले नाही.

"खड्गवर्मा! सर्व मांत्रिक त्यांच्या मालकिणीची आज्ञा पालन करण्यासाठी फार सावधपणे आपल्या पाठोपाठ गुपचुप येऊन आपल्याला निसटता येणार नाही





अशा जागी आपल्यावर एकदम हल्ला करणार असावेत. आपण कोठून आलो आणि कोठे जातो आहो हे देखील कळेनासे झाले आहे." जीवदत्त म्हणाला.

"परत जायचे म्हणतोस का?" खड्गवर्माने विचारले.

"नाही तर काय? या पडक्या इमारतीतून परत उजेडात जायचे म्हणजे गुहेतून पार जाण्याशिवाय वाट आहे कोठे? तिकडे परत जाता आले तर पाहू या." जीवदत्त म्हणाला.

"आपण परतून त्या कण्हत पडलेल्या मांत्रिकाला आणि कंबरडे धरून बसलेल्या भूताला जाऊन त्यांच्या मालकिणीविषयी विचारून तरी घेऊ या!" खड्गवर्मा म्हणाला.

असा विचार करून ते परतले आणि पलीकडच्या दालनात पाऊल टाकणार इतक्यात अकस्मात् त्यांच्या डोक्यात जोराने काठ्या पडल्या. दोघांना घेरी आल्यासारखे झाले आणि दोघे खाली पडले. त्या पाठोपाठ पुजारिणीचे चार नोकर समोर आले आणि घाई घाईने डोक्याला कोठे जखम तर पडली नाही ना पाहू लागले. परंतु कोठे रक्त वगैरे आल्याचे त्यांना दिसले नाही.

"नशीब आपले! या दोघांची डोकी फुटून दोघे मेले की काय मला भीती वाटत होती! तसे झाले असते तर महाशक्तिशालीनी पुजारिणीच्या हाती आपल्याला नक्कीच मरण लिहिलेले होते!" असे एक नोकर दीर्घ श्वास सोडीत म्हणाला.

"जोराचा तडाखा बसला तरी डोके फुटून मरण येऊ नये, म्हणूनच तर काठ्यांना आपण फडकी गुंडाळून ठेवली होती! बरे तर बांधा यांचे हात पाय आणि यांना घेऊन चला खांद्यावर" दुसरा नोकर म्हणाला.

बेशुद्ध स्थितीतच जीवदत्त व खड्गवर्मा दोघांचे हात पाय बांधून त्यांना खांद्यावर घेऊन पुजारिणीचे नोकर निघाले आणि एका मोठ्या मंडपात आले.

मंडपाच्या मध्यभागी एका उच्च आसनावर एक मऊ गालिचा घातलेला होता. त्यावर पुजारिणी बसलेली होती. बाजूला काही नोकर हात जोडून पुजारिणीच्या आज्ञेची वाट पहात उभे होते. तिने खड्गवर्मा व जीवदत्त दोघांकडे हळूच तिरप्या नजरेने एकदा पाहिले व एकदम डोळे वटारून पहात म्हणाली—"ए महाभूता! यांच्या पैकी एक जण मांत्रिक दिसतो आहे रे!"

"शक्य आहे, महाशक्तिशालिनी पुजारिणी! त्याच्या हातात मंत्रदंड सुद्धा होता. या दुसऱ्याच्या हातात एक लांबलचक तलवार होती." एक नोकर म्हणाला.

"कोठे आहेत त्या वस्तू? कोठे टाकून दिल्यात तुम्ही?" पुजारिणीने दरडावून विचारले.

"यांना आम्ही धरून पकडून आणले तेथेच सोडून आलो." तो म्हणाला.

"जाऊन घेऊन या तर! मूर्ख कोठले!" डोळे वटारून पहात पुजारिणी म्हणाली.

पुजारिणीच्या आज्ञेप्रमाणे दोघे नोकर धावत गेले आणि थोड्याच वेळात परत येऊन त्यांनी जीवदत्तची कुबडी व खड्गवर्माची तलवार पुजारिणीसमोर ठेवली. पुजारिणीने लक्षपूर्वक त्यांच्याकडे पाहिले



व म्हणाली—"या दोन्हीत काही विशेष मंत्रशक्ती असेलसे दिसत नाही. या दोघांना अंधार कोठडीत नेऊन टाका आणि त्यांची कुबडी व तलवारजवळ ठेवून या. पुढे काय होते ते पाहू या."

दोघांना बेशुद्धावस्थेतच एका अंधार कोठडीत नेऊन टाकून नोकरांनी बाहेरून कडी लावून घेतली.

पाव तासाभराने जीवदत्त व खड्गवर्मा दोघे शुद्धीवर आले. जीवदत्तला पहिल्याने शुद्ध आली. त्याने जीवदत्तला हलवून जागे केले व म्हणाला—"अरे खड्गवर्मा! आश्चर्य! अजून आपण जिवंत आहों रे! आपली शस्त्रे सुद्धा आपल्याजवळच आहेत.

खड्गवर्माने त्या खोलीत त्याला कोठे काही दिसते का चारीबाजूला दृष्टी फिरवून पाहिले व म्हणाला—"आपल्याला असे जिवंत राहू देण्यात पुजारिणीचा नक्कीच काही तरी हेतू असला पाहिजे."

"त्या पुजारिणीला प्रत्यक्ष पाहल्याशिवाय ते कळणे शक्य नाही. आपण प्रथम येथून बाहेर निघाले पाहिजे." असे म्हणत जीवदत्त उठून उभा राहला.

"त्या गुलामांनी आज आपली चांगलीच खोड मोडली. पुन्हां त्यांच्या हातांत आपण पडलो..."

खड्गवर्माच्या तोंडचे ते वाक्य पुरे होण्यापूर्वीच भितीपलीकडून सिंहगर्जना ऐकू आली. ती ऐकून खड्गवर्मा जागच्या जागी दचकून म्हणाला—"त्या गुलामांच्या मनात आपल्यावर सिंह सोडण्याचा विचार तर नसेल?" असे म्हणत तो हंसला.

"तसे झाले तर बरेच झाले. आपण त्या सिंहाचा प्रयोग त्यांच्यावरच करू या आणि या पडक्या जुनाट इमारतींची त्या गुलामांना कायमची दहशत बसेल असे काही तरी करू या." असे म्हणत जीवदत्तने आपली कुबडी जोराने पहारीसारखी भितीवर आपटली. वीज पडावी असा धक्का भितीला बसला आणि एक मोठे भोक पडले. सिंह घाबरून गेला आणि घाबरलेल्या कुत्र्यासारखा शेपटी दाबून भितीला टेकून बसला.

"हे वनराज! तुला आज पोटभर खायला मिळणार आहे रे!" असे म्हणत जीवदत्तने त्यांच्या खोलीला जे दार होते त्याला कुबडीने दोन ठोसे मारून फोडले. दारे धाडकन् पलीकडे जाऊन पडली.

त्याच वेळी पुजारिणीचे दहा बारा नोकर "कैदी पळत आहेत रे!" असे ओरडत पुढे आले. जीवदत्त धावत सिंहाजवळ गेला आणि कुबडी त्याच्या अंगाला लावून पुजारिणीच्या नोकरावर उडी मारायला त्याने सिंहाला खूण केली. त्याप्रमाणे सिंहाने गर्जना करून नोकरांच्या अंगावर उडी मारली.






# राक्षस विवाह

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौनपणे स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा! तू कोणाच्या शब्दावर विश्वास करून या अपरात्रीच्या वेळी इतके कष्ट सहन करीत आहेस, कोण जाणे; परंतु सिंहपुरीचा राजा विजयवसंत याच्या सारखे शब्द देऊन तो मोडणारे सुद्धा या जगात आहेत. तुला कंटाळा येऊ नये म्हणून त्याची गोष्ट सांगतो, लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

विजयवसंत हा एक अद्वितीय पराक्रमी वीर होता. युद्धविद्येत त्याची बरोबरी करू शकेल असा कोणी त्या काळात नव्हता. त्याला अरुणकुमारी नावाची एकुलती एक



मुलगी होती. बाप जसा अद्वितीय पराक्रमी होता तशीच अनुपम सुंदरी म्हणून दूरदूर देशात तिची ख्याती होती.

राजकन्या विवाह योग्य झाली तेव्हां तिचे लग्न करून देण्याच्या प्रश्नावर राजवाड्यात व दरबारी लोकात विचार होऊ लागला. राजाने सर्व सूचना अमान्य करून असा निर्णय दिला की सर्व तऱ्हेच्या युद्धविद्यांत सर्वांना पराभूत करणाऱ्या तरुणाशीच राजकन्येचा विवाह होईल.

त्याप्रमाणे प्रधानाने स्वयंवराची सर्व तयारी करून सर्व प्रमुख राजेरजवाड्यांकडे दूत पाठविले आणि स्वयंवराची अट देखील कळविली.

स्वयंवराचा संदेश सर्व देशांत पोचला. परंतु शाकलपुरीला संदेश [illegible] नाही. कारण सिंहपुरी आणि शाकलपुरी यांचे हाडवैर होते.

परंतु शाकलपुरीचा राजकुमार कमलशेखर याच्या मनात लग्न करावयाचे तर ते अरुणकुमारीशीच असे होते. त्याला अरुणकुमारीच्या स्वयंवराची वार्ता आणखी एका राजकुमाराच्या तोंडी कळली. तो त्या राजकुमाराचा एक मित्र म्हणून त्याच्या बरोबर स्वयंवराला गेला.

स्वयंवराच्या दिवशी इतर राजकुमारांबरोबर कमलशेखरने देखील घोडेस्वारी, खड्गयुद्ध, गदायुद्ध, धनुर्विद्या इत्यादि प्रतिस्पर्धांत भाग घेतला आणि सर्वांचा पराभव केला.

अरुणकुमारीने त्याच्या गळ्यात वरमाळा घातली. त्यानंतर विजयवसंत कमलशेखरला प्रेमाने भेटला आणि विचारले—"कुमार! युद्धविद्येत तुझे कौशल्य पाहून मला फार आनंद झाला. तू कोणत्या देशाचा राजकुमार? नांव काय तुझे?"

"मी शाकलपुरीचा राजकुमार आहे. माझे नांव कमलशेखर." कमलशेखर म्हणाला.

शाकलपुरीचे नांव ऐकताच विजयवसंतला भयंकर राग आला. तो रागातच म्हणाला—

"तू [illegible] चालता हो! मी या खेपेस तुला जिवंतपणी सोडीत आहे."

कमलशेखरला तो अपमान असह्य वाटला. त्याला साहजिकच जास्त राग आला व तो तितक्याच जास्त उच्च स्वरात म्हणाला—"तू ठेवलेल्या अटीप्रमाणे, ती अट पुरी होतांच तुझी मुलगी माझी वधू झाली आहे. तिच्याशी मी लग्न करणार. तू कसा आड येतोस, हे मी पण पाहणार आहे." असे म्हणत त्याने विद्युत्वेगाने तलवार उपसली.

विजयवसंतने पण तत्काळ तलवार उपसली. दोघांचे खड्गयुद्ध सुरू झाले. त्या युद्धात विजयवसंतच्या ज्या हातात तलवार धरली होती त्याच हाताला जबर जखम झाली.

कमलशेखर जास्त वेळ थांबला नाही. त्याने अरुणकुमारीचा हात धरला आणि तिला आपल्या घोड्यावर बसवून घेऊन शाकलपुरीच्या दिशेने घोडा सोडला.

विजयवसंतने शाकलपुरीवर त्याच दिवशी स्वारी केली. शाकलपुरीचे सैन्य युद्धाला तयारच होते. सैन्याच्या अग्रभागी इतर शूरवीरांसमवेत अरुणकुमारीपण युद्धाला तयार होऊन आलेली पाहून विजयवसंतने युद्ध न करण्याचे ठरविले आणि पुढे येऊन आपल्या मुलीला व जांवयाला प्रेमाने भेटला. त्याने दोघांना आशीर्वाद दिला. त्याने त्याचा हाडवैरी शाकलपुरीचा जो



राजा होता त्याच्याशी सख्य करून अरुण-कुमारीचे कमलशेखरशी थाटामाटाने लग्न करून दिले आणि आनंदाने आपल्या मुलीला व जांवयाला निरोप दिला.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला–"राजा! मला हे सांग कीं विजयवसंतच्या या विचित्र वागण्याचा काय रे अर्थ? त्यानेच ठेवलेली स्वयंवराची अट पुरी करणाऱ्या राजकुमाराशी आपल्या मुलीचे लग्न करून देण्याऐवजी त्याला त्याने खड्ग-युद्धाला आव्हान केले काय आणि नंतर शाकलपुरीवर चालून जाऊन युद्ध केल्या-शिवाय आपल्या मुलीचे कमलशेखरशी लग्न करून दिले काय? याला काही अर्थ? या शंकेचे समाधान माहीत असून तू करून दिले नाहीस तर तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला–"कमलशेखरला कोणी स्वयंवराला बोलाविले नाही. म्हणून त्याला युद्धविद्येच्या स्पर्धांत भाग घ्यायलाच [illegible] नव्हता. म्हणून [illegible] असून ही त्याला विजयवसंतने कोणत्याही प्रकारे इजा केल्याशिवाय स्वदेशी निघून जायला सांगितले. परंतु कमलशेखरने तलवार उप-सून खड्गयुद्धास आव्हान केल्यावर विजय-वसंत युद्धाला तयार झाला, त्यात विचित्र असे काहीच नाही. म्हणून तो शाकलपुरीवर चालून गेला त्यातही काही आश्चर्य करण्या-सारखे नाही. त्याने स्वयंवर रचले होते, पण तो राक्षस विवाह झाला. म्हणून तो मुलीला सोडवून आणायला निघाला. परंतु मुलीला स्वतः युद्धाला तयार होऊन आलेली पाहून मुलीचे कमलशेखरवर प्रेम असल्याचे त्याला आढळून आले. म्हणून त्याने सूज्ञ-पणाने युद्ध थांबवून दोघांचे लग्न करून दिले. जांवयाशी वैर राखणे बरोबर नाही असे ठरवून त्याने शाकलपुरीच्या राजाशी सुद्धा सख्य करून घेतले."

अशातऱ्हेने राजाचे मौनभंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि पुन्हां झाडाला जाऊन लोंबकळू लागला.



# तीन मूर्ख

चंद्रावती नदीकाठी लिंबोणी नावाचे एक गाव होते. त्या गावच्या गावकऱ्यांना समजूत थोडी कमीच अशी जवळपासच्या गावात प्रसिद्धी होती. लिंबोणी गावच्या लोकांना आठवड्याच्या बाजाराला जायचे झाले, म्हणजे नदीवरचा पूल ओलांडून जावे लागे.

एकदा पुलाजवळ दोघे गावकरी परस्परांना भेटले. एकाने दुसऱ्याला विचारले–"काय हो, कोठे निघालात आणि कोणत्या कामाला?"

दुसरा–"आठवड्याच्या बाजाराला, मेंढरे विकत घेऊन यायला निघालो हो!"

पहिला–"कोणत्या वाटेने परतणार?"

दुसरा–"याच वाटेने पुलावरून, कां?"

पहिला–"मी येऊं दिले तर ना?" असे म्हणत मेंढरांना इकडे तिकडे पळवीत असल्या-सारखे तोंडाने व हाताने करू लागला. लगेच त्याच्या पाठोपाठ दुसरा मेंढरांना गोळा करीत असल्यासारखे करू लागला. दोघांचे हे नृत्यनाटक चालू असतां तिसरा गावकरी डोक्यावर दुधाची कासंडी घेऊन तिकडे आला आणि दोघांना घडले ते विचारून घेतल्यावर त्याने आपल्या कासंडीतले सर्व दूध नदीत ओतले व म्हणाला–"सांगा, या कासंडीत आतां किती दूध आहे?"

पहिला–"मुळीच नाही."

तिसरा–"तुम्हां दोघांच्या डोक्यातसुद्धां मुळीच अक्कल नाही."





# व्यवहार कौशल्य

एका गावी क्षेमचंद्र नावाचा एक ज्योतिषी होता. तो लोकांचे हात पाहून त्यांचे भूतभविष्य सांगे. त्याला हात दाखवून आपले भूतभविष्य विचारून घेतले नाही, असा त्या गावच्या पंचक्रोशीत कोणी नव्हता.

हस्तसामुद्रिक ही वृत्ती मानून काम करणारे लोक क्षेमचंद्र रहात असे त्या गावात पाऊल देखील टाकीत नसत. कोणी चुकून आला की क्षेमचंद्र चार जणांसमोर त्याची परीक्षा घेऊन त्याची फजीती करून सोडी. पुन्हां त्या गावी येण्याची तो मनुष्य हिंमत करीत नसे.

असाच एकदां रामशास्त्री नावाचा एक हस्तसामुद्रिक त्या गावी चुकून आला. गावातल्या. पारावर क्षेमचंद्र त्या वेळी गावकऱ्यांबरोबर गप्पात रंगला होता.

रामशास्त्री, हात पाहून लोकांचे भूत-भविष्य सांगतो हे ऐकून क्षेमचंद्रने जमलेल्या लोकांसमोर त्याच्यावर प्रश्नांची सरबत्ती सुरू केली—"काय हो, तुम्ही कोण कोणते ग्रंथ वाचले आहेत? तुमचे गुरु कोण? हस्तसामुद्रिकातले कोण कोणते प्रकार तुम्हांला माहीत आहेत?"

रामशास्त्री नम्रपणे म्हणाले—"हे शास्त्र मला बेताचे माहीत आहे. त्या शास्त्राचे वाचन पण फार नाही. माहीत आहे तेवढेच भविष्य वर्तवून पोटापुरते मिळवितो. माझे गांव विचाराल तर गोगलगाईसारखे आपले घरदार पाठीवरच आहे."

"तुमच्या या तोटक्या हस्तसामुद्रिक-शास्त्रावर भाळून जाऊन या गावची मंडळी तुमच्यावर पैशाचा पाऊस पाडतील असे वाटले होय तुम्हांला? इतके खुळे नाहीत या गावचे लोक. म्हणजे माझ्याविषयी तुम्ही काहीच ऐकले नाही असे दिसते आहे. माझ्यासारखा हस्तसामुद्रिक या [illegible] पाणी-सुद्धा मिळणार नाही, लक्षात असू द्या. म्हणून आल्या वाटेने चालू लागा."

ते ऐकून रामशास्त्रीला राग आला. या माणसाची घमेंड जिरविलीच पाहिजे असा विचार करून ते क्षेमचंद्रला म्हणाले—"आपापल्या परीने प्रत्येकजण लहान व थोर असतोच. मी तुमच्याहून मोठा आहे असे कधीच म्हटले नाही. परंतु तुम्ही कोणत्या आधारे मला लहान आणि हलका ठरविलेत हो? लहान थोर हा भेद प्रत्यक्ष परीक्षा घेऊनच होतो की नाही? तुम्हांला माझ्याहून जास्त कशावरून कळते हो?"

तेथे जमलेल्या लोकांना पण वाटले की रामशास्त्री म्हणतो ते खरे आहे. दोघांच्या ओळखीचा नसलेला असा एक मनुष्य असला तर त्याचा हात पाहून कोणाचे म्हणणे खरे निघते हे पहावे असे त्यांनी सुचविले.

सुदैवाने त्याच वेळी कोणी परगावचा एक गृहस्थ तेथे आला. गावकऱ्यांनी त्याला विचारले—"अहो, तुम्हांला थोडा त्रास होईल. परंतु दोघांची आज एक परीक्षा आहे. त्यात तुमच्या मदतीची गरज आहे. आपण या दोघांना आपला हात दाखविण्याची कृपा करावी."



त्या गृहस्थाने बरी गंमत आहे असा विचार करून हात पुढे केला. क्षेमचंद्र हात पाहून म्हणाला—"क्षमा करा हं. ही परीक्षाच आहे, तेव्हां खरे खरे ते मला सांगावे लागणार. आपल्याला संपत्तीचा योग आहे, परंतु तुमचा हात थोडा चिकट आहे. आपली मंडळी आपल्या आज्ञेबाहेर नाहीत."

"माझ्या तोंडावर माझा असा अपमान करता? या तुमच्या गप्पा ऐकायला मी नाही आलो येथे!" तो गृहस्थ म्हणाला.

रामशास्त्री त्यांना म्हणाला—"क्षमा करा, असे रागावू नका. काही लोकांना हस्तसामुद्रिक फक्त त्यांनाच माहीत आहे असे वाटते. मला दाखवाल का आपला

हात?" त्या गृहस्थाने हात पुढे केल्यावर तो पाहून रामशास्त्री म्हणाला—"अहो! लक्ष्मीचा वरदहस्त आहे आपल्या डोक्यावर. आपले औदार्य पाहून कोणी किती मोठा असला तरी लहान मुलासारखा आपल्याशी वागतो. पूर्वजन्मीचे पुण्य म्हणूनच आपणांला उत्तम कुटुंब लाभले आहे."

ते ऐकून तो गृहस्थ खूष झाला. म्हणाला—"काय हो, तुम्ही तर स्वतः डोळ्यांनी पाहिल्यासारखे भविष्य वर्तविलेत की! याला म्हणतात हस्तसामुद्रिक! नाही तर याने सांगितले ते! याच्या बोलण्यात शेंडाबुडखा असेल तर ना!"

रामशास्त्री पुढे म्हणाला—"माझे या शास्त्राचे ज्ञान पाहून मला आपल्या बोटातली अंगठी काढून द्यावी असे आपल्या मनात आहे. आपली दानवृत्ती जगप्रसिद्धच आहे, हो की नाही?" ते ऐकून त्या गृहस्थाला कमालीचा आनंद झाला.

रामशास्त्री ते ओळखून म्हणाला—"कान धरतो. काही चूक सांगितले का मी? [illegible] विचारतो!"

"छेः, नाही हो! माझ्या मनातली गोष्ट सुद्धा तुम्हांला कशी कळली, हा विचार करून आश्चर्य वाटले मला." असे म्हणत त्याने आपल्या बोटातली अंगठी काढून रामशास्त्र्याला दिली आणि निघून गेला.

जमलेले लोक रामशास्त्री हस्तमुद्रिकशास्त्रात प्रवीण असल्याचे सांगून त्याची प्रशंसा करू लागले. क्षेमचंद्राची घमेंड जिरली आणि तो खाली मान करून काही बोलल्याशिवाय जागच्या जागी बसून राहिला.

रामशास्त्री सर्वांना म्हणाला—"मी खरे सांगू, क्षेमचंद्राला या शास्त्राचे उत्तम ज्ञान आहे, पण व्यवहार ज्ञान थोडे कमी आहे. वेळप्रसंग पाहून कसे बोलावे व कसे वागावे या गोष्टीवर थोडे ध्यान दिले तर त्याला आपल्या धंद्यात आणखी जास्त यश येईल. त्याने व्यर्थ अहंकारपण सोडून द्यावा."





# वचन पालन

फार पूर्वी तुर्कस्तानात अब्दुल हमीद नावाचा एक श्रीमंत व्यापारी रहात असे. त्याच्याजवळ अरबी जातीचा एक उत्तम घोडा होता. त्याला तो घोडा फार आवडे. परंतु उतारवय आल्यामुळे घोड्यावर स्वारी करून जाणे त्याला शक्य नव्हते. म्हणून त्याने तो घोडा विकून टाकायचे मनाशी ठरविले. त्याने तो घोडा तीनशे दीनारपर्यंत विकण्याचा विचार केला. परंतु तितकी किंमत देऊन कोणी विकत घ्यायला तयार होईना.

एक दिवशी अब्दुल अजीज नांवाचा एक मनुष्य हमीदकडे आला आणि नम्रपणे सलाम करून म्हणाला—"साहेब! मी एका कुलीन घराण्यात जन्मलो आहे. परंतु गरीब आहे. आपला घोडा मला फार हवासा वाटतो. परंतु तेवढी किंमत द्यायची ऐपत माझ्यात नाही. तरी मी वचन देतो, मी परदेशात जाऊन काहीतरी व्यापारधंदा करावा म्हणतो आहे. एका वर्षात मी जे काही मिळवीन ते या घोड्याची किंमत म्हणून आपल्याला देईन. मी वचन देतो."

हमीद थोडा विचार करून म्हणाला—"ठीक, तू दिलेल्या वचनाप्रमाणे वाग म्हणजे, झाले." असे सांगून त्याने आपला घोडा त्याला दिला.

अजीज आनंदाने त्या घोड्यावर बसून आपल्या नशिबाच्या शोधार्थ निघाला.

काही काळ प्रवास केल्यावर तो एका गावी आला. त्या गावच्या राजवाड्या समोरून तो दररोज जाई येई. राजवाड्यातून त्या गावाच्या सुलतानाची नजर अजीजच्या घोड्यावर पडली. तो अरबी जातीचा सुंदर घोडा पाहून तो आपण विकत घ्यावा असे सुलतानाला वाटले.



सुलतानाने आपल्या नोकराला अजीज पाठोपाठ पाठविले आणि अजीज उतरला होता त्या धर्मशाळेत जाऊन नोकर त्याला भेटला व सुलतानाकडे बोलावून घेऊन आला. सुलतानाने घोड्याची किंमत विचारली असतां, घोडा विकणार नाही असे उत्तर देणे बरोबर होणार नाही असा विचार करून अजीज घोड्याची किंमत जरा जास्त सांगण्याच्या विचाराने म्हणाला– "हुजूर! नऊशे दीनार आहे!"

सुलतानाला ती किंमत फार जास्त वाटली, परंतु घोडा सोडून द्यावेसे वाटेना. म्हणून तो अजीजला म्हणाला–"किंमत फार जास्त सांगतो आहेस, बुवा! मला थोडा विचार करु दे. उद्यां सकाळी किंमत ठरवू या." असे सांगून सुलतानाने अजीजला निरोप दिला.

त्यानंतर सुलतानाने आपल्या वजिरांना बोलावून कमी किंमतीला घोडा विकत घेण्यास काही युक्ती आहे का विचारले. मंत्र्यांनी त्यांना सुचले ते सांगितले. परंतु सुलतानाला त्यापैकी एकही उपाय बरोबर वाटला नाही.

तेव्हां मुख्य वजीर सुलतानाला म्हणाला– "उद्यां सकाळी तो तरुण घोडेवाला आपल्याला उद्यानात भेटायला येईल तेव्हां राजकन्येला सुद्धां बरोबर आणावे व तिच्याकडूनच त्या तरुणाला विचारून घोड्याची किंमत किती हे नक्की करून घ्यावे. तो नक्कीच किंमत कमी करील. समजा, नाहीच कबूल केले तर आपण पाहून घेऊ. आपल्या परवानगीशिवाय त्याला गावाबाहेर पाऊल टाकायला मिळेल का?"

सुलतानाला तो सल्ला पसंत पडला. दुसऱ्या दिवशी सुलतानाने अजीजला उद्यानात बोलावून घेऊन यायला वजिराला सांगितले आणि राजकन्येला उद्यानात जायला सांगितले. अजीज आपल्या घोड्यावर बसून उद्यानात आला. त्याला पाहूनच राजकन्या चकित झाली. अजीज पण राजकन्येचे सौंदर्य पाहून चकित झाला. आपल्या वृद्धा- [illegible] असलेल्या वडिलांच्या [illegible] सुंदर घोड्यावर बसण्यास अजीजसारखा सुंदर तरुणच योग्य आहे असे तिला वाटले.

ती घोड्याकडे पहात जवळ जाऊन अजीजला म्हणाली–"या घोड्याला स्वस्तात विकले नाही तर तुझ्या प्राणावर बेतेल. म्हणून येथून पाय काढून जाण्यातच शहाणपण आहे. माझ्या जवळ एक कोट आहे. त्यात अनेक दीनार भरले आहेत. माझे वडील आल्याबरोबर फार तहान लागल्याचे सांग. मी जाऊन तो कोट अंगात घालून पाणी घेऊन येते. नंतर आपण दोघे घोड्यावर बसून दूर कोठे तरी पळून जाऊ या."

तेवढ्यात सुलतान आला. अजीज त्याला म्हणाला–"हुजूर! फार तहान लागली आहे हो!" राजकन्या पाणी आणायला म्हणून निघून गेली आणि कोट अंगात घालून पाणी घेऊन आली. अजीज पाणी घेण्यासाठी म्हणून तिच्याजवळ गेला आणि तिला उचलून घोड्यावर बसविले आणि स्वत: घोड्यावर बसून त्याने घोडा भरधांव सोडला.

सुलतानाने त्या दोघांच्या पाठोपाठ आपले घोडेस्वार पाठविले, परंतु ते अजीजच्या घोड्याच्या आसपास देखील पोहंचू शकले नाहीत.

अजीज राजकन्येबरोबर आनंदाने अनेक देश फिरत राहला. एक वर्ष संपत आले. वचन पुरे करण्याचा विचार मनात येतांच काय करावे हे त्याला सुचेना. राजकन्येने



अजीज काळजीत असल्याचे ओळखून कारण विचारले.

अजीजने, हमीदला दिलेल्या वचना-संबंधी सांगितले व म्हणाला—"या घोड्या-वर बसून मी जे काही एका वर्षात मिळवीन ते घोड्याची किमत म्हणून देईन असे कबूल केले होते. वचन दिल्याप्रमाणे तुझा कोट व तुला पण द्यावे लागणार. परंतु तुला सोडून मी एक क्षणभर देखील जग-णार नाही."

राजकन्येने चकित होऊन विचारले—"तुझे सौंदर्य पाहून मी तुला वरले. मी आपल्या सर्व नातेवाइकांना सोडले. हमीदला यापैकी एक गोष्टदेखील माहिती नसणार. घोड्याची किमत म्हणून हमीदला एक हजार दीनार देऊन टाकू या, त्याचे समाधान होईल."

परंतु अजीजला ते मान्य झाले नाही. काय वाटेल ते मानसिक किंवा शारीरिक कष्ट सहन करावे लागले तरी दिलेले वचन मोडता कामा नये असे त्याने सांगितले. नंतर दोघे अवधी संपतांच हमीदकडे आले. [illegible] सलाम [illegible] आणि घडलेले सर्व वृत्त थोडक्यात सांगून म्हणाला—"मी पुष्कळ दूर देशात फिरून आलो आहे. आपण दिलेल्या घोड्यामुळे मला ही राजकन्या आणि सोन्याचे दीनार शिवून ठेवलेला हा कोट मिळाला आहे. घोड्याची किमत म्हणून दोन्ही गोष्टी आपल्याच आहेत."

हमीद उदार विचारांचा होता. वचन दिल्याप्रमाणे अजीजने वर्षभरात जे काही मिळविले ते देण्यास तो कबूल झाला. हे पाहून अजीजविषयी हमीदच्या मनात आदरभाव उत्पन्न झाला. म्हणाला—"तू वचन पाळलेस या बद्दल माझ्या मनाचे समाधान झाले आहे. हा कोट माझ्या कामाचा आहे. पण यातले दीनार आपण अर्धे अर्धे वांटून घेऊं या. ही राजकन्या तुझी प्रेमिका आहे. तिच्याबरोबर तू सुखाने संसार कर. घोडा तुझाच आहे."

त्यानंतर अजीज राजकन्येबरोबर निघून गेला. त्यांचा संसार सुखाचा झाला.





# एका दिवसाचा सुलतान

[ ५ ]

हसन म्हणाला ते ऐकून खलीफाला फार आनंद झाला. म्हणाला—"हसन, तुझे निस्वार्थ प्रेम मला मिळाले त्याचा मला फार आनंद वाटतो. या क्षणापासून मी तुला माझा खास अनुचर म्हणून नेमतो. राजवाड्यात वाटेल तिकडे वाटेल तेव्हां हिंडाफिरायला तुला पूर्ण स्वातंत्र्य राहील. जुबेदा बेगमच्या महालात देखील प्रवेश करायला परवानगीची गरज नाही. मी जुबेदा बेगमच्या महालात असतांना देखील तू आलास तरी हरकत नाही."

खलीफाने राजमहालातच हसनच्या राह-ण्याची उत्तम व्यवस्था करून दिली आणि खर्चासाठी दहा हजार दीनार देवविले.

त्यानंतर खलीफा हसनचा निरोप घेऊन आपल्या दिवाणखान्यात निघून गेले. अबू अल हसन लगेच आपल्या घरी आनंदाने धावत पळत गेला आणि घडलेले वृत्त आईला सांगून म्हणाला—"अग आई! खलीफांनीच हौशी खातर हे सर्व नाटक रचले होते. बरं आतां मी जातो. दररोज येऊन भेटून जाईन." असे सांगून हसन खलीफांच्या राजमहालात परत आला.

खलीफाने केलेल्या उपकाराबद्दल हसनला परमानंद झाला, परंतु गर्व चढला नाही. तो नेहमी हास्यविनोद करून खलीफांचे मनोरंजन करी. तो दरबारातल्या सर्व अमीर उमरावांशी नम्रपणे वागे व आपल्या विनोदवृत्तीने सर्वांस खूष ठेवी. हसनला नेहमी खलीफांच्या महालात अगर जुबेदा बेगमच्या महालात खलीफा असतील तेथे रहावे लागे. खलीफाबरोबर हसन जेव्हां जेव्हां जुबेदा बेगमच्या महालात येई तेव्हां तेव्हां तो गन्ना दासीकडे चोरट्या नजरेने



पहात असल्याचे व त्याने पाहल्याबरोबर गन्ना दासीचा चेहरा लाजेने लाल झाल्याचे बेगमने दोन तीन दिवसांत ओळखले आणि संधी पाहून ती खलीफांना म्हणाली—"हसन व गन्ना परस्परांकडे प्रेमाने पहात असल्याचे आपल्या नजरेआड नसणार. त्यांचा निकाह लावून दिला तर?"

"माझ्या मनात तीच गोष्ट होती. परंतु कामाच्या गर्दीत मी विसरलो होतो. त्यांच्या मनाला आवडेल त्या तरुणीशी लग्न करून देतो असे वचन देखील मी दिले होते. गन्नाशी त्याचे लग्न करून दिले तर त्याचा संसार सुखाचा होईलसे वाटते." खलीफा म्हणाले.

खलीफांनी आणि बेगम जुबेदाने हसन व गन्ना दासीला बोलावून—"दोघं लग्नाला तयार आहां का?" विचारले.

गन्नाने स्मित करून जुबेदा बेगमचे पाय धरून आपली संमती दर्शविली.

हसन म्हणाला—"गरीब परवर! आपला हा दास आपल्या करुणासागरात गटांगळ्या खात आहे. गन्ना दासीला आपली गृहिणी करून घेण्यापूर्वी बेगम साहेबांना एक प्रश्न विचारण्याचे धाडस हा सेवक करीत आहे. परवानगी असावी."

"बोल, काय विचारायचे मागायचे असेल ते!" बेगम जुबेदा म्हणाली.

"माझ्या आणि हिच्या आवडी निवडी सारख्याच आहेत ना, प्रथम हिला विचारावे. मला काव्य, संगीत व नृत्य आवडते. हिलासुद्धा या गोष्टींची आवड नसेल तर हिच्याशी लग्न न करतां ब्रह्मचारी राहूनच मी आपली सेवा करीन." हसन म्हणाला.

जुबेदा बेगमने गन्नादासीला विचारले—"ऐकलेसना तू, याने काय विचारले ते? सांग तुला काय सांगायचे ते!"

गन्नाने होकारार्थी मान हलविली.

खलीफांनी लगेच काजीला आणि साक्षीदारांना बोलाविले. लग्नाच्या आणा शपथा लिहिल्या. तीस दिवस राजवाड्यात मेज-

[illegible] नवदंपतीने आपला संसार थाटला.

दोघांनी मनसोक्त खाण्या पिण्यात व ऐषआरामात जवळ होते नव्हते ते सर्व धन खर्च करून टाकले. खलीफा आपल्या दरबारच्या कामात गर्क असल्यामुळे हसनला द्यायची रक्कम किती हे ठरले नव्हते. म्हणून दोघांच्यावर कर्जाचा बोजा दिवसेंदिवस वाढतच गेला.

अशा स्थितीत दोघांना खलीफांकडे किंवा जुबेदा बेगमकडे जाऊन आपल्या कष्टांचे गाऱ्हाणे सांगणे बरोबर वाटले नाही. दोघे पुढे काय करायचे या विचारात खाली मान घालून तासन् तास बसून राहू लागले. शेवटी एकदां हसन धीर करून गन्नाला म्हणाला—"आपण डोळे मिटून पाण्यासारखा पैसा खर्च केला. आतां उपाशी मरण्यापर्यंत पाळी आली आहे. तरी मी खलीफांकडे जाऊन काही मागावे, हे मला आवडणार नाही. अशा परिस्थितीत एकच एक मार्ग उरतो."

गन्नाने दीर्घ श्वास सोडून विचारले—"बोला, काय तुमच्या मनात आहे ते. मी पण जिवापरीने ते करीन. आपल्याला कोणासमोर हात पसरणे जमणार नाही आणि आपल्या राहणीत ही काही बदल करतां येणार नाही."



"आणखी काय?...आत्महत्या!" हसन म्हणाला.

गन्ना दचकून एकदम ओरडून म्हणाली—"आत्महत्या! मी नाही तयार. तुम्हांला आत्महत्या करून घ्यायची असेल तर माझ्या मदतीशिवाय तुम्हांला ते करावे लागेल."

हसन ते उत्तर ऐकून रागावला नाही. शांतपणे म्हणाला—"अग ए पोरी! जिवंत राहणे हाच जगण्याचा एक मात्र मार्ग आहे हे मी ब्रह्मचारी होतो तेव्हांपासूनच मला माहीत आहे. तुझा हा मूर्खपणा पाहून मी इतके दिवस ब्रह्मचर्यात घालविले ते बरोबर होते, या गोष्टीची माझी खात्री झाली

आहे. तू उगाच घाई केलीस उत्तर द्यायला. मी पुरे सांगितले असते तर तू तशी मरायला नक्कीच तयार झाली असतीस. मेल्याचे सोंग करायचे आहे आपल्याला, म्हणजे सोन्याचा पाऊस पडेल, बघ!"

गन्नाने स्मित करून विचारले—"ते कसं काय?"

"ऐक, सांगतो!" हसन म्हणाला आणि पुढे सांगू लागला—"मी 'मेल्या' बरोबर मला एका चादरीत गुंटाळून माझे पाय व गुडघे काबाच्या दिशेने ठेव आणि माझ्या तोंडावर माझे पागोटे ठेवून दे. नंतर आक्रोश करून छाती बडवून मोठमोठ्याने रडू लाग. आपले केस पिंजारून कपडे फाडू लाग. तुला त्या शोकावस्थेत पाहून जुबेदा बेगम [illegible] धावत येईल. रडत असतां [illegible] घरी पडून पडल्यासारखे कर आणि माझे एकाएकी प्राणोत्क्रमण झाल्याचे सांग आणि बेशुद्ध झाल्यासारखी पुन्हा पडून रहा. तासभर उठू नकोस. सर्व लोक तुला शुद्धीवर आणण्यासाठी निरनिराळे उपाय करतील. नंतर आपल्या घरी सोने चालून येईल."

"असे 'मरण' तर सहजी येईल की! मी तुला 'मरण' येण्या[illegible] ही सर्व मदत करीन. परंतु मी [illegible] मरायचे ते सांगाल की नाही." गन्नाने [illegible]रले.

"ते सर्व त्या [illegible] माहीत आहे! मी सांगतो तसे करीत जा म्हणजे झाले. हा पहा, मी आतां 'मरतो आहे'!" असे म्हणत हसन [illegible] उताणा पडून राहिला.

गन्नाने त्याच्या अंगावर प्रेतावर टाकतात ती चादर गुंडाळली. नंतर तिने त्याच्या तोंडावर पागोटे ठेवून देऊन त्याने सांगितल्याप्रमाणे आक्रोश करून रडू लागली. केस पिंजारून अंगावरचे कपडे फाडून छाती बडवू लागली. जुबेदा बेगम आली तेव्हां आणखी मोठ्याने ओरडून बेशुद्ध झाल्यासारखी जमिनीवर पडून राहिली.

गन्नाचा तो अवतार पाहूनच जुबेदाला तिच्यावर आलेल्या भयंकर संकटाची कल्पना आली. तिने गन्नाला आपल्या मांडीवर निजवून तिला शुद्धीवर आणण्यासाठी निरनिराळ्या प्रकारे प्रयत्न करून पाहिले. मोठ्या कष्टाने तिने रात्री नवरा मेल्याचे जुबेदा बेगमला सांगितले आणि म्हणाली—"आतां मला मरण आले तर बरे वाटेल!" नंतर बेशुद्ध होऊन पडल्यासारखी पुन्हां पडून राहिली.

जमलेल्या सर्व दासी रडू लागल्या. हसन होता तेव्हां किती करमणूक होई, सांगू लागल्या आणि रडतरडत गन्नाला शुद्धीवर आणण्याचा प्रयत्नपण करू लागल्या.

जुबेदा बराच वेळ रडत राहिली व स्वतःच्या खजिन्यातून दहा हजार दीनार गन्नाच्या घरी पाठवून देण्यास तिने सांगितले आणि म्हणाली—"गन्नाच्या यजमानांची उत्तर क्रिया उमरावांना शोभेल अशी थाटात झाली पाहिजे."





खजीनदाराने जुबेदा बेगमच्या आज्ञे-प्रमाणे दहा हजार दीनार गन्नाच्या घरी पाठवून दिले.

गन्नाला प्रेमाने पोटाशी आवळून म्हणाली–"अल्ला तुझे सर्व कष्ट कमी करील आणि तुझ्या नवऱ्याचे हिरावलेले आयुष्य तुला लाभेल असे करील."

गन्नाने शुद्धीवर आल्यासारखे दर्शवून आपल्या आंसवांनी बेगमचे हात जणूंकाही धुतले आणि आपल्या घरी निघून गेली. घरात लाकडाच्या ठोकळ्यासारखा तिचा नवरा ज्या खोलीत पडला होता त्या खोलीत हंसत खिदळत ती गेली व म्हणाली–"अहो विनोद मूर्ती! उठा आतां, 'जिवंत' व्हा! देवाने आपल्या घरी आज सोन्याचा पाऊस पाडला आहे, पहा!"

त्याने आपल्या बायकोचे अभिनंदन केले व म्हणाला–"एवढ्यात सर्व नाटक संपले नाही. आता 'मरण्या'ची पाळी तुझी. तू जुबेदा बेगमला फसविलेस तसेच आतां खलीफांना फसविण्याचे काम मला करायाचे आहे. पाहू या मला ते कितपत जमते ते. लोकांना फसविणे त्यांना एकटचालाच माहीत आहे अशी त्यांची समजूत असेल कदाचित!"

त्याने आपल्या अंगावरचे कापड काढून ते गन्नाच्या 'मृत' शरीरावर टाकले व तिचे पाय व गुढगे काबाच्या बाजूने करून ठेवून तिला बजावून सांगितले–"कोंडल्या-सारखे वाटले तरी जागचे हालतां कामा नये." नंतर तो रडक्या तोंडाने पागोटे अर्धवट बांधून आणि डोळ्यांना कांद्याचा रस चोळून रडतरडत खलीफांकडे गेला आणि ओरडत आपले कपडे फाडीत खलीफांच्या दरबारात जाऊन उभा राहला.

आनंदसागरात पोहोत असलेल्या हसनला रडत आलेला पाहून खलीफा चकितच झाले. ते त्याच्याजवळ जाऊन त्याच्या मनाचे सांत्वन करीत त्याला विचारू लागले–"अरे, झाले काय सांग तरी?"

हसन मोठ्याने ओरडला–"गरीबपरवर! काय सांगू? अहो, गन्ना, [illegible]!" आणि मोठ्याने गळा काढून रडू लागला.

खलीफांनी गन्ना मरण पावल्याचे ओळखले व त्याच्या पाठीवर हात फिरवीत त्याचे सांत्वन करू लागले. त्यांचे डोळेपण ओले झाले. म्हणाले–"हसन! अल्लाची जशी मेहरबानी असेल तसेच रहावे लागते. गन्नाचे जे आयुष्य त्याने हिरावून घेतले ते तुला लाभो. तुला इतके दिवस आनंद देऊन ती तुला एकाएकी दुःखसागरात लोटून निघून गेली. तिची उत्तर क्रिया राजकन्येला शोभेल अशा थाटाने झाली पाहिजे." असे सांगून खलीफांनी आपल्या खजिनदाराला बोलाविले व दहा हजार दीनार हसनच्या घरी पाठवून द्यायला आज्ञा केली. खजिन-दार दीनार पाठविण्याची व्यवस्था करीत असता हसन उठला आणि पुन्हां मोठ्याने गन्नाचे नांव घेऊन रडू लागला. खलीफांनी त्याला निरोप दिला.

घरी आल्यावर त्याने मढ्यासारखी पडून राहलेल्या बिचाऱ्या गन्नाला अंगावरचे कापड काढून सोडविले आणि म्हणाला–"तुलाच ही विद्या येते असे नको समजूस, मी देखील दहा हजार सोन्याचे दीनार घेऊन आलो आहे. आतां जुबेदा बेगम आणि खलीफा दोघांचा राग होऊ नये याची काळजी बाळगली पाहिजे." त्यासाठी काय करावे लागणार हे त्याने थोडक्यात समजा-वून सांगितले.





खलीफांनी त्या दिवशी फार लवकर दरबारचे काम आटोपले व जुबेदा बेगमच्या महालात जाऊन तिची एक अत्यंत विश्वास-पात्र अशी दासी मेल्याची दु:ख वार्ता तिला सांगितली. त्याच वेळी जुबेदा बेगमनेपण खलीफांचा एक अत्यंत प्रिय अनुचर सोडून गेल्याची दुखवार्ता सांगितली.

खलीफा खूप जोराने हसले व बरोबर आलेल्या मसरूरला म्हणाले–"बेगम-साहेबांना काही भ्रम झालेला दिसतो आहे. खरे काय ते सांग!"

मसरूर स्मित करून म्हणाला–"सर-कार! अबू अल हसनला काही झाले नाही, चांगला स्वत: पायाने येऊन सरकार-[illegible] त्याची बायको वारली!" तिच्या उत्तर-क्रियेसाठी खलीफांनी दहा हजार दीनार दिल्याची गोष्ट सुद्धा मसरूरने सांगितली. ते ऐकून बेगम जुबेदा चकित होऊन म्हणाली–"अहो, म्हणता काय? हसनच्या उत्तरक्रियेसाठी म्हणून मी दहा हजार दीनार दोन घटकांपूर्वीच तर पाठविले."

मेला तो हसन की मेली ती गन्ना या गोष्टीवर दोघां नवराबायकोचा बराच वेळ वादविवाद झाला. शेवटी खलीफा मसरूरला म्हणाले–"आतां वजीरसाहेब तुम्ही स्वत: हसनच्या घरी जाऊन खरी गोष्ट काय आहे विचारून तरी या!" तो निघून गेल्यावर दोघां नवराबायकोंनीं पैज मारायचे ठरविले.

हसन कोणीतरी विचारपूस करायला येणार या विचारात असतां दुरून मसरूर येत असलेला दिसला. तो गन्नाला म्हणाला–"पहा, खरे काय ते विचारून यायला खलीफांनी मसरूरला पाठविले आहे. चटकन मर बघू!"

मसरूर येऊन पोचला त्या वेळी गन्ना मढ्यासारखी खोलीत पडलेली होती. तोंडावर रुमाल ठेऊन हसन रडण्याचे सोंग करीत तिच्याजवळ बसलेला होता. ते दृश्य पाहून मसरूरच्या डोळ्यांना पण पाणी [illegible] निघून गेला.

मसरूरच्या तोंडी गन्ना मेल्याचे ऐकून खलीफा जुबेदाला म्हणाले–"बेगम साहेब! तुम्ही हारलात पैज!"

जुबेदाला राग आला. म्हणाली–"हा मसरूर, खोटा व लबाड आहे. गन्नाला येथे रडत आलेली मी एकट्यानेच नाही, माझ्या दासींनीपण स्वत:च्या डोळ्यांनी पाहिली आहे. मला खोटी ठरविण्यासाठी तुम्ही सर्वांनी रचलेले हे कारस्थान आहे. थांबा, मी कोणाला तरी पाठवून खऱ्या खोट्याची चवकशी करविते. माझी गोष्ट खरी ठरली तर या मसरूरला फाशी झाली पाहिजे." असे सांगून जुबेदाने आपल्या म्हाताऱ्या दासीला अबू अल हसनच्या घरी पाठविले.

आणखी कोणी येते आहे का वाट पहात हसन बसला होता. त्याने दुरून जुबेदाच्या म्हाताऱ्या दासीला पाहिले व ओरडून म्हणाला–"गन्ना! आतां मी 'मरतो'!"

दासी खोलीत येऊन पाहते तो हसन मरून पडलेला दिसला आणि गन्ना त्याच्या शेजारी बसून रडत बसलेली दिसली. दासीने तिचे समयोचित सांत्वन केले आणि परत जाऊन गन्ना मेलेली नसून तिचा नवरा मेल्याचे सांगि-तले. आनंदाने जुबेदा खलीफांना म्हणाली–"प्रथम या मसरूरचे डोके उडवा पाहू!"

"मसरूर खोटा ठरला तर मी सुद्धा खोटा ठरेन. खरे काय आहे ते बरोबर दोघे



जाऊन पाहून येऊ या, चल!" खलीफा जुबेदाला म्हणाले.

खलीफा व जुबेदा बेगम दोघांबरोबर दासदासींची जणुंकाही एक फौजच निघाली.

हसन असे काही होणार हे ओळखूनच होता. तो गम्नाला म्हणाला—"आतां आपण दोघे 'मरू या'."

खलीफा व जुबेदा बेगम दोघांनी खोलीत पाऊल टाकले तेव्हां दोन प्रेते पडलेली दिसली. सर्व परस्परांकडे "म्हणजे!" अशा अर्थी पाहू लागले.

"पण पहिल्याने कोण मेले हे कसे कळायचे?" जुबेदा बेगमने विचारले.

"ते सांगेल त्याला मी दहा हजार दीनार द्यायला तयार आहे." खलीफा म्हणाले.

"मला द्या, मीच पहिल्याने 'मेलो'." म्हणत हसन उठून अंगावरचे कापड बाजूला सारू लागला.

प्रेत बोलू लागलेले पाहून जुबेदा बेगम दचकली. परंतु परिस्थिती ओळखून खलीफा [illegible] 'खोखो' [illegible] हंसू लागले व [illegible]— नाही रे बाबा हसन! हसून पोट दुखू लागले म्हणून मी 'मरतो आहे'."

खलीफा आपले हंसू आवरून हसनकडे पाहू लागल्यावर हसनबरोबर गम्नापण उठून बसली. दोघांनी अनुक्रमे खलीफा व जुबेदा बेगमचे पाय धरून क्षमा मागितली. हसन म्हणाला—"सरकार! मी ब्रह्मचारी होतो तोंपर्यंत मला पैशाची चणचण कधीच भासली नाही. परंतु ही गम्ना आहे ना सोने किती पोती भरून दिली तरी गिळून फस्त करते. आपला सर्व खजिना खजिनदारासकट गिळून टाकील ही."

खलीफा व जुबेदा बेगमने दोघांना माफ केले आणि प्रत्येकाला आणखी दहा दहा हजार दीनार इनाम म्हणून दिले.

हसनवर आलेले संकट खलीफांना कळले. त्यांनी जफरच्या बरोबरीने हसनला पगार ठरवून दिला.

त्यानंतर हसन व गम्ना दोघांचे पुढील आयुष्य सुखाने गेले. (संपूर्ण)





# सोनेरी पक्ष्याचे अंडे

सुंदरवनात एका मोठ्या आंब्याच्या झाडावर चांदण्या रात्री एक घुबड बसलेले होते. ते सुंदर दृश्य पाहण्यात घुबड देहभान विसरून गेले असतां झाडाखाली काही तरी सरसरण्याचा आवाज ऐकू आला. घुबडाने खाली वांकून पाहिले. त्याला एक लांबलचक सांप दिसला आणि सांपाच्या तोंडात एक पक्ष्याचे अंडे दिसले. झाडाच्या मुळाशी असलेल्या एक पोकळ्या जागेत सांपने ते अंडे ठेवून दिले. नंतर सांप आला त्या वाटेने निघून गेला.

रात्र उलटल्यावर घुबडाने झाडाखाली जाऊन त्या पोकळीत पाहिले तेव्हां त्याला एक सोनेरी पक्ष्याचे पिल्लू दिसले.

ते सोनेरी पिल्लूं पाहून घुबडाला ते पिल्लू आपल्या घरट्यात नेण्याचा मोह आवरेना. त्याने प्रेमाने स्वत:च्या पिल्लासारखे त्याला वाढविले. दोन महिन्यात ते पिल्लूं पक्ष्यांच्या जातीत अद्वितीय सुंदर म्हणून प्रसिद्ध झाले. ती एक मादी होती.

त्या सोनेरी पक्ष्याशी लग्न व्हावे असे सुंदरवनातील सर्व तरुण पक्ष्यांना वाटू लागले. परंतु त्या सर्वांना नकार मिळाला.

सुंदरवनातील पक्ष्यांचा दोन तोंडे असलेला एक विचित्र पक्षी राजा होता. त्याची पट्टराणी एक लांडोर होती. तिच्या इतकी सुंदर पक्षीण दुसरी नाही अशी तिला घमेंड होती. सोनेरी पक्ष्याच्या सौंदर्याचे वर्णन ऐकून तिच्या मनात ईर्ष्याग्नी पेटला. आपले सौंदर्य वाढविण्यासाठी पुष्कळ कृत्रिम उपाय करून सोनेरी पक्ष्याला पहायला निघाली. तिचा तो नट्टापट्टा पाहून सोनेरी पक्षीण खदखदां हसली.

सोनेरी पक्षिणीला प्रत्यक्ष पाहून राणीच्या मनांत ईर्ष्याग्नी जास्तच भडकला. त्यांत ती आपल्याला पाहून हंसली याचा विचार

करून तिला जास्तच संताप चढला. सोनेरी पक्षिणीचे वाईट झाले पाहिजे, असा विचार करून तिने एका महार कावळ्याशी तिचे लग्न क[illegible]न देण्यासाठी हुकूम काढविला व [illegible]से लग[illegible] करवून दिले. महार कावळा व सोनेरी पक्षिणीने एका झाडावर घरटे बांधून [illegible] आपला संसार थाटला.

इतके झाले तरी लांडोरी राणीचा इर्ष्याग्नी थंड झाला नाही. सोनेरी पक्षिणीचा संसार महार कावळ्याबरोबर ही सुखाचा चालू असलेला तिला पाह[illegible] नाही. तिने एक दुष्ट उपाय [illegible]. ती आपल्या नवऱ्याला म्हणाली–"काय हो, तुम्ही दररोज असे अशक्त होत चालला आहां की ऐन तारुण्यात तुम्हांला म्हातार[illegible] [illegible] आले आहे. [illegible] दररोज एक सोनेरी पक्ष्याचे [illegible]डे [illegible] तर पुन्हा तारुण्य येईल. तिचे [illegible]हिले अंडेच तुम्ही खा. तुम्ही आपले [illegible]शिपाई ने[illegible] पहारा द्यायला."

पक्ष्यांच्या [illegible]जाने नेम[illegible]लेले शिपाई सोनेरी पक्ष्याने अं[illegible] घातल्याबरोबर ते आपल्या राजाला नेऊन देऊ लागले. सोनेरी पक्षिणी[illegible] पण काह[illegible] करता येईना. दोघां नवर[illegible] बा[illegible]कोंनी पळून दुसऱ्या अरण्यात जायचा विचार केला, परंतु ते सुद्धां शक्य झाले नाही. कारण लांडोरी राणीने पन्नास चारींना त्या दोघांवर नजर ठेवण्यासाठी नेमले होते.

एकदां घुबड सोनेरी पक्षिणीच्या घरट्याजवळ आले. तिच्यावर जो प्रसंग आला [illegible] [illegible] घुबड[illegible] [illegible] वाटले व तिला या संकटातून सोडविण्यासाठी काही उपाय करण्याचे पण त्याने योजले.

घुबडाला पक्ष्यांच्या औषधपाण्याची चांगली माहिती होती. त्याने एकदां पक्ष्यांच्या राजाचे औषधपाणी त्याला त्याचा आजार बरा केला होता. राजाचा त्याच्यावर पूर्ण विश्वास होता. परंतु राणी जवळ असेपर्यंत त्याला काही करणे शक्य नव्हते. म्हणून तिला दूर पाठविण्यासाठी काही तरी उपाय करणे आवश्यक होते.

म्हणून लांडोरीराणीचे आईबाप ज्या अरण्यात रहात असत त्या अरण्यात जाऊन त्याने सर्व पक्ष्यांना एक मेजवानी दिली आणि त्यांच्या अन्नात काही तरी विष कालवून ठेवले. ते अन्न खाऊन त्या अरण्यातले सर्व पक्षी आजारी पडले.

ती बातमी लांडोरी राणीला कळली. तिने राजाला ती दुःखवार्ता कळविली आणि आपल्या आजारी आईवडिलांना भेटून येते असे सांगून निघून गेली.

दुसऱ्याच दिवशी घुबड पक्ष्यांच्या राजाला जाऊन भेटले. त्यावेळी राजा सोनेरी पक्ष्याचे अंडे खाण्याच्या तयारीत होता.

घुबड राजाला म्हणाले–"महाराज! थांबा, [illegible]! ते ताजे अंडे दिसत नाही. फार जुने, सडलेले दिसते आहे."

"अहो, ते काल रात्रीच घातलेले अंडे आहे!" राजा म्हणाला.





"तरी खात्री करून घ्यावी, हे बरं नाही का? या पाण्याच्या पेल्यात अंडे टाकून पहा. ताजे असेल तर बुडेल, नाही तर तरंगेल!" घुबड म्हणाले.

"मला माहीत आहे ते!" असे म्हणत राजाने ते अंडे घुबडाने आणलेल्या पाण्याच्या पेल्यात टाकले; पण ते अंडे बुडले नाही आणि तरंगू लागले.

"अरे, होय कीं! तुम्ही म्हणालात तेच खरे ठरले तर! दूर नेऊन टाका हो ते!" राजा म्हणाला.

घुबडाने ते अंडे उचलून सोनेरी पक्षिणीला दिले. तिला तर आश्चर्यच वाटं म्हणाली— "तुम्ही हे अंडे कसे काय बांध ;लत हो?"

घुबडाने हंसत त्याने जे केले ते सांगितले. म्हणाला—"मी एक जादू केली आणि ती यशस्वी झाली. एका लहान पोराला ही जादू करतांना मी एकदां पाहिले होते. तो गोड पाण्यात अंडी घालून पहात असे. ती बुडत. नंतर तो पाण्यात मीठ विरघळवून त्यात पुन्हां ती अंडी टाकी [illegible] अंडे बुडत नसून तरंगू लागल्याचे [illegible] मी खाऱ्या पाण्यातच राजाकरवी ते अंडे टाकविले. अंडे शिळे कुजके असल्याची राजाची खात्री झाली."

ते अंडे सोनेरी पक्षिणीच्या घरट्यात ठेवणे धोक्याचे आहे असे समजून घुबडाने ते आपल्या घरट्यात नेऊन ठेवले. तेथे त्या अंड्यातून एक सोनेरी पिल्लू बाहेर आले. एक दिवशी रात्री त्या पिल्लाला घेऊन घुबड दुसऱ्या अरण्यांत निघून गेले.

लांडोरी राणी आपल्या आईवडिलांना भेटून परत येत असतां वाटेत एका शिकाऱ्याने तिला बाण मारून ठार केले. त्यानंतर काही दिवसांनी राजादेखील मरण पावला. तेव्हांपासून सोनेरी पक्षिणीला व तिचा नवरा महार कावळा दोघांना कायमची मुक्ती मिळाली. दोघे, घुबड निघून गेले होते त्या अरण्यात जाऊन आपल्या पिल्लांला भेटले व तेथेच घरटे बांधून राहू लागले.





# हत्तींची सभा

आफ्रिका खंडातल्या एका मोठ्या सरोवराच्या उत्तरेकडील तीरावर रामोगी नावाचा एक मनुष्य आपल्या सात मुलांबरोबर रहात असे. सर्वांच्या बायका व मुले बाळे पण एकत्रच रहात. त्या सर्वांच्या लहान लहान झोपड्या मिळून एक छोटे खानी गावच झाले होते.

रामोगी वारल्यानंतर त्यांच्या रीतीप्रमाणे सर्व जमीनजुमला त्याच्या मोठ्या मुलाला मिळाला. बाकीच्या सहा जणांना आपापल्या बायको व मुलांबरोबर आणखी कोठेतरी जाऊन रहावे लागले.

भावंडांपैकी शेवटचे दोघे भाऊ जुळ्या भावंडांसारखे रहात. हिंडणे फिरणे, खाणे पिणे, झोपणे सर्व एकत्रच. एवढेच नव्हेतर दोघांनी लग्ने केली ती सुद्धां दोघी सख्ख्या बहिणींशी केली, म्हणजे दोघांना निरनिराळे रहावे लागू नये.

दोघांनी एकाच जागी झोपड्या बांधून रहावयाचे ठरविले आणि दोघे मिळून शेतीभाती करीत तसे करणे त्यांच्या रीतीविरुद्ध होते तरी त्यांनी, त्या गोष्टीची फिकीर केली नाही.

रामोगी रहात असे त्याच्या पूर्वेला एका मोठ्या अरण्याच्या बाजूलाच दोघे झोपड्या बांधून राहू लागले.

परंतु रीतीविरुद्ध एकत्र राहण्याचा प्रयत्न आणि एका दाट अरण्याशेजारी झोपड्या बांधण्याचा त्यांचा निश्चय, दोन्ही साहसाचीच कामे होती. त्याशिवाय अशी एक समजूत रूढ होती की ते अरण्य मंत्रवलेले जंगल आहे. त्यात मनुष्याने कधी पाऊल टाकले तर त्याला सरड्याचे किंवा एखाद्या रानटी जनावराचे रूप येते. आणखी भिण्याचे कारण म्हणजे जंगलात हत्ती रहात असत.



त्या हत्तींना पाहून मांत्रिक देखील भिऊन पळून जात असत.

अशा भयंकर अरण्या शेजारी पोधू आणि अरुवा दोघांनी शेतात ज्वारी पेरली होती,—आणि कणसे पाहून चांगले पीक येणार असे वाटू लागले होते.

एकदा अरुवा गुरांना जंगलात चरायला घेऊन गेला. पोधू बरे वाटत नव्हते म्हणून अंथरुणावरच पडून होता. इतक्यात मुले "हत्ती हत्ती" अशी ओरडू लागली. पोधू चटदिशी उठला आणि एक भाला हाताला आला तो घेऊन बाहेर गेला.

ज्वारीच्या शेतावर हत्तींचा एक मोठा कळप तुटून पडला होता. ज्वारीची कणसे [illegible] हत्ती शेताचा नासधूस करीत होते. पोधू जंगलात थोडा एका बाजूला जाऊन मोठ्याने ओरडला. ते ऐकून सर्व हत्ती जागच्या जागी थबकले.

हत्तीने आपल्या हातातला भाला सर्व शक्ती एकवटून हत्तींच्या कळपांतल्या सर्वात मोठ्या हत्तीवर फेंकला आणि तो त्या हत्तीच्या गंडस्थलात जाऊन रुतला. तो हत्ती रागाने आणि कळा सहन झाल्याने फार मोठ्याने ओरडत जंगलास शिरला आणि त्याच्या पाठोपाठ कळपातले सर्व हत्ती निघून गेले.

पोधूने जे साहस दाखविले त्यामुळे पीक वांचले. परंतु या प्रयत्नात त्याच्या हातून एक चूक झाली. त्याने हत्तीला जो भाला मारला होता तो अरुवाचा होता. आणि पिढ्यान् पिढ्या त्यांच्या कुटुंबात वापरण्यात आला होता. तोच नेमका हत्तीबरोबर नाहींसा झाला. त्यांच्या कुटुंबात तो मंत्रवलेला भाला असल्याची समजूत होती. पूर्वी कोणी नंदी जातीच्या लोकांनी तो मंत्रवून तयार करविला होता, म्हणे. रामोगी स्वतः तयार करविलेले भालेच वापरी. वंशपरंपरागत चालून आलेला तो भाला त्याने कधी वापरला नव्हता. त्याने आपल्या सर्व संपत्तीची वांटणी करून ठेवली होती. त्यात हा भाला अरुवाच्या वांटणीला [illegible] तो भाला सभाळून ठेवीत असे. पोधूने तोच भाला उचलून हत्तींचा कळप पळवून लावला होता.

अरुवा गुरांना घेऊन संध्याकाळी घरी आला तेव्हां पोधूने घडलेली चूक कबूल करून माफी मागितली. परंतु अरुवाला इतका राग आला की तो म्हणाला—"तू मेलास तरी चालेल परंतु माझा भाला मला परत मिळाला पाहिजे."

पोधूने, त्या दाट जंगलात हत्तीच्या कळपात शिरून तो भाला परत मिळविणे किती धोक्याचे आहे वगैरे गोष्टी सांगितल्या. परंतु अरुवा हट्टाला पेटला होता. म्हणाला—"माझा भाला आणून दे नाहीं तर मी तुला ठार करीन."

"ठीक, मी तुझा भाला आणून देतो, त्या प्रयत्नात प्राण द्यावे लागले तरी परत येणार नाही!" असे सांगून पोधू दुसऱ्या दिवशी कोणी उठण्यापूर्वी एक भाला खांद्यावर टाकून हत्तीच्या कळपाचा शोध काढीत निघाला. दिवसभर रानटी जनावरांपासून आपला बचाव करीत तो पुढे जात होता. रात्री एका मोठ्या झाडाच्या पोकळीत बसून त्याने बरोबर आणलेल्या भाकऱ्या खाल्ल्या आणि उजाडेपर्यंत झोपून राहला. उजाडल्यावर पुन्हा हत्तीच्या शोधार्थ पुढे निघाला. बराच वेळ चालत राहल्यावर



झाडीच्या मध्य भागी एक मोकळी जागा दिसली. तेथे एक जुनी झोपडी होती. झोपडीतून धूर बाहेर येत असलेला दिसला.

पोधू चकित होऊन झोपडीकडे पहात असतां एक म्हातारी बाहेर आली. वाळलेल्या काटक्या तोडीत ती बडबडत होती— "या म्हातारीला कोणी हातभार द्यायला असते तर!"

ते ऐकून पोधू चटदिशी पुढे येऊन म्हणाला—"आजी! मी तोडून देतो लाकडे." आणि त्याने म्हातारीच्या हातातली कुऱ्हाड मागून घेतली.

म्हातारी त्याला लाकडे फोडीत असलेला पाहून कृतज्ञतापूर्वक हंसत म्हणाली—



"कोण रे बाबा तू? देवासारखा येऊन पावलास!"

पोधूने थोडक्यात आपली सर्व कथा सांगितली.

"असले साहस दाखविणारा तूच दिसलास बाबा! तुला मदत करता येईल की नाही, मी सांगू शकत नाही. परंतु तू काही काळ लाकडे फोडून देण्याचे काम करीत येथेच रहा." ती म्हणाली.

पोधू सुमारे एक महिनाभर म्हातारीकडे लाकडे फोडून देई व ती सांगे ते काम करी. ती दररोज त्याला उणे कमी बोले पण. मधूनमधून मूर्ख, नालायक आळशी, ऐदी म्हणायलादेखील मागेपुढे पहात नसे.

... म्हातारीकडून आपल्याला काही मदत मिळण्याची लक्षणे दिसत नाहीत अशी पोधूची खात्री झाली. तो अगदी निराश झाला. अशा प्रसंगी म्हातारीने त्याला बोलावून जवळ बसायला सांगितले व म्हणाली–"तू इतके दिवस फुकट गेले असे समजू नकोस. धीर, सहनशक्ती आणि शील हे तीन गुण असल्याशिवाय माणसाला आपल्या कामात यश मिळत नाही. तुझ्यात हे तीनही गुण आहेत, या गोष्टीची खात्री करून घेतल्यावर तुला हत्तींच्या कळपांत जाऊन कार्यसिद्धी होईल असे मला वाटते. तू एका हत्तीला दुखापत केली आहेस. हत्ती कधी क्षमा करीत नाहीत. म्हणून तुला थोडी मदत होईल यासाठी एक वस्तु तुझ्याजवळ देऊन ठेवते." असे सांगून म्हातारीने एक निळ्या रंगाचा कांचेचा मणी पोधूच्या हातात दिला.

दुसऱ्या दिवशी कोणत्या दिशेने व वाटेने गेले की हत्तींच्या वस्तीत तो पोहचू शकेल हे तिने सांगितले.

म्हातारीने सांगितल्याप्रमाणे चालून पोधू चारपांच तासात हत्तींच्या वस्तीत येऊन पोचला. त्या दाट अरण्यात एक मोठे मैदान होते. मैदानाच्या चारीबाजूला किल्ल्याच्या कोटासारखी दाट झाडी होती. मोठमोठी जाड खोडाची झाडे परस्परांना चिकटून होती.

होते. कळपात लहान थोर हत्ती व हत्तिणी होत्या. त्यांत एका लहानशा टेकाडया सारखा एक म्हातारा हत्ती पोधूला दिसला. तो त्यांचा राजा असावा असे त्याला वाटले.

पोधू त्या गजराजासमोर खाली मान करून थरथर कापत उभा राहिला.

गजराजाने काहीतरी आवाज करून म्हटल्यासारखे वाटले. "तू इकडे कशासाठी आला आहेस?" असे तो विचारीत असावा असे पोधूला वाटले, म्हणून त्याने मान वर करून सर्व हत्तींना ऐकू जाईल अशा स्वरात उत्तर दिले–"गजराजा! तुझ्या कळपाने माझ्या ज्वारीच्या शेतात शिरून नासधूस सुरू केलेली पाहून मी पिकाच्या रक्षणासाठी अविचाराने आणि निर्दयपणे तुमच्यापैकी एकाला भाला मारला. तो भाला माझ्या भावाचा होता. तो भाला मी परत आणून दिला नाही तर मला प्राणदंड देण्याचे माझ्या भावाने ठरविले आहे. म्हणून मी तुमच्याकडे आपल्या प्राणाची भीक मागायला आलो आहे. मला तो भाला तरी परत द्या किंवा माझा जीव घेऊन या अग्निदिव्यातून माझे रक्षण तरी करा!"

बराच वेळ कोणताही हत्ती काहीच उद्गारल्यासारखे भासले नाही. परंतु काही वेळाने हत्तींचा राजा काहीतरी म्हणाल्या



सारखा भासला. इतर दोन हत्ती गुणगुणल्यासारखे वाटले. नंतर दोन हत्ती पोधूला दूर एका झाडाखाली घेऊन गेले.

त्यानंतर हत्तींची सभा सुरू झाली. बराच वेळ चर्चा होत राहिली असावी. मधूनमधून हत्तींचा होकारार्थी नकारार्थी आवाज झाल्याचा भास होई. शेवटी सभा संपली. हत्ती पोधूला आपल्या राजाकडे पुन्हा घेऊन गेले. गजराज काही तरी म्हणाल्यासारखे वाटले.

हत्ती पोधूला एका झाडीत घेऊन गेले. तेथे पुष्कळ भाले पडलेले होते. पोधूने आपल्या भावाचा भाला ओळखून उचलून घेतला. त्याने सर्व हत्तींना नम्रतापूर्वक

नमस्कार केला आणि त्यांचे आभार मानून आपल्या वस्तीच्या दिशेने परतला.

परत येत असतां तो वाट चुकला की काय त्याला कळले नाही, एवढे खरे की, त्या म्हातारीची झोपडी त्याला वाटेत लागली नाही. म्हातारीने दिलेला तो निळा मणी त्याच्याकडेच राहून गेला.

भाला परत मिळाल्याबद्दल अरुवाला फार आनंद झाला. पोधूने जे पहायला किंवा अनुभवायला मिळाले, सर्व सांगून त्याला म्हातारीकडून मिळालेला निळा मणी दाखविला. सर्व तो मणी हातात घेऊन पहात त्याचे कौतुक करू लागले. नंतर मुलांनी तो मणी घेतला. खेळात अरुवाच्या लहान मुलाने तो तोंडात टाकला आणि गिळला.

झाले, तेवढ्यावर पुन्हां भांडण सुरु झाले. पोधूच्या बायकोने त्या मुलाला जोराने चार दिल्या. अरुवाची बायको आपल्या मोठ्या बहिणीला त्याबद्दल तोंडाला आले ते बोलली.

[illegible] अरुवाला म्हणाला—“अरुवा! मी तुझा भाला घालवून बसलो तेव्हां तू माझा जीव घ्यायला तयार झालास. मी प्राण-पणाने तो आणून दिला. आतां माझा हा मंतरलेला मणी तुझ्या मुलाने गिळला आहे. बोल, आतां तुझे काय म्हणणे आहे ते ऐकू दे!”

“उद्यां मी दुसरीकडे जाऊन आपले वेगळे बिऱ्हाड थाटतो. कुत्री मांजरी एकत्र राहू शकतील, पण दोघे भाऊ एकत्र नांदणे मनुष्य जातीत तरी शक्य नाही, असे मला वाटू लागले आहे.” अरुवा म्हणाला.

“ठीक, तुला काय वाटेल ते कर परंतु माझा मणी तुझ्या मुलाने गिळला आहे! मी त्याला आपल्याकडे ठेवून घेणार!” पोधू म्हणाला.

अरुवाला नकार देता आला नाही. त्याने आपल्या मुलाला पोधूकडे ठेवून दिले आणि दूर दुसऱ्या टेकाडावर आपले झोपडे बांधून तेथे राहू लागला.





# महाभारत

नहुष राजा पूर्वी स्वभावाने फार चांगला होता. इंद्रपद मिळतांच तो भोग-विलासात पडला. अप्सरां बरोबर विहार करीत असता त्याला एकदा इंद्राची स्त्री शची दिसली. तिला पाहतांच तिच्याशी विहार करण्याची इच्छा त्याच्या मनात उत्पन्न झाली. आपल्याला इंद्रपद मिळाले असतां इंद्राची बायको आपली पत्नी कां असू नये असा त्याने हट्ट धरला. त्याने शचीला कळविले तेव्हां ती बृहस्पतीकडे गेली.

ते कळल्यावर नहुषाला बृहस्पतीचा फार राग आला व तो देवांना आणि ऋषींना शिव्या शाप देऊ लागला.

परस्त्रीवर नजर टाकणे महापातक आहे असे त्यांनी नहुषाला समजावून [illegible]

“इंद्राने अशी अनेक कामे मागे केलेली आहेत. त्यावेळी तुमचा ही नीति अनीती कोठे गेली होती?” नहुषाने विचारले.

तेव्हां देव बृहस्पतीकडे गेले व म्हणाले—“शचीने नहुषाची पत्नी म्हणून राहणे मान्य केले नाही तर त्रिलोकावर मोठे संकट येईल.”

“मला वाटेल त्या यातना सहन कराव्या लागल्या तरी मी त्याची पत्नी म्हणून रहायला तयार नाही.” शचीने साफ सांगून टाकले.

त्या स्थितीत नहुषाचा राग शांत करण्यासाठी व शचीवरचे संकट टळावे यासाठी काही तरी उपाय करणे आवश्यक [illegible]



बृहस्पती देवांना म्हणाला–"नहुषाला फार गर्व झाला आहे. गर्वोन्मताचे पतन हे निश्चित आहे. शचीने विचार करण्यासाठी थोडा अवधी मागून घ्यावा."

त्याप्रमाणे शची नहुषाला जाऊन भेटली आणि म्हणाली–"आपण म्हणता आहां ते विचार करूनच मी ठरवू शकेन. तरी मला थोडा अवधी द्यावा."

तिकडे ऋषी मुनींनी नहुषाच्या पापाचे खापर पूर्णपणे भरावे यासाठी त्याच्याकरवी अश्वमेध यज्ञ सुरू करविला. इंद्र नहुषाच्या तेजासमोर उभा राहू शकला नाही. शचीने त्याला भेटून पुन्हां इंद्रपद प्राप्त करण्यास

"यावेळी नहुष शक्तिशाली आहे. त्याच्या पापाचे खापर भरत आले आहे. परंतु तुझ्या मदतीने ते लवकर भरू शकेल. नहुष तुझ्यावर भाळला आहे तेव्हां तू सांगशील ते करायला तो तयार होईल. तू त्याला असे सांग की सप्तर्षींनी त्याला पालखीत बसवून तुझ्याकडे आणावे. नहुषाचे पतन होण्यास हा सर्वोत्तम उपाय आहे." इंद्राने शचीला सल्ला दिला.

शचीने नहुषाला अद्वितीय वाहनात बसून यावे असे सांगून ऋषींनी वाहून आणलेल्या पालखीत यायला सुचविले. नहुषाला परमानंद झाला. त्याने सप्तर्षींनी त्याच्या पालखीला खांदा द्यायला सांगितले. मुनी नहुषाला राग यावा यासाठी मुद्दाम हळुहळु चालू लागले नहुषाने 'सर्प' 'सर्प', म्हणजे 'लवकर चला' असे म्हणत अगस्त्य ऋषींना लाथ मारली. तेव्हां अगस्त्य ऋषींनी त्याला शाप दिला–"तूच 'सर्प' म्हणजे साप हो!" त्याप्रमाणे नहुष स्वर्ग-लोकातून भूलोकात येऊन पडला आणि इंद्राला पुन्हां इंद्रपद मिळाले.

शल्याने ही कथा पांडवांना सांगितली आणि पांडवांचा निरोप घेऊन कौरवांकडे गेला.

द्रुपद राजाचा पुरोहित पांडवांचा दूत

कौरव आणि पांडवांच्या बाजूने युद्धास तयार होऊन आलेले राजे आपापल्या सैन्यासह येऊन पोचले होते.

पांडवांच्या बाजूने युद्ध करण्यास सात अक्षौहिणी सैन्य उपप्लाव्य येथे जमा झाले. महारथी युयुधान एक अक्षौहिणी सैन्य घेऊन आला. चेदि देशाच राजा धृष्टकेतु आणि जरासंधाचा मुलगा जयत्सेनदेखील एकेक अक्षौहिणी सैन्यानिशी आले. पांड्य देशाचा राजा पर्वत प्रदेशात राहणाऱ्या शूर योद्ध्यांचे सैन्य घेऊन दाखल झाला. द्रुपद राजा अनेक देशांच्या शूरवीरांसह व आपल्या शूर पुत्रांसह फार मोठे सैन्य घेऊन आला. मत्स्य देशाचा राजा विराट गिरिजन वीरांचे एक मोठे सैन्य घेऊन आला. अनेक देशांचे राजे आपापले झेंडे उभारून कौरवांशी युद्ध करण्यास येऊन पांडवांच्या नगरीत हजर झाले.

त्याच वेळी कौरवांच्या बाजूने अकरा अक्षौहिणीचे सैन्य पांडवांशी युद्धास तयार होऊन हस्तिनापूरला आले. नरकासुराचा मुलगा भगदत्त चीन, किरात इत्यादि जातींचे एक अक्षौहिणी सैन्य घेऊन आला. त्याच प्रमाणे भूरिश्रवा आणि शल्य प्रत्येकी एक अक्षौहिणी सैन्य घेऊन आले. पल्लव पुष्प माला धारण करून हत्तीसारखे बलिष्ठ



सौवीर देशाहून जयद्रथ वगैरे थोर शूर वीर तयार होऊन आले. त्यांचे सैन्य सुमारे एक अक्षौहिणी होते. दक्षिणेकडून माहिष्मती नगरीहून नील भयंकर शस्त्रास्त्रे धारण करणाऱ्या आपल्या शूर अनुयायांसह आला. अवंतीचा राजा दोन अक्षौहिणी सैन्य घेऊन हजर झाला. कैकेय देशाचा राजा एक अक्षौहिणी सैन्यासह आला. इतर लहान थोर राजांचे मिळून तीन अक्षौहिणी सैन्य पण आले.

दुर्योधनाच्या बाजूने आलेल्या सैन्यालाच हस्तिनापूरला उतरण्यासाठी पुरेशी जागा नव्हती. ते सैन्य पंचनद, गुर्जर, रोहित-



आणि यमुनेच्या विस्तीर्ण तीरावर राहुट्या व तंबू टाकून उतरले.

अशा तऱ्हेने जागोजागी पसरलेले सैन्य पहात द्रुपद राजाचा पुरोहित हस्तिनापुरी पोचला आणि सरळ धृतराष्ट्राच्या दरबारात गेला. त्या वृद्ध ब्राह्मणाचे विदुराने, भीष्माने धृतराष्ट्राने सर्वप्रकारे आदरातिथ्य केले आणि पांडवांची कुशलवार्ता विचारली. त्या ब्राह्मणाने देखील दुर्योधनदिकांची कुशलवार्ता विचारून घेतली आणि सर्वांना ऐकू येईल व कळेल अशा स्वरात म्हणाला—

"सभासद हो! धृतराष्ट्र व पांडु दोघे सख्खे भाऊ. वाडवडिलांच्या सपत्तीवर व [illegible]

आहे. तेव्हा धृतराष्ट्राच्या मुलांना त्यांच्या पित्याचे राज्य आणि पांडुपुत्रांना त्यांच्या पित्याचे राज्य उपभोगण्याचा अधिकार आहे. परंतु पांडवांना मात्र ते उपभोगण्यास मिळू नये, याचे कारण काय? पांडवांना त्यांचे राज्य उपभोगू न देता दुर्योधनाने त्यांना दिलेला त्रास तुम्हां सर्वांच्या माहितीचा आहे. पांडवांचे भाग्य बलवत्तर होते म्हणूनच ते सर्व संकटांना तोंड देऊन वाचले. पांडवांनी आपल्या स्वतःच्या शौर्य पराक्रमाने मिळविलेले राज्यदेखील त्यांना पूर्णपणे उपभोगता आले नाही. कारण त्यांच्या कारस्थानाला कपटी शकुनीने हात-भार लावला. बारा वर्षे वनवास व एक वर्ष अज्ञातवास पांडवांनी सपत्नीक भोगला. विराट नगरीत त्यांच्यावर जे जे प्रसंग ओढवले ते सांगण्यासारखे किंवा ऐकण्या-लायक सुद्धां नाहीत. इतके असूनही पांडवांची इच्छा कौरवांशी सख्य राखण्याची आहे. युद्धामुळे प्राणहानीच होणार. काही-तरी समेटाने करावे असे त्यांना मनापासून वाटते. दुर्योधनाला त्याच्या असंख्य सैन्याचा विश्वास वाटतो आहे. परंतु तो त्याचा निव्वळ भ्रम आहे. त्याच्याकडे पांडवांपेक्षां चार अक्षौहिणी सैन्य असून उपयोग काय? पांडवांच्या सैन्यात सात्यकी, भीम, नकुल [illegible]

[illegible] तितक्याच अक्षौहिणी सैन्याला पुरे करून सोडील. कृष्ण त्याच्या सारखाच पराक्रमी आहे. अशा बलाढ्य पांडव वीरांशी युद्ध करून जिंकण्याची आशा, कोणत्याही बुद्धिमान माणसाच्या मनात उत्पन्न होणार नाही. पांडवांशी सख्य करून घ्यायला याहून चांगली संधी मिळणार नाही."

द्रुपदाच्या पुरोहिताने या शब्दात निवेदन केल्यावर भीष्माचार्य म्हणाले—"हे ब्राह्म-णोत्तमा! आपण म्हणालात ते किती कठोर व कडू असले तरी सत्य तेच आहे. पांडवांनी युद्धाची सर्व प्रकारे तयारी करून सख्य करण्यासाठी हात पुढे करणे हे त्यांना शोभण्यासारखेच आहे. अर्जुनाने अनेक अस्त्रे संपादन केली आहेत. स्वतः इंद्र वज्रायुध धारण करून युद्धाला उभा राहिला तर अर्जुनासमोर त्याला माघार घ्यावी लागेल."

भीष्माचार्य बोलत असतां मध्येच उठून कर्ण उभा राहिला आणि म्हणाला—"ब्राह्म-णोत्तमा! आपण म्हणालात त्यात नवीन काहीच नाही. धर्मराज स्वतः मान्य केलेल्या अटीप्रमाणे द्यूतात आपले सर्वस्व हारून वनवासाला गेला आणि तोच मूर्खपणाने आपले राज्य परत मागतो आहे, यात काही अर्थ आहे का? पांडवांच्या बलपरा-



क्रमाला भिऊन दुर्योधन एक टीचभर जमीन देखील द्यायला तयार होणार नाही. त्यांना परत राज्य हवे असेल तर अटीप्रमाणे पुन्हां वनवास भोगला पाहिजे. राज्यासाठी ते धर्मनीती सोडून युद्धाला तयार झाले आहेत."

भीष्माचार्य चकित होऊन म्हणाले—"कर्णा! या सर्व गोष्टी व्यर्थ आहेत. अर्जुनाने एकट्याने आपणां सर्वांना किती सहज पळवून लावले होते ही गोष्ट तू विसरलास का? त्या ब्राह्मणोत्तमाने सांगि-तल्याप्रमाणे तू वागला नाहीस तर अर्जु-नाच्या कोपाग्नीत सर्व कौरव आणि त्यांचे असंख्य सैन्य भस्म होऊन जाईल!"



मध्येच धृतराष्ट्र बोलणे आवश्यक वाटून म्हणाला–"कर्णा! असे उर्मटपणाने बोलणे तुला शोभत नाही. भीष्माचार्यांनी जे काही सांगितले आहे ते सर्वांच्या हिताचे आहे." नंतर द्रुपदाच्या पुरोहिताकडे वळून म्हणाला–"ब्राम्हणोत्तमा! मी आपले उत्तर सर्व गोष्टींचा विचार करून संजयाकरवी पांडवांकडे पाठवितो. आपण पांडवांना जाऊन तसे कळविण्याची कृपा करावी!"

द्रुपदाच्या पुरोहिताला निरोप देऊन धृतराष्ट्राने संजयाला बोलाविले आणि म्हणाला–"संजया! तू ताबडतोब उपप्लाव्य नगरीत जाऊन धर्मराजाला भेट आणि पांडवांची कुशलवार्ता विचारून सर्व संक-टा[illegible] [illegible] देऊन ते सुखरूप परत आले याबद्दल त्यांचे माझ्या वतीने अभिनंदन कर. नंतर कृष्णाला आणि पांडवांच्या मदतीला आलेल्या इतर प्रमुख वीरांना बोलावून त्यांना आमच्या वतीने सांग की, आमच्यामुळे पांडवांना फार कष्ट सहन करावे लागले. धर्मराज रागावून रुसून आमच्याशी युद्ध करण्यास तयार होऊन येत आहे हे ऐकूनच आम्हांला आश्चर्य व भय वाटू लागले आहे. भीमार्जुन दोघे अद्वितीय वीर आहेत. त्यांच्याजवळ काय बोलायचे ते तूच ठरव! परंतु युद्धाशिवाय काय होऊं शकेल ते समजावून सांग, एवढेच माझे म्हणणे आहे!"

संजय रथात बसून उपप्लाव्यला आला आणि धर्मराजाला भेटला. परस्परांची कुशलवार्ता विचारून झाल्यावर संजय सर्वांना संबोधन करून म्हणाला–

"धृतराष्ट्र महाराजांनी सख्य आणि शांती घडवून आणण्यासाठी मला आपल्याकडे पाठविले आहे. पांडवांना जग आदर्श पुरुष म्हणून ओळखते. म्हणून राग येऊन त्यांनी काही करावे हे शोभत नाही. युद्ध करणेच गैर. आपल्या बंधुबांधवांचा वध करण्यापेक्षा स्वतःला मरण आलेले बरे. कौरवांचा वध करून राज्य प्राप्ती करून घेणे कोणत्याही परिस्थितीत हिताचे नाही. पांडवासमोर [illegible] [illegible] लागणार नाही. तसेच कौरवांचे सैन्यदेखील बलशाली आहे. दोघांचे युद्ध होऊन त्यात एकाचा जय झाला तरी जिंकणाऱ्याला काय सुख मिळणार? पांडव कधी धर्म व नीती सोडून युद्ध करणार नाहीत ह्याची मला पूर्ण खात्री आहे. शांतिस्थापना कशी होईल याचा विचार करावा अशी मी धृतराष्ट्र महाराजांच्या वतीने हात जोडून विनंती करतो."

संजयाने असे निवेदन केल्यावर धर्मराज म्हणाला–"संजया! युद्धासाठी मी का आतुर आहे? शांतिस्थापनेसाठी युद्ध करण्यास सिद्ध होणारा मी मूर्ख नाही. शहाण्या माणसाने स्वतःच्या सुखाची जितकी काळजी बाळगायला हवी, तितकीच, किंबहुना थोडी जास्तच काळजी इतरांच्या सुखाची देखील बाळगली पाहिजे. दावाग्नी पेटला असता फक्त "मी मरतो आहे, मला वांचवा!" म्हणणारा मूर्खच नव्हे काय? दुष्ट दुर्योधनाची सर्व कृत्ये डोळ्यासमोर होत असतांना त्या विरुद्ध एक चकार शब्द ही न बोलता धृतराष्ट्र महाराज गप्प बसले होते. त्यांना कसे सुख मिळणार? कपटीपणाने द्यूत खेळून कौरवांनी आत्मनाशाचे बी पेरले. तरी देखील कौरवांशी सख्य राखण्यात मला कोणत्याही प्रकारे



हरकत वाटत नाही. मी सर्व जुन्या गोष्टी विसरून जाण्यास तयार आहे. फक्त इंद्रप्रस्थाचे राज्य मला द्यायला सांग. त्याला चक्रवर्ती राजा व्हावयाचे असेल तर खुशाल राहू दे!"

संजय म्हणाला–"धर्मराज! तुला धर्मोल्लंघन हे माहीतच नाही. तुच्छ राज्य लोभाने तू आपली अपार कीर्ति कलंकित करून घेणार का? तेव्हां युद्धाचा विचार मनातून काढून टाक. कौरव तुला आपल्या राज्यातला एकही तुकडा देतीलसे मला वाटत नाही. युद्ध करून राज्यप्राप्ती करून घेण्यापेक्षा तू आणि तुझ्या बंधूनी याचना वृत्ति धारण केल्याने तशी कीर्ति वाढेल."

संजयाने नीति अनीति व धर्माधर्म या विषयी जे त्याला सांगावयाचे होते ते सांगितल्यावर धर्मराज म्हणाला—"संजया! तू म्हणालास ते मी सर्व ऐकले. परंतु आपद्धर्म म्हणून एक असतो. संकटांत सांपडल्यावर त्यांतून मुक्ती प्राप्त करण्या-साठी अधर्म कार्य करावे लागले तरी ते कर्तव्य धर्म म्हणून करावे लागते. तो देखील धर्मच होय! तरी कृष्ण उपस्थित आहे. तो जे म्हणेल ते मी आपले कर्तव्य समजून करायला तयार आहे."

कृष्ण संजयाला म्हणाला—"तू आज सख्य आणि शांतीच्या गोष्टी करीत आहेस. क्षत्रियांनी युद्ध न करणे हा त्यांचा धर्म आहे असे का तुझे म्हणणे आहे. अधर्म करण्यास सर्व प्रकारे सिद्ध झाले धृतराष्ट्राचे पुत्र! दुर्योधनाने अनीतिपूर्वक पांडवांचे सर्वस्व हरण केले. त्यात क्षत्रियधर्म त्याने कोणता पाळला? तूच सांग? इतके दिवस त्याने पांडवांचे राज्य उपभोगिले. आतां त्याने त्यांना ते कां परत करू नये? प[illegible] हजारपटीने चांगले. म्हणून युद्ध करून त्यात मरण आले तरी ते आम्हांला योग्य वाटते. ही गोष्ट तू कौरव सभेत जाऊन स्पष्टपणे सांग!"

संजयाने त्याच्या हातून काही चूक झाली असल्यास क्षमा करण्याची प्रार्थना करून सर्वांचा निरोप घेतला. तो निघाला तेव्हां धर्मराज त्याला म्हणाला—"संजया! आम्हांला खरोखरच सख्य व शांती हवी आहेत. धृतराष्ट्र महाराजांना देखील सख्यच हवे असेल तर त्यांनी आमच्या राज्यातला काही भाग तरी द्यावा असे त्यांना सुचव. आम्हां पांच जणांना फक्त पांच गावे, कुशस्थल, वृकस्थल, माकंदी, वारणावत आणि पांचवे जे त्यांना इष्ट वाटेल ते त्यांनी द्यावे असे सांग. सर्व सुखाने राहू या. मला सख्य आणि शांतीची जितकी अभिलाषा आहे तितकाच मी युद्धालापण तयार आहे!"

धर्मराजाचा तो संदेश घेऊन संजय हस्तिनापूरला परतला.





# शिवपुराण

[ २२ ]

विश्वनाथ तथा विशालाक्षी दोघे काशीला येऊन राहू लागल्यावर व्यास मुनींना वाटले की काही दिवस काशीला जाऊन काशीवास करावा. तो विचार मनात येतांच ते एक दिवशी आपल्या तीनशें शिष्यांसह काशीला येऊन पोंचले. त्यांच्या शिष्यांत वैशंपायन, जैमिनी, सुमंत आदि प्रमुख होते.

सर्व ऋषींनी प्रथम गंगेवर स्नानसंध्यादि करून गायत्री जप झाल्यावर शंकराची आराधना केली. व्यास मुनींनी शिष्यांसह मुक्तिमंडपात मध्याह्न होईपर्यंत शिवपुरा-णाचे वाचन केले. नंतर सर्व मंडळी भिक्षाटनास निघून गेली.

त्या वेळी शंकर पार्वतीला म्हणाला—"व्यास मुनींची परीक्षा घेतली पाहिजे. त्यांना किंवा त्यांच्या शिष्यांना कोणाला भिक्षा मिळता कामा नये."

विशालाक्षी पार्वतीने होकारार्थी मान हलवून नगरीच्या प्रत्येक गृहिणीच्या मनात भिक्षा न देण्याची प्रेरणा उत्पन्न केली. व्यास मुनी सशिष्य "भिक्षांदेहि!" म्हणत घरोघरी फिरत असतां त्यांना उत्तर मिळे—"अद्याप सैंपाकच झाला नाही!" किंवा "जेवणे आटोपून बराच वेळ होऊन गेला!" एकेका घरी तर कोणी दार देखील उघडले नाही.

तीन प्रहरी गुरु आपल्या मठात परत आले व सर्व शिष्यमंडळी रिकाम्या हातांनीच परतली. सर्वांना भुका लागल्या होत्या.

"मला भिक्षेत एक शीत देखील मिळाले नाही!" व्यास मुनी म्हणाले आणि त्यांनी



आपल्या शिष्यांना विचारले—“तुम्हांला काय काय भिक्षा मिळाली?” परंतु शिष्यांनीपण त्यांना मुळीच भिक्षा न मिळाल्याचे सांगितले.

लागोपाठ सात दिवस कोणालाच भिक्षा मिळाली नाही. व्यास मुनींना आश्चर्य वाटू लागले, या शिवपुरीत एका काळी दिवोदासासारख्याचे राज्य होते आणि आतां तर काशीविश्वनाथ स्वतः काशीवास करीत आहे. प्रत्येक या गावात गृहिणी अन्नपूर्णा म्हणून ओळखली जाते. एक आठवडाभर उपासमार व्हावी, याचे कारण काय? उपासामुळे वैशंपायन, जैमिनी, सुमंत

आठवा दिवस उजाडला. स्नानसंध्यादि आटोपून व्यासमुनी शिष्यांबरोबर भिक्षाटनास निघाले.

परंतु एका घरीदेखील कोणी भिक्षा घातली नाही. तेव्हां मात्र व्यासांना मनस्वी राग आला. त्यांच्या कपाळाला आठ्या पडल्या. कपाळावर घामाचे थेंब दिसू लागले. त्यांनी कमंडलातून पाणी घेऊन शाप देण्यासाठी संकल्प सोडण्याचा निश्चय केला. आपले भिक्षापात्र फोडून सर्व काशीवासियांस असा शाप देण्याचे ठरविले की तीन पिढ्या त्यांना विद्या, धन आणि भक्ती या तिन्हीचा लाभ होणार नाही. परंतु कमंडलातले पाणी सोडायला हात पुढे केला तेव्हां हात थरथर कापू लागला व कमंडलातले पाणी हातावर पडले नाही.

त्याच वेळी एका वृद्ध सौभाग्यवती स्त्रीने आपल्या घराचे दार उघडले. तिच्या सर्वांगावर शुभ वस्त्राभूषणे होती. ती म्हणाली—“हे ब्राह्मणा! शाप कां देतोस? माझ्याजवळ ये.”

व्यासांनी तिच्याकडे चकित होऊन पाहिले आणि ती कोण, तिचे वय काय इत्यादि गोष्टींचा विचार केल्याशिवायच त्यांनी त्या स्त्रीला नमस्कार केला आणि

ते स्त्री म्हणाली—“ [illegible] नाही म्हणून का तू सर्व काशी नगरीला शाप द्यायला निघालास? तुझ्या हृदयाची परीक्षा घेण्यासाठी स्वतः काशी विश्वनाथाने हा डाव रचला होता. नाहीतर तुझ्या सारख्यांना भिक्षा घालणे या काशीवासियांस अशक्य होईल असे वाटले का तुला? दर रोज अन्नपूर्णा स्वतः सुवर्णाच्या पळीने अमृतासारखी खीर सर्वांना देते ही गोष्ट तुला माहीत नाही वाटते? तू आपला धीर सोडलास आणि विश्वनाथाला पत्नी स्वरूप असलेल्या या काशीनगरीस शाप देऊ लागलास. यावरून भूक ही तुझ्यासारख्या थोर महर्षीला देखील कशी हालवून सोडते हे उघड झाले आहे. बरे तर ये, मी तुला आज सशिष्य पंचपक्वान्नांचे भोजन वाढते.”

ते ऐकून व्यासमुनी म्हणाले—“माते! आज कित्येक दिवसांनंतर तुझे हे अमृत तुल्य गोड शब्द ऐकायला मिळाले आहेत. माते, तू काय वाटेल ती भिक्षा घाल, आम्ही ती आपसात वांटून घेऊन त्यांत मनाचे समाधान करून घेऊ.”

ते ऐकून ती स्त्री स्मित करून म्हणाली—“बाळा! मध्याह्न उलटून चालली आहे. तुम्ही सर्व गंगास्नान करून या. तुम्हां सर्वांना मी स्वतः मनसोक्त जेवण वाढणार



त्यानंतर व्यास ऋषी आपल्या सर्व शिष्यांसह गंगास्नानास निघून गेले. स्नानसंध्यादि आटोपून पुन्हां त्या सुगृहिणीच्या घरी भोजनार्थ परत आले. त्या गृहिणीने सर्वांना आदरपूर्वक घरात बोलावून नेले. तिने पहिल्यापासून मांडून ठेवलेल्या पाटांवर त्यांना बसायला सांगितले आणि समोर केळीची स्वच्छ पाने मांडली.

नंतर धूप रांगोळी आदी झाल्यावर ती सर्वांस म्हणाली—“आतां आपोषणी घेऊन भोजनास सुरवात करावी.”

ते ऐकून व्यास मुनी व त्यांचे शिष्य चकित होऊन परस्परांकडे पाहू लागले.

होती आणि पक्वान्नांचा वास पण येत नव्हता.

आज ही गृहिणी आपल्याला उपाशी मारून आपली सर्वांची खोड मोडणार असे दिसते आहे, असे सर्वांच्या मनात येत होते. परंतु त्याच वेळी काही स्त्रिया आपोषणी साठी पाणी घेऊन आल्या. ती वृद्ध स्त्री सर्वांना म्हणाली–"बाळांनो! जेवायला थोडा उशीर झाला, सावकाश होऊं द्या!"

सर्वांनी आपोषणी घेतांच सर्वांच्या पानावर प्रत्येकाला आवडणारे पदार्थ वाढलेले दिसले. सर्व पदार्थ स्वादिष्ट व प्रत्येकाला हवेतितके वाढलेले होते.

प्रत्येकाला वाटत होते की ती वृद्ध स्त्री प्रत्यक्ष अन्नपूर्णाच आहे.

जेवणे झाल्यावर त्या वृद्ध स्त्रीने सर्वांच्या विश्रांतीची व्यवस्था केली.

थोड्या वेळाने पार्वतीपरमेश्वर तेथे आले. सर्व विश्रांती घेत पडले होते. पार्वतीच्या चेहऱ्यावर शांतभाव होता. परंतु शंकराचा चेहरा उग्र दिसत होता. शिव [illegible]ला समोर पाहून सर्व उठून नम्रपणे प्रणाम करून उभे राहिले.

शिवपार्वती उच्च आसनावर बसले. शंकराने व्यास मुनीकडे क्रुद्ध दृष्टीने पाहून विचारले–"काय रे ए, उद्दंड मूर्ख, महाभारत लिहिण्याचे मूर्खत्व करून आज मला पत्नीस्वरूप असलेल्या काशीनगरीस शाप द्यायला निघाला होतास नाही का? एक तर या काशीत तू प्रवेश केलास हाच तुझा अपराध! आतां जास्त वेळ न घालवितां आलास तसा ही काशी सोडून चालता हो!"

व्यासांनी पार्वती परमेश्वरांना नम्रपणे नमस्कार करून क्षमा मागितली आणि काशींहून निघण्यास तयारी करू लागले. तेव्हां पार्वतीला राहवले नाही. म्हणाली–"बाळ! तू काळजी करू नकोस. झालेल्या चुकीचे प्राय:श्चित्त दक्षारामला भीमेश्वराची उपासना करून कर. तुझे सर्वप्रकारे कल्याण होईल." पार्वतीच्या आज्ञेप्रमाणे व्यास आपल्या शिष्यमंडळी समवेत भीमेश्वराची उपासना करण्यासाठी दक्षारामला निघाले.





# १३२. शंभर वर्षांचा वृक्ष



कॅरिबियन समुद्रात पोर्टोरिकोच्या पूर्वेकडे 'व्हर्जिन' हे द्वीप अमेरिकावासियांस एक सहलीचे स्थान म्हणून आहे. सर्वांत आधी १४७३ मध्ये कोलंबसने ही द्वीपें पाहिली. परंतु १९१७ मध्ये ही द्वीपें अमेरिकेच्या आधीन राज्यात सामील झाली. ही एकूण तीन द्वीपें आहेत–सेंट टॉमस, सेंट जॉन आणि सेंट क्रॉय. येथील निवासी नीग्रो आहेत. प्रवासी लोकांवरच यांची उपजीविका अवलंबून आहे. येथील समुद्राचा किनारा आकर्षक आणि हवापाणी समशीतोष्ण असल्या कारणाने यात्रेकरूना सहलीसाठी या बेटांवर यावेसे वाटते.

या द्वीपावरच्या विचित्र दृश्यांपैकी एक म्हणजे येथे एक "शंभर वर्षांचा वृक्ष" आहे. याची पाने जाड असतात. शंभर वर्षात फक्त एकदांच या झाडाला फुले येतात, म्हणे. म्हणून या झाडाला हे नाव मिळाले. याची फुले पिवळी व झुबकेदार असतात. पांच वर्षांच्या वयात सुद्धां फुले लागतात, परंतु फुले लागल्याबरोबर हे झाड मरते.





# अमरवाणी

घृतेन वर्द्धते बुद्धिः,
क्षीरे आयुष्य वर्द्धनम्,
शाकेन वर्द्धते व्याधिः,
मांसम् मांसेन वर्द्धते । ॥ १ ॥

[ तुपाने बुद्धीचा विकास होतो, दुधाने आयुष्य वाढते, भाजीपाल्याने व्याधी वाढते आणि मांस मांसाने वाढते. ]

अनभ्यासे विषम् शास्त्रम्
अजीर्णे भोजनम् विषम्,
दरिद्रस्य विषम् गोष्ठि,
वृद्धस्य तरुणी विषम् । ॥ २ ॥

[ अभ्यासाशिवायचे शास्त्रज्ञान, अजीर्ण झाले असतां जेवण, दारिद्र्यात मनोरंजनार्थ नृत्य नाटक, तमाशे इत्यादी आणि उतारवयात तरुणीचा संग, हे सर्व हितकारी नसतात. ]

वृथा वृष्टि स्समुद्रे च,
वृथा तृप्तेच भोजनम्,
वृथा धनवतो दानम्,
दरिद्रे यौवनम् वृथा । ॥ ३ ॥

[ समुद्रावर पाऊस आणि पोट भरले असतां जेवण, तसेच धनवानाला दान देणे आणि दारिद्र्यात यौवन व्यर्थ होय ! ]




# अग्नि परीक्षा

पुरंदर राज्याची राजकन्या लावण्यवती नावासारखीच सुंदर होती. तिचे रूप म्हणजे अप्सरादेखील माना खाली घालतील इतके सुंदर होते. योग्य वर मिळाल्यावर राजकन्येचा विवाह करून देण्याचा विचार राजा करीत होता. परंतु पुरंदर राज्य दूर डोंगराळ प्रदेशात होते. चारी बाजूला मोठे जंगल होते. म्हणून त्या देशात जावयाचे झाल्यास कित्येक दिवस लागत. म्हणून लावण्यवतीसाठी योग्य वर मिळायला फार उशीर झाला.

लावण्यवतीला सुद्धां करमेनासे झाले होते. तिचा लवकर विवाह करून द्यावा असे सर्वांना वाटत होते. खेळायला मैत्रिणी व दासी होत्या. परंतु त्यात किती दिवस आनंद मिळणार? तिच्या दासी तिच्या मनोरंजनार्थ गोष्टी व कथा सांगत. परंतु त्याच त्याच गोष्टीच त्यांना सांगाव्या लागत. त्यामुळे राजकुमारीला राजवाड्यातले राहणे नकोसे वाटू लागले.

एक दिवशी ती कोणाला काही सांगितल्याशिवाय आणि कळू दिल्याशिवाय राजवाड्याबाहेर निघून गेली आणि जंगलात उत्तर दिशेला चालत असतां ती एका अत्यद्भुत उद्यानात येऊन पोचली. त्या उद्यानात जिकडे पहावे तिकडे सुंदर वृक्ष, लता व फुले आणि फळे दिसत होती. तसले वृक्ष व लता आणि फुले लावण्यवतीने आयुष्यभरात कधी पाहिली नव्हती. ते उद्यान मानव निर्मित दिसत नव्हते. तेथे माणसांची येजा पण दिसत नव्हती. तिला कोठे पशुपक्षी सुद्धा दिसले नाहीत. अगदी अपूर्व असे ते उद्यान होते.

लावण्यवती प्रत्येक फुलझाडाजवळ जाऊन फुलांचे सौंदर्य आणि वास पहात त्यांचे कौतुक करीत होती. एका झाडाचे



फूल तिला फारच आवडले आणि ते तोडून घेऊन वेणीत खोवून ठेवावेसे तिला वाटले. तिचा हात फुलाजवळ गेला.

"कोण तोडते आहे ते फूल?" असे म्हणत एक तरुण युवक झाडाआडून लावण्यवतीसमोर आला. परंतु तिला पाहून त्या तरुणाच्या मनात बदल झाला. तो काही बोलणार, पण त्याच्या तोंडातून एक शब्द ही उमटला नाही. तो लावण्यवतीचे सौंदर्य पाहून अवाक्‌ झाला होता आणि आश्चर्यचकित होऊन तिच्याकडे कौतुकाने पहात होता.

"मला फूल तोडायला मनाई आहे, हे माहीत नव्हते. परवानगी विचारावी तर [illegible] कोणी दिसले नाही. मला वाटले की येथे कोणी नाही." लावण्यवती म्हणाली.

तो तरुण स्मित करून म्हणाला—"येथे कोणी खरोखरच रहात नाही. फक्त मी एकटा पाहरा देण्यासाठी राहतो." असे म्हणत त्याने झाडावरची काही फुले तोडून लावण्यवतीला दिली.

"फूले तोडायला मनाई असल्याचे आतांच आपण नाही का सांगितले?" लावण्यवतीने विचारले.

"तुझ्या सारख्या सुंदरीकरितां तो नियम नाही." तो तरुण म्हणाला.

"आपण कोण?" तिने विचारले.

"माझे नाव सुव्रत आहे. मी गंधर्वांच्या या उद्यानाचा पाहरेकरी आहे." तो म्हणाला.

लावण्यवतीला गंधर्वांचे नांव ऐकून थोडी भीती वाटली. कारण मानवांना त्यांची मैत्री आणि सख्य घातुक असते. ते अनेक मंत्रविद्यांत प्रवीण असतात. लावण्यवतीला कदाचित माहीत नव्हते की गंधर्व तिच्या राज्याच्या इतक्या जवळ राहतात.

लावण्यवतीला भ्यालेली पाहून सुव्रत म्हणाला—"राजकुमारी! भिण्याचे मुळीच कारण नाही. मी गंधर्वांचा सेवक असलो तरी जन्माने तुझ्यासारखाच एक मानव आहे. माझे आजोबा पूर्वेकडील जयसिंधु देशाचे महाराज आहेत. लहानपणीच माझे [illegible] आजोळी जाऊन राहू लागलो. तेथेच मी लहानाचा मोठा झालो. मोठा झाल्यावर मी आजोबांबरोबर या जंगलात शिकारी साठी आलो. तेव्हां एक गंधर्वांची राणी मला पकडून इकडे घेऊन आली. तिला वाटत होते की मी तिच्याशी लग्न करीन. परंतु तिच्यावर माझे प्रेम नव्हते. म्हणून तिने दिवसां मला या उद्यानाची राखण करण्याचे काम दिले. रात्री ती मला धरून गंधर्व लोकात घेऊन जाते. मला गंधर्वांची राहणी आणि त्यांचा देश मुळीच आवडत नाही. दिवसेंदिवस माझ्या मनांत गंधर्व लोकाचा तिटकारा वाढतच गेला. या जाळ्यातून कशी सुटका होते हे मी पहात होतो. आजपर्यंत मला मानव जातीचा कोणी भेटलाच नाही आणि मी अगदी निराश झालो आहे." असे म्हणत त्याने मोठ्या दुःखाने सुस्कारा सोडला.

लावण्यवती त्या तरुणाकडे टक लावून पहात होती. आपली सहानुभूति दर्शवून ती त्याला म्हणाली—"उपाय आहे का काही सुटण्याचा? माझ्याकडून होऊ शकला तर मी प्राणपणाने तो करीन."

सुव्रत लावण्यवतीकडे, तिच्याकडून होऊं शकेल का अशा संदिग्ध मुद्रेने पहात म्हणाला—"दर पौर्णिमेला गंधर्व राणी आपल्या दासदासी व सखींबरोबर या उद्यानात विहार करायला येते. त्यावेळी मला तिच्याबरोबर रहावे लागते. परंतु त्यावेळी





कोणी मानवाने मला घट्ट आवळून आलिंगन करून धरून ठेवले आणि गंधर्वराणीने माया करून किती त्रास दिला आणि भीती दाखविली तरी मला सोडले नाही तर मला गंधर्वराणीच्या या "तुरुंगवासातून" सुटका मिळू शकेल. परंतु माझ्या करितां इतके कष्ट सहन करणाऱ्याच्या मनात माझ्याविषयी तितकीच आपुलकी असली पाहिजे. परंतु मला ओळखणारा या जगतात कोणी असेलसे मला वाटत नाही. तेव्हां माझी सुटका होऊं शकेल असा विचार करणे म्हणजे माझा मूर्खपणाच आहे."

सुव्रतने मोठ्या कष्टाने हे सर्व सांगितले व पुढे म्हणाला–"सूर्यास्ताची वेळ आहे [illegible] आहे. काळोख पडल्यावर या उद्यानात राहणे धोक्याचे आहे."

"तुला लवकरच गंधर्वांच्या या 'तुरुंगा-तून' सुटका मिळेल!" असे सांगून लाव-ण्यवती घाईघाईने परतली.

पौर्णिमा व्हायला चार दिवस होते. लावण्यवतीच्या मनात सुव्रतचाच विचार येई. तिला दुसरे काही सुचत नव्हते. तिने त्याचे रक्षण करण्याचा आणि त्या प्रयत्नात प्राण गेला तरी पाय मागे न घेण्याचा निश्चय केला.

पौर्णिमेला लावण्यवती एकटी कोणाला काही सांगितल्याशिवाय गंधर्वांच्या उद्यानात आली. ती त्या दिवशी मुद्दाम काळी साडी नेसून आली होती. झाडांच्या सावलीत कोणाला ती दिसली नाही. ती झाडाझुडपा-आड लपून बसली. तिने आपल्या काळ्या थोर केसांखाली आपले चंद्रासारखे स्वच्छ तोंड लपवून ठेवले.

रात्री उद्यानात कोणी चालल्याचा आवाज ऐकू येऊ लागला. गंधर्व जोडपी एकेक करून येऊ लागली. झुडपाआडून लावण्यवती प्रत्येक जोडपे पहात होती.

मध्यरात्रीच्या सुमारास सुव्रत एका स्त्रीबरोबर येताना दिसला. ती स्त्री गंधर्व राणीच असणार हे ओळखायला लावण्या-[illegible] जवळ आल्याबरोबर लावण्यवती झुडपा-आडून बाहेर आली आणि तिने सुव्रतला घट्ट आवळून आलिंगन केले.

गंधर्व राणी थक्क होऊन तिच्याकडे पाहू लागली. आतां सुव्रत आपल्या हातातून निसटणार की काय अशी शंका तिच्या मनात आली. म्हणून तिने आपली माया सुरू केली.

लावण्यवतीने सुव्रतला आवळून धरले होते परंतु त्याच्या जागी एक बलिष्ठ अजगर तिला दिसला. तिने न कचरता त्या अजग-राला तसेच पोटाशी आवळून धरून ठेवले. अजगराचा सिंह झाला. सिंहाला पाहून लावण्यवती दचकली, परंतु ती सावध होती. तिने आपली पकड थोडीदेखील सैल केली नाही. इतक्यात त्या सिंहाच्या जागी विस्तवात तापवलेली एक लाल पहार झाली. लावण्यवतीच्या अंगाचा भडका उडाला. तरी तिने दांतओठ आवळून ते सहन केले आणि पहार आवळून पोटाशी धरून ठेवली.

त्यानंतर काय झाले तिला कळले नाही. ती शुद्धीवर आली तेव्हां उद्यानात एकही गंधर्व नव्हता. ती सुव्रताला आवळून पोटाशी धरून होती. सुव्रतदेखील तिच्या पाठोपाठ शुद्धीवर आला.

"तू गंधर्व राणीपासून माझे रक्षण केलेस. तुझ्या या ऋणाची फेड कशी होईल, मला सांगता येत नाही. चल, आपण प्रथम तुझ्या गावी जाऊ. तुला तुझ्या घरी पोंचविल्यावर पुढे काय करायचे याचा विचार मी करीन." सुव्रत म्हणाला.

राजकुमारी अदृश्य झालेली पाहून राज-वाड्यात व जवळपासच्या जंगलात तिचा शोध सुरू झाला. सर्व लोक काळजीत होते. परंतु लावण्यवतीने घरी पोंचल्यावर घडलेले वृत्त थोडक्यात सांगितले. राजा सुव्रतला म्हणाला–"तुझ्यासाठी माझ्या मुलीने अग्नि दिव्य करून दाखविले आहे. तेव्हां तुझ्या-शिवाय तिचा विवाह आम्ही आणखी कोणाशी करणार?"

दोघांचा विवाह सुमुहूर्तावर झाला.



# अस्पृश्य

**का**वेरी नदीच्या काठी एका गावी कांचनशर्मा नावाचा एक कर्मठ ब्राह्मण रहात असे. तो स्वभावाने फार रागीट होता. त्याच गावी माधव नावाचा एक महार होता. तो स्वभावाने शांत होता आणि ज्ञानीपण होता.

चंद्रग्रहण होते गावकरी मंडळी पहाटे उठून कावेरी नदीवर स्नानाला गेली होती. कांचनशर्मा स्नान करून आपल्या घरी परत येत होता. तेव्हां माधवचे ओले कपडे कांचनशर्मांच्या अंगाला लागले. माधवला ते कळले नाही.

कांचनशर्मांचा पारा एकदम चढला. दात ओठ चावून त्यांनी माधववर शिव्यांची लाखोली वाहली. माधवने चुकीची माफी मागून अंधारात दिसले नाही, असे सांगितले. त्याने माफी मागून साष्टांग नमस्कारपण केला. परंतु कांचनशर्मांचा पारा उतरला नाही. त्याने बिचाऱ्याला चारपाच लाथा मारून शिव्या दिल्या आणि महाराला शिवल्याच्या पापाबद्दल पुन्हा नदीवर जाऊन स्नान केले.

कांचनशर्माला पुन्हां नदीवर स्नानाला गेलेला पाहून माधव पण नदीवर गेला आणि स्नान करू लागला. तेव्हां कांचनशर्माने त्याला विचारले–"कायरे, तु शिवलास म्हणून मला स्नान करावे लागले, पण तू कशाला स्नान करतो आहेस ?"

माधव म्हणाला–"काम क्रोध आदि षडरिपू अस्पृश्यासारखेच मी मानतो. क्रोध रूपी अस्पृश्याचा स्पर्श झाला म्हणून मी पुन्हां स्नान करतो आहे."





# यक्ष पर्वत

[ ८ ]

[ खड्गवर्मा आणि जीवदत्त दोघांनी मांत्रिकाला व केसाळ भुताला खूप ठोकले आणि पडक्या इमारतीत शिरले. तेथे पुजारिणीच्या नोकरांनी त्या दोघांना कैद करून अंधार कोठडीत डांबून ठेवले. परंतु दोघांनी स्वतःची सुटका करून घेऊन शेजारच्या खोलीतल्या सिंहाला पुजारिणीच्या नोकरांवर सोडले. पुढे– ]

**उ**पाशी भुकेला सिंह पुजारिणीच्या नोकरां-वर धांवला. त्याने एकेकाला घायाळ करून टाकले. खोलीभर नोकर अर्धमृता-वस्थेत पडलेले होते. त्यांचा कोणी वाली नव्हता. सिंह वाटेल त्याला खाण्याच्या स्थितीत होता.

खड्गवर्मा व जीवदत्त सिंहाने चाल-विलेला तो धुमाकूळ पहात एका पडक्या-मोडक्या खिडकीत उभे होते. खड्गवर्मा हसत त्या नोकरांना म्हणाला–"काय रे! तुम्ही त्या बिचाऱ्या सिंहाला चारपांच दिवसात कधी खायला प्यायला घातलेले दिसत नाही. म्हणून आतां तो तुमच्यावरच आपली भूक भागवणार आहेसा दिसतो आहे. तरमग आतां पहिल्याने तुमच्यापैकी कोणीतरी पुढे या त्याचा आहार व्हायला, म्हणजे कदाचित तुमच्यातल्याच इतरांचा जीव तरी वांचेल!"



पुजारिणीचे नोकर ही थट्टा समजण्याच्या मनःस्थितीत नव्हते. कारण त्यांच्यापैकी चारपांच जणांना खड्गवर्माचे पुरे होण्यापूर्वीच सिंहाच्या पंजांचा तडाखा बसला होता. एकाला सिंहाने आपल्या जबड्यातच धरले होते. तो ओरडत होता. जे लोक पडक्या खिडक्यात चढून बसले होते ते थरथर कांपत होते. परंतु सिंहाची नजर त्यांच्यावर नव्हती. कारण तो वाट सांपडली तर जंगलात पळून जाण्याच्या विचारात होतासा दिसत होते. त्याने एकदां चारही बाजूंना नजर फिरवून पाहिले.

जीवदत्तने ते ओळखले आणि आपली कुबडी सिंहाला दाखवून म्हणाला—"हे [illegible]च्या राजा! [illegible] कोणाला खाल्ले तर दृष्ट लागेल या भीतीने का तू मागेंपुढे करतो आहेस? त्या पहा, बाजूला पायऱ्या आहेत. तू त्या वाटेने जा. पुढे तुला सर्व जंगल मोकळेच आहे." असे म्हणत जीवदत्तने, सिंह उभा होता तिकडे चार पावले टाकली आणि पायऱ्याकडे त्याने वळावे म्हणून त्याला कुबडीने खूण केली.

सिंहाने गुरगुरून त्याला कोणाचा असा हुकूम आवडत नाही असे दर्शविले आणि जीवदत्तवर उडी मारण्यासाठी मागच्या पायांवर उभा राहीला. परंतु जीवदत्तने आपली कुबडी चटदिशी त्याच्या पोटात मारली आणि त्याला जोराने बाजूला ढकलले. सिंह स्वतःला सावरू न शकल्यामुळे तोल जाऊन खाली पडला आणि घसरत पायऱ्यापर्यंत जाऊन पोंचला.

जीवदत्त त्याला म्हणाला—"हे जंगलाच्या राजा! आता लवकर उभा रहा आणि पुजारिणी नोकरांबरोबर येण्यापूर्वी तू पाय काढ कसा! यातच तुझे हित आहे." जीवदत्त सिंहाला कुबडी दाखवीत चार पावले पुढे गेला.

पडक्या भिंतीवर बसून पुजारिणीचे नोकर जीवदत्तने सिंहाला कसा आडवा पाडला होता आणि त्याच्या हुकमाप्रमाणे [illegible] होते. त्यांना आश्चर्य वाटले, त्यांच्यापैकी एकाने हिंमत करून जीवदत्तला नमस्कार केला आणि म्हणाला—"हे मांत्रिक शिरोमणी! आपली मंत्रशक्ती सामान्य माणसाला अवगत होण्यासारखी नाही. आतां महाशक्ती पुजारिणीचा वध करून तूच या पडक्या नगरावर राज्य कां करीत नाहीस? आम्ही तुझे शिष्य होऊन तुझी सेवा करू. आम्हांला या दुष्ट पुजारिणीच्या अत्याचारांतून सुटका तरी मिळेल! एका बाईचे नोकर होऊन तिची 'हांजी' 'हांजी' करण्यापेक्षां एका पराक्रमी पुरुषसिंहाची सेवा करण्यात गौरव आहे."

त्याच्या तोंडचे ते वाक्य पुरे होण्यापूर्वीच त्याचे दोघे तिघे साथी "गुरुद्रोह, गुरुद्रोह!" म्हणत त्याला मारायला धावले. पडक्या भिंतीवरच त्यांची मारामारी सुरू झाली. एक दोघे पाय घसरून खाली येऊन पडले. पायऱ्यांकडे वळलेला सिंह दचकला आणि चवताळून त्याच्या अंगावर उडी मारायला मागे फिरला.

जीवदत्तने कुबडी दाखवून सिंहाला दरडावले—"तू पायऱ्या उतरून आपल्या वाटेने चालू लाग. तू पुजारिणीच्या शिष्यांच्या भांडणात पडून स्वतःचा जीव धोक्यात घालून घेऊ नकोस!"



सिंहाला कुबडीचा तडाखा एकदा कळला होता. म्हणून जीवदत्तने कुबडी दाखविल्यावर सिंह, रागाने गुरगुरतच का होईना पायऱ्या होत्या त्या बाजूची खोली पार करून निघून गेला.

खड्गवर्मा हे सर्व दृश्य इतका वेळ मुकाट्याने पहात होता. आतां मात्र त्याला राहवले नाही. म्हणाला—"जीवदत्त! आपण तरी येथे कशाला थांबायचे? पुजारिणीचे शिष्य आपसात मारामारी करीत आहेत. आपल्याला अडवायला येथे कोणी नाही. आपण देखील या पडक्या नगरातून पाय काढला तर काय हरकत आहे?"



"ठीक! चल तर सिंह गेला त्याच वाटेने आपण जाऊ या. कदाचित गुहेचे दार आपल्याला मिळेल." असे म्हणत जीवदत्त निघाला.

परंतु खड्गवर्माचे म्हणणे खोटे ठरले. त्यांना अडविणारा कोणी नाही असे त्याला वाटत होते. परंतु पुजारिणीला तिच्या एका विश्वासू नोकराकडून जीवदत्त व खड्गवर्मा सुटल्याची गोष्ट कळली होती आणि सिंहाने तिच्या काही नोकरांना घायाळ केल्याचे पण कळले होते.

ते कळल्यावर पुजारिणी संतापाने म्हणाली—"हे महाभूता! हे रे कसे झाले? म्हाताऱ्या पुजाऱ्यासारख्याला सुद्धा मी आपल्या मंत्रबळाने कैद करून अंधार कोठडीत डांबून ठेवले आहे. अशा माझ्या-सारख्या महाशक्ती विरुद्ध दोघे सामान्य मानव दंड ठोकून कसे उभे आहेत? माझ्याच राज्यात शिरून माझ्या शिष्यांना व नोकरांना घायाळ करणारे हे कोण आहेत, मला पहावयाचे आहे. मूर्ख पळपुट्यांनो आम्हांला दाखवा तरी ते दोघे मानव कोठे आहेत? मी त्यांच्या समाचाराला येणार आहे. मी स्वतः त्यांना कैद करते."

पुजारिणीच्या दोघां शिष्यांनी स्वतःच्या डोळ्यांनी जीवदत्ताचा प्रताप पाहिला होता. खड्गवर्मा व जीवदत्त दोघांनी मांत्रिकाला व केसाळ भुताला कसे लोळविले होते आणि सिंहालादेखील कसे पळवून लावले होते हे पाहल्यामुळे पुजारिणीच्या मंत्रबळावरचा त्यांच्या मनात होता नव्हता तो विश्वास ढळला होता. म्हणाले—"हे महाशक्ती पुजारिणी! ते दोघे फक्त मानव नसून शक्तिशाली मांत्रिक आहेत. त्यांनी आप-ल्या दरबारी मांत्रिकाला आणि केसाळ भुताला..."

त्याच्या तोंडातले ते वाक्य पुरे होण्या-पूर्वी पुजारिणीने आपल्या भाल्याचे टोक त्याच्या पाठीवर ठेवले व चवताळलेल्या वाघिणीसारखी म्हणाली—"तोंडाची वडवड बंद कर! मी त्या दोघांना आता कैद करते आणि महाभूतासमोर त्यांना बळी देते. हो बाजूला!" असे म्हणत ती पुढे सरसावली.

नोकर भीतभीतच पुढे निघाले. त्या सर्वांच्या पुढे मांत्रिक व केसाळ भूत स्वतःला सावरून चालू लागले.

"गुरुवर्य! या खेपेस मी त्या दोघांना खाऊन टाकतो पहा!" केसाळ भूत म्हणाले.

"अरे! असला वेडेपणा करायला जाऊ नकोस. तू चुकतो आहेस. हे दोघे सामान्य मानव नाहीत, लक्षात ठेव! हे आपल्या नगरात शिरले आहेत ते पुजारिणीचा पराभव करणार, नक्की, पहा! नंतर मी या नगराचा राजा होणार व तू माझा मंत्री. आपण त्या म्हाताऱ्या मांत्रिकाला बंदीमुक्त करून त्याच्याजवळ आणखी मंत्र शिकून घेऊ या." मांत्रिकाने केसाळ भूताला ही गोष्ट हळूच फक्त त्याला ऐकू जाईल एवढ्या स्वरात सांगितली.

केसाळ भुताला ते ऐकून फार आनंद झाला. मागे वळून तो म्हणाला—"गुरुवर्य! तुम्ही महाराज आणि मी मंत्री म्हणतां? वाः! छान छान!"

पुजारिणी आणि तिचे इतर शिष्य व नोकर बरेच पाठीमागून चालत होते.



पुजारिणीने त्या सर्वांना सर्व पडके नगर पालथे घालून त्या दोघांना पकडून समोर हजर करण्यास सांगितले. परंतु त्यांच्या दुर्दैवाने खड्गवर्मा व जीवदत्त फार दूर नगराच्या दुसऱ्यात्र भागात होते आणि नगराबाहेर पडले होते. ते परत जंगलात जाण्यासाठी वाट शोधीत होते. परंतु भुयारातल्या ज्या वाटेने ते आले होते ती वाट त्यांना सापडत नव्हती. परंतु ती गोष्ट पुजारिणीच्या लोकांना माहीत नव्हती.

"खड्गवर्मा! आपण ज्या वाटेने आलो होतो त्या वाटेने बाहेर निघता येईलसे दिसत नाही. पुजारिणीच्या शिष्यांपैकी



एखाद्याला पकडून त्याच्या मदतीनेच बाहेर निघावे लागेल. दुसरा उपाय आत्ता उरला नाही." जीवदत्त म्हणाला.

"मला वाटते, पुजारिणीच्या शिष्यांना चकवून आपण पुष्कळ दूर निघून आलो आहों आणि तो सिंह कोठे गेला कळले नाही. तो या पडक्या नगराबाहेर जंगलात तर पोचला नसेल अशी एक शंका मला आहे!" खड्गवर्मा म्हणाला.

"नाही मला वाटते, तो आपल्या सारखाच वाट चुकून कोठेतरी अडकून राहला असावा. त्याच्या गर्जना तुला नाही का ऐकू येत?" असे म्हणत जीवदत्तने पडक्या भवनाच्या खिडकीत डोकावून पाहून आणि म्हणाला— "खड्गवर्मा! इकडे ये. ती पहा धान्याची पोती! व्यापाऱ्यांना लुटून यांनी ही पोती एकत्र केली आहेत. हे त्यांचे कोठार आहे. हाच यांचा धंदा दिसतो आहे तर!"

खड्गवर्माने पण खोलीत डोकावून पाहिले, एकावर एक धान्याची पोती रचून ठेवलेलीं होती. काही पोती फाटलेली होती आणि त्यांतून गहू, तांदूळ, ज्वारी व बाजरी बाहेर पडत होती.

याचा अर्थ असा की या केसाळ भुताच्या मदतीने बिचाऱ्या व्यापाऱ्यांना लुटून या लोकांनी ही धान्याची पोती जमा केली आहेत. पुजारिण मोठी वस्ताद दिसते आहे. हे सर्व कृत्य तिचेच दिसते आहे!" खड्गवर्मा म्हणाला.

"या धान्याच्या कोठारातला एक दाणा देखील तिच्या हाती लागतां कामा नये, अशी काही तरी युक्ती आपण काढली पाहिजे. तेव्हां या लोकांना ही त्यांची लपण्याची जागा सोडून बाहेर यावे लागेल. नाहीतर उपाशी मरावे लागेल." जीवदत्त म्हणाला.

"तुझ्या व माझ्या मनात एकच विचार एकाच वेळी आला आहे! आहे की नाही गंमत?" खड्गवर्मा असे म्हणत हंसला. त्याने आपल्या खिशातून दोन गारगोट्या



काढल्या आणि कापसावर ठिणग्या पाडून तो पेटवला. त्याच्या मदतीने त्याने मोठा जाळ तयार करून कोठारालाच आग लावली.

खड्गवर्मा व जीवदत्त बाहेर उभे राहून ते दृश्य पहात होते. हळूहळू सर्व पोत्यांना आग लागली आणि लाह्या फटफट फुटू लागल्या आणि वाऱ्याने बाहेर येऊन पडू लागल्या.

"अरे पण या लाह्या खाऊन हे लोक या पडक्या इमारतीत काही दिवस मजेत काढतील नाही का वाटत तुला?" खड्गवर्मा म्हणाला.

"थोडा वेळ थांब! पहा सर्व जळून राखेचा ढिगारा तेवढा उरेल. परंतु हा जाळ आणि आगीचे लोट पाहून पुजारिणी व तिचे नोकर सावध होऊन इकडे धावतील. तेव्हां..."

जीवदत्त असे म्हणत असतां कोठाराच्या बाजूच्या खोलीतून कोणीतरी ओरडत असल्याचे ऐकू आले.

"खड्गवर्मा! बाजूच्या खोलीत कोणी-तरी अडकला आहे आणि तो बिचारा या आगीत मरणार की काय अशी भीती वाटते आहे." असे म्हणत जीवदत्त घाई-घाईने धावत त्या खोलीच्या जवळ गेला जोराने धक्के मारून दार उघडण्याचा यत्न करू लागला.

खड्गवर्मा त्याच्या जवळ जाऊन हंसत म्हणाला—"जीवदत्त! या गडबडीत तू दाराला कुलूप लावले आहे ते पाहिले नाहीससे दिसते. तू आपल्या कुबडीने प्रथम ते कुलूप फोड!"

जीवदत्तने वेळ न दवडता कुबडीने कुलूप फोडले आणि कडी काढून दार उघडले. खोलीत तेवढा काळोख नव्हता. एका खिडकीतून थोडा उजेड येत होता. त्या उजेडात भिंतीत ठोकलेल्या खुंट्यांना बांधलेल्या साखळदंडांनी एका आजानुबाहू हडकुळ्या म्हाताऱ्याला जखडून ठेवलेले होते. त्याची पांढरी लांब दाढी वाऱ्याने हलत होती. (क्रमशः)





# आयुर्दान

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही.

तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौनपणे स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा! फार पूर्वी माधव नावाचा एक मनुष्य परक्यांसाठी पुष्कळ कष्ट सहन करून त्यांना मदत करीत असे. परंतु तो आपल्या नातेवाइकांना मदत करीत नसे. तू देखील तसाच इतरांसाठी इतके कष्ट सहन करीत नाहीस ना? तुला त्याची गोष्ट मी सांगतो." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

पिनाकिनी नदीच्या काठी माधव नावाचा एक श्रीमंत कुटुंबातला तरुण युवक रहात असे. अत्यंत प्रेमाने लाडात त्याचे पालन झाले होते. म्हणून लहानथोर संकटांना तोंड द्यायला तो घाबरत असे. गुरुगृही राहून



विद्याभ्यासाचे कष्ट सहन करण्यास ही त्याची तयारी नव्हती. म्हणून तो अशिक्षितच राहिला. जमीनजुमला भरपूर होता म्हणून त्याच्या आईवडिलांनी त्याच्या विद्याभ्यासाकडे दुर्लक्ष केले.

माधव लग्नाला योग्य झाला तेव्हां त्याला आपण शहरात रहावेसे वाटू लागले. त्याने आपल्या आईवडिलांना सांगून व त्यांचे मन वळवून सर्व जमीनजुमला विकून टाकला आणि सर्व धन घेऊन विक्रमसिंहपुरीला आला. तेथे त्याने एक चांगलेसे घर विकत घेतले आणि उरलेल्या भांडवलावर व्यापार करण्याचे ठरविले. त्यासाठी त्याने पुष्कळसा माल विकत घेतला.

परंतु [illegible] दुर्दैवाने एक दिवशी [illegible] त्याचे घर जळून गेले आणि त्या जागी उरला तो राखेचा मोठा ढिगारा. माधवने कसाबसा आपला जीव वांचविला. परंतु त्याचे आईवडील त्या अपघातात मरण पावले. त्याने व्यापारासाठी घेतलेला सर्व मालदेखील जळून भस्म झाला. माधव राजाचा रंक झाला.

माधवने जीव द्यायचे ठरविले आणि पिनाकिनी नदीवर गेला.

त्या अंधारात ही त्याला एका झाडाखाली बसलेल्या माणसाने विचारले–"मुला, कोण तू? आणि काय करण्याच्या विचारात आहेस?"

माधव त्या झाडाजवळ गेला. तेथे त्याला एक मुनी दिसले. आपल्या दुर्दैवाची कथा सांगण्याचा विचारात माधव असता ते मुनी म्हणाले–"अरे, ते सर्व मला माहीत आहे, या जगात जगायचे कसे हे तुला माहीत नसल्यामुळे जीव द्यायचा विचार करून तू नदीकाठी आलास. परंतु तुझा हा प्रयत्न फुकट आहे."

"असे कां म्हणतां मुनीश्वर?" माधवने विचारले.

"तुला देवाने शंभर वर्षे आयुष्य दिले आहे. ते पूर्ण होईपर्यंत मृत्यू तुझ्या देहाला हात लावणे शक्य नाही." मुनी म्हणाले.

हे ऐकून माधवाला [illegible] वाईट वाटले व त्याने घाबरून जाऊन विचारले–"परंतु काय हो? एक वेळचे जेवण मिळविण्याची लायकी नसता मी शंभर वर्षे जगायचे कसे? मला नरकयातनाच भोगाव्या लागतील!"

मुनींनी थोडा वेळ विचार केला आणि म्हणाले–"पैशाशिवाय जगणे तुला अशक्य वाटते का? मी तुला सांगतो पैसे कसे मिळवायचेते. मेलेल्या माणसांना तू आपल्या आयुष्यातला काही काळ दिलास तर ते पुन्हां जिवंत होतील व तुला खूप पैसे देतील. आपले आयुष्य विकून तुला वाटेल तितके पैसे मिळवितां येतील. परंतु तू जितके आयुर्दान करशील तितके तुझे आयुष्य पण कमीकमी होत जाईल."

माधवने विचार केला की मुनीश्वर म्हणतात ते खरे आहे. त्याच्या आयुष्याचा प्रश्न सुटेल. असा विचार करून त्याने त्या मुनींकडून मंत्रोपदेश घेतला आणि आपल्या आयुष्यातली काही वर्षे दान करीत जगण्याचा उपक्रम करू लागला.

सकाळी तो एका गावी आला. त्या गावातल्या एका श्रीमंताच्या घरासमोर लोकांची गर्दी होती. त्याच दिवशी रात्री त्या श्रीमंताचे हृदयविकाराने प्राणोत्क्रमण झाले होते. माधवने त्या श्रीमंताच्या



नातेवाइकांनाजवळ जाऊन विचारले–"मी यांना पुन्हां जिवंत करतो. पण त्याबद्दल तुम्ही मला काय देणार?"

परंतु कोणाचा त्याच्या बोलण्यावर विश्वासच बसेना. तेव्हां माधव साहस करून म्हणाला–"मी यांना जिवंत करू शकलो नाही तर तुमचे नुकसान तर होणार नाही ना? मग मला प्रयत्न करून पाहूं द्या. परंतु मी यांना जिवंत करून दाखविले तर तुम्ही मला काय द्याल, हे सांगा."

"एक लाख सुवर्णमुद्रा देऊ. तुला शक्य असेल तर तू यांना जिवंत करून दाखव." त्या श्रीमंताचे नातेवाईक म्हणाले.



माधव हात पाय धुवून एका तांब्यात पाणी घेऊन आला आणि त्या श्रीमंताच्या प्रेताजवळ बसला. त्याने मंत्रपाठ करून त्या प्रेतावर मंत्रवलेले पाणी शिंपडून त्या श्रीमंताला आपल्या आयुष्यातले एक वर्ष दिले. मंत्रवलेले पाणी अंगावर पडताच मृत देह हलला आणि थोड्या वेळाने तो श्रीमंत मनुष्य झोपेतून जागा झाल्यासारखा उठून बसला.

त्या श्रीमंताच्या नातेवाइकांना अपरंपार आनंद झाला. त्यांनी वचन दिल्याप्रमाणे एक लाख सुवर्ण मुद्राच नव्हे तर वस्त्र वाहनादि देऊन माधवची पादपूजा केली.

[illegible] धन घेऊन माधव आपल्या गावी परत आला. हळूहळू त्याची कीर्ती पंचक्रोशीत पसरली. दररोज त्याच्या घरी पालखीत किंवा गाड्यातून प्रेते येऊ लागली. माधवचा आयुर्दानाचा धंदा जोराने चालू झाला आणि त्याच्यावर पैशाचा पाऊस पडू लागला. गरीब लोकदेखील त्याच्याकडे आयुर्दान मागायला येऊ लागले.

माधव कोट्याधीश झाला. तरी आयुर्दानाचे कार्य अखंड चालू राहले. पुढे तो पैसे घेऊन आयुष्य देई ते फार कमी देऊ लागला. त्याने किती दिवसाचे आयुष्य दान केले आहे, हे त्याला एकट्यालाच माहीत होते.

माधवने आतां लग्न करण्याचे ठरवून एका सुंदर मुलीशी लग्न करून घेतले. परंतु लग्नानंतर थोड्याच दिवसांनी त्याची बायको आजारी पडून मेली. परंतु माधवने तिला आपल्या आयुष्यातला थोडादेखील भाग दिला नाही. त्याने शांतपणे यथाविधि आपल्या बायकोची अन्त्येष्टी करून टाकली.

ते पाहून सर्वांना आश्चर्य वाटले. इतर लोकांना जिवंत करणाऱ्या माधवने आपल्या बायकोला आयुर्दान देऊन जिवंत कां केले नाही? प्रत्येकाला त्याचे मंत्रबळ संपले असावेसे वाटले. त्याच्याकडे कोणी प्रेत घेऊन आले की लोक [illegible] सांगत, "अहो, माधव आपल्या स्वतःच्या बायकोला जिवंत करू शकला नाही तर तो तुमच्या नातेवाइकाला कसा काय जिवंत करू शकेल?" असे सांगून लोक प्रेत घेऊन येणाऱ्यांना परतवून लावीत. हळूहळू माधवकडे प्रेते येण्याचे बंद झाले. आणि माधव सुमारे ऐंशी वर्षे जगला.

वेताळ येथवर गोष्ट सांगून म्हणाला— "राजा! माधवने इतर सर्वांना आयुर्दान दिले. परंतु तो स्वतःच्या बायकोला कां जिवंत करू शकला नाही? तिला आयुर्दान केल्यास त्याला कोणाकडून धनलाभ होणार नाही यासाठी का? की त्याचे बायकोवर प्रेम नव्हते म्हणून. तिला अशा तऱ्हेने मरू देऊन स्वतःची कीर्ती आणि प्रतिष्ठा कां घालवून बसला? याचे उत्तर माहीत असून ही तू दिले नाहीस तर परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला—"माधवने व्यापार केला होता. त्याचे भांडवल होते ते त्याचे आयुष्यच होते. ते मोजकेच होते. त्याने धनप्राप्तीसाठी व्यापार केला होता, कीर्ती किंवा मानप्रतिष्ठा मिळविण्यासाठी नव्हे. परंतु या व्यापारात त्याचे आयुष्य क्षीण होऊ लागले होते. त्याला आपल्या व्यापारात जे यश मिळे तेच त्याला घातक होऊ लागले आणि अशी वेळ आली की त्याला अपयश येणेच श्रेयस्कर वाटले. म्हणून त्याने ते अपयश आपल्या पत्नीला न वांचवून मिळविले. इतर कोणाला न वांचवून त्याला ते अपयश घ्यायचे नव्हते. म्हणून बायकोवर प्रेम असून ही तिला त्याने आयुर्दान केले नाही. दुसरे असे की त्याला पुष्कळ दिवस जगण्याची इच्छा होती. म्हणून त्याला पत्नी आणि यश दोन्हींचा त्याग करावा लागला."

राजाचे मौन अशा प्रकारे भंग होताच वेताळ प्रेताबरोबर अदृश्य झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)



# मिशांची किंमत

एका गावी एक शीलकुलवान असा धर्मात्मा रहात असे. त्या गावात त्याने मदत केली नाही असा एकही मनुष्य नव्हता. दानधर्म करीत असता त्या धर्मात्म्या पुरुषाची सर्व इस्टेट संपुष्टात आली आणि शेवटी उपासमार होण्याची पाळी आली. म्हणून तो गावातल्या एका वाण्याकडे जाऊन म्हणाला–"शेटजी ! मला पंचवीस रुपये कर्जाऊ द्या. माझ्याजवळ गहाण ठेवायला काही नाही. माझ्या मिशीचा एक केस गहाण म्हणून ठेवून घेऊन कर्ज द्यावे."

त्या वाण्याने त्या कुलीन धर्मात्म्याला कर्जाची रक्कम देऊन निरोप दिला. ते पाहून त्याच्याकडे काम करणाऱ्या दिनू नोकराने वाण्याला विचारले–"शेटजी, तुम्ही त्या कुलीन माणसाच्या मिशीचा एक केस ठेवून घेऊन पंचवीस रुपये कर्ज दिलेत. मी आपल्या सर्व मिशा छाटून देतो, मला शंभर रुपये द्यावेत."

"अरे दिनू ! मिशांची किंमत उतरली आहे. एका काळी त्या धर्मात्म्या पुरुषाने मला माझ्या मिशांतल्या एका केसाबद्दल शंभर रुपये दिले होते. आता मिशांच्या केसांचा भाव उतरला आहे. तुला पाहिजे तर मी आपल्या मिशांचे केस दहादहा रुपयाला द्यायला तयार आहे. तू पंचवीस रुपये भावाने विकून पाहिजे तर पैसे मिळव." वाणी म्हणाला.





समरकंद येथे मीर कमाल नावाचा एक व्यापारी रहात असे. त्यांच्याजवळ पैशाचा तोटा होता असे नाही. परंतु फुकटात उदरनिर्वाह कसा चालवायचा, हाच काय तो एक प्रश्न त्यांच्या समोर होता. त्यांना मूलबाळ ही नव्हते. मीर कमाल आठवड्यातून सहा दिवस व्यापार धंद्यासाठी परगांवी जाई आणि दर बुधवारी घरी परत येई. अशीच अनेक वर्षे लोटली.

एका बुधवारी मीरकमालाची बायको त्याला म्हणाली–"तुम्हां पुरुषांचे बरं आहे. नेहमी बाहेर हिंडता फिरता आणि मजा करतां. आम्हां बायकांना एकटीने बसून 'नको जीव' होऊ लागतो. एखादी बकरी गाय काही आणून दिलीत तर वेळ जाईल कदाचित."

मीरकमाल बायकोच्या करमणुकीसाठी एक हडकुळी मेंढी घेऊन आला. स्वस्तात आतां कमालच्या बायकोला विरंगुळ्यासाठी एक साधन मिळाले. ती मेंढी चोवीस तास ओरडत खोकत असे. घराच्या आसपास जे गवत किंवा हिरवळ होती ती मेंढीने फस्त करून टाकली.

दुसऱ्या बुधवारी कमाल परत आला तेव्हां त्याची बायको त्याला म्हणाली–"तुम्ही माझा जीव घ्यायलाच ही मरतुकडी मेंढी आणून दिलेली दिसते आहे. मी मेले की 'सुटलों एकदाचा' म्हणून श्वास सोडाल. म्हणून सांगते, ही मेंढी पुन्हां तुम्ही बाहेर गावी जाण्यापूर्वी कोणाकडे तरी पाठवून द्या, नाहीतर मला तरी माहेरी पाठवा."

"तू अशी एकरीवर कां येतेस करतो व्यवस्था !" मीरकमाल म्हणाला.

त्याच दिवशी मीरकमाल आपल्या आईच्या कबरीजवळ दुवा मागायला कबर-स्तानात गेला. तेथे हिरवे गार गवत खूप

उंच वाढलेले दिसले. याहून जास्त चांगले गवत आपल्या मेंढीला कोठून मिळणार? असा विचार करून तो घरी गेला आणि मेंढीला घेऊन पुन्हां कबरस्तानात आला. तो तेथल्या पाहरेकऱ्याला म्हणाला—"अहो दादा! आतां उतारवय झाले आहे व मला मूलबाळ देखील नाही. अल्ला बोलवील तेव्हां गेलेच पाहिजे. पण दफन विधी करायला मागे कोणी नाही. स्वतःच तजवीज करून ठेवणार आहे. ही मेंढी मी तुमच्याकडे त्याच साठी घेऊन आलो आहे."

कबरस्तानाच्या पाहरेकऱ्याने हे फुकटात मिळालेले 'मेंढीदान' खुशीत स्वीकारले.

दोन महिन्यांनंतर कमालने कबरस्तानात जाऊन पाहिले तेव्हां त्याला ती मेंढी ओळखता आली नाही, इतकी लठ्ठ झाली होती. कमालने विचार केला, या मेंढीचे वजन मणाहून जास्तच असेल इतकी मोठी मेंढी दान म्हणून देणे म्हणजे मूर्खपणा आहे. नंतर तो पाहरेकऱ्याच्या घरी गेला आणि सलाम करून त्याला म्हणाला—"दादा! [illegible] एक मुलगा दत्तक म्हणून घेतला होता. तो आजारपणात अर्धा चमचा हकीमाचे औषध प्याल्याबरोबर मेला. शिवाय ताशकंद सोडून जायला सरकारी हुकूम झाला आहे. तेव्हां तुम्ही सुद्धा आपले सामान घेऊन चला."

"मी रे कशाला जाऊ?" पहारेकऱ्याने चकित होऊन विचारले.

"कशाला म्हणजे? मी जाईन तिकडे तुम्ही आलेच पाहिजे. मी मेल्यावर तुम्हांलाच माझा दफनविधी करावा लागणार आहे. तुम्ही ते कबूलपण केले आहे. म्हणून नाहीं का मी माझी मेंढी तुम्हांला आणून दिली?"

"मोठा आला आहे शाहणा! तुला जिकडे मरायचे असेल तिकडे जाऊन मर नाहींतर नदीत जाऊन जीव दे. घेऊन जा आपली मेंढी!" पाहरेकरी म्हणाला.

कमालची शक्कल यशस्वी झाली. तो मेंढी घेऊन आनंदाने आपल्या घरी गेला.





# अकलेची परीक्षा

एका इनामदारांच्या घरी कमला नावाची एक मोलकरीण होती. तिचा नवरा देखील त्या इनामदाराच्या शेतात काम करीत असे. परंतु थोड्याच दिवसांपूर्वी तो आजारी पडून एकाएकी मरण पावला.

कमलाला हरी नावाचा एक मुलगा होता. हुशार होता, परंतु कमालीचा बेफिकीर आणि आळशी होता. एकदा ती आपल्या मुलाला म्हणाली—"तुला काही काम येत नाही आणि ठोंब्यासारखा बसून असतोस. तुझे पुढे कसे होईल, ते एकट्या देवालाच माहीत!"

हरी म्हणाला—"आई! मला काम दे आणि पहा, मी काम करतो की नाही!"

कमलाला आनंद झाला. ती दुसऱ्या दिवशी हरीला घेऊन इनामदारांकडे गेली आणि म्हणाली—"मालक! मला हा एकुलता एक मुलगा आहे. हा आपण सांगाल ते काम करायला तयार आहे. त्याला काय काम येते हे आपणच परीक्षा घेऊन पहा!"

इनामदार म्हणाले—"कामे काय पुष्कळ आहेत. देतो मी एक काम याला. याला ते काम येते की नाही हेदेखील कळेल. असे सांगून इनामदाराने आपल्या एका म्हाताऱ्या नोकराला बोलावून हरीला गोठ्यात न्यायला सांगितले आणि हरीला म्हणाला—"हे पहा, उद्यांपासून तू आमच्या म्हशी चरायला घेऊन जात जा. पण बेफिकीरपणे राहू नकोस बरं का! एकेका म्हशीची किंमत पांचशे रुपये आहे. जर का एखादी म्हैस हरविली तर मी पांचशे रुपये तुझ्या आईकडून वसूल करून घेईन." नंतर कमलाला म्हणाला—"कळलं का? मी तुझ्या मुलाला म्हशी चरायला घेऊन जायचे काम दिले आहे. निष्काळजीपणाने एखादी

म्हैस हरविली तर तुला पांचशे रुपये भरून द्यावे लागतील."

कमलाने विचार केला, मुलाने सावधगिरीने वागावे म्हणून पांचशे रुपये सांगितले असतील. खरी किंमत कमीच असेल. म्हणून होकार दिला आणि हरी त्या दिवसापासून मालकाच्या हुकमाप्रमाणे कामाला लागला."

हरीला ते काम मुळीच आवडले नाही. त्याला थोडे फार लिहितां वाचतां येत होते. त्याला वाटत होते की इनामदार त्याला काहीतरी चांगले काम देतील. परंतु त्यांनी गुराख्याचे काम दिले. तो हुशार होता व त्याला असे वाटू लागले की इनामदाराला आपल्याला थोडे फार लिहितां वाचतां येते याची माहिती नसावी. त्यांना कळावे यासाठी त्याने एक युक्ती केली.

एक दिवशी हरीने एका मुलाला आपल्या म्हशी चरायला नेण्याचे काम दिले व त्याबद्दल खायला जिलबी दिली. मुलगा तयार झाला. हरी एक म्हैस घेऊन शेजारच्या गावी गेला व त्याने म्हशीच्या पाठीवर "एक [illegible] घ्यायची असेल त्यांनी गावच्या मैदानावर संध्याकाळी हजर रहावे." असे लिहून गांवभर म्हशीला फिरविले.

संध्याकाळी दोन हजार लोक मैदानावर हजर झाले. हरी त्यांना म्हणाला–"प्रत्येकाने एकेक रुपया द्यावा आणि सर्वांच्या नांवाच्या चिट्ठ्या टाकून ज्याच्या नावाची चिट्ठी निघेल त्याला म्हैस मिळेल."

त्याप्रमाणे प्रत्येकाने एकेक रुपया दिला. दोन हजार रुपये जमा झाले. चिट्ठी उचलल्यावर ज्याचे नाव आले त्याला म्हैस मिळाली.

हरीने दोन हजार रुपये मालकाला नेऊन दिले आणि त्याने केलेली युक्ती सांगितली.

इनामदार खूष झाला. हरीच्या हुशारीची परीक्षा झाली. त्याने हरीला त्या दिवसापासून हिशोब लिहिण्याचे काम दिले.

कमलाला आनंद झाला. तिचे व तिच्या मुलाचे पुढील आयुष्य सुखाचे झाले.





# चोरी उघडकीला आली

कृष्णा नदीच्या काठी कृष्णा आणि रघू नावाचे दोन शेतकरी रहात असत. कृष्णा आळशी पण वस्ताद होता. परंतु रघू अगदी निराळ्या स्वभावाचा होता. तो जात्याच मेहनती आणि सरळ होता. म्हणून रघूच्या शेतात चांगले पीक निघे आणि हळूहळू त्याने चार पैसे जमविले देखील. परंतु कृष्णा आपल्या शेतात कधी पाऊल टाकील तर शपथ! तो चकाट्या मारीत आपला सर्व वेळ घालवी.

रघूकडे चार पैसे जमा झाले तेव्हां त्याने शेतीचे काम करण्यासाठी एक नोकर ठेवला आणि स्वतः बदके पाळून अंडी विकू लागला. त्या व्यापारात देखील पुष्कळ फायदा झाला.

कृष्णाला त्याचे मित्र म्हणाले–"काय रे! पाहिलेस का रघू बदकांची अंडी विकून खूप पैसे मिळवू लागला आहे, आणि तू तर शेतातदेखील काम करीत नाहीस! तू सुद्धा बदके पाळून अंडी विकायचा धंदा कां करीत नाहीस?"

कृष्णा रघूच्या घरी गेला आणि त्याने बदकांच्या अंड्यांचा धंदा कसा सुरू केला व त्यात त्याला बरकत कशी झाली सर्व विचारून घेतले. रघूने सहानुभूतीपूर्वक सर्व सांगितले देखील.

त्या प्रमाणे कृष्णाने काही बदके विकत आणली. परंतु ती वाढवून त्यांची अंडी विकायला मिळेपर्यंत त्याला धीर नव्हता. त्याची बदके त्याच्या निष्काळजीपणामुळे अशक्त झाली व कमी अंडी देऊ लागली. याउलट रघूची बदके व अंडी मोठी व वजनदार असत आणि अंड्यांची किंमत पण जास्त येई.

दोघांची दुकाने शेजारी शेजारीच होती. कृष्णा लबाड होता. संधी मिळेल तेव्हां



तो रघूच्या दुकानातून अंडी चोरून घेऊन येई. हळू हळू त्याने दररोज अंडी चोरून न्यायचा प्रघातच पाडला. एक दिवशी रघूला संशय आला, म्हणून त्याने पाळतीवर राहून कृष्णाला अंडी चोरीत असतां पकडले आणि बजावून सांगितले की त्याने पुन्हां कधी चोरी केली तर त्याला न्यायाधिशाच्या कचेरीत ओढून न्यावे लागेल. परंतु कृष्णाला चोरीची संवय पडली होती.

तेव्हां अगदी नाइलाजाने रघूने कृष्णाविरुद्ध कोर्टात फिर्याद केली. कोर्टात कृष्णानें सर्व अंडी त्याचीच असल्याचे सांगितले. चोरीचा आरोप खोटा ठरला.

रघूला कळेना की कृष्णाची खोड कशी मोडायची. तेव्हां त्याच्या बायकोने चोराला मुद्देमालासकट पकडून देण्याचा उपाय सुचविला. तेव्हां रघूची बायको त्याला म्हणाली—"त्यात कठीण असे काही नाही. तुम्ही आमचे गणपतीमामा आहेत ना, त्यांच्याकडे जाऊन विचारा. ते काही तरी मंत्र सांगतील."

रघूला तो सल्ला पसंत पडला आणि तो दुसऱ्या दिवशी बायकोच्या गणपती मामाकडे गेला.

गणपतीमामा थोडावेळ विचार करून म्हणाले—"रघुदादा! मी सांगतो तसे करा, म्हणजे चोर नक्कीच मुद्देमालासकट पकडला जाईल." असे सांगून गणपतीमामांनी रघूला एक उपाय सुचविला.

रघूने घरी परत जात असता दुकानात एक दोन वस्तू विकत घेतल्या आणि घरात गेल्यावर खोलीत बसून एकट्यानेच तो उद्योग करू लागला.

त्या दिवशी रघूला दुकानात जायला थोडा उशीर झाला. त्याने दुकान उघडून दुकानात सर्व अंडी ठेवून दिली आणि पाणी प्यायला म्हणून थोडावेळ बाहेर निघून गेला. तो परत यायच्या आत कृष्णाने काही अंडी चोरली. रघूने परत आल्यावर कृष्णाने अंडी चोरून नेल्याचे

"चोर, चोर!" ते ऐकून तिकडून जाणारा पोलीस शिपाई आला आणि चोर कोठे गेला आणि चोरी कसली झाली वगैरे गोष्टींची त्याने चवकशी केली.

रघू म्हणाला—"चोर आणखी कोण हो, हा आमचा शेजारीच, वीस अंडी चोरून घेऊन गेला आहे!"

"खोटे! सपशेल खोटे!" कृष्णा म्हणाला.

"काय हो, तुम्ही पूर्वी असाच चोरीचा आरोप लावून कृष्णाला कोर्टात ओढले होते ना? पण चोरीचा आरोप सिद्ध झाला नाही, विसरलात वाटते?" शिपायाने विचारले.

"मी या खेपेस साबित करून दाखवितो." रघू म्हणाला.

रघू आणि कृष्णा आपापल्या दुकानातला माल घेऊन पोलीस ठाण्यावर पोलीसाबरोबर गेले. कोर्टात गेल्यावर न्यायाधिशाने रघूला विचारले—"काय हो तुम्ही मागे असाच आरोप केला होतात, पण काय झाले? खोटाच ठरला, नाही का?"

शिपायाने कृष्णावर रघूने अंडी चोरल्याचा आरोप लावल्याचे कोर्टाला सांगितले.

"त्याचे प्रमाण काय?" न्यायाधिशाने विचारले.

"कृष्णा कच्ची अंडी विकतो, पण आज त्याच्या टोपल्यात उकडलेली अंडी कशी काय आली, विचारून पहावे त्याला! आज



मी सर्व अंडी उकडून आणली आहेत." रघू म्हणाला.

"माझ्या काही गिऱ्हाइकांनी उकडलेली अंडी आणायला सांगितली होती. म्हणून मी उकडली अंडी आणून ठेवली होती." कृष्णा म्हणाला.

रघू म्हणाला–"हुजूर! आपण कृष्णाच्या टोपलीतल्या अंड्याची टरफले काढून पहावी. त्यांवर माझे नाव लिहिलेले दिसेल. आपण पहावी टरफले काढून."

"पाहतो!" असे सांगून न्यायाधिशाने अंड्यावरची टरफले काढून पाहिले आणि रघूने सांगितल्याप्रमाणे खरोखरच अंड्यांवर त्याचे नाव लिहिलेले होते.

रघूने स्मित करून विचारले–"हुजूर! आपण कृष्णाला विचारावे तरी की त्याने कोणती जादू करून आणि कशासाठी माझे नाव आपल्या अंड्यांवर लिहिले?"

कृष्णा जवळ काही उत्तर नव्हते. चोरीचा आरोप सिद्ध झाल्यामुळे कृष्णाला तुरुंगात जावे लागले.

[illegible] चोराला मुद्देमालासकट कसे [illegible] दिले हे. आनंदाने सांगितले.

"परंतु ही चोरी कशी काय साबीत करून दाखविलीत, नाही कळले?" बायकोने विचारले. रघूने चोरलेल्या अंड्यांवर टरफलांच्या आत त्याचे नाव लिहिलेले होते असे सांगितले होते.

"परंतु तुमचे नाव अंड्यांवर कसे लिहिले गेले, हे नाही सांगितलेत?" बायकोने विचारले.

"तूच नव्हेतेस का सांगितलेस गणपतीमामांकडे जायला. मामांनी तेजाब आणि तुरटी मिसळून जे द्रव तयार होईल त्याने अंड्यावर लिहिलेले नाव उघडल्यावर टरफलाच्या आत उमटते असे सांगितले होते. मी खोलीत बसून तोच उद्योग केला होता. तू द्रवपदार्थ वाळल्यावर अंडी उकडून दिली होतीस. झाले, हीच जादू होती. दुसरे काही केले नाही." रघू म्हणाला.





# उडणारा घोडा

शतके होऊन गेली, इराण देशात सबूर नावाचा सुलतान राज्य करीत असे. तो त्या काळच्या सुलतानात जास्त श्रीमंत व हुशार होता. त्याच बरोबर तो दानशूर पण तसाच होता. त्याच्या दरबारी जाऊन कोणी रिकाम्या हातांनी घरी परतत नसे. तो गरीबांचा कैवारी होता व परदेशी विद्वानांचा आदर करी. परंतु न्यायनिवाडा करण्यात तो कडक होता. अपराध सिद्ध झाला की तो इतकी कडक शिक्षा करी इतर लोकांना त्याची दहशत बसे.

सुलतानाला एक मुलगा होता आणि एकीहून एक सुंदर अशा तीन मुली होत्या. मुलाचे नाव कमर अक्मार होते.

दरवर्षी सुलतान आपल्या प्रजेच्या मनोविनोदार्थ दोन मोठे उत्सव करी–वसंत ऋतूत नवरोज उत्सव होई आणि हेमंत ऋतूत मिहिरगान उत्सव. या दोन्ही उत्सवांच्या वेळी सुलतानाच्या महालाचा दरवाजा सर्वांसाठी खुला असे आणि सुलतान खुल्या दिलाने दानधर्म करी. नव्या लोकांना सुलतानाच्या दरबारी नोकरी आणि जुन्या नोकरांना पगारवाढ मिळे. उत्सवांच्या वेळी इराण देशाच्या काना कोपऱ्यातून लोक राजधानीत येत. विद्वान मौलवी व पंडित, कारागीर आणि कलाकार, नट आणि नृत्यकार येऊन आपले कौशल्य दाखवून इनाम मिळवून स्वदेशी जात. प्रजा मनोरंजन व करमणुकीचे कार्यक्रम पहायला येई आणि सुलतानाला स्वखुषीने नजराणे देई. सुलतान सर्वांचा यथायोग्य सत्कार करी.

एकदा नवरोज उत्सव चालू होता. सुलतान दरबारात बसला असतां तीन जण आपापले कौशल्य दाखविण्यासाठी सुलतानाच्या दरबारात आले. त्यांच्या पैकी

प्रत्येक एकेक शास्त्राचा विद्वान होता. ते आपापल्या कलेचे प्रदर्शन करून लोकांची 'वाहवा' मिळावी म्हणून आले होते. एक जण हिंदुस्थानातून आला होता, दुसरा रोमचा होता व तिसरा इराण देशातलाच होता. तिसऱ्याला इराणी भाषा येत होती.

हिंदुस्थानातून जो पंडित आला होता त्याने सुलतानाला लवून नमस्कार केला आणि त्याला आशीर्वाद देऊन एक भेट सुलतानासमोर ठेवली. ती एक मूर्ती होती. ती सोन्याची मूर्त आणि हिऱ्या माणकांनी मढलेली होती. त्या मूर्तीच्या हातात एक वाजवायचे शिंग होते.

"या मूर्तीचे विशेष काय?" सुलतानाने त्या पंडिताला विचारले.

पंडित म्हणाला—"जहाँपनाह! या [illegible] या मूर्तीचे विशेष लक्षात येईल. ही मूर्त आपण आपल्या राजधानीच्या द्वारावर ठेवून द्यावी. ती रात्रंदिवस पाहरा देईल. शत्रू स्वारी करायला आला तर तो जवळ येण्यापूर्वी ही मूर्त शिंग वाजवून आल्याची सूचना देईल. शत्रू शिंगाचा आवाज ऐकूनच थरथर कापू लागेल आणि युद्ध झाल्या-शिवायच भयभीत होऊन जागच्या जागी ठार होईल."

"तुम्ही या मूर्तीविषयी जे काही म्हणा-लात ते आहे मोठे गमतीदार ते खरे ठरले तर तुम्हांला मी तुम्ही मागाल ते बक्षिस देईन. पण जर का ते खोटे ठरले तर [illegible] सुलतान म्हणाला.

त्यानंतर रोमचा कारागीर समोर आला. त्याने एक चांदीचे मोठे तबक सुलताना-समोर ठेवले. त्या तबकात मधोमध एक सोन्याचा मोर होता आणि चारही बाजूला चोवीस लांडोर होते.

सुलतानाने विचारले—"कारागीर! या मोराचा आणि लांडोरांचा उपयोग काय, सांगाल का?" सुलतानाने विचारले.

"जहांपनाह! हा मोर प्रत्येक तासाला एका लांडोराला चोंच मारील आणि पिसारा पसरून नाचेल. असे चोवीसदा केले की एक दिवस व एक रात्र संपेल. म्हणजे हे तबक एक घड्याळच आहे. एवढेच नव्हे तर एक महिना पुरा झाला की हा मोर तोंड उघडून आपल्याला द्वितीयेच्या चंद्राचे दर्शन घडवील."

"खरोखरच गंमतीदार आहे खरे तुमचे हे घड्याळ! तुमचे म्हणणे खरे निघाले तर तुम्ही मागाल ते बक्षिस मी देईन. परंतु जर का खोटे निघाले तर मात्र फांशीची शिक्षा मिळेल!" सुलतानाने बजावून सांगितले.

नंतर इराण देशातला कारागीर पुढे आला. त्याने लवून मुजरा केला आणि एक लाकडी घोडा सुलतानासमोर आणून उभा केला. तो शिशवीचा घोडा होता. आणि त्यावर सोन्याचांदीच्या नक्षीचे काम केले होते." घोड्याच्या पाठीवर खोगीर







बसवलेले होते आणि तोंडात लगाम बस-
विलेला होता. घोडा सुंदर होता.

घोडा पाहून सुलतानाने त्याचे विशेष विचारले.

इराणी कारागार म्हणाला—"जहां-पनाह! या घोड्यावर जो कोणी बसेल तो आपले मन ज्या वेगाने धावू शकते त्या वेगाने पाहिजे तिकडे उडू शकेल. सामान्य घोडा वर्षभर पळत राहीला तर जितका दूर पळेल तितके अंतर हा घोडा एका तासात कापून काढील, तरी तो दमणार नाही."

"तुम्ही म्हणालात ते खरे ठरले तर तुम्हांला मागाल ते बक्षिस मिळेल. नाही तर फांशी!" सुलतानाने बजावून सांगितले.

[illegible] आणला होता त्याची परीक्षा तीन दिवसात झाली आणि तिघांचे म्हणजे खरे असल्या-बद्दल सुलतानाची खात्री झाली. सुलतान गमतीखातर इराणच्या कारागिराने आणले-ल्या घोड्यावर बसून आकाशात एक चक्कर मारून आला.

सुलतान सबूर आनंदाने तिघांना बोला-वून म्हणाला—"तुम्ही तिघांनी आपापल्या वस्तूचे विशेष मला पटवून दिले आहे. तेव्हां तुम्ही मागाल ते द्यायला मी तयार आहे."

ते ऐकून तिघे म्हणाले—"जहांपनाह! आपण आपल्या तिघां मुलींची लग्ने आमच्याशी करून द्यावी अशी विनंती आहे! आपले जांवई होण्याची आमची इच्छा आहे."

सुलतान म्हणाला—"कबूल! मी तुमच्या इच्छेप्रमाणे तुमचे लग्न करून देतो." असे सांगून सुलतानाने काजीला आणि साक्षी-दारांना बोलावून आणविले आणि त्यांना लग्नासंबंधी कागदपत्र तयार करायला सांगितले.

पडद्यामागून तिघी राजकन्या तिघां कारागिरांनी आणलेल्या वस्तू कौतुकाने पहात होत्या. सुलतानाची तिसरी राज-कन्या आपल्या होणाऱ्या पतीकडे पाहून

थरथर कापू लागली. तिच्या अंदाजाने तो [illegible] म्हातारा तरी [illegible] होता. तिघी बहिणीत तीच जास्त सुंदर होती. आपल्याला त्या थेरड्याशी लग्न करावे लागणार या विचारानेच तिला वेड लाग-ल्यासारखे झाले. ती आपल्या खोलीत जाऊन रडू लागली. अंगावरचे कपडे फाडून ती वेड्यासारखी आपलेच तोंड ओरबडू लागली.

त्याच वेळी तिचा भाऊ कमर अक्मार शिकार संपवून घरी परतला. बहिणीला रडत असलेली ऐकून तो सरळ तिच्या खोलीत गेला आणि तिच्या रडण्याचे कारण विचारले.

ती म्हणाली—"अरे दादा! माझे कर्म! बाबांनी एका शंभर वर्षाच्या थेरड्याशी माझे लग्न करून देण्याचे वचन दिले आहे. तो एक लाकडी घोडा घेऊन आला आहे आणि तो घोडा आकाशात उडतो. आपल्या बाबांना वेड लावले आहे त्या घोड्याने. मी जीव देईन, पण त्या थेरड्याशी लग्न करणार नाही."

कमरने आपल्या बहिणीचे सांत्वन केले आणि तिच्या मर्जीविरुद्ध काही होणार नाही असे तिला सांगून तो सरळ बापाकडे गेला आणि म्हणाला—"अब्बाजान! आपण माझ्या धाकट्या बहिणीचे लग्न एका



थेरड्याशी करून द्यायचे वचन दिले आहे का? तो कोणता नजराणा घेऊन आला आहे, कोणास ठाऊक आणि आपण त्याच्या साठी आपल्या सुंदर मुलीचा बळी का देणार? या लग्नाचा हट्ट आपण धरलात तर माझी बहीण नक्कीच आत्महत्या करील."

कमर हे सर्व आपल्या बापाला सांगत असतां तो घोडा आणणारा कारागीर जवळच उभा राहून सर्व ऐकत होता. त्याला राग आला, परंतु त्याला काहीच करता येण्यासारखे नव्हते. त्याच वेळी सुलतान आपल्या मुलाला म्हणाला—"अरे बेटा! हा कारागीर जो घोडा घेऊन आला

ाहे तो तू पाहिलास तर तू असे बोलणार ाहीस."

नंतर तो मुलाला घेऊन बाहेर आला. ाने मुलाला तो लाकडी घोडा दाखविला. ामर तो घोडा पाहून भुरळला. त्याला ोडयाच्या स्वारीचा छंदच होता. म्हणून टकन उडी मारून तो घोडयावर बसला. ाने घोडयाला टांच मारून लगामाने ालायला खूण केली. परंतु घोडा जागचा ालाच नाही.

तेव्हां सुलतानाने कारागिराला विचारले– कां हो, घोडा कां हालत नाही पाहता ा? माझ्या मुलाला घोडयाचे हे यंत्र ासे चालते ते सांगा. त्यानंतर तुमच्या च्छेप्रमाणे सर्व होईल."

म्हातारा सुलतानाच्या मुलाला चांगली ाद्दल घडविण्याची संधी पहात होता. तो ामरलाजवळ जाऊन म्हणाला–"काही नाही ी, खोगिराच्या उजव्या बाजूला जी गुंडी ाहे ती फिरवा म्हणजे घोडा उडू लागेल." ुलतानाच्या मुलाने त्याप्रमाणे उजवी कडची गुंडी फिरविली आणि घोडा आकाशात उडू ...ला. ... तीन मिनिटात कमर दूर उडत जात दिसेनासा झाला. कित्येक तास लोटले तरी तो परत आला नाही.

आतां मात्र सुलतान घाबरला. त्याने कारागिराला विचारले–"काय हो माझ्या मुलाला जमिनीवर कसे आणायचे सांगा!"

म्हातारा म्हणाला–"जहांपनाह! आतां आपल्या चिरंजीवांचे परत येणे अशक्यच समजा. खाली उतरायला डाव्या बाजूची गुंडी फिरवावी लागते. ते मी सांगण्यापूर्वीच तुमचे चिरंजीव उडव्या बाजूची गुंडी फिरवून आकाशात उडून गेले. अर्धवट ज्ञानाचा असा दुष्परिणाम होतो."

परंतु सुलतानाला त्या कारागिराचा राग आला. "त्या म्हाताऱ्याला बडवून टाका रे तुरुंगात!" सुलतानाने हुकूम सोडला.

त्यानंतर तो दुःख करीत आपली छाती बडवीत घरात गेला आणि अंतःपुरातील स्त्रियांबरोबर शोकसागरात बुडला.

(क्रमशः)



# ब्रह्मदेवाचा एक पैसा

प्राचीन काळी रामशर्मा नावाच्या ब्राह्मणाने ब्रह्मदेवाचे स्मरण करून तपश्चर्येला सुरवात केली.

पुष्कळ वर्षे लोटल्यावर ब्रह्मदेवाने दर्शन देऊन विचारले–"काय रे भक्ता! तू कशासाठी माझे स्मरण केलेस?"

रामशर्मा म्हणाला–"ब्रह्मदेवा! लोक म्हणतात की तू भक्तवत्सल आहेस. पण मला दर्शन द्यायला तू इतका उशीर कां केलास?"

"वत्स! तुमचे एक युग हे माझ्या एका दिवसाच्या बरोबरचे असते रे. मी त्या हिशोबाने एका क्षणात आलो." ब्रह्मदेव म्हणाला.

रामशर्माने विचारले–"तर देवा! आमचे एक कोटी रुपये तुमच्या किती पैशा इतके होतात?"

"एका पैशा इतके!" ब्रह्मदेव म्हणाला.

"तरमग आपला एकच पैसा मला द्या!" रामशर्मा म्हणाला.

"आलो बरं का एका मिनिटात." असे सांगून ब्रह्मदेव अंतर्धान पावला.





# धनच सुखाचे मूळ

ुका गावी शिवराम नावाचा एक श्रीमंत शेतकरी रहात असे. त्याला तीन लगे होते. तिघे शेतात काम करीत ाणि बापाच्या पावलावर पाऊल टाकून ालत.

मुले मोठी झाल्यावर शिवरामने त्यांची ग्ने करून दिली आणि सर्व लागवडीची ामे त्यांच्यावरच टाकली.

हळूहळू तिघां मुलांची लग्ने झाली आणि ना आल्या. शिवरामच्या आयुष्यात एकदम दल झाला. सकाळी उठल्याबरोबर एक न दंतमंजन व पाणी आणून देई. तोंड ऊन आल्याबरोबर दुसरी सून पाट मांडून ायला करून ठेवलेले आणून देई. सकाळचे ाणे झाल्यावर तिसरी सून सासऱ्याच्या ठकीत रामायण भागवतासारखे ग्रंथ चायला नेऊन ठेवी. अशातऱ्हेने तिघी ना सासऱ्याच्या सेवेला सतत हजर असत.

मुले शेतात जे पीक निघे ते घरी आणून त्याचा हिशोब बापाला देत. शिवरामला वाटू लागले की देवाची कृपा म्हणून त्याचे वार्धक्य सुखात जात आहे.

तीन प्रहरी वामकुक्षी झाल्यावर शिव-राम आलेल्या मित्रमंडळींना रामायणातल्या व महाभारतातल्या कथा सांगे आणि संदर्भाने आपल्या मुलांचे व सुनांचे कौतुक करीत त्याला म्हातारपणी किती सुख मिळत आहे सांगे.

असाच एकदा त्याचा बालमित्र रंगनाथ त्याला भेटायला आला असतां शिवरामने त्याला ईश्वरकृपेने त्याचे मुलगे व सुना त्याला कशा प्रेमाने वागवतात हे सांगितले.

रंगनाथ सर्व ऐकून स्मित करीत म्हणाला—"आणखी एक काम कर. संसाराचे सर्व ओझे फेकून देऊन मोकळा हो. जमीन-

[illegible]
मुलं आपमात भांडून सर्व घालवून बसतील." असे सांगून रंगनाथ निघून गेला.

शिवरामने मित्राच्या सल्ल्यातली गोम न ओळखून त्याने सुचविल्याप्रमाणे आपली सर्व इस्टेट मुलांमध्ये सारखी सारखी वाटून दिली.

त्या दिवसापासून शिवरामच्या आयुष्यात एक विचित्र बदल झाला. हा बदल फार मोठा होता. शिवरामला आतां कोणीच विचारीनासे झाले. त्याला काय हवे नको हे विचारायचे तर दूरच, मुलांनी शेतात किती मिळकत झाली हे देखील सांगायचे बंद केले.

आतां शिवरामला जीव नकोसा वाटू लागला. तो अंगणातल्या चौथऱ्यावर एकटा बसून देवाचा धांवा करू लागला की देवा, लवकर बोलावून घे. कोणी येणारा जाणारा मित्र येऊन बसला तर त्याला तो त्याला मुलांच्या व सुनांच्या बेफिकीरपणामुळे किती कष्टाने दिवस काढावे लागत आहेत, सांगे.

शिवरामचा रामशास्त्री नांवाचा एक समवयस्क मित्र होता. त्याने सर्व ऐकून घेतले व म्हणाला—"बाबारे! जुनी म्हण आहे, विसरलास का? 'धन मूलं इदं जगत्!' या जगाचे मूळ धन आहे. ईश्वर-भक्ती वगैरे सर्व फुकट आहे. तुझ्या जवळ जोंपर्यंत चार पैसे होते व शेती होती तोंपर्यंत मुले व सुना तुझी विचारपूस



रीत. ते मिळाल्यावर त्यांना तुझी गरज रली नाही. मी तुला पुन्हां चांगले दिवस ह्यायला युक्ती सुचवितो. मी तुला एक त्याची पेटी आणि शंभर रुपयाचा खुर्दा णून देतो. तू दार लावून आपल्या लीत तो खुर्दा दररोज एकेक करून त्या टीत मोजून टाकीत जा. एका हाताने पैसे क व दुसऱ्या हाताने काढून घे. गंमत हा, काय होते ते!"

त्या दिवसापासून सुनांना सासऱ्याच्या लीतून पैशांचा खणखणाट ऐकू येऊ गला. पहिल्यांने त्यांनी चकित होऊन रस्परांकडे पाहिले. नंतर दुसऱ्या दिवसा-सून सासऱ्याच्या सेवेला हजर राहू गल्या.

आतां शिवरामच्या आयुष्यात पुन्हां दल झाला. सुना येऊन पहिल्यासारख्या चारपूस करू लागल्या आणि मुले देखील पाच्या खोलीत जाऊन शेतात कोणते क कसे निघाले, सांगू लागली. रामशास्त्री रून हे सर्व पहात होता. त्याला त्याची युक्ती [illegible] उपयोगी पडल्याचे पाहून आनं[illegible].

शिवरामने तीन चार वर्षांनी जगाचा निरोप घेतला तेव्हां मुलांनी व सुनांनी हौसेने त्याच्या क्रियाकर्मासाठी खूप पैसे खर्च केले. रामशास्त्री हजर होता. तो मुलांना म्हणाला—"हे पहा, तुमच्या वडिलांनी मागे काही ठेवले असेल! पेटी उघडून पहा. पेटीत काही असेल तर सारखे सारखे वांटे करून घ्या."

मुले उत्सुक होतीच. त्यांनी रामशास्त्री समोरच बापाच्या पेटीचे कुलूप उघडले. गावातले काही प्रमुख मंडळी पण हजर होती. पेटीत बराचसा खुर्दा होता आणि त्याबरोबर एक चिट्ठी पण होती. चिट्ठीत लिहिले होते—"या पेटीत जे पैसे आहेत ते सर्व रामशास्त्रीचे आहेत. ते त्याला देऊन टाकावेत!"

ती चिट्ठी पाहून शिवरामची मुले व सुना चकित होऊन परस्परांकडे पाहू लागल्या. रामशास्त्री आपले पैसे घेऊन निघून गेला.



# दोन मूर्ख

एका गांवी दोन मूर्ख रहात असत. बालपणापासूनच त्यांची परस्परांशी गट्टी होती. एकदां गावातल्या गल्लीत दोघे परस्परांना भेटले. एकाच्या हातात एक पिशवी होती आणि पिशवीत काही तरी होते.

दुसऱ्या मूर्खाने त्याला विचारले—"काय रे आहे या पिशवीत?" पहिल्या मित्राने आपल्या अकलेचे काजवे पाडीत उत्तर दिले—"या पिशवीतली सर्व अंडी तुला देईन."

दुसरा मूर्ख बराच वेळ विचार करून ही काही उत्तर देऊ शकला नाही.

तेव्हां पहिला मूर्ख म्हणाला—"अरे या पिशवीत काय आहे, तुला सांगता आले नाही. अरे अंडी आहेत. किती अंडी आहेत हे सांगितलेस तर पिशवीतली दहाची दहा अंडी तुला देऊन.

दुसरा मूर्ख विचार करीत उभा राहीला. त्याला काय उत्तर द्यावे, सुचेना.



रीत. ते मिळाल्यावर त्यांना तुझी गरज रली नाही. मी तुला पुन्हां चांगले दिवस हायला युक्ती सुचवितो. मी तुला एक ष्याची पेटी आणि शंभर रुपयाचा खुर्दा णून देतो. तू दार लावून आपल्या लीत तो खुर्दा दररोज एकेक करून त्या टीत मोजून टाकीत जा. एका हाताने पैसे क व दुसऱ्या हाताने काढून घे. गंमत हा, काय होते ते!"

त्या दिवसापासून सुनांना सासऱ्याच्या लीतून पैशांचा खणखणाट ऐकू येऊ गला. पहिल्यांने त्यांनी चकित होऊन रस्परांकडे पाहिले. नंतर दुसऱ्या दिवसा-सून सासऱ्याच्या सेवेला हजर राहू गल्या.

आतां शिवरामच्या आयुष्यात पुन्हां दल झाला. सुना येऊन पहिल्यासारख्या चारपूस करू लागल्या आणि मुले देखील पाच्या खोलीत जाऊन शेतात कोणते क कसे निघाले, सांगू लागली. रामशास्त्री रून हे सर्व पहात होता. त्याला त्याची युक्ती [illegible] उपयोगी पडल्याचे पाहून आनं[illegible]

शिवरामने तीन चार वर्षांनी जगाचा निरोप घेतला तेव्हां मुलांनी व सुनांनी हौसेने त्याच्या क्रियाकर्मासाठी खूप पैसे खर्च केले. रामशास्त्री हजर होता. तो मुलांना म्हणाला—"हे पहा, तुमच्या वडि-लांनी मागे काही ठेवले असेल! पेटी उघडून पहा. पेटीत काही असेल तर सारखे सारखे वांटे करून घ्या."

मुले उत्सुक होतीच. त्यांनी रामशास्त्री समोरच बापाच्या पेटीचे कुलूप उघडले. गावातले काही प्रमुख मंडळी पण हजर होती. पेटीत बराचसा खुर्दा होता आणि त्याबरोबर एक चिट्ठी पण होती. चिट्ठीत लिहिले होते—"या पेटीत जे पैसे आहेत ते सर्व रामशास्त्रीचे आहेत. ते त्याला देऊन टाकावेत!"

ती चिट्ठी पाहून शिवरामची मुले व सुना चकित होऊन परस्परांकडे पाहू लागल्या. रामशास्त्री आपले पैसे घेऊन निघून गेला.



# दोन मूर्ख

एका गांवी दोन मूर्ख रहात असत. बालपणापासूनच त्यांची परस्परांशी गट्टी होती. एकदां गावातल्या गल्लीत दोघे परस्परांना भेटले. एकाच्या हातात एक पिशवी होती आणि पिशवीत काही तरी होते.

दुसऱ्या मूर्खाने त्याला विचारले—"काय रे आहे या पिशवीत?" पहिल्या मित्राने आपल्या अकलेचे काजवे पाडीत उत्तर दिले—"या पिशवीतली सर्व अंडी तुला देईन."

दुसरा मूर्ख बराच वेळ विचार करून ही काही उत्तर देऊ शकला नाही.

तेव्हां पहिला मूर्ख म्हणाला—"अरे या पिशवीत काय आहे, तुला सांगता आले नाही. अरे अंडी आहेत. किती अंडी आहेत हे सांगितलेस तर पिशवीतली दहाची दहा अंडी तुला देऊन.

दुसरा मूर्ख विचार करीत उभा राहीला. त्याला काय उत्तर द्यावे, सुचेना.





# गर्वोपहार

पांड्य राजाच्या दरबारात विष्णुशास्त्री नांवाचा एक महा विद्वान पंडित रहात असे. राजा त्याचा फार आदर करी. त्यामुळे विष्णुशर्माला गर्व चढला व तो सर्व पंडितांना त्रास देऊं लागला. तो पंडितांकडून कर वसूल करू लागला आणि दिला नाही तर तो त्यांना शास्त्रार्थासाठी आव्हान करी. पंडितांना त्याची अशी दहशत बसली होती की विष्णुशर्माला लोक "कोलाहल पंडित" या नावानेच ओळखू लागले. त्याच्या भीतीने कित्येक विद्वान पंडित राज्य सोडून निघून गेले.

त्या राज्यांत महाभाष्य भट्ट म्हणून आणखी एक विद्वान पंडित रहात असे. तो सात्विक वृत्तीचा होता. तो शांतपणे आपल्या आश्रमात बसून वेदशास्त्रांचा अभ्यास करी. त्याच्याकडे जी शिष्यमंडळी होती तीदेखील त्याच्यासारखीच सात्विक वृत्तीची होती. कोलाहल पंडिताचा कर भरणे त्याला कष्टाचे जाई.

महाभाष्य भट्टाकडे यामुन नांवाचा एक तेजस्वी शिष्य होता. तो आज्ञाकारी आणि सदाचारी होता. आपल्या गुरूला तो देव तुल्य मानून त्यांची भक्तिभावनेने सेवा करी. त्याने गुरुगृही राहून षड्शास्त्रे आणि षोडष कला शिकून घेतल्या होत्या.

महाभाष्य भट्टकडून कोलाहल पंडिताला लागोपाठ दोन वर्षे कर मिळाला नाही. म्हणून त्याने आपल्या वंजी नांवाच्या शिष्याला पाठविले. वंजी एक वल्लीच होता. ते मोठमोठ्या पंडितांना धमक्या देऊन करवसूलीचे काम करी.

वंजी महाभाष्य भट्टाच्या आश्रमात आला तेव्हां ते कोठे बाहेर गांवी गेले होते व एकटा यामुन आश्रमात होता. वंजी महाभाष्य भट्टाने कर न दिल्याबद्दल त्यांचे [illegible] आपल्या गुरूची निंदा यामुनला [illegible] नाही. तो म्हणाला—"काय रे! माझ्या गुरुवर्यांनी तुझ्या गुरूला कशासाठी रे कर द्यायचा? पांडित्यात ते माझ्या गुरुवर्यांपेक्षां मोठे आहेत का?"

"अस्सं! तरमग तू आपल्या गुरुवर्यांना आमच्या गुरुवर्यांशी शास्त्रार्थ करायला पाठवून दे. मग लहान कोण व थोर कोण हे कळेल!" वंजी म्हणाला.

"तुझ्या गुरूचा पराभव करण्यासाठी माझ्या गुरुवर्यांना इतक्या दूर जाण्याची गरजच काय? मी येतो, त्यांच्याशी शास्त्रार्थ करायला." असे सांगून यामुन पांड्य राजाच्या दरबारात गेला.

यामुन कोलाहल पंडिताशी शास्त्रार्थ करायला आला असल्याचे ऐकून विद्वान पंडितांची दरबारात गर्दी झाली. लोक म्हणाले—"राई आणि पर्वताची काय बरोबरी? बिचाऱ्याचा धुव्वा उडून जाईल!"

राणीला कोलाहल पंडिताचा घमेंडखोरपणा मुळीच आवडत नसे. यामुनला पाहून तिला वाटले;—"ही विस्तवाची ठिणगी गवताच्या गंजीला आग लावून भस्म करणार!"

त्यानंतर कोलाहल पंडित आणि यामुन यांचा शास्त्रार्थ सुरू झाला. कोलाहल पंडिताने यामुनला तर्क आणि व्याकरण शास्त्रावर काही प्रश्न केले आणि यामुनने सर्वांची समाधानकारक उत्तरे दिली.



तेव्हां कोलाहल त्याला म्हणाला—"तू स्वतःच्या इच्छेप्रमाणे मला वाटेल तो प्रश्न घेऊन त्याचे समाधानकारक उत्तर दे. मी त्याचे खंडन करतो. मी खंडन करू शकलो नाही तर मी हारलो आणि तू विजयी झालास असे मी मान्य करीन."

यामुन म्हणाला—"आपली आई वन्ध्या स्त्री आहे का? नाही!"

"तू म्हणालास ते बरोबर आहे. मी याचे खंडन करणार नाही!" कोलाहल म्हणाला.

"पांडव राजा धर्मात्मा आहेत का? आहेत!" कोलाहल म्हणाला.

"होय हे निर्विवादच आहे!" कोलाहल पंडित म्हणाला.

"महाराणी पतिव्रता आहेत का? आहेत!" यामुन म्हणाला.

"होय हे पण पूर्णपणे निर्विवाद सत्य आहे!" कोलाहल म्हणाला.

"तर मग आपण हारलात व मी जिंकलो. कारण मी जे सांगितले त्याचे तुम्ही खंडन करु शकला नाहीत तरी मी करून दाखवितो." यामुन म्हणाला. सर्व दरबारी चकित होऊन यामुनकडे पाहू लागले.

"आपण आपल्या मातोश्रींचे एकुलते एक चिरंजीव आहां, होय ना? या विषयी मनुसंहितेत "एक पुत्रो ह्यपुत्रा इति लोकवादात्" म्हटले आहे. म्हणून त्यांना एक मुलगा असून ही त्या 'अपुत्रा' म्हणजे नसल्या सारख्याच आहेत.

"'सर्वतो धर्म षड्भागो, राज्ञो भवति रक्षत: । अधर्मादपि षड्भागो भवत्यस्यह्य रक्षत: ।' हे देखील मनुसंहितेत सांगितले आहे. [illegible] प्रजेकडून होणाऱ्या पाप-पुण्यातला सहावा भाग राजाला मिळतो. या कलियुगात राजा किती मोठा धर्मात्मा असला तरी प्रजेकडून घडणाऱ्या पापांचा सहावा वांटेकरी तोच आहे. म्हणून तर्क दृष्ट्या महाराज म्हटले आहे धर्मात्मा ठरत नाहीत."

"आतां राणी सरकारांविषयी. मनुसंहितेत–"सोग्निर्भवति, वायुश्च, सोर्क, स्सोम स्सधर्मराट्, स कुबेर स्स वरुण:, स महेन्द्र: प्रभावत:!" राजाच्या अंगात अग्नी, वायु, अर्क, चंद्र, यमधर्म कुबेर, वरुण, इंद्र असे आठ जण असतात. त्या आठ जणांच्या पत्नी राणी पतिव्रता कशा काय होणार?" यामुनने विचारले.

राजा व सभासद यामुनची चमत्कार पूर्ण विद्वत्ता पाहून त्याची प्रशंसा करु लागले. कोलाहल पंडिताचा गर्वपरिहार झाला आणि तो राज्यसभेतून उठून निघून गेला.





# चिक्कू म्हातारी

एका गावी एक चिक्कू म्हातारी रहात असे. तिच्या जवळ एक पडकी झोपडी, एक बंदामाचे झाड आणि एक कढीलिंबाचे झाड होते.

कोणी कढीलिंब मागायला आला की ती मूठभर तांदूळ मागून घेऊन दोन डहाळ्या तोडून देई. गावातली मुले बदाम मागायला येत तर ती एक पैसा घेऊन एक बदाम देई. म्हातारीच्या झोपडीत सैंपाकाची तीन-चार मातीची भांडी, एक घाणेरडी मळकी उशी आणि एक फाटकी घोंगडी एवढ्याच वस्तू होत्या.

त्या गावात लक्ष्मण नावाचा एक उनाड मुलगा होता. त्याने म्हातारीबरोबर राहून फायदा होईल असा विचार केला. कारण ती मेली म्हणजे तिच्यांजवळ जे काही आहे ते आपल्या मिळेल असा विचार करून तो म्हातारीच्या घरी गेला. त्या वेळी म्हातारी बदामाच्या झाडाखाली कांबळे टाकून, खारी येऊन बदाम पाडीत म्हणून ती पडल्या पडल्या पाहारा देत होती.

लक्ष्मण जवळ जाऊन म्हणाला–"आजी! तुमच्या झाडावरचे बदाम कसे आहेत हो?"

म्हातारीने प्रथम लक्ष्मणकडे पायापासून डोक्यापर्यंत निरखून पाहिले आणि म्हणाली– "खाऊन कोणी पाहिले रे? पाहिजे तर एक पैसा देऊन घे आणि खाऊन पहा!"

ते ऐकून लक्ष्मण हंसत म्हणाला– "आजी! मी मदत करीत जाईन. मला आपल्या घरी कां नाही ठेवून घेत?"

"तू काय करणार मदत? फुकट खायला द्यायला नाही माझ्याकडे काही." म्हातारी म्हणाली.

"दोन दिवस मला आपल्याकडे ठेवून तर पहा. तुम्हांला फुकट खर्च होतो असे वाटले तर चालू लागायला सांगा. मी

क. शणीधर जाधव



निघून जाईन. तुमचे बदाम व कढीलिंब
ी बाजारात जाऊन विकीन. तुम्हांला
ार पैसे जास्तच मिळतील." लक्ष्मण
हणाला.

म्हातारी थोडा वेळ विचार करून
हणाली—"तर खारींवर पाहरा ठेव. मला
ुझे काम आवडले तर तुला ठेवून घेईन."
ासे सांगून म्हातारी उशी व घोंगडी
ेऊन झोपडीत गेली.

म्हातारी लक्ष्मणला दोन वेळ जेवायला
ाढी, परंतु त्याला खूप काम सांगे. बाजा-
ात विकायला बदाम व कढीलिंब देई तो
ोजून आणि किंमत सांगून देई. एक
ैसा कमी आला तर लक्ष्मणला शिव्या
शाप ऐकाव्या लागत. इतके सर्व झाले
तरी लक्ष्मण सर्व सहन करीत म्हातारीच्या
मरणाची वाट पाहू लागला.

काही काळ लोटल्यावर म्हातारी इतकी
अशक्त झाली की तिला उठणे बसणेदेखील
अशक्य होऊ लागले. आता जास्त दिवस
या जगाचा संबंध राहणार नाही, हे म्हाता-
रीने ओळखले. आपली झोपडी फुकटात
कोणाला कां मिळावी असा विचार करून
तिने ती एका सावकाराकडे गहाण ठेवून
काही पैसे कर्जाऊ मागून घेतले. म्हातारी
निघून गेल्यावर लक्ष्मण नित्याप्रमाणे कढी-
लिंब घेऊन बाजारात जात असता त्या
सावकाराच्या घरावरून जाऊ लागला.
सावकाराने त्याला हाक मारून म्हातारीने
झोपडी गहाण ठेवून दोनशे रुपये कर्जाऊ
मागून नेल्याचे सांगितले आणि विचारले—
"यात तुझा वांटा किती?"

लक्ष्मणने विचार केला, म्हणजे म्हाता-
रीने ही पडकी झोपडीसुद्धा कोणाला
फुकटात मिळू नये यासाठी गहाण ठेवली
आहे तर. परंतु हे पैसे जाणार कोठे?

रात्री म्हातारी झोपडीत झोपे आणि
लक्ष्मण बदामाच्या झाडाखाली झोपे. एकदा
रात्री झोपडीत खुडबुड झालेली ऐकून तो
झोपडीजवळ गेला आणि झोपडीच्या
भोकातून पाहू लागला. आत एका लहानशा
दिव्याच्या उजेडात म्हातारी रुपये मोजीत
होती.

"म्हातारे, तू मेल्यावर हे सर्व रुपये
मलाच मिळणार आहेत!" असा विचार
करीत लक्ष्मण परत येऊन बदामाच्या
झाडाखाली झोपला.

दिवसामागून दिवस जात होते. एक
दिवशी म्हातारी उठली नाही. तिला बरे
वाटत नव्हते. कांबळयावर पडून होती.
तिला वाटू लागले की आता या जगाचे
नाते तुटण्याची वेळ जवळ आली आहे.
तिने लक्ष्मणला हाक मारली व म्हणाली—
"बेटा! मला बोलावणे आले आहे. चल
आपण स्मशानात जाऊन बसून राहू या.
येथेच मरण आले तर खर्च जास्त होईल."

लक्ष्मणला राग आला. म्हणाला—
"तेथे गेल्यावर कमी खर्च येईल असे
वाटते का आजी! लाकडे आणि कापड
तर लागणारच!"

"अरे, माझे प्रेत जाळण्याची गरजच
काय? फुकट इतका खर्च कशाला? कोणाला
खड्डा खाणायला सांगितला तर खर्च जास्त
होईल. म्हणून तू पहिल्यानेच एक खड्डा
खणून ठेव आणि मी मेल्यावर माझे प्रेत
ओढून या उशी कांबळयाबरोबर खड्डयात
टाकून वर माती टाक म्हणजे झाले."
म्हातारी म्हणाली.

लक्ष्मणला वाटले की म्हातारीने जे
काही वांचविले असेल ते आपल्यालाच
मिळणार. म्हणून तो म्हातारीबरोबर



शानात कुदळ फावडे घेऊन निघाला. तारी उशी व कांबळे घेऊन चालू गली. स्मशानात दोघे पोचले तेव्हां तेथे णी नव्हते. एका चिंचेच्या झाडा खाली शीवर डोके ठेवून म्हातारी पडून राहली. क्ष्मण खड्डा खणू लागला.

थोड्या वेळाने म्हातारीने विचारले– काय रे लक्ष्मणा! खड्डा खणून झाला ?"

"आजी! खणून झाल्यावर तुम्हांला ांक मारतो." लक्ष्मण म्हणाला.

खड्डा खणून झाला तोंपर्यंत चांगले जाडले होते. लक्ष्मण म्हणाला–"आजी! खड्डा झाला हो तयार! पण म्हातारी काही ोललीच नाही. लक्ष्मणला वाटले, म्हातारी ली. सुटली बिचारी ती, आपण आतां ोकळे! तिचे ते सर्व आपलेच!" या विचाराने त्याला अपरंपार आनंद झाला. म्हातारीची ती घाणेरडी मळकी उशी आणि कांबळे त्याने प्रथम खड्यात टाकले आणि नंतर म्हातारीला आत पोचवून तिला पुरून टाकले आणि तिच्या झोपडीकडे धावला.

त्याने झोंपडी हुडकून पाहिली. पण त्याला काही सांपडले नाही. सर्व जमीन खणून पाहिली आणि छपरावर गवत व ताडाची पाने होती ती उलथून पाहिली, परंतु काही एक हाती लागले नाही. त्याला वाटले की ज्या दिवशी म्हातारीने झोंपडी गहाण टाकून रुपये आणले होते त्याच दिवशी घ्यायला पाहिजे होते. ते रुपयेदेखील आता गेले. म्हातारीचे मागच्या जन्मातले कर्ज होते की काय कोण जाणे, नाही तर इतके दिवस तिची चाकरी करून हाती काही कां आले नाही. परंतु म्हातारीने सर्व रुपये उशीत शिवून ठेवले होते हे त्याच्या लक्षात आले नाही.

उजाडण्यापूर्वी पाय काढणे त्याला आवश्यक होते. कारण त्याने झोपडी खणून काढली होती. सावकार येऊन पाहील तेव्हां तुरुंगाची पायरी चढावी लागेल असा विचार करून लक्ष्मण गाव सोडून पळून गेला.





# महाभारत

संजय पांडवांकडे जाऊन आपले दूतकार्य पुरे झाल्यावर हस्तिनापूरला परतला. तो धृतराष्ट्राला भेटून म्हणाला–"राजा! युधिष्ठिराने सर्व दोष तुझ्यावरच लावला आहे. तूच लोकनिंदेस पात्र झाला आहेस. युधिष्ठिराने माझ्या हाती जो संदेश पाठविला आहे तो मी सर्वासमक्ष राज्यसभेत सांगेन." नंतर धृतराष्ट्राचा निरोप घेऊन संजय घरी निघून गेला. धृतराष्ट्र विदुराला बोलावून म्हणाला–"पांडवांकडून संजय परत आला आहे. तू मला माझा मनःस्ताप पुरा होईल असे काही तरी सांग."

गोडशब्दात धृतराष्ट्राची कान उघाडणी करीत म्हणाला–"राजा! तू या जगताच्या रक्षणासाठी असत्याचा त्याग कर. आपला वंशक्षय होऊ नये यासाठी इष्ट ते कर. तू दुर्योधनाच्या हट्टाला बळी पडून पांडवांना दूर लोटलेस. आतां दुर्योधनाला त्याच्या पापाची फळे कशी चाखावी लागतात हे तू स्वतःच्या डोळयांनीच पाहशील. म्हणून सामोपचाराने तू पांडवांना बोलावून त्यांना काही गांवे दे. अजून उशीर झाला नाही, आपल्या मुलावर ताबा ठेव. भाऊबंदकी थांबव. संकटसमयी हातभार लावायला तेच नाही का धांवणार?"

"होय रे! मी तरी पांडवांच्या हिताचाच नेहमी विचार करीत आलो. परंतु दुर्योधन समोर आला की माझे मन माझ्या ताब्यात रहात नाही. हा सर्व दैवदुर्विलास आहे." धृतराष्ट्र म्हणाला.



दुसऱ्या दिवशी राज्यसभा भरली. दुर्यो-धनाच्या मदतीला आलेले सर्व राजेरजवाडे संजयाने आणलेला संदेश ऐकण्यासाठी आतुर होऊन सभेला हजर होते. संजयाने सभेत आल्यावर प्रथम सर्वांना नमस्कार करून म्हणाला—"उपस्थित सभासद हो! मी पांडवांना भेटून आलो आहे. त्यांनी आपणांपैकी प्रत्येकाची फार आपुलकीने चवकशी केली होती. मी त्यांना धृतराष्ट्र महाराजांचा संदेश कळविला."

धृतराष्ट्र मध्येच म्हणाला—"संजया! तू पांडवांना माझा संदेश कळविलास. परंतु त्याचे उत्तर म्हणून इतर कोणी काय सांगायला सांगितले ते आपण नंतर ऐकू.

या ...

संजय म्हणाला—"महाराज! अर्जुनाने सर्वा-समक्ष आपला संदेश सांगावा असे सांगून मला पाठविले आहे. तो म्हणाला—

"दुर्योधनादिकांनी अनेक पापे केली आहेत. त्यांनी त्या पापांबद्दल पश्चात्ताप न करतां युद्ध करण्याचे ठरविले तर त्यांना सव्याज त्या पापाची फळे चाखायला मिळ-तील. युधिष्ठिरदादाने आजवर स्वतःचा राग आवरून धरला आहे. परंतु जर का त्यांना राग आला तर त्यांच्या क्रोधाग्नीत सर्व कौरव भस्म होऊन जातील. एकटा भीम कौरव सैन्याचा चुराडा करण्यास समर्थ आहे. तेव्हां दुर्योधनाला पश्चात्ताप करून ही काही मिळणार नाही. नकुल, सहदेव, विराट, द्रुपद, उपपांडव, अभिमन्यू आणि मी जेव्हां कौर-वांशी युद्ध करण्यास शस्त्र धारण करू तेव्हां कौरवांची जी दुर्दशा होईल ती सांगायला माझी गरज नाही. मी सर्व थोर वडीलधाऱ्या मंडळींना नमस्कार करून मग हक्काचे राज्य मिळविण्यासाठी युद्ध करीन. पंचपांडव जिवंत आहेत तोंपर्यंत कौरवांना राज्य भोगायला कसे काय मिळेल? त्यांना आमचा पराभव करतां आला तर या जगातला धर्म कायमचा नष्ट झाला असेच म्हणावे लागेल. परंतु तसे होणार नाही. कर्णाबरोबर धृतराष्ट्राच्या सर्व मुलांचा वध मी एकट्याने करणार आहे."

... भीष्मपितामह दुर्योधनाला म्हणाले—

"दुर्योधना! तू कर्ण, दुःशासन आणि शकुनी यांच्या नादी लागून स्वतः बिघडत चालला आहेस आणि कौरव कुळाचा नाश करीत आहेस. कौरव-पांडवांचे युद्ध होता कामा नये. नाही तर सर्वनाश निश्चित आहे."

भीष्म म्हणाले ते ऐकून कर्ण त्यांच्यावर ओरडला आणि म्हणाला—"पितामह! तुम्ही माझ्या विषयी जे काही बोललात ते दुसरा कोणी बोलला असता तर त्याचे डोके त्याच्या धडावर टिकले नसते. मी सर्वदा क्षत्रियधर्माचे पालन केले आहे. मी कधी राजद्रोह केला नाही व करणार नाही. मी एकट्याने सर्व पांडवांना यमसदनी पाठवीन. सुरवातीपासूनच ते आपले शत्रू असतां आज त्यांच्याशी मैत्री आणि सख्य कसे काय होऊ शकेल? धृतराष्ट्र महाराज आणि दुर्योधन यांस जे इष्ट असेल तेच मी करणार!"

तेव्हां भीष्म पितामह धृतराष्ट्राला म्हणाले—"धृतराष्ट्रा! कर्णाची बडबड ऐक-ण्याची आपल्याला पुष्कळ संवय आहे. म्हणे, एकटा सर्व पांडवांचा वध करणार आहे हा! पांडव कोठे आणि हा कोठे? पांडवांचा अपमान करणे हेच एकध्येय याच्यासमोर आहे. गोग्रहणाच्या वेळी याचे शौर्य कोठे लयास गेले होते? आणि घोषयात्रेच्या वेळी गंधर्वांनी दुर्योधनाच्या मुसक्या बांधल्या तेव्हां हा कोठे



गेला होता? पांडवांनीच दुर्योधनाला नाही का सोडविले? कर्णाच्या नुसत्या वल्गनाच ऐकून घ्याव्या. कुंतीच्या नांवाने शून्य!"

द्रोणाचार्य म्हणाले—"भीष्माचार्य म्हणाले तेच करण्यात सर्वांचे हित आहे. अर्जुनाने संजयाला सांगून जे काही पाठविले आहे त्यात सत्य अधिक आहे. मी प्रथमपासूनच पांडवांशी सामोपचाराने वागावे असे सांगत आलो आहे."

भीष्माचार्य आणि द्रोणाचार्य जे म्हणाले त्यावर आपले मत देण्यापूर्वीच धृतराष्ट्राने संजयाला विचारले—"संजया! युधिष्ठिर काय म्हणाला रे?" संजयाने युधिष्ठि-राच्या मदतीला कोण कोण येत आहेत हे



सांगून शेवटी युधिष्ठिर युद्धाला तयार असल्याचे सांगितले.

परंतु धृतराष्ट्राला सर्वात जास्त भीती वाटत होती ती भीमाची. कारण त्याला वाटत होते की संजयाने युधिष्ठिराच्या मदतीला कोण कोण पराक्रमी राजे आले आहेत ते सर्व एक बाजूला उभे राहले तरी एकटा भीम त्यांच्याहून जास्त बलवान ठरेल. भीमाच्या बलपराक्रमाची कल्पना फक्त भीष्माचार्य, द्रोणाचार्य आणि कृपाचार्यांना आहे. हे तिघे नाइलाजास्तव कौरवांच्या बाजूने युद्धाला उभे राहतील हे त्याला माहीत असले तरी त्याला हेदेखील ठाऊक होते की त्यांच्या मनात पांडवांच्या विषयी

नाही. म्हणून धृतराष्ट्राला कौरवाचा सर्वनाश जवळ येऊन ठेपलेला स्पष्ट दिसत होता. अर्जुनाने कधी पराभव पाहिलेलाच नव्हता. त्याच्यासमोर कोण उभा राहणार? कर्णाच्या बळावर तरी किती विश्वास करायचा? द्रोणाचार्य वृद्ध झाले आहेत आणि अर्जुनाचे गुरुपण आहेत. म्हणून धृतराष्ट्र सर्व गोष्टींचा विचार करून म्हणाला–"युद्ध न करणेच सर्वांच्या हिताचे आहे. आणि युद्ध झालेच तर त्यात कौरवांचा नाश निश्चित आहे. तेव्हां सर्वांची संमती असेल तर शांतिस्थापनेसाठी प्रयत्न करण्यासारखा आहे."

तेव्हां संजय म्हणाला–" राजा! या सर्व गोंधळाच्या मुळाशी तूच आहेस. करुजांगल प्रदेश सोडून तुझ्या राज्यातला सर्व प्रदेश पांडवांनीच जिंकून तुझ्या राज्याला जोडला आहे. परंतु तो सर्व प्रदेश तू बळकावून बसला आहेस. एवढेच नव्हे तर, तो सर्वप्रदेश तुझाच आहे असे तू मानू लागला आहेस. पांडवांच्या बलपराक्रमाची कल्पना असणारे सर्व प्रमुख वीर पांडवांच्या बाजूला गेले आहेत. तुला दुर्योधनाला आवरणे शक्य नसेल तर अनर्थच होईल." ते सर्व ऐकून घेऊन दुर्योधन आपल्या वडिलांना म्हणाला–" पण तुम्ही असे भिता कां? आमचा पराभव होईल असे तुम्हांला कां वाटते? उलट आमचा जय होईल असे

विदुर काकांशिवाय सर्वांचा वध व्हावा असे कृष्णाला वाटते आहे. पांडवांना विजय नक्कीच होणार असेल तर ते भिकाऱ्यासारखे पांच गांवे कशाला मागायला आले आहेत? भीमाची भीती तुम्हांला असण्याचे कारण नाही. मी एका गदाप्रहाराने त्याचा वध करू शकेन. एकटे भीष्माचार्य पांडवांच्या सर्व सैन्याचा धुव्वा उडवून देतील. त्यांच्या मदतीला द्रोणाचार्य आणि अश्वत्थामा असल्यावर अर्जुनाचा वध करणे कठीण जाईल असे का वाटते तुम्हांला? कर्णाजवळ इंद्राने दिलेले दिव्य अस्त्र आहे. तो अर्जुनाचा वध करू शकणार नाही का? पांडवांच्या सैन्यात पांडव, धृष्टद्युम्न आणि सात्यकी हे खरे पराक्रमी वीर आहेत. त्यांच्या बरोबरीचे योद्धे आपल्या सैन्यात देखील आहेत."

त्यानंतर त्याने संजयाला विचारले–"संजय दादा! पांडवांची युद्धाची तयारी कशी काय आहे?" संजयाने कौरवांच्या कोण कोणत्या सैन्यांशी किंवा योद्धयांशी युद्ध करण्यास पांडवांकडे कशी तयारी झाली आहे, हे सविस्तर समजावून सांगितले.

ते ऐकून धृतराष्ट्र घाबरला व दुर्योधनाला म्हणाला–"बाळा! युद्धाचा विचार तू मनातून काढून टाक. सर्व तुला शाबासकी देतील. तुला सुखाने सर्व आयुष्य घालवायला अर्धे राज्य पुरे आहे. पांडवांना राज्याचा थोडा भाग देऊन टाक. अज्ञानाने सर्वनाशाला स्वतः बोलवू नकोस."





"मला कोणाचे काही ऐकायचे नाही. पांडवांना जिंकण्यासाठी मला कोणाच्या मदतीची गरज पण नाही. फक्त कर्ण आणि दु:शासन माझ्या बाजूला असले की पुरे. आम्ही तिघे पांडवांचा पराभव करू. मी सुईच्या टोंकावर राहील एवढी जमीन देखील द्यायला तयार नाही." दुर्योधन म्हणाला.

कर्ण दुर्योधनाचे समर्थन करून म्हणाला– "मी युद्धाची सर्व जबाबदारी स्वत:वर घ्यायला तयार आहे. कोणाच्या मदती- शिवाय मी पांडवांचा वध करून दाखवितो."

तो म्हणाला ते ऐकून भीष्माचार्यांना राग आला. ते म्हणाले– "तू निव्वळ मूर्खा- सारखा बोलतो आहेस. अर्जुनाचा पराक्रम आणि [illegible] माहीत असून तू असे बोलतोस हे तुला शोभत नाही."

कर्णाला अपमान वाटला. तो भीष्मा- चार्यांना म्हणाला– "तुमच्या म्हणण्याप्रमाणे कृष्ण पराक्रमी आहे हे मी मान्य करतो. परंतु तुम्ही माझे फक्त दोष दाखवून माझा अपमान करतां आहां, हे मला सहन होणार नाही. मी शस्त्रसंन्यास या क्षणापासून घेत आहे. तुम्ही युद्धभूमीवर असाल तोंपर्यंत मी रणांगणावर पाऊलदेखील टाकणार नाही. तुमच्या पाठी मागून माझा पराक्रम सर्व जगाला कळेल." असे सांगून कर्ण सभेतून रागाने उठून निघून गेला.

भीष्म त्याच्याकडे पाहून व्यंग करीत दुर्योधनाला म्हणाला– "पाहिलेस, एकट्याने शत्रूचा पराभव करणारे वीर शस्त्रत्याग करून निघाले आहेत आता यांच्या बोलण्यावर कोण विश्वास ठेवणार? जयद्रथ, बाह्लिक इत्यादी वीरांसमोर त्यांच्या या वल्गना चालू शकतात म्हणा! स्वत:ला ब्राह्मणपुत्र म्हणून सांगून परशुरामाकडून अस्त्रप्राप्ती करून घेतली याने. त्याने केवढे मोठे पाप केले ते?"

ते ऐकून दुर्योधन भीष्माचार्यांनाच उलट बोलू लागला. म्हणाला– "आजोबा! पांडव तरी आमच्याच सारखे मानव आहेत. ते काय देवलोकातून उतरले आहेत? त्यांच्या सारखेच युद्धविद्येचे ज्ञान आम्ही मिळविले आहे. त्यांचे व आमचे गुरु द्रोणाचार्य एकच.



तरमग पांडवांचाच जय होईल असे तरी तुम्हांला कां वाटते? मी या युद्धात कोणाच्या कृपेची अपेक्षा ठेवून उतरत नाही!"

दुर्योधनाची युद्धपिपासा वाढलेली पाहून विदुराने त्याला एक गोष्ट सांगितली. म्हणाला–"एक शिकाऱ्याने जाळे टाकले तेव्हां त्यात दोन पक्षी अडकले. परंतु ते म्याले नाहीत, जाळ्यासकट आकाशात उडू लागले. त्यांचा पाठलाग करीत शिकारी जमीनवरच पळू लागला. ते पाहून एक मुनी त्याला म्हणाले–"अरे वेड्या! आकाशात ते पक्षी उडत आहेत आणि त्यांना धरायला तू जमिनीवर पळतो आहेस. काय उपयोग?" शिकाऱ्याने त्याचे काय उत्तर दिले असेलसे वाटते तुला? म्हणाला–"मुनीश्वर! ते पक्षी आपसात भांडत नाहीततोंपर्यंत माझी धडपड फुकट आहे, हे मी मानतो. परंतु त्यांचे भांडण झाले की दोघां पक्षांसकट माझे जाळे मला परत मिळेल." आणि तेच झाले. दोघे पक्षी आपसात भांडू लागले आणि जाळ्यासकट जमिनीवर येऊन पडले. शिकाऱ्याने त्या दोघांना धरून आपले जाळे परत मिळाल्याच्या आनंदात घरी गेला."

ती गोष्ट सांगून विदुर दुर्योधनाला म्हणाला–"बाळा! राज्यासाठी आपल्याच बांधवांशी युद्ध केल्यास सर्वनाश होतो. म्हणून बांधवांना जोडून रहावे, तोडू नये. मी तुला अशीच आणखी एक गोष्ट सांगतो. आम्ही एकदां किरातांबरोबर गंधमादन पर्वतावर गेलो होतो. तेथे एका भयंकर दरीत एक मधमाशीचे पोळे होते. तेथले लोक सांगू लागले की त्या पोळ्यातला मध खाल्ल्याने वार्धक्य किंवा मरण येत नाही आणि आंधळ्यांना दिसू लागते. आमच्याबरोबर आलेले किरात त्या मधाच्या मोहाला बळी पडले आणि तो मिळविण्यासाठी त्या दरीत शिरले. परंतु त्या दरीत साप होते. सर्पदंश झाल्याने त्या सर्वांना तत्काळ मरण आले. ते मधाच्या मागे धांवताना तो मिळविण्यात किती धोका आहे याचा त्यांनी विचारसुद्धा केला नाही. पांडवांशी राज्यलोभाने युद्ध करणे असेच धोक्याचे आहे."





# शिव लीला

[ १ ]

मृकंडमहर्षी हे भृगुवंशीय होते. त्यांच्या पत्नीचे नाव मरुद्वती असे होते. विवाह झाल्यावर त्यांना बराच काळ अपत्य झाले नाही. म्हणून तीर्थयात्रा करीत दोघं पतिपत्नी केदारक्षेत्री आली.

एक दिवशी दोघं केदारेश्वराची पूजा करून ध्यानमग्न बसली असतां त्यांना आकाशवाणी ऐकू आली–"आतां तुम्ही आपल्या आश्रमात परत जा. तुम्हांला अपत्यप्राप्ती होईल!"

दोघं गृहस्थाश्रमाची सर्व कर्तव्ये पुरी करीत आकाशवाणी केव्हां खरी होते याची वाट पाहू लागली. काही काळ लोटल्यावर मरुद्वतीला एक सूर्यासारखा तेजस्वी मुलगा झाला. त्याच वेळी एक आकाशवाणी झाली–"हा मुलगा अल्पायू होईल. याला बारा वर्षांचे आयुष्य प्राप्त आहे!"

ती आकाशवाणी ऐकून दोघांचा आनंद लयास गेला. दुःखाने उदास होऊन दोघं बसून राहली. परंतु पुत्रसुख जितके दिवस नशीबी असेल तितके दिवस मिळेल, पुढे 'ईश्वरेच्छा' असे मनाचे समाधान करून घेऊन दोघं मुलाचे लाड पुरविण्यात स्वतःला विसरून गेली.

मृकंडने आपल्या मुलाचे नाव मार्कंडेय असे ठेवले. त्याचा उपनयन संस्कार यथावेळी झाला आणि त्याला गुरुगृही पाठविण्यात आले. अकरावे वर्ष लागले तेव्हांच सर्व वेदशास्त्रांचा अभ्यास संपवून मार्कंडेय घरी परत आला. ब्रह्मतेजाने तळपत असलेला त्याचा चेहरा पाहून आईबापांचे चित्त आनंदित झाले. परंतु त्यांच्या मानेवर उरलेले एक वर्ष तलवारीसारखे लटकत होते. मरुद्वती सारखी रडत बसून रहायची.

रंतु तिने मार्कंडेयाने कितीदां विचारले तरी आपल्या दु:खाचे कारण सांगितले नाही. शेवटी मृकंडने मनाचा धीर करून मार्कंडेयाला त्याचे आयुष्य एका वर्षाने संपणार असल्याचे सांगितले.

ते ऐकून मार्कंडेयाने विचार करून काय करायचे ते ठरविले आणि म्हणाला–"तुम्ही दोघे मला आशीर्वाद द्या. मी तपश्चर्येला जात आहे. शंकराला सांकडे घालून त्याच्या कृपेने मी मृत्युंजय होईन असे मला वाटते." असे सांगून त्याने आईवडिलांच्या पायांवर डोके ठेवले. दोघांनी त्याला पोटाशी धरले आणि "चिरंजीवी" होण्याचा आशीर्वाद दिला. त्याच वेळी नारद मुनी तेथे आले. मृकंडने त्यांची पादपूजा करून मुलाला यश[illegible] आशीर्वाद देण्यास विनंती केली. नारदाने मार्कंडेयाच्या दृढ निश्चयाची वाखाणणी करून त्याला आशीर्वाद दिला. म्हणाला–"बाळा मार्कंडेया! तू सरळ गौतमीच्या काठावर जा आणि पंचाक्षरी मंत्राचा जप करीत शंकराची आराधना कर. तुझा मनोरथ पूर्ण होईल."

मार्कंडेयाने गौतमी नदीकाठी जाऊन सैकतलिंगाची प्रतिष्ठा केली आणि म्हणाला–"हे चंद्रशेखरा! तुझ्याशिवाय माझे रक्षण कोण करणार? तुझ्या चरणी लीन झालेल्या भक्तावर यमाची वक्रदृष्टी पडणे शक्यच नाही."

तिकडे नारदमुनी त्रिलोकात संचार करीत यमलोकी गेले आणि यमाला म्हणाले–"मृत्यूवर जय मिळविण्याची प्रतीक्षा करून [illegible] आहे. आता तुझ्या बळाची परीक्षा आहे." असे सांगून नारदमुनी निघून गेले.

एक वर्ष संपत आले आणि मार्कंडेयाच्या आयुष्यातला शेवटचा दिवस उजाडला. यमाने आपले दूत पाठविले. परंतु यमदूत मार्कंडेयाच्या तेजामुळे जवळ जाऊंच शकले नाहीत. ते परतले तेव्हां यमाला स्वत: जावे लागले. तो आपला दंड आणि पाश घेऊन महिषवाहनावर बसून निघाला.

मार्कंडेय शिवलिंगाला आलिंगन करून व त्यावर मस्तक ठेवून ध्यान मग्न बसला होता. त्यावेळी यमाने आपला पाश त्याच्या शिवलिंगासह मार्कंडेयाच्या गळ्यात पडला. तेव्हां एकदम शंकर रुद्ररूपाने प्रगट झाला आणि त्याने आपला तिसरा डोळा उघडून यमावर त्रिशूलाचा नेम धरला. यम शंकराचे ते रुद्ररूप पाहून थरथर कांपू लागला आणि ओरडला–"हरहर शंभो, महादेव! त्राहि माम्!" आणि बेशुद्ध होऊन पडला.

शंकराने आपला अभयहस्त मार्कंडेयाच्या मस्तकावर ठेवला आणि त्याला आशीर्वाद देऊन म्हणाला–"वत्स! तू मृत्युंजय आहेस. कल्पकल्पांतरपर्यंत तू चिरंजीवी राहशील."

त्यानंतर देवांनी येऊन शंकराला हात जोडून विनंती केली की यमाचा उद्धार करावा, नाहीतर जन्म मृत्यूचे चक्र बंद पडेल. शंकराच्या अनुग्रहाने यम उठून बसला. शंकराला नमस्कार करून तो यमलोकी परत गेला.





त्याच वेळी आपल्या मुलाला भेटायला म्हणून मृकंड व मरुद्वती आले. शिवकृपेने मार्कंडेय चिरंजीव झाल्याचे कळल्यावर त्यांना परमानंद झाला. 'शिव लीला अगाध आहे' असे म्हणत दोघं आपल्या मुलाला घेऊन आपल्या आश्रमात परत आले.

त्यानंतर मार्कंडेय चिरकाल जीवित राहिला. त्याच्याहून जास्त दीर्घायु असे अनेक थोर पुरुष पूर्वी होऊन गेले होते.

इंद्रद्युम्न नामक राजाला फार मोठी कीर्ती मिळाली होती त्या कीर्तीच्या आधारे त्याला स्वर्गसुख प्राप्त झाले होते. परंतु त्याची कीर्ती संपली. त्यानंतर स्वर्गलोकातील निवासी त्याला म्हणाले–"भूलोकात कोणी तुझी आठवण देखील काढीत नाही. "आतां स्वर्गात तुला रहायला जागा नाही. तू भूलोकात परत जा."

इंद्रद्युम्न भूलोकीं परत आला आणि त्याचे नाव म्हणजे कीर्ती शेष आहे का चवकशी करीत फिरू लागला. तो मार्कंडेयाकडे आला. तेव्हां मार्कंडेय त्याला म्हणाला–

"हे [illegible] मोठा प्रावारकर्ण (घुबड) आहे, त्याला जाऊन विचार."

त्यानंतर दोघे प्रावारकर्णाकडे आले. तो म्हणाला–"तू कोण हे मला माहीत नाही, परंतु माझ्याहून मोठा नालीकजंघ आहे. चल त्याच्याकडे, त्याला विचारून पाहू या."

नालीकजंघला देखील इंद्रद्युम्न कोण हे माहीत नव्हते. परंतु तो त्याच्याहून वयाने मोठे आकूपार नांवाचे जे कासव होते त्याच्याकडे तिघांना बरोबर घेऊन निघाला.

आकूपारने इंद्रद्युम्नाला पाहतांच ओळखले व म्हणाला–"मी चांगला ओळखतो. तू कित्येकदां माझे रक्षण केले आहेस. मी ज्या सरोवरात राहतो ते कसे झाले ठाऊक आहे का तुला? तू अनेक यज्ञ करून गोदाने केलीस. त्या गाईंच्या खुरानी येथे एक सरोवर झाले."

तेव्हां देवदूत इंद्रद्युम्नाची कीर्ती अजून इहलोकांत शेष आहे हे स्वतः पाहून त्याला स्वर्गलोकी पुनरपि घेऊन गेले.



# १३३. "अल्बट्रास" पक्षी

दक्षिण अमेरिकेच्या दक्षिणेकडील टोकापासून सुमारे १२०० मैल पूर्वेकडे अॅटलांटिक समुद्राच्या अत्यंत थंड समुद्री प्रदेशात दक्षिण जॉर्जिया नांवाच्या बेटांच्या रांगेत अल्बट्रास नामक एक लहानसे बेट आहे. त्या बेटावर 'अल्बट्रास' नामक पक्षी राहतात. ते पक्षी पाण्याच्या आश्रयालाच वाढतात. ते फार मोठे पक्षी आहेत. त्यांनी पंख पसरले म्हणजे त्या पक्ष्यांची लांबी ११ फुटापर्यंत होते. वारा नसेल तर पक्ष्यांना उडता येत नाही आणि आकाशातून खाली उतरतांपण येत नाही. वारा सुद्धा सोसाटयाचा असतो. या चित्रात अल्बट्रास पक्ष्यांचा एक जोडा आहे.





# प्रामाणिकपणाचे फळ

एका शेतकऱ्याला चार मुली होत्या. एका मागून एक तिघां मोठ्या मुलींची लग्ने होऊन गेली. फक्त धाकट्या मुलीचे लग्न व्हायचे राहून गेले होते. मोठे तिघे जांवई घरजांवईच होते.

चवथ्या मुलीसाठी चांगले स्थळ शोधण्याची खटपट चालू असता तिने, घरच्या रामू नोकराशी ती लग्न करणार असल्याचे सांगितले. शेतकऱ्याला हा संबंध आवडला नाही. तरी त्याने तिचे लग्न रामू गड्याशी करून दिले आणि म्हणाला—"बाळ! तू शहाणी आहेस. रामू गड्याला मी इतर जांवयांबरोबर घरांत ठेवू शकणार नाही. तू त्याच्या बरोबर निराळा संसार थाट. मी हा संबंध मान्य केला. परंतु तुझ्या बहिणींशी किंवा तुझ्या मेहुण्यांशी भांडण होऊ नये यासाठी मला ही सूचना करावी लागली."

रामूला ती गोष्ट कळली. तो कोणाला काही सांगितल्याशिवाय एक दिवशी घर सोडून निघून गेला. त्याच्या बायकोचा किंवा त्याचा असा अपमान झालेला त्याला खपला नाही. चांगला नोकरी धंदा करून नंतर बरोबरीच्या नात्याने राहता यावे या हेतूने तो गेला होता.

दुसऱ्या दिवशी एका गावानजीकच्या जंगलात तो येऊन पोचला. जंगलाच्या मध्यभागी एका मैदानात गाई चरत होत्या. एका झाडाखाली एक म्हातारा हात पाय धुऊन खायला बसणार एवढ्यात एक गाय हंबरू लागलेली ऐकून तो तिकडे धावला. गाय व्यायला झाली होती. म्हातारा गाय बसली होती तेथेच थांबला. थोड्या वेळाने गाय व्यायली. तिचा पाडा फार सुंदर होता.

म्हातारा गाईकडे निघून गेल्याबरोबर त्याच्या झुणका भाकरीवर कावळ्याकुत्र्यांनी झडप मारली. परंतु रामूने त्यांना पळवून लावले. म्हातारा परत येईपर्यंत रामू तेथेच बसून राहिला.

म्हाताऱ्याने परत आल्यावर रामूला विचारले—"कोण रे तू? कोठून आलास? तू होतास म्हणून मला भाकर खायला मिळते आहे!"

"मी कोठे तरी काम मिळेल म्हणून फिरतो आहे. माझे स्वतःचे असे कोणते ही गांव नाही." रामू म्हणाला.

म्हाताऱ्याने रामूला खायला भाकरी दिली आणि म्हातारपणी सर्व काम त्याला का करावे लागले, हे सांगितले.



त्या म्हाताऱ्याकडे सुमारे शंभर गाई होत्या. त्याला मूलबाळ नव्हते. गुराखी व नोकर गाय हरवली म्हणून सांगून गाय विकून टाकीत. शेवटी म्हाताऱ्याने सर्व नोकर काढून टाकले आणि स्वतः गाई चरायला घेऊन जाऊ लागला. ते ऐकून रामू म्हणाला—"आपला माझ्यावर विश्वास असेल तर मी आपल्या गाई चरायला घेऊन जात जाईन. जो पगार द्याल त्यात मी भागवून घेईन."

म्हाताऱ्याने त्याला नोकर म्हणून ठेवून घेतले. रामू गाईंचे दूध काढी आणि ते विकून म्हाताऱ्याला त्याची किंमत आणून देई. त्या शिवाय गाईंना चरायला न्यायचे काम व शेणगोठा रामू करू लागला.

दोन आठवडे लोटले. म्हाताऱ्याने रामूच्या प्रामाणिकपणाची अनेक तऱ्हेने परीक्षा करून पाहिली. रामू इमानदार असल्याचे त्याला आढळून आले. म्हातारा एकदा त्याला म्हणाला—"रामू! चांगलीशी मुलगी पाहून तुझे लग्न करून द्यावे, म्हणतो."

तेव्हां रामू म्हणाला—"मालक! माझे लग्न झाले आहे!" आणि त्याने थोडक्यात घडलेली गोष्ट सांगितली.

म्हातारा म्हणाला—"तरमग माझ्याकडे काम करून तुला काय मिळणार? दोघांची पोटे कशी भरणार?"

रामू स्मित करून म्हणाला—"धनी! आपली लायकी असेल तेवढेच काम माणसाने करावे. भाग्यात असेल तेवढे पैसे मिळणारच! मी कळू लागले तेव्हां ही साधी कामेच करू लागलो व तीच मला येतात. घर सोडल्यापासून आपल्याच प्रेमाचा आधार मला मिळाला. म्हणून आपल्याला सुखी राखणे माझे कर्तव्य आहे."

रामू म्हणाला ते म्हाताऱ्याने मौनपणे सर्व ऐकून घेतले.

आणखी काही दिवस लोटले. एकदा म्हातारा रामूला म्हणाला—"आपण गोठ्यासाठी नवी झोपडी उभी करू या. आज रात्री मी खुणा करून ठेवतो तेथे तू खांब पुरण्यासाठी खड्डे खणून ठेव. उजाडल्यावर झोपडी बांधण्याचे काम करू."

पहाटे रामू म्हाताऱ्याने सांगितल्याप्रमाणे पहार घेऊन खड्डे खणू लागला. दोन खड्डे खणत असतां त्याला दोन्ही खड्ड्यांत दोन लहान सोन्याने भरलेले हंडे सापडले. रामूने ते घरात जपून नेऊन ठेवले आणि उजाडल्यावर म्हाताऱ्याला ते दाखविले. म्हातारा ते हंडे पाहून म्हणाला—"रामू! भाग्य देईल तुला, म्हणत होतास ना? भाग्यानेच तुला ते दिले आहेत. ते तुझे आहेत. तू ते घेऊन जा." म्हाताऱ्याने रामूच्या पोटांत शिरून त्याच्या मनातली गोष्ट ओळखण्यासाठी ते म्हटले होते.

"मालक! हे आपल्या जागेत पुरलेले धन आहे, आपले आहे. माझे भाग्य कसे होऊ शकेल?" रामू म्हणाला.

"बाळ! मी तसे नाही म्हणत! तूच माझ्या सर्व शेताचा, गाईगुरांचा आणि इस्टेटीचा होणारा मालक आहेस. मी तुलाच आपला वारस करून घेण्याचे ठरविले आहे. बायकोला घेऊन येथे येऊन रहा! मी तुला आपला मुलगा आणि तुझ्या बायकोला आपली सुनबाई मानून राहीन."

रामूने आनंदाने आपल्या सासऱ्याकडे जाऊन सर्व वृत्त सांगितले आणि बायकोला घेऊन आला.





# गरीबी-श्रीमंती

एका गावी दोन भाऊ रहात असत. मोठा भाऊ श्रीमंत होता तर धाकटा गरीब.

एक वर्षी पीक कापून झाले होते आणि धाकटा भाऊ आपल्या शेतात पाहरा देत होता. तो एका जागी बसून आपल्या गरीबीविषयी विचार करीत होता. तेव्हां पांढरे शुभ्र वस्त्र धारण करून एक स्त्री कोठून तरी तेथे आली आणि शेतातल्या लोंबी तोडून जाळू लागली.

ती बाई जवळ आल्यावर धाकट्या भावाने तिचा हात धरला आणि विचारले—"ताई! कोण तुम्ही आणि हे काय करतां आहां?"

ती म्हणाली—"मी तुझ्या मोठ्या भावाची भाग्यदेवी आहे. खाली पडलेल्या व फुसक्या लोंबी मी जाळून टाकते आहे, म्हणजे बाकीच्यातून दाणे चांगले येतील."

"अस्सं! तरमग माझी भाग्यदेवी कोठे आहे?" धाकट्या भावाने तिला विचारले.

"समोर डोंगर दिसत आहेत ना? त्याच्या पलीकडे!" असे सांगून ती निघून गेली. धाकट्या भावाने आपल्या भाग्यदेवीचा शोध काढण्याचे ठरविले आणि निघाला. प्रथम तो आपल्या झोपडीत गेला. त्याच्याजवळ जी थोडीफार चीजवस्तू होती ती घेऊन निघण्याची तयारी करू लागला.

इतक्यात चूलीच्या पाठीमागून दारिद्र्याची देवी आली आणि स्फुंदत रडत म्हणाली—"मला सोडून कोठे निघालास रे? मला सुद्धां बरोबर येऊ दे!"

धाकटा भाऊ म्हणाला—"मला पुष्कळ दूर जायचे आहे. तू अशक्त दिसते आहेस, कशी चालशील माझ्याबरोबर?" पण त्या स्त्रीने मुळीच ऐकले नाही.

शेवटी नाइलाजाने धाकटा भाऊ म्हणाला—"तुला चलायचेच असेल तर या बाटलीत बस. मी तुला घेऊन जातो."



दारिद्र्यदेवीने लघुरूप घेऊन त्या बाटलीत प्रवेश केला. धाकट्या भावाने बाटलीला बूच लावून टाकले आणि घरून निघाला. वाटेत त्याला दलदलीची जागा लागली. त्याने तेथल्या चिखलात त्या दारिद्र्यदेवीची बाटली पुरून टाकली आणि आपली सुटका करून घेऊन पुढे निघाला.

कित्येक दिवस प्रवास केल्यावर धाकटा भाऊ दक्षिणेकडील डोंगर ओलांडून एका मोठ्या शहरात पोचला. तेथल्या एका वृद्ध गृहस्थाने धाकट्या भावाला एक काम द्यायचा विचार केला. धाकट्या भावाने ते करण्याचे कबूल केले. तेव्हां तो वृद्ध गृहस्थ त्याला म्हणाला–"मला एक खंदक खणून दे. त्याचा मोबदला म्हणून मी तुला चांगली मजुरी देईन. खंदक खणतांना तुला जी काही मूल्यवान वस्तू मिळेल ती तुझी!"

ती अट धाकट्या भावाने कबूल केली आणि खंदक खणण्याचे काम करू लागला. एक तासभरच त्याने काम केले असेल, त्याला सोन्याचा अलोट सांठा सांपडला. म्हाताऱ्याने वचन दिल्याप्रमाणे ते सर्व सोने धाकट्या भावाला घेऊन जायला सांगितले. परंतु धाकट्या भावाने त्यातले फक्त अर्धे सोने स्वतःसाठी ठेवून घेतले आणि बाकी त्या वृद्ध माणसाला दिले.

धाकटा भाऊ खंदक खणण्याचे काम करीत राहला. शेवटी त्याला एका जागी एक झोपडीसारखे काही तरी लागले. त्या झोपडीत सोन्याची नाणी आणि हिरे व माणिक्यांच्या राशी होत्या. त्यांच्या बरोबर एक मोठी पेटी पण निघाली. त्या पेटीतून त्याला आवाज ऐकू आला–"लवकर उघडा पेटी आणि मला वांचवा!"

धाकट्या भावाने पेटी उघडून पाहिली. एक स्त्री पेटीतून बाहेर आली. ती देखील स्वच्छ पांढरे पातळ नेसलेली होती.

"कोण ग बाई तू?" धाकट्या भावाने तिला विचारले.

"मी तुझी भाग्यदेवी आहे. तू मला शोधीत होतास ना? आजपासून मी तुला सोडून कोठे जाणार नाही." ती स्त्री म्हणाली आणि अदृश्य झाली.

खंदकात जो धनाचा सांठा मिळाला तो धाकट्या भावाने आणि त्या वृद्ध माणसाने अर्धाअर्धा वांटून घेतला.

आता धाकटा भाऊ कोट्याधीश झाला. आपल्या गावी परत आल्यावर तो गोर-गरिबांना मदत करू लागला.

एकदा दोघां भावांची एका गल्लीत गांठ पडली. धाकटा भाऊ मोठ्या भावाला सकुटुंब आपल्या घरी बोलावून घेऊन गेला. त्याला त्याने त्याचे दिवस कसे पालटले हे सांगितले. नंतर त्याने मोठ्या भावाला आपल्या घरीच बरेच दिवस ठेवून घेतले. मोठा भाऊ जायला निघाला तेव्हां धाकट्या भावाने मोठ्या भावाला, त्याच्या बायकोला व मुलांना कित्येक मूल्यवान वस्तू देऊन निरोप दिला.

धाकट्या भावाचे भाग्य पालटलेले पाहून मोठ्या भावाचा मत्सराग्नी पेटला. त्याच्या घरी पुन्हां दारिद्र्यदेवीला आणून पोचते केले पाहिजे असे त्याने ठरविले. तो दारिद्र्यदेवीला ज्या जागी पुरून ठेवले होते तेथे आला आणि बराच वेळ शोध काढून त्याने ती बाटली बाहेर काढली आणि बाटलीचे बूच काढले.

तत्क्षण दारिद्र्यदेवी बाहेर आली आणि मोठ्या भावाला मिठी मारून म्हणाली–"तू किती उपकार करून माझा उद्धार केलास. आतां मी तुला कधी सोडणार नाही. आयुष्यभर मी तुझ्याबरोबर राहीन."

मोठ्या भावाने दारिद्र्यदेवीला पुन्हां चिखलात पुरून टाकण्याचा यत्न करून पाहिला. परंतु त्याला यश मिळाले नाही. वाटेत त्याला लुटेऱ्यांनी लुटले. त्याच्या धाकट्या भावाने त्याला प्रेमाची भेट म्हणून जे काही दिले होते ते देखील हळूहळू नाहीसे झाले. घरी येऊन पाहतो तर त्याचे घर धान्य आणि गवताची गंजी सर्वांला आग लागली होती. त्या वर्षी नदीला पूर आला आणि पुरात त्याचे सर्व शेत वाहून गेले. तो आपले सर्वस्व घालवून बसला.





# अमरवाणी

सिंह शिशु रपि निपतति मदमलिन कपोलभित्तिषु गजेषु,
प्रकृति रियम् सत्त्ववताम् न खलु वय स्तेजसाम् हेतुः ॥ १ ॥

[ सिंहाचा छावा (लहान असून ही) मदोन्मत्त हत्तीच्या गंडस्थलावर चढतो. सत्त्ववान तेजस्वी जो असतो लहान किंवा मोठे वय यांचा त्याच्या तेजस्वितेशी काही संबंध नसतो.]

रथस्यैकम् चक्रम्, भुजगनमिता स्सप्ततुरगा,
निरालंबो मार्गः चरणविकल स्सारथिरपि,
रवि र्यात्ये वांतम् प्रतिदिन मपारस्य, नभसः ;
क्रियासिद्धि स्सत्त्वे भवति महताम् नोपकरणे ॥ २ ॥

[सूर्याच्या रथाला एकच चाक आहे, सापांची दोरी (लगाम) त्याच्या सात घोड्यांना आहे, त्याचा रथ अधांती चालतो, त्याचा सारथी (अरुण) पंगु आहे, तरी सूर्याचा रथ अबाधितपणे चालू आहे. सत्त्ववान तेजस्वी लोकांना साधनांची गरजच काय ?

विजेतव्या लंका, चरणतरणीयो जलनिधिः,
विपक्षः पौलस्त्यो, रणभुवि सहायाश्च कपयः,
पदाति र्मर्त्योसौ सकलमवधी द्राक्षसकुलम् ;
क्रियासिद्धि स्सत्त्वे भवति महताम् नोपकरणे ॥ ३ ॥

[लंका जिंकायची आहे. पायी समुद्र ओलांडून जायचा आहे. रावणासारखा शत्रू आहे. मदतीला वानर आहेत. राम मर्त्य मनुष्यच (तर) आहे. तरी त्याने राक्षसांच्या (अफाट) सैन्याचा धुव्वा उडविला. सत्त्ववान थोर यशस्वितेसाठी पुरुषांना साधनांची गरज नसते.



# सूक्ष्म पर्वत

[९]

[खड्गवर्मा आणि जीवदत्त दोघांनी सिंहाला दुसऱ्या इमारतीत पळविले आणि पळून जाण्यासाठी वाट शोधू लागले. त्यांना एका खोलीत धान्याचे कोठार दिसले. त्याला त्यांनी आग लावली. त्याच वेळी बाजूच्या खोलीतून एक म्हातारा वाचविण्यासाठी ओरडत असल्याचा आवाज ऐकू आला. त्यांनी खोली उघडली. पुढे......]

खड्गवर्मा व जीवदत्तला पाहून म्हाताऱ्याने विचारले–"कोण रे तुम्ही ? त्या लबाड पुजारिणीचे शिष्य असालसे वाटत नाही ? कोणी असा, प्रथम मला वाचवा ! शेजारच्या खोलीत धान्याचे कोठार जळत आहे, वाटते ? मला कोंडून ठेवले होते त्या खोलीच्या भिंती तापल्या आहेत आणि त्यांच्या उष्णतेने माझे सर्वांग पोळून निघत आहे. लवकर करा."

"थोड्याच वेळाने छप्पर खाली येणार !" असे म्हणत जीवदत्त त्या म्हाताऱ्याजवळ गेला. त्या बिचाऱ्याला साखळदंडांनी बांधून ठेवलेले होते. जीवदत्तने आपल्या कुबडीने साखळदंड तोडून त्या म्हाताऱ्याला हात धरून बाहेर ओढून आणले.

म्हाताऱ्याने एकदा चारी बाजूला पाहिले आणि आनंदाने श्वास घेत म्हणाला– "आज किती वर्षांनी मी खुल्या हवेत श्वास



घेतो आहे! ती दुष्ट बाई अजून या पडक्या नगरावर राज्य करते आहे, वाटते? तुम्ही कोणी व इकडे कशासाठी आलां होतां? सर्व सांगा!"

"आम्ही कोणी असलो तरी त्या पुजारिणीचे शिष्य नाही, एवढे खास! आम्ही विध्य पर्वतावर एका कामासाठी जात होतो. वाटेत निरनिराळ्या लहान सहान अडचणींना तोंड देत असतां येथे येऊन पोंचलो. येथे आम्हांला कैद करून ठेवण्यात आले होते. तुझ्या बोलण्यावरून तूच येथला खरा आणि जुना पुजारी आहेस तर! तर मग तुला तिनेच या अंधार कोठडीत बंद करून ठेवले होते. होय ना? आमचा अंदाज खरा असावासा वाटतो, आम्हांला." जीवदत्तने त्याला विचारले.

"होय, तू म्हणालांस तसेच आहे. ती दुष्ट बाई वीस वर्षांपूर्वी मला या जंगलात सांपडली. एक असहाय, अनाथ मुलगी होती ती. मी तिला वांचविले, लहानाची मोठी केली, तिला आपली सर्व मंत्रविद्या शिकविली. परंतु तिने माझ्याविषयीं कृतज्ञतेचा एक शब्द ही न उच्चारितां, कृतघ्नपणाने दोन वर्षांपूर्वी मला या अंधार कोठडीत, वादळ सुटले असतां, पावसात, त्या काळोख्या रात्री..."

जीवदत्त त्या वृद्ध मांत्रिकाचे बोलणे चालू असतां मध्येच म्हणाला—"तुझी ही जीवनकहाणी ऐकायला आमच्या जवळ वेळ नाही. कारण आम्हांला तिच्या हातातून लवकर निसटून जंगलात जावयाचे आहे. आम्हांला कैद करण्यासाठी ती निघाली असेल. त्या आधी आम्हांला दृष्टीआड व्हायचे आहे. तुला येथेच रहावयाचे आहे का? की या पडक्या घराचे छप्पर डोक्यावर येऊन पडण्याच्या आत आम्हांला बाहेर जाण्याचा मार्ग दाखवून तुला स्वतःची सुटका करून घ्यावयाची आहे?"

"मी त्या दुष्ट स्त्रीची खोड मोडल्याशिवाय तिच्या देहाची कांडेकांडे करून कुत्र्यामांजरांना खायला घातल्याशिवाय येथून जाणार नाही. माझी जुनी शिष्यमंडळी मला या स्तितीत पाहून माझी बाजू घेतील, याची मला खात्री आहे. त्यांच्या मदतीने मी तिला कैद करून तिला तिच्या पापाची फळे चाखायला लावीन. तेव्हां माझा अंतरात्मा शांत होईल." म्हातारा मांत्रिक म्हणाला.

ते सर्व ऐकायला खड्गवर्माच्या मनाची तयारी नव्हती. म्हणाला—"जीवदत्त! चल आपण निघून जाऊ या. याचा प्रलाप ऐकण्यात आपला वेळ घालविणे बरोबर नाही. ती दोघं आपसांत डोकी फोडून घेतील! आपल्याला काय करायचे आहे त्यांच्यांशी?" असे म्हणत तो निघाला.

जीवदत्त त्याच्या बरोबर निघताना म्हातार्‍याला म्हणाला—"त्या दुष्ट पुजारिणीला ठार करून तिच्या देहाची कांडे करून ती कोल्ह्याकुत्र्यांना खायला घालण्यात तुझा हेतू काय? त्या पेक्षा एक भुकेला सिंह आहे, या पडक्या नगरात. त्याच्यासमोर टाक तिला. तुला पुण्य मिळेल आणि त्याचे पोट भरेल."

वृद्ध मांत्रिक उत्तर देऊं लागला तेवढ्यात त्या पडक्या घरामागून पुजारिणी, मांत्रिक, केसाळ भूत आणि चारपांच शिष्य तेथे येऊन धडकले. पुजारिणी वृद्ध मांत्रिक, खड्गवर्मा आणि जीवदत्त यांच्याकडे डोळ्यांनी आग



पाखडीत हातातले त्रिशूल उगारून गरजली—"असं! हा थेरडा अंधार कोठडीतून बाहेर पडला आहे तर? चोरासारखे आमच्या राजधानीत पाऊल टाकणारी तरुण मंडळी पण येथेच आहेत? तुमचा मृत्यू समोर उभा आहे! तुम्हां सर्वांचा बळी महाभूतासमोर मी देणार आहे!" असे म्हणत तिने एक पाऊल पुढे टाकले.

खड्गवर्मा लगेच चार पावले मागे गेला आणि चटदिशी धनुष्यावर बाण चढवून पुजारिणीला सावध करीत म्हणाला—"खबरदार! एक पाऊल देखील पुढे टाकलेस किंवा हालचाल केलीस तर माझा हा बाण तुझ्या कंठाला पार करून जाईल?"



ते ऐकून पुजारिणी जागच्या जागी थबकली. मांत्रिक आणि केसाळ भूत थोडे बाजूला सरकून उभे राहिले. क्षणभर गप्प राहिल्यावर पुजारिणीचा एक शिष्य आपला भाला हवेत रोखून म्हणाला–"महाशक्ति पुजारिणी! उशीर कां? या म्हाताऱ्याला आणि या दोघां घमेंडखोर तरुण मंडळींना आपल्या मंत्रबळाने भस्म कां करून टाकीत नाही?"

"नाही, इतक्यात या दोघांना असे ठार करून चालणार नाही! या तिघांना धरून महाभूताच्या चरणी बळी देणार आहे." असे म्हणत पुजारिणी बाजूला वळून मांत्रिकाला व केसाळ भूताला म्हणाली–"अरे, दगडासारखे उभे कां? पहिल्याने या दोघांना पकडा! मी या म्हाताऱ्याचा समाचार घेते!"

ते ऐकून खड्गवर्मा व जीवदत्त मोठ्याने हसले. जीवदत्त केसाळ भुताकडे एक पाऊल पुढे टाकीत म्हणाला–"अरे भुता! तू नर आहेस की मादी, मला माहीत नाही. आपल्या मालकिणीच्या हुकमाचे पालन न करतां ठोंब्यासारखा उभा कां आहेस?"

केसाळ भूत घाबरले होते. मांत्रिकाजवळ जाऊन म्हणाले–"गुरुवर्य! काय करू म्हणता? त्या दोघांना धरून कच्चे खाऊन टाकू?"

"अरे बेटा! असे करू नकोस! ते तर फार मोठे पाप होईल. पुजारिणी त्यांना जिवंत धरून नेऊन त्यांना महाभूताच्या चरणी बळी देणार आहे! अशी घाई करू नकोस!" मांत्रिक गुरूने केसाळ भूताला सांगितले.

मांत्रिक म्हणाला ते ऐकून पुजारिणीने डोळे वटारून आणि आपला त्रिशूल रोखून मांत्रिकाला मारण्यासाठी दोन पावले पुढे टाकली. लगेच खड्गवर्मा दरडावून म्हणाला–"खबरदार पुजारिणी! मी दिलेली धमकी विसरलीस वाटते? तू जागची हललीस तर माझा हा बाण तुझ्या कंठाच्या आरपार जाईल! तू जागची हलल्याशिवाय तुझे काय ते मंत्रबळ दाखव आणि आपल्या शत्रूंचा नाश कर. आम्ही तयार आहो!"

इतका वेळ हे सर्व पहात उभा असलेला म्हातारा मांत्रिक दरडावून म्हणाला–"ए गुरुद्रोहिणी! दाखव आपले मंत्रबळ! ते सर्व लयास गेले आहे! मी ते केव्हांच परत काढून घेतले आहे!"

"खोटे, खोटे! सपशेल खोटे! तुम्ही या थेरड्याची बडबड काय ऐकता? अरे शिष्यांनो! मी आपला त्रिशूल या थेरड्याच्या छातीत मारते पहा!" असे म्हणत पुजारिणी त्या म्हाताऱ्या मांत्रिकाकडे वळली. तिने दोन किंवा चार पावले सुद्धा टाकली नसतील, खड्गवर्माने "खबरदार!" म्हणत आपला बाण सोडला. तो तिच्या हाताला लागला आणि ती "ओय ओय!" करून ओरडली व तिच्या हातातले त्रिशूल खाली पडले.

पुजारिणीच्या हातातले त्रिशूल खाली पडल्याबरोबर तिच्या बरोबर आलेल्या शिष्यांपैकी दोघे ओरडले–"या महा पवित्र त्रिशूलाला जमिनीवर टाकून हिने ते अपवित्र केले आहे! या घटकेपासून आपले गुरु वृद्ध पुजारी! वृद्ध पुजारी की जय!"

"खड्गवर्मा! आपण वाट चुकून या मूर्खांच्या मध्ये येऊन पडलो आहो. या



पडक्या ओसाड नगरातच यांना राज्य करायला सोडून आपण निघून जाऊ या. हे लोक बाहेर आले तर शहाणे देखील यांच्या संसर्गदोषाने मूर्ख होतील." जीवदत्त म्हणाला.

आपल्या बाजूला पुजारिणीचे दोन शिष्य वळलेले पाहून म्हाताऱ्या मांत्रिकाला उत्साह चढला. तो म्हणाला–"हे महाभूता! तू किती दिवसांनी माझ्या शिष्यांना ज्ञानबोध केलास? यापुढे मी पहिल्या सारखा अनेकानेक प्राण्यांचा नित्य बळी देऊन तुझी पूजा करीत राहीन!"

"खड्गवर्मा! अरे हा थेरडा देखील पुजारिणीहून कमी क्रूर दिसत नाही!"



असे म्हणत जीवदत्त तेथे हजर असलेल्या सर्वांना उद्देशून म्हणाला—"तुमच्या या भाऊबंदकीत आम्हांला रुची नाही. तुमच्या-पैकी कोणी पुढे येऊन आम्हांला या नगराबाहेर जंगलात जायला वाट दाखवायला तयार असेल तर या."

"तुम्हांला पळून जायला वाट हवी आहे का? काय पण इच्छा! थांबा! मी तुम्हांला या त्रिशूलाने या नगरातूनच काय या जगातून कायमचे बाहेर जाण्याची वाट दाखविते. मी महाभूतासमोर नेऊन तुम्हांला टाकते." असे म्हणत पुजारिणी त्रिशूल हातात घेऊ लागली.

"एकदां घडा मिळाला तरी हिला ज्ञानोदय झालेला दिसत नाही!" म्हणत खड्गवर्माने धनुष्यावर आणखी एक बाण चढविला. परंतु जीवदत्तने मध्ये पडून त्याला थांबविले आणि म्हणाला—"खड्ग! ही किती दुष्ट असली तरी एक स्त्री आहे. दया कर तिच्यावर! स्त्री हत्येचे पाप कशाला लावून घेतोस? त्या म्हाताऱ्या पुजाऱ्याला आणि या दुष्ट पुजारिणीला आपसात मारामारी करू दे! आपल्याला काय करायचे आहे, यांच्या भांडणाशी?" असे म्हणत जीवदत्त आपली कुबडी उगारून केसाळ भूत आणि मांत्रिकाला दरडावून म्हणाला—"व्हा पुढे, जंगलांत जायची भुयाराची वाट दाखवा! उशीर होतो आहे, हूं:!"

मांत्रिकाने वृद्ध पुजारी व पुजारिणीला हात जोडून नमस्कार करीत विचारले—"माझ्या गुरुजनांनो! कोणता तरी शाप आहे मला. म्हणून माझी मंत्रशक्ती या वेळी निरुपयोगी झालेली दिसते आहे. मी या मानवांच्या आज्ञेप्रमाणे यांना बाहेर जाण्याची वाट दाखवू? की आपण दोघे आपल्या मंत्रबळाने माझे रक्षण करणार?"

वृद्धपुजारी आणि पुजारिणी परस्परांचा चेहरा पहात उभे राहले. खड्गवर्माने क्षणभर त्यांना त्या स्थितीत पाहिले आणि आपली तलवार उपसून मांत्रिकावर व केसाळ भूतावर रोखून म्हणाला—"आतां ही तोंडाची बडबड बंद करतां की नाही? व्हा पुढे आणि निमूटपणे आम्हांला भुयाराची वाट दाखवा! पुरे झाली थट्टा!"

तलवार पाहून केसाळ भूत व मांत्रिक थरथर कांपू लागले आणि असे म्हणत निघाले—"वीर हो! आम्हां गरिबांचा जीव घेऊ नका. चला, जंगलात जायला आम्ही तुम्हांला भुयाराची वाट दाखवितो."

चौघे निघून गेल्यावर वृद्ध पुजारी आणि पुजारिणी दोघांची त्यांच्या त्यांच्या अनुयायांच्या मदतीने मारामारी सुरू झाली. जीवदत्तने एकदा मागे वळून पाहिले आणि हसत म्हणाला—"खड्गवर्मा! हे दोघे महाभूताचा पुजारी होण्यासाठी आपसात मारामारी करीत आहेत. या मारामारीत दोघे ही मरणार आणि यांची शिष्यमंडळी पण ठार होणार."

"मरू दे, क्रूर दुष्टांना! या पडक्या नगरातल्या सिंहाला काही दिवस तरी पोटभर खायला मिळेल!" खड्गवर्मा म्हणाला.

ते ऐकून केसाळ भूत थरथर कांपत आपल्या गुरूला म्हणाला—"गुरुवर्य! तो सिंह वाटेत कोठे भेटलां तर?"

"त्यावर उडी मारून त्याला कच्चा खाऊन टाक! भितरा, पळपुटा! हो पुढे!"



खड्गवर्मा आपली तलवार दाखवीत म्हणाला.

"अरे शिष्या! असा भितोस कशाला? तो सिंह भेटलाच तर मी मंत्र टाकून त्याला मांजर करून टाकीन. समजले! आपण गुहेतून भुयाराच्या वाटेपर्यंत आलो. पहिल्याने तू पुढे हो." मांत्रिक म्हणाला.

त्या गुरुशिष्यांच्या पाठीमागून खड्गवर्मा आणि जीवदत्त त्या भुयाराच्या वाटेने पुढे निघाले. त्याच वाटेने ते त्या पडक्या ओसाड नगरात आले होते. थोड्या वेळाने जंगलात शिरायचे गुहेचे दार आले. त्यानंतर ते बाहेर चारी बाजूला. एकदा नजर फिरवून केसाळ भूताला आणि मांत्रि-

काला म्हणाले—" आतां परता तुम्ही आपल्या 'सुंदर' राजधानीस आणि भक्तिभावाने त्या महाभूताची आराधना करीत रहा!"

त्यानंतर मांत्रिक आणि केसाळ भूत दोघांनी खड्गवर्मा व जीवदत्तला आदरपूर्वक नमस्कार केला आणि म्हणाले—"वीर हो! आतां परत जाण्याची आमची इच्छा नाही. दूर ते डोंगर दिसत आहेत, त्या डोंगराळ प्रदेशात राहून आम्ही पुढील आयुष्य घालवू."

"पण, एक गोष्ट लक्षात ठेवा! लुटारूपणाचा धंदा करतां कामा नये! केलात तर कडक शिक्षा मिळेल. त्या डोंगरात पोंचण्यापूर्वी तुम्ही गेंडा जातीच्या नजरेस पडलात तर ते तुमची शिकार केल्याशिवाय राहणार नाहीत. संभाळा!" जीवदत्त म्हणाला.

मांत्रिक आणि केसाळ भूत निघून गेल्यावर खड्गवर्मा आणि जीवदत्त दोघांनी नदीत उतरून स्वच्छ आंघोळ करून घेतली. नंतर झाडावर चढून खाण्यासारखी जी फळे मिळाली ती तोडून खाल्ली आणि काही वेळ आराम करून नदीच्या प्रवाहाच्या दिशेने चालू लागले. त्यांना वाटू लागले की स्वर्णाचारीला धरून नेणारे लुटेरे वाटेत नक्कीच कोठे तरी भेटतील. स्वर्णाचारीचे रक्षण वाटेल ते करून केले पाहिजे असे त्यांनी मनाशी ठरविले.

दोघे सुमारे एक तास नदीच्या काठाकाठाने चालत राहिले. त्यांना वाटेत लहान मोठे उंचवटे लागले. ते पार करून गेल्यावर दूर डोंगरात त्यांना उंटावर मोठी शिळा ठेवून उंटांना ओढून नेत असलेले काही लोक दिसले.

"खड्गवर्मा! ते लुटेरेच दिसतात रे! वाळवंटात राहणाऱ्या या प्राण्यांकडून दगड धोंडे डोंगरातून दडवून नेणें किती धोक्याचे आहे, कदाचित या लोकांना माहीत देखील नसेल?" जीवदत्त म्हणाला.

जीवदत्ताचे बोलणे संपण्यापूर्वीच एक उंट त्याच्यावर बसून निघालेल्या एका स्वारासह डोंगराच्या उतरणीवर पाय घसरून तोंडघशी पडलाच.





# पितृधर्म

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही.

तो पुन्हा झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि मौनपणे स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा! तू या रात्रीच्या वेळी इतके कष्ट करीत आहेस ते स्वतःच्या स्वार्थासाठी की परोपकारासाठी, हे नाही कळले मला. कारण मनुष्याला स्वार्थ प्रेरित करतो की परमार्थ हे सांगणे केव्हां केव्हां कठीण असते. त्याचे उदाहरण म्हणून मी तुला एक गोष्ट सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

फार पूर्वी पार्वतीपती नावाचा एक थोर पंडित होता. पंडित विद्वानांच्या सभेत त्याच्या विद्वत्तेचा फार आदर होई. हे कळल्यावर त्या देशाच्या राजाने त्याला एक गांव आंदण म्हणून लिहून दिले.

## वेताळाच्या गोष्टी



पार्वतीपतीला धन, विद्या आणि प्रतिष्ठा सर्व भरपूर प्राप्त होते. परंतु अपत्य नव्हते. म्हणून तो नेहमी दुःखी असे. पुष्कळ व्रत व वैकल्ये केली आणि नवस केले तेव्हां कोठे त्याला एक मुलगा झाला. त्याचे नाव त्याने लहानपणीच रामशास्त्री असे ठेवले.

प्रत्येक आईबापाला आपला मुलगा गुणी विद्वान व्हावा असे वाटते. पार्वतीपतीला सुद्धा वाटे की त्याच्या मुलाने विद्वान होऊन कीर्ती मिळवावी. परंतु त्याची ती इच्छा पूर्ण होण्याची चिन्हे दिसत नव्हती. कारण मुलगा विद्याभ्यासात मागेच राहिला.

तसा रामशास्त्री स्वभावाने सुशील होता. आईवडिलांच्या आज्ञेबाहेर त्याने कधी कोणतेही काम केले नाही. परंतु त्याला देवाने बुद्धीमंद दिली होती. तो जो शिके विसरून जाई.

पार्वतीपतीला मुलाची ही स्थिती पाहून फार वाईट वाटे. मुलगा उडाणटप्पू असता तर त्याला त्याने मारून मुटकून शिकविले असते. परंतु रामशास्त्री नित्यनियमितपणे मन लावून अभ्यास करी आणि शिकलेले सर्व विसरून जाई. हळूहळू तो लहानाचा मोठा झाला.

एकदा पार्वतीपतीचा एक बालमित्र त्याला भेटायला आला. चंद्रभट्ट शेजारच्या राजदरबारचा पंडित होता. चंद्रभट्ट आला तेव्हां पार्वतीपती घरी नव्हता. म्हणून रामशास्त्रीलाच आपल्या वडिलांच्या मित्राचे आदरातिथ्य करावे लागले.

"काय रे तू पार्वतीपतीचा मुलगा आहेस ना?" चंद्रभट्टने विचारले व रामशास्त्री "हो!" म्हणाला.

परंतु मुलाशी बोलत असता मुलगा मोठा झाला तरी विद्याभ्यासात मागे असल्याचे चंद्रभट्टने ओळखले. थोड्या वेळाने पार्वतीपती घरी आला. कित्येक वर्षांनी दोघे मित्र भेटले होते. म्हणून परस्परांच्या घरची चवकशी झाली. चंद्रभट्ट म्हणाला—"पार्वतीपती! आता लवकरच मी सेवानिवृत्त व्हायचे ठरविले आहे. उतारवय झाले, कोणतेही जबाबदारीचे काम होत नाही."

"परंतु तुझ्या जागी कोणी योग्य पंडित महाराजांना कोठून मिळणार?" पार्वती-पतीने विचारले.

"माझ्याहून जास्त विद्वान पंडित हजर आहे, महाराजांच्या सेवेला. मग मी त्या पदाचा मोह दाखविण्याची गरज काय?" चंद्रभट्टने उत्तर म्हणून विचारले.

"तुझ्याहून योग्य पंडित? कोण आहे बुवा? दरबारात शास्त्रार्थ झाला की काय? आणि आतां पराभव झाला म्हणून तू डोक्यात राख घालून निघालास की काय?" पार्वतीपतीने विचारले.

"अरे तसे नाही. आपली गादी मुलाला दिली आहे. त्याची विद्वत्ता पाहून महाराज फार खूष झाले आणि महाराजांनी त्याला माझ्या जागेवर नेमायचे ठरविले आहे." चंद्रभट्ट म्हणाला.

परंतु ते उत्तर ऐकून पार्वतीपतीला आपल्या मुलाच्या विद्याहीनतेबद्दल मनात-ल्या मनात फार वाईट वाटले.

चंद्रभट्टने ते ओळखले व सहानुभूतीच्या स्वरात म्हणाला—"मला कळले आहे सर्व. परंतु तुला एवढे निराश होण्याचे कारण नाही. त्याच्या नशीबी असेल ते होईल!"



त्यादिवशी रात्री पार्वतीपती जेवायला बसला तेव्हां बायकोला चंद्रभट्टच्या मुलाला दरबारी पंडिताच्या पदावर महाराजांनी नेमल्याचे सांगून म्हणाला—"आणि आतां आपले हे रत्न! नसता जन्मला तर मूल झाले नाही एवढेच वाटले असते. आईबापांचे नाव न राखणारा मुलगा जन्मला नसता तर बरे झाले असते असे वाटू लागले आहे!"

रामशास्त्री ते सर्व दाराआडून ऐकत होता. त्याला फार वाईट वाटले. त्याच दिवशी रात्री तो पंडित झाल्याशिवाय पुन्हां घरी परत यायचे नाही असे मनाशी ठरवून पळून गेला.



रामशास्त्रीने सरस्वतीच्या कृपेविना विद्या येत नाही, हे ऐकले होते. म्हणून त्याने सरस्वतीची मनोभावे आराधना करून कित्येक वर्षे खडतर तपश्चर्या केली. शेवटी सरस्वती त्याची भक्ती पाहून प्रसन्न झाली व म्हणाली–"मुला! तुला पंडित व्हायचे आहे ना, ते पांडित्य तुला मिळेल आणि तुझा मुलगा मूर्ख निघेल. परंतु जर का मुलाच्या हितासाठी स्वतः तू मूर्ख व्हायला तयार झालास तर तुझा मुलगा विद्वान पंडित होईल. तुला दोन्हीपैकी काय पाहिजे, ते मागून घे!"

रामशास्त्री देवी म्हणाली ते ऐकून विचारात पडला. काय उत्तर द्यावे हे त्याला सुचेना. परंतु विचार करून म्हणाला–"माते! मला पंडितच व्हायचे आहे!" सरस्वती "तथास्तु" म्हणून अंतर्धान पावली.

सरस्वतीच्या कृपेने रामशास्त्री विद्वान झाला. षडशास्त्रे व षडदर्शन यात त्याचा हात धरणारा कोणी राहला नाही. घरी परत येत असता वाटेत ज्या ज्या राज्यात गेला तेथील दरबारी पंडितांना जिंकीत आला. आपला मुलगा एक विद्वान पंडित होऊन घरी परतलेला पाहून मातापित्याला परमानंद झाला. त्यांनी त्याचे लग्न एका कुलीन सुस्वरूप मुलीशी करून दिले. दोन वर्षांनी रामशास्त्रीला एक मुलगा झाला. मुलगा मोठा होत गेला तसतसे त्याचे गुण पाघळू लागले. देवी म्हणाली ते खरे होणार, असे रामशास्त्रीला वाटू लागले. कारण तो मुलगा मूर्ख निघाला. त्याच्यामुळे रामशास्त्रीला पदोपदी अपमान सहन करावा लागे. लोक 'पंडितपुत्र' म्हणून मुलाची थट्टा करीत ते ऐकून रामशास्त्रीला फारच वाईट वाटे. त्याने विचार केला, मुलाच्या मूर्खपणाला कारण दुसरा तिसरा कोणी नसून आपण स्वतःच आहो. कारण त्यानेच स्वतःसाठी सरस्वतीकडून पांडित्य मागून घेतले होते.

मुलाचा मूर्खपणा जास्त जास्त वाढत चाललेला पाहून रामशास्त्रीने पुन्हां सरस्वतीचे स्मरण केले आणि ती प्रसन्न झाल्यावर तिला म्हणाला–"माते! माझ्या मुलाने बरे व्हायला काही मार्ग असेल तर सांग!"

"तू आपले सर्व पुण्य-कार्य, पांडित्य आणि सत्शीलवृत्ती मुलासाठी सोडायला तयार झालास तर तुझ्या मुलाचे नक्कीच बरे होईल."

रामशास्त्रीने ते मान्य केले आणि त्याचा मुलगा थोड्याच दिवसात एक थोर पंडित म्हणून प्रसिद्ध झाला. त्याची कीर्ती जवळपासच्या राज्यांत पसरली. रामशास्त्री स्वतः मूर्ख, वेडा म्हणून ओळखला जाऊ लागला.

येथवर गोष्ट सांगून वेताळाने विचारले–"राजा! रामशास्त्रीचा हा त्याग म्हणावयाचा की स्वार्थ? त्याला आपला मुलगा पंडित विद्वान व्हावासा वाटत होते तर त्याने प्रथमच सरस्वतीजवळ मुलाला विद्वान करून देण्याचे मागणे कां मागून घेतले नाही? त्याने मुलगा महा मूर्ख निघणार असे माहीत असून ही स्वतःसाठी पांडित्य कां मागून घेतले? आणि शेवटी पुन्हां मूर्खपणा कां मागून घेतला? या प्रश्नाची उत्तरे माहीत असून तू दिली नाहीस तर तुला माहीतच आहे तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

त्याचे उत्तर देत विक्रमादित्य म्हणाला–"रामशास्त्रीने पुत्रधर्म पालन करण्यासाठी देवीकडून पांडित्य मागून घेतले आणि पितृधर्म साधण्यासाठी शेवटी पांडित्य मुलाला देऊन त्याचा मूर्खपणा देवीकडून मागून घेतला. ह्या गोष्टी वरवर विरोधी दिसल्या तरी त्याच्या स्वतःच्या व त्याच्या मुलाच्या हिताच्या ठरल्या. त्याने पुत्रधर्म व पितृधर्म दोन्हीचे पालन उत्तम प्रकारे केले."

अशातऱ्हेने राजाचे मानभंग होताच वेताळ प्रेतावरोबर अदृश्य झाला आणि पुन्हां झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)



# म्हशीची शिंगे

सुप्रसिद्ध परमानंद गुरु आपल्या दोघां शिष्यांना बरोबर घेऊन तीर्थयात्रेसे निघाले. वाटेत एका जंगलात त्यांना उतरावे लागले. सैपाकाला एक शिष्य लागला आणि दुसरा एका खेड्यात ताक आणायला गेला. त्याला एक झोपडी दिसली. झोपडीत म्हातारी रहात असे. शिष्याने म्हातारीला "थोडे ताक देतां का, आजी?" विचारले. म्हातारी "हो", म्हणाली. त्या शिष्याची नजर म्हातारीच्या एका लांब शिंगाच्या म्हशीवर पडली. त्याने तिला विचारले–"आजी! तुमच्या त्या म्हशीची शिंगे किती लांब आहेत? ती मेली तर या दारांतून बाहेर कशी नेणार?"

"मेल्या! माझी म्हैर मरणार का? चालता हो!" म्हातारी म्हणाली.

पहिला शिष्य रिकाम्या हाताने परत आलेला पाहून परमानंद गुरूने दुसऱ्या शिष्याला पाठविले. तो त्याच म्हातारीच्या घरी ताक मागायला गेला. म्हातारीने त्याच्या आधी आलेल्या शिष्याने म्हटले ते त्याला सांगितले. तेव्हां दुसरा शिष्य स्मित करून म्हणाला– "अहो आजी! तो अक्कलशून्य आहे हो! म्हैस मेली तर तिची शिंगे कापून सुद्धा तिला बाहेर काढावे लागणारच!" ते ऐकून म्हातारीने त्यालादेखील शिव्या देऊन हाकलून लावले.





# जानव्याचे वजन

एका गावी एक गरीब ब्राह्मण रहात असे. तो अशिक्षित होता. परंतु त्याला पैसे मिळविण्याचा मोह होता.

एक दिवशी तो ब्राह्मण दुसऱ्या गावी गेला. तेथे एका चौथऱ्यावर एक म्हातारा ब्राह्मण बसलेला होता. तो जानवी मोजून विकीत असे. तराजूच्या एका पारड्यात तो जानवे ठेवी व दुसऱ्या पारड्यात गिऱ्हाइकाला पैसे टाकायला सांगे. काही लोक तांब्याची नाणी टाकीत तर काही चांदीची टाकीत. परंतु त्या नाण्यांच्या वजनाशी आणि जानव्यांच्या वजनाशी परस्पर काहीच संबंध नसे. ते पाहून तरुण ब्राह्मण चकित झाला. काही वेळ तो ती गंमत पहात उभा राहला, पण राहवले नाही तेव्हां त्याने त्या म्हाताऱ्या ब्राह्मणाला विचारले–"काय हो! मी एक गरीब ब्राह्मण आहे, मला एक जानवे दान म्हणून देता का?"

म्हाताऱ्याने त्याला एक जानवे दिले. ते घेऊन तो गरीब ब्राह्मण त्या देशाच्या राजाकडे गेला आणि म्हणाला–"महाराज! माझ्याजवळ एक जानवे आहे. मला त्याच्या वजनाएवढे सोने दिलेत तर आपले फार उपकार होतील माझ्यावर.

राजाने होकार दिला. मंत्र्याने एक तराजू मागविला. एका पारड्यात जानवे व दुसऱ्यात सोने ठेवून वजन करून पाहिले. परंतु जानव्याचे पारडे खालीच राहले. मंत्र्याने आणखी थोडे सोने टाकले. तरी जानव्याचे पारडे खालचे खालीच. मंत्री थोडे थोडे सोने टाकीत गेला तरी जानव्याचे पारडे जागचे हालेना.

तेव्हां राजा व मंत्री परस्परांकडे चकित होऊन पाहू लागले. मंत्र्याला एक उपाय सुचला. तो ब्राह्मणाला म्हणाला–"हे पहा, जेवणाची वेळ झाली आहे. तेव्हां जेवून

घ्या. त्यानंतर बसू पुन्हां जानव्याचे वजन करायला. असे सांगून मंत्र्याने ब्राह्मणासमोरच त्याच्या जेवणासाठी पावभर तांदूळ आणून ते पारड्यात घातले. पावशेर तांदूळाचे वजन बरोबर जानव्याइतके असल्याचे आढळले. त्या तांदुळाचा भात शिजवून ब्राह्मणाला जेवायला वाढण्याची व्यवस्था झाली. ब्राह्मणाला पोटभर जेवायला मिळाले.

तेव्हां मंत्री राजाला ऐकू जाईल इतक्या हळू स्वरात म्हणाला–"महाराज! मला वाटले होते तसेच घडले. हा ब्राह्मण जानवे घेऊन आला आहे त्यात एक विशेष आहे. ब्राह्मणाच्या मनाचे समाधान झाले पाहिजे. पावशेर तांदुळाचा भात ब्राह्मणाला लागतो. म्हणून बरोबर पावशेर तांदूळ जानव्याच्या वजनाएवढे झाले. सोन्याने पोट भरणे शक्यच नव्हते. मनाचे समाधान व्हायला पोटभर अन्न हेच मुख्य असते. आपण किती सोने घातले असते तरी जानव्याचे वजन जास्तच राहले असते."

"हो, पण आपण जानव्याच्या वजनाचे सोने द्यायचे कबूल केले आहे ना?" राजाने विचारले.

"ते मी पाहून घेईन." मंत्री म्हणाला.

ब्राह्मण जेवणखाण आटोपून थोडा वेळ वामकुक्षी करून आला आणि म्हणाला–"मला जानव्याच्या वजना एवढे सोने देऊन निरोप द्या, महाराज!"

मंत्री म्हणाला–"तुम्हांला जानव्याच्या वजनाएवढे सोने दिले तर ते तुम्हांला घरी नेणे अशक्य होईल. वाटेत चोर भामटे लुबाडून घेऊन जातील. तुम्ही स्वतःच पाहिलेत, जानव्यांचे वजन पावशेर तांदळाएवढे आहे. दररोज राजवाड्यात येऊन जेवून जाणे तुम्हांला आवडेल की तुम्हांला तेवढे सोने हवे आहे? तुम्हीच ठरवा."

ब्राह्मणाने विचार केला, जानव्याचे वजन फार तर पाव शेर सोन्या एवढेच होणार. तो म्हणाला–"महाराज! मला दररोज पोटभर जेवायला मिळाले की माझे समाधान होईल!"





# हजरजबाब

एका राजाला एक मुलगी होती. ती फार गप्पिष्ट होती. राजाने असे जाहीर केले की जो कोणी तिला हजरजबाबीत जिंकील त्याच्याशी तिचे लग्न करून देण्यात येईल आणि अर्धे राज्य हुंडा म्हणून देण्यात येईल. निरनिराळ्या देशातले तरुणयुवक दूरदुरून आले. परंतु एकालाही राजकन्येस जिंकण्यात यश मिळाले नाही.

शेवटी राजा कंटाळला. त्याने राजकन्येच्या प्रश्नांची उत्तरे देऊन शकणाराचे कान तापलेल्या सळईने भाजून काढले जातील अशी अट घातली.

राजकुमारीच्या लग्नाची गोष्ट ऐकून तिघे भाऊ राजधानीला निघाले. वाटेत त्यांना एक मेलेली मैना दिसली. तिसऱ्या भावाने तिला उचलून घेतले आणि विचारले–"सांगा, मला काय सापडले?" दोघे भाऊ त्याला म्हणाले–"दे रे फेकून! काय करणार ही मेलेली मैना बरोबर नेऊन?"

"कदाचित काही तरी उपयोग होईल?" असे सांगून धाकट्या भावाने तिला बरोबर नेण्याचे ठरविले.

थोडे अंतर चालून गेल्यावर त्याला कसल्या तरी रेशांचे एक पुडके सापडले. आणखी पुढे गेल्यावर क्रमाने खापर, एडक्याची दोन शिंगे, लाकडी खुंटी आणि जुना बूट अशा वस्तू मिळाल्या. सर्व वस्तू तरी त्यांचा उपयोग होईल असा विचार करून त्याने ठेवून घेतल्या.

राजधानीत पोचल्यावर राजाने मोठ्या भावाला राजकन्येशी बोलायला बोलविले. तो म्हणाला–"आजचा दिवस किती छान आहे! हवा येथे कशी उबेची आहे नाही?"

"उबेचीच काय, चटका बसेल चांगला!" असे सांगून राजकन्येने शेकोटीकडे बोट

दाखविले. दोन सळया तापत ठेवलेल्या होत्या. त्या पाहून मोठ्या भावाची बोबडीच वळली. त्याच्या कानाला दोन चटके दिले गेले. दुसऱ्या भावाची पण तीच गत झाली.

तिसरा म्हणाला–"आजचा दिवस किती छान आहे? आज हवेत उष्मा नाही की थंडी नाही."

राजकुमारी शेकोटीकडे बोट दाखवून म्हणाली–"तेथे पहा, उष्माच नव्हे; चटका बसेल इतकी उष्णता आहे!"

"त्यात मैनेला छान भाजून काढता येईल!" तिसरा भाऊ म्हणाला.

"तिच्या अंगाच्या चिंधड्या होऊन जातील!" राजकन्या म्हणाली.

"या रेशांनी त्या बांधून किंवा शिवून ठेवता येतील." धाकटा म्हणाला.

"रेशा सैल होऊन जातील." राजकन्या म्हणाली.

"लाकडाची ही खुंटी पाचरासारखी आत घालून घट्ट करतां येईल." धाकटा म्हणाला.

"त्या पक्ष्याची चर्बी वाहू लागेल." राजकन्या म्हणाली.

"या खापरात ती धरून ठेवतां येईल." धाकटा म्हणाला.

"तू प्रत्येक गोष्टीचे काही तरी वांकडे उत्तर देतो आहेस!" राजकन्या म्हणाली.

"माझ्या उत्तरात वांकडेपणा याहून जास्त आहे का?" असे म्हणत धाकट्याने एडक्याचे शिंग दाखविले.

"हे नाही आम्ही पूर्वी कधी पाहिले!" राजकन्या म्हणाली.

"तसे आणखी एक आहे." असे म्हणत धाकट्याने दुसरे शिंग दाखविले.

"तू हारशील म्हणून मनात फार दबतो आहेस!" राजकन्या म्हणाली.

"मी नाही. या खाली जे येईल ते दबते." धाकट्याने जुना बूट दाखविला.

राजकुमारीने आपली हार मानली. राजाने तिचा विवाह धाकट्या भावाशी करून देऊन त्याला अर्धे राज्य दिले.





# चौर्य कला

फार प्राचीनकाळातली ही गोष्ट आहे. राजाच्या दरबारांत एक विद्वान पंडित रहात असे. तो षड्दर्शन व षड्शास्त्रांत पारंगत होता. एकदा दरबारात या गोष्टीवर बराच वादविवाद झाला की चौसष्ट कला एकाहून एक वरचढ आहेत. "परंतु त्या सर्वांत चौर्यकला ही कठीण आहे." असे तो पंडित म्हणाला.

ते ऐकून राजाला आश्चर्याबरोबर राग पण आला. तो म्हणाला–"ती हो कशी? कारण जो मूर्ख असतो आणि ज्याला दुसरी एक ही कला येत नाही तोच चोरी करतो. चोरी करण्यात तशी मोठी कला आहे, असे आम्हांला नाही वाटत."

पंडित म्हणाला–"या गोष्टीबद्दल वादविवाद करण्यापेक्षा प्रत्यक्ष अनुभव घेऊन पहावा, अशी माझी सूचना आहे. मोठ्या मूल्यवान वस्तूच नव्हे तर सामान्य वस्तूंची चोरी करणेदेखील कष्टसाध्य असते. पाहिजे तर आपण स्वतः अनुभव घेऊन पहावा." राजाने ती गोष्ट मान्य केली.

महाराज आपण राजसी थाटात गेल्यास श्रीमंत मनुष्य वाटेल ती वस्तू मागितल्या बरोबर देईल. चोरी करण्याची गरजच राहणार नाही. म्हणून एक सामान्य चोरासारखा पोशाख करूनच जाऊन कितपत यश येते, हे पाहिले पाहिजे. कोणाला कळल्याशिवाय, किंबहुना शिपायांची सुद्धा नजर चुकवून चोरी करतां आली तरच ती खरी चोरी. म्हणून आपण सामान्य वेषातच जाण्याची कृपा करावी." पंडिताने सुचविले.

महाराजांना ती गोष्ट पटली. त्यांनी तोंडाला कोळशाची पूड चोळून मळकट घाणेरडे कपडे घातले आणि चोरी करायला निघाले.

महाराज प्रथम श्रीमंतांच्या वस्तीत गेले. परंतु त्यांना एकाही घरात शिरणे शक्य झाले नाही. घराच्या चारी बाजूला मोठ-मोठ्या किल्लेवजा तट होता आणि दिंडी दरवाज्यावर सशस्त्र पाहरेकरी उभे होते. महाराजांनी विचार केला की अशा घरात आतां प्रवेश मिळणे अशक्य.

त्यानंतर राजाने विचार केला केला की पंडिताने मोठ्या घरातच चोरी केली पाहिजे असे काही सांगितले नव्हते. तेव्हां गरिबाच्या घरी चोरी केली तरी काय हरकत आहे? म्हणून राजा गरीबांच्या वस्तीकडे वळला. तो कुंभारवाड्यांत आला. सर्व झोपड्यांची दारे आंतून बंद होती. परंतु एका झोपडी समोर मडकी एकावर एक रचून ठेवलेली होती. राजाने एक मडके चोरून न्यायचे ठरविले.

राजाला अगदी वरचे मडके लहान वाटले; म्हणून त्याने मधलेच एक बेताचे मोठे मडके काढण्याचा प्रयत्न केला. परंतु वरची मडकी अलगद काढून ठेवण्या ऐवजी त्याने एका हाताने वरची मडकी उचलून मधले मडके काढण्याचा प्रयत्न केला. परंतु ती मडकी घसरून त्याच्या अंगावर पडली. राजा खाली पडला व मडकी त्याच्यावर पडली. मडकी पडल्याचा आवाज ऐकून कुंभार जागा झाला आणि "चोर, चोर" म्हणून ओरडला. वस्तीतले सर्व लोक जागे झाले. कोणी राजाला ओळखले नाही. म्हणून राजाला त्यांनी खूप बडविले आणि शिव्या दिल्या–"लुच्चा, चोर कुठला! मडकी चोरायला आला होता. एका मडक्यासाठी इतकी मडकी फोडलीस! थांब तुला राजाकडून चांगला चोप देववितो."

राजा माफी मागून कसातरी जीव वाचवून राजवाड्यात परत आला. दुसऱ्या दिवशी दरबारी पंडिताला बोलावून राजा म्हणाला–"तुम्ही म्हणालात ते खरे आहे. प्रत्यक्ष अनुभवाने मला कळले की चोरी सुद्धां एक कलाच आहे आणि ती सुद्धां कष्टसाध्यच आहे!"





# उडणारा घोडा

[ २ ]

तिकडे शाहजादा कमाल लाकडी घोड्यावर उडत आकाशात दूर जात होता. त्याला आपण कोठे जातो आहो, हे देखील कळत नव्हते. आपण सूर्यावर की चंद्रावर जातो आहो असे त्याला वाटले. आपण धोक्यात सांपडलो. आपण घाईत उतरायचे कसे हे त्या कारागिराला विचारले नाही. कदाचित त्या थेरड्याने आपल्याला ठार करण्यासाठीच हे केले असावे. आपल्यामुळे त्याच्या लग्नात विघ्न आले असे त्याला वाटले असावे. आकाशात वर न्यायला जसे एक बटण आहे, तसे जमीनीवर उतरवायला सुद्धा कोठे तरी नक्कीच बटण असले पाहिजे. असा विचार करून, त्याचा जेथेजेथे हात पोचत होता तेथे त्याने चाचपून पाहिले. खोगिराखाली एका जागी एक बटण त्याच्या हाताला लागले.

त्याने ते बटण दावल्याबरोबर घोडा खाली उतरू लागला. त्याचा वेग कमी झाला आणि घोड्या वेळाने कोणत्याही प्रकारचा जिवाला धोका न होता घोडा खाली जमिनीवर उतरला. शाहजाद्याच्या जिवात जीव आला.

आता शाहजाद्याला जीव वांचल्याबद्दलच नव्हे तर घोड्याचे सर्व गुपित कळल्याबद्दल आनंद वाटला. त्याने बराच वेळ घोड्यावर बसून वर उडण्याची व उतरण्याची आणि हळू व वेगाने त्याला उडवायची संवय करून घेतली. घोड्याला कसे वळवायचे हे देखील शिकून घेतले. आतां त्या यंत्राच्या घोड्याचे सर्व गुपित त्याला कळले होते. त्याला परमानंद झाला.

तो पुन्हां घोड्यावर बसला आणि नवीन देश व प्रदेश पहात निसर्गाचा



आनंद घेत आकाशात बराच वेळ गमती-खातर उडत राहला.

काही वेळाने त्याला एक सुंदर शहर दिसले. त्या शहरात उतरण्याचे त्याने ठरविले. त्या शहरात मोठमोठ्या सुंदर इमारती होत्या आणि शहराच्या चारी-बाजूला गालिच्यासारखे हिरवेगार सुंदर गवत असलेली मैदाने दिसली. कित्येक ओढे वहात होते. सर्व दृश्य कसे मोहक होते. शाहजाद्याला ते शहर पाहण्याचा मोह आवरेना. त्याने शहरावर बराच वेळ घिरट्या घातल्या. मधून मधून एकादे सुंदर दृश्य पाहण्यासाठी त्याने घोडा आकाशातच अधांत्री थांबविला.

सूर्यास्ताची वेळ होत आलेली पाहून त्याने त्या शहरात उतरण्याचे ठरविले. ती रात्रभर त्या शहरात राहावे आणि दुसऱ्या दिवशी स्वदेशी परतावे असा विचार करून तो खाली उतरू लागला. उतरण्यासाठी शहराच्या मध्यभागी त्याने सोयीची एक उंच इमारत निवडली. त्या इमारतीच्या चारी बाजूला तट होता व तटाला सुंदर बुरूज पण होते. चाळीस एक सशस्त्र निग्रो पाहरेदार तटाच्या मुख्य दारावर पाहरा देत होते.

हळूहळू काळोख पडू लागला. कोणाला कळू दिल्याशिवाय त्या महालाच्या गच्ची-वर उतरायचे आणि सर्व लोक शांतपणे झोपेपर्यंत तेथेच बसून रहायचे त्याने ठरविले. त्याला भूक लागली होती व तहान पण खूप लागली होती. कारण, घरून निघण्यापूर्वी घाईत खाणेपिणे झाले नव्हते. त्याने विचार केला इतक्या मोठ्या महालात त्याला खायला प्यायला नक्कीच मिळेल. तो घोड्याला तेथेच गच्चीवर ठेवून जिना उतरून खाली जाऊ लागला. त्याला महा-लाच्या चारी बाजूला अंगणात संगमरमर दगडाची फरशी दिसली. तो महाल फारच सुंदर होता. परंतु चिटपाखरू ही दिसले नाही. सगळीकडे शुकशुकाट होता. म्हणून त्याने वर गच्चीवर जाऊन आपल्या

उडणाऱ्या घोड्याच्या बाजूला झोपून राह-ण्याचा एक विचार त्याच्या मनात आला. सकाळी उठून घरी निघून गेले की झाले, असे त्याला वाटले.

असा विचार करून कमाल गच्चीवर जाण्यासाठी जिना चढू लागला. त्याच वेळी त्या महालात त्याला दूर एका जागी दिव्याचा उजेड दिसला. तो पुन्हां मागे वळला आणि जिना उतरून उजेडाच्या दिशेने चालू लागला. तो मशालीचा उजेड होता. मशालीच्या बाजूला एक निग्रो खुजा शिपाई घोरत पडला होता. दिसायला भुतासारखा होता तो. तो अंत:पुरात जाण्याच्या दारा-समोर आडवा झोपला होता. मशालीच्या उजेडात त्याच्या तलवारीची मूठ चकचकत होती. त्याच्या खाण्याची पिशवी दूर एका बाजूला जमिनीवर पडलेली होती.

त्या भयंकर माणसाला पाहून कमालने एकदा देवाचे नाव घेतले आणि पिशवी दूर नेऊन त्याला खायला जे काही मिळाले ते बकाबका खाऊन टाकले. एका जागी प्यायचे पाणी वहात होते, त्याने पाणी पिऊन घेतले. त्याने पुन्हां रिकामी पिशवी होती त्या जागी तशीच ठेवून दिली आणि पाहरेदाराच्या म्यानेतली तलवार हळूच काढून घेऊन फार सावधगिरीने महालात पाऊल टाकले. एका दारावर मखमलीचा पडदा टाकलेला होता. तो पडदा बाजूला सारून कमाल दुसऱ्याच एका खोलीत शिरला. त्या खोलीत हस्तीदंती पलंगावर



सुंदर नक्षी केलेली होती. त्यावर हिरे व माणिक्ये जडलेली होती. त्या पलंगाजवळ जाऊन कमालने पाहिले. एक अत्यंत रूपवती तरुण स्त्री झोपलेली होती. पलंगाच्या चारी बाजूला जमिनीवर गुलाम बायका झोपलेल्या होत्या.

त्या पलंगावर झोपलेल्या तरुण स्त्रीचे रूप पाहून कमाल देहभान विसरला. परिणामाचा विचार केल्याशिवाय त्याने पलंगाच्या अगदी जवळ जाऊन धाडसपणाने त्या स्त्रीचा उजव्या गालाचा मुका घेतला.

झाले, ती स्त्री दचकून जागी झाली. तिला समोर एक तरुण पुरुष उभा असलेला दिसला. तिने विचारले–"कोण तू? कोठून आलास?"

"सुंदरी! मी तुझा गुलाम-दास-आहे. तुझे अपरूप सौंदर्य या डोळ्यांनी पाहून मी स्वत:ला आवरू शकलो नाही." कमाल म्हणाला.

"तुला येथे कोणी पाठविले?" त्या स्त्रीने विचारले.

"अल्लाने पाठविले, माझ्या दैवाने पाठविले!" कमाल म्हणाला.

ते उत्तर ऐकून ती मुळीच घाबरली नाही. ती एक राजकन्या होती. तिचे नाव शाहजादी शम्स उल नहर होते. म्हणाली–"तूच नाहीं का काल माझ्याशी विवाह करण्याच्या हेतूने आला होतास? परंतु तो तर एक अवतारच होता, गोरिला माकडाच्या जातीचा. माझ्या बाबांनी त्याला साफ नकार दिला होता. पण तू तर निराळाच दिसतो आहेस-स्वर्गातून उतरलेल्या देवासारखा सुंदर! तुला पाहून मला..." असे म्हणत ती शाहजादी पलंगावरून उठली आणि सहज निर्भयपणे कमालच्या खांद्यावर डोके ठेवून त्याला बिलगून उभी राहिली.

त्याच वेळी गुलाम दासींच्या झोपा मोडल्या. "शाहजादी! कोण हे?" त्यांनी विचारले.

"माझी झोप मोडली तेव्हां समोर उभा होता हा स्वर्गातून उतरलेला पुरुष-कदाचित माझ्याशी लग्नाच्या हेतूने काल आलेला राजकुमार असावा." राजकुमारी म्हणाली.

तेव्हां सर्व गुलाम दासी म्हणाल्या–"नाही हो, हे कोणी दुसरेच दिसत आहेत. हे तर कामदेवाचे अवतारच वाटतात. काल आला होता तो तर तुमचा गुलाम होण्यालायक सुद्धा नव्हता."

त्यानंतर दासी घोरत पडलेल्या खुजा पाहरेकऱ्याला जागे करून रागावल्या–"शाहजादी झोपलेल्या असतां एक परपुरुष अंत:पुरात कसा येऊ शकला?"

खुजा निग्रो पाहरेदार घाबरून उठला आणि म्यानेतून तलवार काढण्यासाठी त्याचा उजवा हात मुठीकडे गेला. परंतु म्यानेत तलवारच नव्हती. तो शाहजादीच्या खोलीत आला व कमालला पाहून थरथर कापू लागला. कांपऱ्या आवाजात म्हणाला–"आपण कोण? बोला मनुष्य की राक्षस?"





कमालने तलवार दाखवून विचारले– "मूर्खा! तुझे एवढे धाडस? एक शाहजाद्याला पाहून राक्षस म्हणतोस? मी सुलतानाचा जांवई आहे. शाहजादीशी माझा विवाह झाला आहे. म्हणून मला अंतःपुरात प्रवेश आहे."

"शाहजादा! माफ करा, कान धरतो!" असे म्हणत सुलतानाकडे धावत पळत गेला आणि पाय धरून माफी मागीत म्हणाला– "जहांपनाह! धावा, शाहजादीचे रक्षण करावे. कोणीतरी सैतान राक्षस अंतःपुरात शाहजादाचे सोंग करून शिरला आहे!"

सुलतानाला राग आला. त्या पाहरेदाराचे डोके तत्क्षण उडवावे असे त्याला वाटले. म्हणाला–"मूर्खा! तो सैतान आत शिरला तेव्हां तू काय करीत होतास? घोरत पडला होतास?" त्यानंतर सुलतान धावत पळत शाहजादीच्या महालाकडे गेला.

गुलाम दासी महालाच्या दारावर थरथर कापत उभ्या होत्या. सुलतानाने त्यांना विचारले–"शाहजादी कोठे आहे, काय करते आहे?"

"मालक! आम्ही झोपलो होतो. काय झाले आम्हांला कळले नाही. आमची झोप मोडली तेव्हां एक सुंदर तरुण पुरुष शाहजादीजवळ बोलत असलेला आम्हांला दिसला. इतक्या सुंदर पुरुषाला आम्ही आयुष्यभरात कधी पाहिले नाही. आम्ही विचारल्यावर ते म्हणाले, आपणच दोघांचा विवाह करून दिला आहे. ते कोण आहेत, आम्हांला माहीत नाही. परंतु दिसायला व वागायला ते सज्जन दिसले."

ते ऐकून सुलतानाच्या मनातली शंका थोडी कमी झाली. त्याने पडदा बाजूला सारून आत डोकावून पाहिले, एक तरुण शाहजादीशी बोलत उभा असलेला दिसला.

आपली मुलगी अशी वागावी हे सुलतानाला मुळीच आवडले नाही. त्याला भयंकर राग आला. तलवार उपसून तो पुढे गेला कमालला शाहजादीकडून तो सुलतान असल्याचे कळले. तेव्हां तो सुद्धा तलवार उपसून द्वंद्वयुद्धाला तयार झाला. सुलतान जागच्या जागी थबकला. कमाल पुढे येत असलेला पाहून सुलतानाने तलवार म्यानेत ठेवली आणि विचारले–"कोण रे तू? मनुष्य आहेस की राक्षस की सैतान?"

तेव्हां कमाल थोडयाशा कडक शब्दात म्हणाला–"आपण माझ्या बरोबरीचे आहां असे मानून आणि आपली मुलगी कुलीन घराण्यातली आहे हे ओळखून मी आपणांवर वार करीत नाही. नाहीतर इराण देशाचा शाहजादा असला अपमान कधीच सहन करणार नाही. मी एका क्षणार्धात तुम्हांला परलोकात पोचते केले असते. लक्षात ठेवा!"

ते ऐकून सुलतानाला दहशत बसल्यासारखे झाले आणि मुलीला एक चांगला वर चालून आल्याबद्दल आनंद पण वाटला. नंतर स्वतःला थोडे सावरून सुलतान म्हणाला–"तू शाहजादा आहे म्हणतोस तर आम्ही बोलाविल्याशिवाय किंवा आम्हांला आगाऊ सूचना दिल्याशिवाय तू सरळ अंतःपुरात कसा काय शिरलास? तू माझ्या मुलीला माझ्या नकळत भेटून आमच्या कुळाला कलंकित केलेस! कित्येक राजकुमारांनी माझ्या मुलीशी लग्न करण्याची इच्छा प्रगट केली होती. परंतु



मी नकार दिला होता. मग तू, मी तिच्याशी तुझा विवाह करून दिला असे खोटे कां बोललास? मी माझ्या नोकरांकरवी तुझ्या शरीराची खांडे खांडे करून टाकली तर माझा हात धरणारा येथे कोण आहे, सांग!"

"तुमच्या या भोळसटपणाकडे पाहून मला आश्चर्याबरोबर हसू येते आहे. तुमच्या मुलीला माझ्याहून जास्त योग्य वर मिळेल असे का वाटते, आहे तुम्हांला? माझ्याहून जास्त साहसी आणि श्रीमंत माणसाला तुम्ही आयुष्यभरात कोठे पाहिले आहे का?" कमालने विचारले.

"तू म्हणतोस त्यात सत्याचा थोडा अंश असू शकेल. परंतु माझ्या मुलीशी

लग्न करावयाचेच असेल तर काजी आणि साक्षीदारांसमोर करावे लागेल. आमच्या चालीरीतीप्रमाणे हा विवाह झाला नाही तर आमच्या कुळाला कलंक लागेल." सुलतान म्हणाला.

"आपण म्हणालात ते बरोबर झाले. परंतु थोड्या वेळापूर्वी तुम्ही आपल्या शिपायांना बोलावणार होतां. त्यांना बोलाविले असते तर कलंक लागला नसता का? म्हणून मी सांगतो ते करण्या व्यतिरिक्त दुसरा मार्ग तुम्हांला राहलेला नाही, हे लक्षात असू द्या." कमाल म्हणाला.

"बोल, तुझे काय म्हणणे आहे?" सुलतानाने विचारले.

कमाल म्हणाला—"तुम्हांला दोनच गोष्टी शक्य आहेत. एकतर माझ्याशी द्वंद्वाला उभे रहा. परंतु त्यात तुम्ही हारलात तर तुम्हांला आपले सर्व राज्य मला द्यावे लागेल. नाही तर मला आजची रात्र राजकुमारीच्या महालात काढायला मनाई असता कामा नये. उजाडल्यावर आपण आपली सर्व फौज मला धरून न्यायला पाठवा."

"माझ्या पदरी चाळीस हजारांचे सैन्य आहे. त्याशिवाय माझे गुलाम आणि गुलामांचे गुलाम मिळून आणखी चाळीस हजार आहेत. ऐशी हजार सैनिकांशी युद्ध करण्यास तुझ्याजवळ फौज कोठे आहे?"

"ठीक, उजाडण्यापूर्वी आपण सैन्य मला धरून नेण्यासाठी उभे करावे आणि सैन्याला सांगावे की मी शाहजादीशी लग्न करणार आहे. त्यासाठी मी एकटा त्या सर्वांशी युद्धाला उभा राहीन. परंतु त्यांनी मला ठार केले तर आपले गुपित जगजाहीर होईल. आणि मी त्या सर्वांना ठार करून युद्धात यशस्वी झालो तर आपला जांवई महा पराक्रमी असल्याची आपली खातरी होईल." कमाल म्हणाला.

कमालच्या एवढ्या धाडसाच्या मुळाशी कोणते गुपित आहे, हे सुलतानाला कळले नाही. तरी त्याने ती गोष्ट मान्य केली.

(क्रमशः)



# उत्तम इनाम

एक राजा आपल्या दिवाणखान्यात बसून काही कागदपत्रे पहात होता. तेव्हां एका कवीने येऊन त्या राजाची स्तुती करून एक कविता म्हटली—"हे प्रतापी चक्रवर्ती! इंद्रासारखे आपले तेज आहे...वगैरे!"

त्या राजाला असला तोंडपुजेपणा आवडत नसे. त्याने आपल्या खजिनदाराला बोलावून त्या कवीला शंभर रुपये द्यायला सांगितले. तेव्हां कवीला अपरंपार आनंद झाला. त्याने राजाची तुलना कुबेर आणि कर्णाशी करून आणखी एक कविता म्हणून दाखविली.

राजाला राग आला तरी त्याने खजिनदाराला हाक मारून "शंभर नाही, हजार रुपये द्यावे!" असे सांगितले.

खजिनदाराने त्या कवीला बाहेर बसायला सांगून राजाला येऊन विचारले—"महाराज! कवीश्वरांना शंभर द्यायचे की हजार?"

"अरे, जे द्यायचे ते मी दिले! तू द्यायची गरज नाही. त्यांनी माझा खोटा स्तुतिपाठ केला, मी देखील खोटे गोड बोलून खूष केले. आतां द्यायचे काय आहे?" राजा म्हणाला.

—श्री ना. ज्ञा. जाधव.





# कोण जिंकला कोण हारला

मगधदेशाच्या राजाला दोन राण्या होत्या.

दोघींना एकाच दिवशी आणि एकाच वेळी एकेक मुलगा झाला. एकाचे नाव अमरसिंह आणि दुसऱ्याचे जयसिंह ठेवण्यात आले.

दोघे सुंदर होते आणि शौर्यपराक्रमात ही परस्परांची बरोबरी करीत. विद्याभ्यासातही दोघे सारखे होते. युद्धकलेत आणि शस्त्रास्त्रविद्येतही दोघांनी सारखी प्रगती केली होती. परंतु एका गोष्टीत दोघात फरक होता. अमरसिंह घोडेस्वारी आणि खड्गयुद्धात प्रवीण होता तर जयसिंह हत्तीच्या स्वारीत आणि मल्लयुद्धात निपुण होता. दोघांचे परस्परांवर सख्ख्या भावांसारखे प्रेम होते.

राजाचा वृद्धापकाळ जवळ आला होता. दोघां मुलांपैकी कोणाला आपला वारस करून राज्यकारभार त्याच्या हाती द्यावा, हा प्रश्न राजासमोर उभा होता. कारण दोघांचा जन्म एकाच वेळी झाला होता आणि लहान मोठा हा भेद करतां येणे शक्य नव्हते. राज्याचे दोन वांटे करून देणे पण राजाला आवडत नव्हते. म्हणून राजाने दोघांच्या योग्यतेची परीक्षा करून जास्त योग्य ठरेल त्याला आपली गादी देण्याचे ठरविले. राजाने ही गोष्ट मंत्र्याच्या सल्ल्याने ठरविली होती. परंतु परीक्षा घेऊन अधिक योग्य कोण हे कसे ठरवायचे हे त्यांना कळेना. तो सुद्धा एक प्रश्नच होता.

परंतु दोघां राजकुमारांना ते सर्व कळले नाही. महाराजांसमोर असा काही प्रश्न उभा राहला असेल या गोष्टीची त्यांना कल्पनादेखील नव्हती.

त्याच सुमारास कौशिक वंशीय राजकन्येच्या स्वयंवराची तयारी चालू होती. कौशिक राजाने राजकन्येच्या स्वयंवरासाठी विविध कलांच्या चढाओढी ठेवून त्या सर्वांत जो सर्व प्रथम येईल त्याच्याशी राजकन्येचा विवाह होईल, असे जाहीर केले होते.

ते कळल्यावर राजाने आपल्या दोघां मुलांना त्या स्वयंवराच्या वेळी चढाओढीत भाग घेण्यास पाठविण्याचा विचार केला. दोघांपैकी जो कोणी सर्व प्रथम ठरेल त्याच्याशी त्या राजकन्येचा विवाह होईल व तोच आपल्या गादीला वारस ठरेल या हेतूने राजाने दोघां मुलांना कौशिकनगरी पाठविले.

स्वयंवरात भाग घेण्यासाठी अनेक राजकुमार दूरदूरच्या देशातून आले होते. आपल्या वडिलांच्या आज्ञेप्रमाणे अमरसिंह व जयसिंह दोघांनी सर्व स्पर्धांत भाग घेऊन त्या जिंकल्या. दोघे समसमान विजयी ठरले. आतां त्या दोघां मध्ये चढाओढ सुरू झाली. तेव्हां घोडेस्वारीत आणि खड्गयुद्धात अमरसिंह विजयी झाला आणि हत्तीची स्वारी आणि मल्लयुद्ध दोन्हीत जयसिंह विजयी ठरला. म्हणून परीक्षकांच्या मनाने दोघे समसमान विजयी ठरले.

आता कौशिकराजासमोर राजकन्येचा विवाह कोणाशी करून द्यायचा, हा प्रश्न उभा राहला. त्याने आपला निर्णय देण्यासाठी तीन दिवसांचा अवधी ठेवला आणि सर्व राजकुमारांना त्यांच्या त्यांच्या निवासस्थानी पाठवून दिले.



त्यानंतर कौशिकराजाने आपल्या मंत्र्याच्या सल्ल्याने दवंडी पिटविली की "जो कोणी तरुण अमरसिंह आणि जयसिंह या दोघांपैकी जास्त योग्य कोण आहे हे समजावून सांगू शकेल त्याच्याशी आपल्या दुसऱ्या मुलीचे लग्न करून देऊन त्याला अर्धे राज्य दिले जाईल."

ती दवंडी ऐकून दुसऱ्या दिवशी एक मुनी व त्याचा एक शिष्य राजाच्या दरबारात आले. मुनी म्हणाले–"महाराज! आपल्यासमोर जो प्रश्न उभा राहला आहे तो माझा हा शिष्य सोडवील!"

राजाने तो प्रश्न कसा सुटेल, विचारले.

तेव्हां त्या मुनीचा शिष्य राजाला म्हणाला–"महाराज! अमरसिंह घोडेस्वारी आणि खड्गयुद्धात जयसिंहहून जास्त योग्य आहे, परंतु हत्तीच्या स्वारीत आणि मल्लयुद्धात कमी योग्य ठरला आहे. परंतु हत्तीवर खड्गरहित वीरापेक्षा घोड्यावरचा खड्गधारी वीर जास्त योग्य नाही का? शिवाय घोडा उडया मारून हत्तीवर तुटून पडू शकेल. परंतु हत्तीवरचा वीर घोड्यावरच्या खड्गधारी वीराला कोणत्याही परिस्थितीत ठार करू शकणार नाही! या उलट हत्तीवरच्या मल्ल स्वाराला घोड्यावरचा खड्गधारी वीर नक्कीच ठार करू शकेल. म्हणून जयसिंहापेक्षा अमरसिंहच जास्त योग्य नाही का?"

हा तर्क मान्य करावा लागला. राजाला प्रश्न सुटल्याचा आनंद झाला.

दुसऱ्या क्षणाला मुनीने आणि त्याच्या शिष्याने आपापली सोंगे टाकली आणि आपल्या खऱ्या रूपात प्रगट झाले. अमरसिंहाने मुनिवेष धारण केला होता तर जयसिंहाने शिष्याचे सोंग घेतले होते.

कौशिक राजाने आपल्या दोन्ही मुलींचा विवाह दोघां राजकुमारांशी करून दिला आणि जयसिंहला अर्धे राज्य दिले.

या स्वयंवराबरोबर मगधदेशाच्या राजासमोरचा प्रश्न पण आपोआप सुटला. त्याने अमरसिंहाला आपला वारस नेमून त्याचा राज्याभिषेक करून दिला.



# अधिक आदर कां?

एका गावी दुष्काळ पडण्याची चिन्हे दिसू लागली होती. म्हणून त्या गावचा एक व्यापारी स्वस्तात धान्य मिळणाऱ्या देशात धान्य खरेदीसाठी निघाला. त्याच्याबरोबर एक चांभार कातड्याच्या खरेदीसाठी पण निघाला.

वाटेत एका जागी दोघे एका मुनीच्या आश्रमात उतरले. मुनीने, कां कोणास ठाऊक, व्यापाऱ्याचा जास्त आदरसत्कार केला. दोघे धान्य व कातड्याची खरेदी करून परत आले. तेव्हांदेखील दोघे त्याचा मुनीच्या आश्रमात उतरले. या खेपेस मुनीने चांभाराचा जास्त आदरसत्कार केला.

दोघांना त्या गोष्टीचे आश्चर्य वाटले व त्यांनी मुनीला त्याचे कारण विचारले.

तेव्हां मुनी म्हणाला–"शेटजी! तुम्ही त्या देशात सुगी आहे म्हणून पुष्कळ धान्य खरेदी करण्याचा विचार करून गेला होता. परंतु चांभाराने विचार केला होता की त्या देशात दुष्काळ असेल व पुष्कळ जनावरे मरत असतील. म्हणून मी जातांना तुमचा अधिक आदरसत्कार केला. परंतु परत येतांना तुम्ही दुष्काळात धान्य जास्त किमतीवर विकता येईल या विचाराने आलात. परंतु चांभार लोकांजवळ वहाणा व पादत्राणे विकत घेण्याइतके धन असेल असे समजावून व ते सुखी होतील या हेतूने परतला. म्हणून मी या खेपेस त्याचा जास्त आदरसत्कार केला.





# पुनर्जन्म

महाराज उग्रगुप्त यांना दोन मुलगे होते. दोघांचा स्वभाव परस्पर विरुद्ध होता. मोठा मुलगा शंकर गुप्त धूर्त, कपटी, क्रूर आणि कठोर हृदयाचा होता. तो दारूच्या धुंदीत असला म्हणजे वाटेल ते काम करायला सिद्ध असे. या उलट धाकटा मुलगा शेखर सरळ स्वभावाचा, धर्मभीरू आणि दयाळू होता.

अर्थातच, यामुळे शंकरगुप्ताचा स्वभाव दरबारी लोकांना किंवा प्रजेला मुळीच आवडत नसे. तरी तो मोठा मुलगा होता आणि रीतीप्रमाणे गादीला वारस होता. याशिवाय तो राजाचा लाडका होता. परंतु स्वत: मंत्र्याला व दरबारी लोकांना धाकटा शेखरच जास्त आवडे. कारण तो स्वभावाने शांत होता.

ही गोष्ट जगजाहीर होती आणि प्रजा व दरबारी धाकट्या राजकुमाराची नि:संकोचपणे वाखाणणी करीत म्हणून शंकरगुप्ताच्या मनात शेखरगुप्त विषयी मत्सर आणि द्वेषभाव वाढत गेला. त्याने शेखरगुप्ताचा काटा दूर करण्याचे मनाशी ठरविले.

शंकरगुप्तला महाराजांनी फार लाडावून ठेवले होते. त्याच्या क्रूरपणाला महाराज पराक्रम मानीत आणि दयाळू स्वभावाच्या शेखर गुप्ताला केवळ भितरा मानून त्याला कमी लेखीत.

मत्सराग्नीने पेटलेल्या शंकरगुप्ताने आपल्या धाकट्या भावाचा शेवट करायचे ठरवून आपल्या काही अनुयायांच्या सल्ल्याने एक कारस्थान केले. एक दिवशी त्याने शेखरला शिकारीस बरोबर यायला सांगितले. दोघे घोड्यावर बसून शिकारीला निघाले. दोघे दाट जंगलातून जात असता शंकरगुप्ताने पाठीमागून शेखरगुप्तावर तलवारीने वार केला.

परंतु शेखरगुप्त सावध होता. त्याने ऐन वेळी झाडाला लोंबत असलेल्या वेलीला लोंबकळून तो वार चुकविला. त्याच वेळी त्याचा घोडा मागे फिरला आणि शंकरगुप्ताच्या घोड्यावर अचानकपणे आदळला. म्हणून शंकरगुप्ताचा घोड्याने मागच्या बाजूने पाय वर करून शंकरगुप्ताला खाली टाकले. त्या गडबडीत शेखरगुप्ताची तलवार उलटी जमिनीवर पडून चिखलात रुतली होती. तलवारीचे टोक वर होते. शंकरगुप्त नेमका त्या तलवारीवर जाऊन आदळला आणि जागच्या जागी ठार झाला.



इतक्यात शंकरगुप्ताचे साथीदार तेथे आले. शेखरची तलवार शंकरगुप्तच्या काळजात घुसलेली त्यांना दिसली. तेव्हां शेखर झाडावरून उतरून शेजारी उभा होता.

या सर्व प्रकारात मूळ गोष्ट लपली आणि ज्याचा खून होणार होता त्या निरपराध शेखरगुप्तवर भावाचा वध करण्याचा आरोप लावण्यात आला. त्याला निर्दोषी शाबीत करण्यास पुरावा नव्हता की कोणी साक्षीदार पर नव्हता. त्याने जे घडले ते खरे खरे सांगितले. पण ते सर्व कपोलकल्पित असल्याचे मानून न्यायाधिशाने त्याला मृत्युदंडाची शिक्षा ठोठावली.

पुढच्या शुक्रवारी दहा धनुर्धारी वीरांकडून एका क्षणी त्याला बाणाने वध करून ठार करण्याची शिक्षा देण्याची व्यवस्था करण्यात आली.

त्या देशाच्या पद्धतीप्रमाणे सेनापतीने टाकलेला रुमाल जमिनीवर पडल्याबरोबर धनुर्धारी वीरांनी बाण सोडावयाचा नियम होता. आणि जर ठरल्यावेळी काही कारणास्तव ठरल्या वेळेवर शिक्षा दिली गेली नाही तर आरोपीला सुटका द्यावी असा देखील नियम होता.

मंत्री व इतर दरबारी लोकांप्रमाणे सेनापतीला देखील शेखर फार आवडे. त्याला आपल्या हाती मरण येणार या

गोष्टीचे सेनापतीला फार वाईट वाटत होते. आपण आपल्या हाताने तांबडा रुमाल टाकून राजकुमाराच्या वधासाठी खूण करावयाची आहे, या विचाराने त्याला खाणेपिणे सुचेना व झोप येईना.

परंतु त्याला तो नियम आठवला की ठरल्या वेळी काही कारणास्तव शिक्षा दिली गेली नाही तर आरोपी सुटतो. पण ती वेळ टळणार कशी. तेव्हां त्याला दरबारी जादुगार इंद्रनाथाची मदत घेण्याची गोष्ट सुचली. तो त्याला भेटला आणि त्याने त्याला "काही मार्ग काढतोस का?" विचारले.

इंद्रनाथने एक तांबडा हात रुमाल घेऊन त्याच्या एका टोंकाला एक वीतभर लांब पातळ रबराच्या पट्टीचे एक टोक दोऱ्याने शिवून टाकले. रबराचे दुसरे टोक उजव्या हाताच्या बाहीच्या आत अशातऱ्हेने शिवून ठेवले की बाहीत रुमाल गेला तर बाहेरून दिसणार नाही आणि रुमाल धरून रबराची पट्टी ओढली गेली तरी फक्त रुमालच बाहेर दिसेल व रुमाल सोडल्याबरोबर तो खाली जमिनीवर न पडतां बाहीत शिरून नाहीसा होईल.

शुक्रवार उजाडला. वधस्थानी सर्व तयारी होती. सेनापती लाल रुमाल हातात धरून ठरलेल्या जागी उभा राहिला. धनुर्धारी रुमाल खाली केव्हां पडतो याची वाट पहात नेम धरून उभे होते. सूर्य बरोबर डोक्यावर आला. सेनापतीने रुमाल सोडला, परंतु रुमाल जमिनीवर पडलाच नाही व अदृश्य झाला. धनुर्धारी व जमा झालेली गर्दी आश्चर्यचकित होऊन रुमाल कोठे गेला हे पहात उभी राहिली.

दंड देण्याची वेळ टळली आणि शेखरगुप्तला दिली गेलेली मृत्यु दंडाची शिक्षा रद्द झाली. प्रजा शेखरचा जयजयकार करू लागली. राजाला आनंद झाला की देवानेच आपल्या मुलाला वांचविले.

सेनापती व इंद्रनाथ मात्र परस्परांकडे स्मित करून पहात होते.





# चंचल मनाचा शेतकरी

एकदा एक शेतकरी आपल्या शेतात नांगरत असता नांगराचा फाळ कशाला तरी लागला आणि 'खण्ण्' असा आवाज झाला. शेतकऱ्याने ती जागा खणून पाहिली तेव्हां त्याला कांशाची एक हंडी दिसली. हंडीत सोन्याच्या मोहरा होत्या.

हंडी भरून सोने पाहून शेतकऱ्याला काय करू आणि काय न करू असे झाले. त्याने विचार केला एवढे सोने असल्यावर आपल्याला काय वाटेल ते करता येईल. आपण आता श्रीमंत झालो आहो. परंतु इतके सोने जवळ असणे धोक्याचे आहे. चोर दरोडा घालून सोने घेऊन जातील व कदाचित आपला जीव धोक्यात पडेल.

काय करावे त्याला सुचेना. न्यायाधिशाकडे नेऊन हे सोने जमा करून ठेवले तर मग काही धोका नाही. असा विचार करून तो न्यायाधिशाकडे धावत गेला आणि म्हणाला—"आपण एकदां माझ्या शेताकडे येण्याचा कष्ट करू शकाल का?"

दोघे कांशाची हंडी पुरली होती तिकडे निघाले. वाटेत शेतकऱ्याचे मन बदलले. त्याने न्यायाधिशाला विचारले—"काय हो, माझ्याकडे दोन बैल आहेत. त्यातला चांगला बैल कोणता, सांगू शकाल का?"

ते ऐकून न्यायाधिशाला राग आला आणि काही उत्तर दिल्याशिवाय परतला.

काही वेळ शेतकरी विचार करू लागला—"मी तरी किती मूर्ख आहे? हे सर्व सोने न्यायाधिशाला देऊन टाकले असते म्हणजे कसली काळजी उरली नसती. आतां एवढे सोने लपवू तरी कोठे?" तो दिवसभर त्याच विचारात बसून राहिला.

सूर्यास्ताच्या सुमारास न्यायाधीश कचेरीचे काम संपवून घरी निघाला असतां शेतकऱ्याने त्याला पाहिले. तो पुन्हा जवळ

जाऊन म्हणाला–"आपण पुन्हां एकदां माझ्या शेतापर्यंत येऊ शकाल का?"

न्यायाधिशाने विचार केला बिचारा कोणत्या तरी संकटात खरोखरच सांपडला असावा. तो त्या शेतकऱ्याबरोबर त्याच्या शेतात गेला. परंतु त्या अवधीत शेतकऱ्याचे मन पुन्हां बदलले. तो न्यायाधिशाला म्हणाला–"काही नाही, मी काल शेत नांगरले आणि आजदेखील नांगरले. दोन्ही पैकी कोणते चांगले नांगरले गेले असे आपले मत आहे?"

न्यायाधीश तो प्रश्न ऐकून आणि याचे डोके फिरलेले दिसते आहे, असा विचार करून तेथून काही उत्तर दिल्याशिवाय तेथून निघून गेला. न्यायाधीश निघून गेल्यावर शेतकरी विचार करू लागला–"मी तरी किती वेडा आहे? न्यायाधिशाच्या हातात सर्व सोने देऊन मोकळा झालो नसतो का?"

शेवटी त्याने एका पोत्यात ती सोन्याची हुंडी ठेवली आणि उचलून घेऊन घरी गेला.

घरी पोचल्यावर शेतकरी आपल्या बायकोला म्हणाला–"जा, जरा बैलांना बांधून ये कशी! त्यांना गवत घालून दाणा दे खायला. मला न्यायाधिशाकडे जायचे आहे."

नवऱ्याने खांद्यावरचे पोते उतरून ठेवले नाही आणि आपल्याला हुकूम सोडू लागलेला पाहून बायकोला आवडले नाही. पोत्यात काही तरी आहे, माझ्यापासून लपविण्याचा विचार दिसतो आहे. असा विचार करून ती नवऱ्याला म्हणाली–"मला नाही ते कळत, तुम्हीच बांधा बैलांना. मी गायीला बांधते आणि तिचे दूध काढते. नंतर तुम्हांला काय वाटेल तिकडे जा आणि या."

नाइलाजाने शेतकऱ्याने पोते एका जागी ठेवून दिले आणि बैलांना बांधून दाणापाणी पहायला गेला. तिकडे शेतकऱ्याच्या बायकोने पोत्यात काय आहे ते पाहून तो हुंडा बाहेर काढला आणि तो सोन्याने भरलेला आहे हे ओळखून नवऱ्याच्या हाती लागणार नाही अशा जागी लपवून ठेवला. नंतर हुंड्याच्या आकृती एवढा गोलसा दगड हुडकून पोत्यात ठेवून पोत्याचे तोंड पहिल्यासारखे बांधून ठेवून दिले.

शेतकरी काम आटोपून आला आणि पोते खांद्यावर घेऊन सरळ न्यायाधिशाच्या घरी गेला. म्हणाला–"माफ करा, मी आपल्याला दोनदां त्रास दिला, परंतु आपल्याला एक चांगलीशी भेट घेऊन आलो आहे.

न्यायाधिशाला वाटले की असेल एखादा भोपळा किंवा असेच काही. त्याने पोते उघडून पाहिले, आत एक मोठा दगड होता. तो पाहून न्यायाधीश व शेतकरी दोघे चकित झाले.

न्यायाधिशाला वाटले की शेतकऱ्याच्या या निक्षिप्तपणाचे काही तरी विशेष कारण





असले पाहिजे. त्याने त्याला अंधार कोठडीत बंद करून ठेवायला सांगितले आणि हा झोपल्यावर काही बडबडतो का ऐकून लिहून ठेवायला शिपायांना सांगितले.

शेतकरी अंधार कोठडीत बसून हातवारे करीत बडबडत होता–"केवढे मोठे भांडे होते? हंडा होता हंडा आणि त्यांत सोने!"

नोकरांनी न्यायाधिशाला शेतकरी जे काही बडबडला, जाऊन सांगितले. न्यायाधिशाने शेतकऱ्याला बोलावून विचारले– "काय रे, रात्री तू हातवारे करून काही तरी मोजीत मापीत होतास! काय होते ते?"

शेतकऱ्याला थोडा धीर आला. तो न्यायाधिशाला म्हणाला–"मालक! मी आपल्यालाच मापीत मोजीत होतो. आपले डोके एवढे मोठे आहे. पोट एवढे आहे. मान एवढी लांब आहे!"

ते ऐकून न्यायाधिशाला राग आला. त्याने नोकरांना हुकूम दिला–"जा रे याला फांशी द्या!"

नोकर शेतकऱ्याला फांशीच्या जागी घेऊन गेले. त्याला फळीवर उभा करून त्याच्या गळ्यात फास टाकला. तेव्हां शेतकरी म्हणाला–"थांबा, थांबा! न्यायाधिशांना एक गोष्ट सांगायची राहली आहे."

नोकरांनी शेतकऱ्याला आपली शेवटची इच्छा न्यायाधिशासमोर प्रगट करण्यासाठी आणले.

न्यायाधिशाने त्याला विचारले–"काय रे, पुन्हां काय काम आहे माझ्याजवळ?"

"नाही साहेब! आपले नोकर माझ्या गळ्याला गळफांस घालू लागले होते. पण त्यांना गळफांस लावला तर श्वासोच्छ्वास घेता येईल ना मला? बंद होणार तर नाही?" शेतकऱ्याने विचारले.

शेतकरी म्हणाला ते ऐकून न्यायाधीश जोरजोराने हंसू लागला. म्हणाला– "या खुळचाला सोडा!"

नंतर शेतकरी घरी निघून गेला. बायकोने संभाळून ठेवलेले सोने त्याला आयुष्यभर पुरले.





# महाभारत

धृतराष्ट्राने देखील दुर्योधनाला युद्ध केल्यास धोका असल्याचे समजावून सांगितले. परंतु त्याने त्याची फिकीर केली नाही. सभेत उपस्थित सर्वांची युद्ध टळणे शक्य नाही, या गोष्टीची खात्री झाली.

धृतराष्ट्राने गुप्तपणे संजयला बोलावून विचारले–"संजया! तुला कौरव आणि पांडव दोघांच्या बलाबलाची चांगली कल्पना आहे. पांडवांच्या बाजूने युद्धोत्साह किती आहे, हे जास्त बलिष्ठ कोण आहे, सांग."

संजय म्हणाला–"राजा! मी याविषयी एकांतात काहीच बोलत नाही. व्यास महर्षी आणि गांधारी यांच्या समक्ष सर्व खरे खरे ते सांगतो. त्यांना बोलवायला कोणाला तरी पाठवा."

थोड्या वेळाने व्यासमुनी आणि गांधारी आले. तेव्हां संजय म्हणाला–"राजा! कृष्ण व अर्जुन दोघे अवतारी पुरुष आहेत. त्रिलोकाने एकत्र होऊन कृष्णाशी करायचे तरी ते शक्य नाही. तसा तो सामान्य मानवासारखाच तूर्त वागत आहे."

"परंतु तुलाच हे कसे कळले? मला कां कळले नाही?" धृतराष्ट्राने विचारले.

"राजा! तू तामस वृत्तीचा आहेस. म्हणून ज्ञानहीन आहेस. मी ज्ञानचक्षूने हे सर्व पहात आहे! ज्ञानचक्षूंमुळेच मला कृष्णाचा महिमा कळला." संजय म्हणाला.

तेव्हां व्यास मुनी धृतराष्ट्राला म्हणाले– "धृतराष्ट्रा! कृष्णाच्या मनात तुझ्याविषयी फार आदर आहे. संजयाला कृष्णाविषयी



पूर्णज्ञान आहे. 'म्हणून तू याच्या म्हणण्या-प्रमाणे वागलास तर तुझे हित होईल."

तिकडे उपप्लाव्य नगरीत युधिष्ठिर श्रीकृष्णाशी त्याच वेळी बोलत होता. तो कृष्णाला म्हणाला—"कृष्णा! याच वेळी आमच्या मित्रबांधवांनी आम्हांला मदत केली पाहिजे. तू आमचा सखा व मित्र आहेस. तुझ्या भरंवशावरच आम्ही कौर-वांचा नाश करण्याचे ठरविले आहे. आमच्या रक्षणाचा भार तुझ्यावरच आहे."

कृष्ण म्हणाला—"युधिष्ठिरा! तुला जे काही सांगावयाचे असेल अगदी निर्भीडपणे सांग. तुझ्या इच्छेप्रमाणे सर्व काम करण्याची जबाबदारी मी घेतो."

ते ऐकून युधिष्ठिर म्हणाला—"कृष्णा! तू संजयाच्या तोंडी सर्व ऐकले आहेस. धृतराष्ट्र काकांना आम्हांला जे काही सांगावयाचे होते ते संजयाने सांगितले आहे. काकांच्या मनात मोहाने घर केले आहे. आमचे राज्य आम्हांला न देतां आमच्याशी ते संधी करू पहात आहेत. धृतराष्ट्र काकांच्या सत्य आचरणावर विश्वास ठेवून आम्ही इतके दिवस वनवास भोगला. परंतु ते दुर्योधनाच्या इच्छेविरुद्ध काही करायला तयार दिसत नाहीत. मी आपल्या मातेला, भावंडांना आणि पत्नीला कष्टच जास्त दिले. मी तरी फक्त पांच गांवावर तृप्त होईन असेदेखील सांगून पाठविले. परंतु काका त्यालासुद्धां कबूल होत नाहीत. दारिद्र्यापेक्षा मरण बरे! आम्ही क्षत्रिय धर्म सोडला आणि इतरांचा धर्म स्वीकारला तर ते बरोबर होणार नाही. आम्हांला शांतताच हवी आहे. परंतु ते शक्य नसेल तर युद्धाला आम्ही तयार आहों. या परिस्थितीत दुसरे काय करतां येईल, तूच सांग!"

कृष्ण म्हणाला—"राजा! माझ्या दृष्टी-समोर तुम्ही पांडव आणि कौरव सारखे आहां. म्हणून दोघांचे हित व्हावें हा हेतू ठेवूनच मी कौरवांच्या दरबारी जाईन. तुझ्या मनासारखें मी कौरवांचे मन वळवं शकलो आणि दोघांमध्ये समेट घडवून आणू शकलो तर ते एक पुण्यकार्यच ठरेल!"

युधिष्ठिर म्हणाला—"दुर्योधन हट्टी आहे. तो तुझे म्हणणे कदापी मानणार नाही. त्याला पाठिंबा देणारे इतर लोकदेखील त्याच्या विरुद्ध काही बोलणार नाहीत. अशा लोकांमध्ये तू जाण्याचे धाडस करणे मला बरोबर वाटत नाही. तुझ्यावर काही अनपेक्षित प्रसंग आला तर ते आम्हांपैकी कोणालाच खपणार नाही."

कृष्ण त्याच्या मनाचे समाधान करण्या-साठी म्हणाला—"युधिष्ठिरा! मी दुर्योधनाला आणि त्याच्या अनुयायांना ओळखत का नाही? कोणी माझ्या वाटेला जाऊं लागला तर त्यांची नांगी मोडण्या पुरेसे सामर्थ्य माझ्यात आहे. परंतु जर आपण युद्ध थांबविण्याचा प्रयत्न केला नाही तर लोक आपल्याला दोष देतील. म्हणून मी तिकडे जाणे अत्यावश्यक आहे."

"तुझे म्हणणे खोडण्याची शक्ती माझ्यात नाही. तू साध्य झाल्यास समेट घडवून आण. तुला यश येवो हीच माझी इच्छा आहे." युधिष्ठिर म्हणाला.

कृष्ण युधि[illegible]ठराच्या मनाचे सांत्वन करण्यासाठी [illegible]न्हां म्हणाला—"युधिष्ठिरा! तू धर्माचे पा[illegible] [illegible]रीत आला आहेस. तरी कौरवांनी तुझ्य[illegible]ी वैर करावयाचे ठरविले



आहे. क्षत्रियाचा धर्म युद्ध करणे हा आहे, भीक मागणे नाही. यश किंवा अपयश हे दैवाधीन आहे. कौरवांनी अनेक राजांशी बरेच दिवसापासून सख्य केले आहे. म्हणून ते समेटाला तयार होतील असे मला वाटत नाही. त्यांनी तुमच्यावर जे अन्याय व अत्याचार केले आहेत त्याबद्दल त्यांना थोडादेखील पश्चात्ताप वाटत नाही. मग तू त्यांच्याविषयी सहानुभूती दाखविण्याचे कारण नाही. तू धृतराष्ट्राविषयीं जी श्रद्धा व विश्वास दर्शवीत आला आहेस तो बरोबर नाही. मी कौरवसभेत तुझ्या धर्म-बुद्धीची जाणीव करून देईन आणि तुझ्या-विषयी त्यांच्या मनात गैरसमज असेल तर



तो दूर करीन. तुला कोणत्याही प्रकारचे नुकसान सहन करावे लागू नये आणि समेट घडून यावा यासाठीच मी प्रयत्न करीन. परंतु एकंदरीत युद्ध टाळणे शक्य नाही, दुर्योधन जिवंत असेपर्यंत तुझे राज्य तुला मिळणे शक्य नाही. म्हणून तू युद्धाची तयारी चालू ठेव."

नंतर भीम कृष्णाला म्हणाला–" कृष्णा! तू कौरवसभेत शिष्टाईला जाणे बरोबर आहे. तू सर्वांसमक्ष दुर्योधनाच्या डोळ्यात झळझळीत अंजन घालून शांतिस्थापनेसाठी त्याचे मन वळव. त्याच्याशी थोडे सलोख्या-नेच बोलावे लागणार. आमच्या वंशावर कोणत्याही प्रकारे मोठे संकट येणार नाही याचा यत्न कर. आम्हांला युद्ध करण्याची इच्छा नाही, आम्हांला शांतताच हवी आहे."

भीम म्हणाला ते ऐकून कृष्ण चकितच झाला. भीमाला इतके शांत व गंभीरपणे बोलतांना त्याने कधी पाहिले नव्हते. त्याचा युद्धोत्साह थंड पडला की काय अशी एक शंका कृष्णाच्या मनात येऊन गेली. म्हणून त्याचा क्रोधाग्नी प्रज्वलित करण्याच्या हेतूने कृष्ण म्हणाला–"भीमा! अरे तूच का बोलतो आहेस हे? तू घाबरला आहेस वाटते, दुर्योधनाचे अफाट सैन्य पाहून? धृतराष्ट्राच्या दुष्ट मुलांचा वध करण्याची प्रतिज्ञा तू विसरलास की काय? दुर्योधनाच्या वधाच्या गोष्टी तुझ्या वल्गनाच होत्या की काय? आज तू शांतिस्थापनेच्या गोष्टी बोलू लागला आहेस? भीतीने तुझी बुद्धी भ्रष्ट झालेली दिसते आहे. कोठे गेला तुझा तो सर्व पराक्रम? 'भय' आणि 'भीम' दोन्ही शब्द परस्पर विरोधी आहेत! तुझ्या सारखा माणूस स्वतःच्या पराक्रमाने मिळ-विलेल्या वैभवाशिवाय इतर भोगविलासाकडे ढुंकूनदेखील पाहणार नाही!"

ते ऐकून भीमाला राग आला. म्हणाला–"कृष्णा! तू तरी अर्थाचा अनर्थच करू लागलास की रे! मला युद्ध नको आहे, असे कां वाटले तुला? इतके दिवस मला जवळून पाहून देखील तू मला बरोबर ओळखले नाहीस, असेच म्हणावे लागेल. मला चांगले ओळखणारा असे बोलणेच शक्य नाही. तर मग ऐक, मला काय म्हणावयाचे आहे ते. माझ्या अंगात जी शक्ती आहे आणि पौरुष आहे ते सामान्य नाही. माझ्या हातात सांपडलेला शत्रू किती ही बलिष्ठ असला तरी जिवंत सुटणार नाही. युद्ध झालेच तर माझा पराक्रम तुला प्रत्यक्षच पहायला मिळेल. आमचा हा भरत वंश निर्मूल होऊं नये या हेतूने मी शांतिस्थापनेच्या गोष्टी बोललो होतो."

भीम म्हणाला ते ऐकून कृष्ण मंदस्मित करीत म्हणाला–"भीमा! तुझी निंदा करण्याच्या हेतूने मी ते बोललो नव्हतो. तुझ्या बलपराक्रमाची पारख मला तुझ्याहून जास्त आहे. मी कौरव सभेत तुमचे हित होईल आणि शांतिस्थापनासुद्धा घडेल असाच यत्न करणार आहे. परंतु मला यश आले नाही तर युद्ध होणारच. तुझ्या मनात काय आहे हे जाणून घेण्यासाठी ते बोललो होतो."

त्यानंतर अर्जुनाने या शब्दात आपले मत दिले–"कृष्णा! कौरवसभेत काय बोलायचे हे युधिष्ठिरदादाने सांगितलेच आहे. कौरव शांतिस्थापनेस तयार होणार नाहींत असेच मला वाटते. तरी प्रयत्न करणे आपले कर्तव्य आहे. आपसांत सख्य होऊ शकले



तर प्रयत्न करून पहा. आमचे हित व अहित आमच्यापेक्षा जास्त तुलाच माहीत आहे."

"अर्जुना! मला जे काही करावयाचे आहे ते मी करीनच. शकुनी आणि कर्ण यांचा विरोध असतां दुर्योधन समेटास कसा तयार होईल? माझे असे मत आहे की युधिष्ठिराने मला शांतिस्थापनेसाठी पाठ-विले आहे, असे सांगताच कामा नये. तुला दुर्योधनाचा स्वभाव माहीतच आहे. तो युद्धाशिवाय एक टीचभर जमीन सुद्धा देणार नाही."

नंतर नकुलाने आपले मत दिले. म्हणाला–"कृष्णा! माझ्या वडील बंधूंनी सांगावयाचे



ते सर्व सांगितले आहे. मी लहान तोंडी मोठा घास घेऊ इच्छित नाही. आमच्या म्हणण्या प्रमाणे कदाचित ते समेटाला तयार होणार नाहीत. परिस्थितीप्रमाणे माणसाचे विचारपण बदलतात. शांति-स्थापना होऊ शकली नाही तर कठोर सत्याला तोंड देणे भागच आहे."

सहदेव म्हणाला–"युधिष्ठिर दादाने धर्माचरण केले आहे. तरी माझ्या मते युद्ध व्हावे असेच तू कर. कौरवांनी युद्ध टाळण्याचा प्रयत्न केला तरी युद्ध होईल असाच यत्न कर."

सात्यकीने सहदेवाचे अनुमोदन केले. पांडवांच्या बाजूने युद्धास आलेल्या सर्व योद्धयांनी सात्यकीच्या म्हणण्याला दुजोरा दिला.

तेव्हां द्रौपदी मनांतले दु:ख व्यक्त करीत म्हणाली–"दादा! ज्येष्ठ पांडुपुत्राने पांच गांवावर त्यांच्या मनाचे समाधान होईल असे सांगितले आणि दुर्योधनाने साफ नकार दिला. माझ्या मते आम्हांला हक्काने मिळणारे सर्व राज्य मिळेपर्यंत तू संधीला मान्यता देतां कामा नये! पांडवांच्या हाती कौरवांचा वध निश्चित आहे व तेच माझ्या मते उचित व योग्य आहे. माझा अपमान करणारा दुर्योधन आणि त्याचा धाकटा भाऊ दु:शासन अद्याप जिवंत कसा राहला? संधी वार्ता करतांना माझ्या केसांची आठ-वण असूं दे. कौरवसभेत ज्या गोष्टी घडल्या त्या तू विसरलास तर नाहीस? त्या दुष्टाचे दोन्ही हात कापले जाईपर्यंत माझा अंतरात्मा शांत होणार नाही."

कृष्णाने द्रौपदीचे योग्य शब्दात सांत्वन केले.

कृष्णाने शिष्टाईसाठी निघण्यापूर्वी सात्यकीला जवळ बोलावून रथात शंख, चक्र, गदा व इतर आयुधे ठेवण्यास सांगि-तली आणि म्हणाला–"दुर्योधन स्वत: दुष्ट आहे आणि त्याचे कान भरायला कर्ण व शकुनीमामा तेथे असणार. आपण किती शक्तिशाली असलो तरी शत्रूला निर्बल



मानणे शहाणपणाचे नाही. निर्बल शत्रूची उपेक्षा करून भागत नाही !"

सर्व तयारी करून कृष्ण सात्यकीला रथात स्वतःबरोबर बसायला सांगून हस्तिनापूरला निघाला. त्यावेळी सर्व पांडव, चेकितान, धृष्टकेतू द्रुपद, काशीचा राजा, शिखंडी, धृष्टद्युम्न, विराट इत्यादिक शूरवीर राजे कृष्णाला निरोप द्यायला काही अंतर पायी चालून आले.

परतण्यापूर्वी युधिष्ठिर कृष्णाला सख्य-भावाने प्रेमालिंगन देत म्हणाला—"कृष्णा ! आमच्या मातोश्री हास्तिनापूरलाच आहेत. त्यांना भेटून आमचे सर्वांचे साष्टांग नमस्कार सांग. त्यांनी किती प्रेमाने आणि किती कष्ट सहन करून आम्हां सर्वांना वाढविले. आमच्यावर अनेक संकटे आली, पण निर्भय-पणे त्यांनी त्यांना तोंड दिले. कित्येक यातना सहन केल्या. त्यांना आमच्या वतीने भेटून आमच्या वतीने जे काही सांगावयाचे ते तूच सांग. नंतर धृतराष्ट्र काका, भीष्मा-चार्य, द्रोणाचार्य, कृपाचार्य, बाल्हिक, सोमदत्त इत्यादि थोर वडीलधाऱ्या मंड-ळींना नमस्कार सांगून अश्वत्थामा वगैरे आमच्या समवयस्क मित्र मंडळीस पण भेटून त्यांची कुशलवार्ता विचारायला विसरू नकोस. विदुरकाकांना आमचे सर्वांचे प्रणाम सांग !"

त्यानंतर सर्व कृष्णाला निरोप देऊन परतले.

कृष्णाचा रथ दारुक चालवीत होता. त्याने वेगाने हस्तिनापूरच्या वाटेने रथ चालू केला. कृष्णाने, कौरवांच्या राज्यात पाऊल टाकतांचा वृकस्थल येथे पडाव टाकण्याचे ठरविले. त्या दिवशी रात्री तेथेच मुक्काम केला. कृष्णाने आपल्या गांवी मुक्काम केला असल्याचे ऐकून सर्व प्रमुख गावकरी कृष्णाला भेटायला आले. त्यांनी कृष्णाला प्रेमपूर्वक आपल्या घरी बोलावून नेले व सर्व प्रकारे त्याचे आद-रातिथ्य केले. कृष्णाने पण त्या सर्वांना आपल्या मुक्कामाच्या जागी बोलावून त्यांचा यथोचित सत्कार केला.





# शिव लीला

[ २ ]

भीमावती नगरीत सोमदेव नावाचा एक शिवभक्त रहात असे. शिवराम त्याच्या मुलाचे नाव होते. शिवराम सात वर्षांचा झाला तेव्हां त्याचा बाप मरण पावला. आईनेच मुलाला वाढविले.

दिवाळीचा सण येण्यापूर्वी शिवराम आपल्या काही साथीमित्रांबरोबर समिधा, झाडाची पाने वगैरे गोळा करून आणायला जंगलात गेला. सर्व मुले एका वडाच्या झाडाखाली गप्पा मारीत बसली.

मुले म्हणू लागली—"या भाऊ बिजेला माझी बहीण आणि माझे मेहुणे येणार आहेत. मी जाऊन त्यांना घेऊन येणार आहे." आणखी काही मुले म्हणाली—"बाबांनी ताईला देण्यासाठी नवीन साडी व खण आणले आहेत!" मुलाचे असे बोलणे चालू होते. तेव्हां शिवराम म्हणाला—"मी सुद्धां माझी ताई आली की तिच्या बरोबर खूप गप्पा मारणार आहे. मी तिला भाऊबीज घालीन आणि तिला साडीखण देईन."

शिवराम म्हणाला ते ऐकून सर्व मुले खदखदां हसू लागली. म्हणाली—"अरे, तुला बहीण कोठे आहे? म्हणे बहिणीला भाऊ बीज घालीन आणि साडीखण देईन! सांग, कोठे राहाते तुझी बहीण? तिचे नाव काय रे आणि तुझ्या मेहुण्याचे नाव काय? ते कोठे राहतात आणि त्यांना किती मुले आहेत?"

शिवरामजवळ त्यांच्या त्या प्रश्नांचे उत्तर नव्हते. गप्प बसण्याशिवाय मार्ग नव्हता. तो रडत घरी परत आला.

शेवटच्या मलपृष्ठावरील चित्र



मुलगा रडत घरी परत आलेला पाहून आईने त्याला रडण्याचे कारण विचारले. म्हणाली—"कोठे पडलास का? की कोणी मारले? काय झालं काय, रडायला?"

शिवरामने मुलांनी त्याची कशी थट्टा उडविली ते सांगितले. आई त्याला म्हणाली—"बाळ! एवढेच ना, ते पुन्हां भेटले तर त्यांना जाऊन सांग, तुझ्या ताईचे नाव भ्रमरांबा आहे आणि तुझ्या मेहुण्याचे नाव मल्लिकार्जुन. ते दोघे श्रीशैल क्षेत्री राहतात. त्यांना गणपती आणि कुमारस्वामी असे दोन मुलगे आहेत. सर्व जग त्यांच्या इंगितावर चालते. तुझ्या मेहुण्यासारखा प्रतापी वीर त्रिलोकात नाही."

आईकडून आपल्या ताईचे व मेहुण्यांचे नाव गाव कळल्यावर शिवरामला परमानंद झाला. म्हणाला—"आई! तरमग मी या दिवाळीला आपल्या ताईला आणि मेहुण्यांना बोलावून घेऊन येणार आहे. सर्वांच्या घरी भाऊबिजेच्या दिवशी बहीण व मेहुणे येणार आहेत ना? आपण आजपर्यंत आपल्या ताईला किंवा मेहुण्यांना बोलाविले नाही!"

"बाळ! तुझे बाबा गेल्यापासून त्यांना बोलावून आणणार कोण? तू अजून लहान आहेस. वाटेत जंगल आहे आणि जंगलांत रानटी श्वापदे आहेत. तुझे मेहुणे फार ऐश्वर्यवान आहेत. ते आपल्यासारख्या गरिबाच्या घरी कसे काय येतील? ते आले तरी एकटे येणार नाहीत. त्यांचे नोकरचाकर पण बरोबर येतील. इतक्या लोकांच्या राहण्याची व खाण्यापिण्याची व्यवस्था आपण कशी करायची? तू मोठा होऊन मिळवू लागलास म्हणजे बोलावून घेऊन ये आपल्या ताईला आणि मेहुण्यांना!" आईने मुलाची समजूत घालण्याचा प्रयत्न करून पाहिला.

शिवराम काहीच बोलला नाही. आई म्हणाली ते निमूटपणे ऐकून घेतले. दुसऱ्या दिवशी तो पहाटे कोणी जागे होण्यापूर्वी उठला आणि आईला सांगितल्याशिवाय घराबाहेर पडला. श्रीशैल पर्वताची वाट विचारीत क्रूर श्वापदांची फिकीर केल्याशिवाय श्रीशैलक्षेत्री आला. तेथे सर्वदेवांचे दर्शन करून व तीर्थस्नान करून त्याने आपल्या बहिणीची व मेहुण्यांची चवकशी केली. त्याने एकाला विचारले—"काय हो! मल्लिकार्जुन कोठे राहतात?" त्या गृहस्थाने त्याला मल्लिकार्जुनाचे देऊळ दाखविले. देवळात शिवरामला फक्त शिवलिंग दिसले.



शिवराम दमून गेला होता; तो पिंडीसमोर बसून म्हणाला—"अहो, तुम्हांला आणि ताईला घेऊन जायला मी आलो आहे. दिवाळी आली आहे ना? सर्वांच्या घरी त्यांची ताई व मेहुणे येणार आहेत. माझी आई तुमची आणि माझ्या ताईची वाट पाहते आहे. तुम्हांला आजपर्यंत आम्ही कधी बोलाविले नाही, म्हणून रागावलात का? तुम्ही किती मोठे आणि श्रीमंत असला तरी आपले नाते कधी सुटते का? आम्ही गरीब आहो, म्हणून तुम्ही आलां नाहीत तर ते नाही मला आवडणार! मी तुम्हां दोघांना बरोबर घेऊन जाऊनच परतणार!"

शिवराम म्हणाला ते त्या दगडाच्या देवाला कळले की नाही, शिवरामला कळले नाही. तो आपली बहीण भ्रमरांबेच्या देवळात गेला आणि तिला घरी येण्यासाठी खूप आळविले. शेवटी तो अगदी निराश झाला आणि त्याने डोंगराच्या कड्यावरून उडी मारून आत्महत्या करण्याचे ठरविले. एकटा परत गेला तर इतर सवंगड्यांसमोर त्याची मान खाली होईल. तो अपमान त्याला असह्य वाटला. त्याऐवजी आपल्या ताईसमोर आणि मेहुण्यासमोर त्याने आपला शेवट करून घेतला तर त्याचे पाप त्या दोघांच्या शिरांवर येईल असे त्याला वाटले.

असा विचार करून शिवराम डोंगराच्या कड्यावर जाऊन उभा राहला. इतक्यात कोणी तरी पाठीमागून येऊन त्याच्या दोन्ही खांद्यावर हात ठेवले. त्याच्या एका बाजूला एक पुरुष व दुसऱ्या बाजूला एक स्त्री होती.

"कोण तुम्ही? माझ्या ताईला व मेहुण्यांना माझी फिकीर नाही तर तुम्ही का आलां मला मध्ये अडवायला?" शिवरामने विचारले.

"शिवराम! अरे, मीच तुझी ताई भ्रमरांबा आणि हे तुझे मेहुणे! तू पूर्वी कधी आम्हांला पाहिले नाहीस म्हणून ओळखले नाहीस. कोणी तरी आम्हांला सांगितले की सोमदेवांचा मुलगा इकडे आला आहे, म्हणून आम्ही हुडकत आलो." ती स्त्री म्हणाली.

शिवरामने आनंदाने दोघांना नमस्कार केला. त्यांनी शिवरामची आणि गणपती व कुमारस्वामीची ओळख करून दिली. शिवरामने आपल्या भाच्यांना दिवाळीला त्याच्या घरी यायचे बोलावणे केले. त्यांनी होकार दिला.

तिकडे शिवराम दिसला नाही तेव्हां त्याच्या आईने पुष्कळ चवकशी केली. तिला एक शंका आली की मुलगा आपल्या ताईला आणि मेहुण्यांना आणण्यासाठी श्रीशैलक्षेत्री तर गेला नसेल!

काही दिवस लोटले. दिवाळी आली. शिवराम घरी येऊन आईला म्हणाला—"आई! मी ताईला, मेहुण्यांना आणि आपल्या भाच्यांना बरोबर बोलावून घेऊन आलो आहे आणि ते सर्व गावातल्या देवळाजवळ वाट पाहात आहेत. शिवरामची आई त्याच्याबरोबर धावत देवळात गेली. पार्वती-परमेश्वर आणि गणपती व कुमारस्वामी सर्वांना तिने घरी येण्याबद्दल फार आग्रह केला. सर्व घरी आले तोपर्यंत घराचे रूपच बदलले होते. लहानशा घराच्या जागी त्यांना एक सुंदर महाल दिसला. पाहुण्यांसह शिवराम व त्याच्या आईने घरात प्रवेश केला. गावकरी तो दिव्य महाल पाहून आश्चर्य चकित झाले. त्या महालाचे बाहेरचे मुख्य द्वार बंद होते. परंतु आत पुष्कळ लोक असल्याचा भास होत होता.

दिवाळीच्या दिवशी शिवरामच्या घरी पाहुणे म्हणून आलेले शिवपार्वतीच ते. त्यांनी मायलेकांना बरोबर घेऊन कैलास लोकी गमन केले.





# १३४. ड्रॅगन वृक्ष

कॅनरीज द्वीपसमूहात टेनरीज नावाचे एक द्वीप आहे. त्या बेटावर पन्नास फूट परिघाचे वृक्ष आहेत. त्यांना "ड्रॅगन" वृक्ष म्हणतात. हे वृक्ष दीर्घकाळ वाढत असतात. असे सांगतात की या चित्रात दिलेल्या वृक्षाचे वय ३००० वर्षांचे आहे. या वृक्षातून जो द्रव पदार्थ निघतो तो रस थोर पुरुषांची प्रेते वर्षानुवर्षे जशीच्या तशी ठेवण्यास फार उपयोगी पडतो.



# चांदोबा

संस्थापक : नागिरेड्डी
संचालक : 'चक्रपाणी'

मे महिना हा लग्नामुंजींचा–हास्य विनोदाचा वैशाख महीना. परंतु दुष्काळाची काळी छाया सर्वत्र पसरली आहे. माणसे व गुरे 'त्राहित्राहि' म्हणत आकाशाकडे डोळे लावून आहेत. वरुणदेवाची कृपादृष्टी केव्हां वळते, वाट पहात आहेत. लवकर अमृतवृष्टी होवो आणि 'सुजलाम् सुफलाम्'चा घोष करीत भारतमातेला वन्दन करण्यास आनंदाचा दिवस उदयास येवो, अशी प्रार्थना त्या परमपित्या परमेश्वराजवळ आपण सर्व मिळून करूं या.

वर्ष : २२ मे १९७३ अंक : ११



# अमरवाणी

सुजनो न याति वैरम्
परहितनिरतो विनाशकालेपि,
छेदेपि चंदन तरु:
सुरभयति मुखम् कुठारस्य । ॥ १ ॥

[ सज्जन दुसऱ्याचे हित व्हावे यासाठीच झटतो त्याचा स्वत:चा सर्वनाश व्हायची वेळ आली तरी देखील कोणाशी वैर करीत नाही. चंदनाचेच (उदाहरण) घ्या, ज्या कुऱ्हाडीने तो कापला किंवा तोडला जातो तिला तो आपला सुवास देतो. ]

विसृज्य शूर्पव दोषान्
गुणान् गृह्णति साधव: ;
दोषा नेव तु गृह्णति
चालिनी वतु दुर्जना । ॥ २ ॥

[ सूप टरफले व कोंडा उडवून टाकते (व दाणे तेवढे ठेवून घेते) त्याप्रमाणे साधू अवगुण टाकतात व फक्त गुण ग्रहण करतात; आणि दुर्जन चाळणीसारखे दोषच ग्रहण करतात. ]

खल: सर्षप मात्राणि परच्छिद्राणि पश्यति,
आत्मनो बिल्व मात्राणि पश्यन्नपि न पश्यति । ॥ ३ ॥

[ दुष्ट मनुष्याला इतरांचे दोष मोहरीराई एवढे असले तरी दिसतात आणि स्वत:चे दोष बेलफळाएवढे असले तरी दिसत नाहीत. ]

सज्जन-दुर्जन



# अभिषेकाचा हत्ती

सहस्रावधी वर्षांपूर्वीची गोष्ट आहे. श्रीपुर राज्याच्या गादीवर अशोकवर्मा नावाचा राजा राज्य करीत असे. त्याच्या राज्यात दरवर्षी युद्धकलेच्या चढाओढी होत. जे शूर लोक आपले प्राविण्य दर्शवीत राजा त्यांना आपल्या दरबारी स्थान देई. अशातऱ्हेने स्थान मिळविणारात रविवर्मा नावाचा योद्धा होता.

राजा अशोकवर्मा याला कोणी मूलबाळ नव्हते आणि एकाएकी त्याला मरण आले. म्हणून त्याच्या मागून गादीला वारस कोण, हे तो सांगू शकला नाही. त्याच्या दरबारात राजा होण्याची योग्यता असलेले अनेक लोक होते. परंतु मंत्री त्यापैकी कोणालाही गादीवर बसविण्यास कचरत होता. कारण जर कोणाला गादीवर बसविले तर सर्व त्याचे शत्रूच होतील. म्हणून मंत्र्याने वृद्ध राजगुरूचा सल्ला घेतला. राजगुरू म्हणाले–

"मंत्रीवर्य ! ही जबाबदारी आपण स्वत:वर कशाला घ्यायची ? वंशानुवंशे चालून आलेल्या परंपरेप्रमाणे राज्याभिषेकाचा हत्ती आहे, त्याच्या सोंडेत एक फुलांचा हार देऊन त्याला सोडा. तो ज्याच्या गळ्यात हार घालील तो आपला राजा."

मंत्र्याला तो सल्ला पसंत पडला. जो राजा निवडला जाईल त्याच्याशी कोणाचे वैर होण्याचे कारणच नाही. राजगुरूने एका पंधरवड्यानंतर चांगला मुहूर्त असल्याचे सांगितले. म्हणून मंत्र्याने जाहीर केले की अभिषेकाचा हत्ती ज्या कोणाच्या गळ्यात अभिषेकाची माळ घालील तो गादीचा अधिकारी होईल.

ही गोष्ट कळल्यावर काही लोक निराश झाले तर काही लोकांच्या मनात नवीन आशा उत्पन्न झाली. रविवर्मा निराश झाला. कारण तो मयत राजाच्या अत्यंत

कु. शोभा स. सुळे

विश्वासपात्र व स्वामिभक्त सेवकांपैकी एक होता. राजा गुप्तपणे त्याला बोलावून राज्यकारभारात त्याचा सल्ला घेई व ती गोष्ट कळू न देण्याची काळजी बाळगीत असे. कारण कोणाला मत्सर अगर हेवा वाटू नये. राजाने मरण येण्यापूर्वी मंत्र्याला, रविवर्मालाच गादीला वारस नेमण्यास सांगून ठेवले असते. परंतु ती गोष्ट अभिषेकाच्या हत्तीला कशी काय कळणार? असा विचार करून रविवर्मा दु:खी झाला.

परंतु राज्याभिषेक व्हावा म्हणून लोभ करणारी अगदी निराळीच व्यक्ती होती. त्या हत्तीचा राखणदार एक माहूत होता त्याने विचार केला की त्याच्या गळयात माळा घालायची संवय हत्तीला करून ठे[illegible] अभिषेकाच्या दिवशी इतर कोणाच्या गळयात माळ न घालतां आपल्याच गळयात घालील व आपल्याला गादी मिळेल. अभिषेकाला एक पंधरवडा उरला होता. तेवढा अवधी हत्तीला संवय होण्यास पुरे होता.

हत्ती बांधण्याची जागा एका वाड्या सभोंवारच्या उद्यानात होती. माहूत जाई आणि फुले तोडून त्याची माळा ओवून हत्तीच्या सोंडेत देई. हत्ती शिकविल्याप्रमाणे माहूताच्या गळयात माळ घालू लागला.

ज्या उद्यानातून माहूत फुले तोडून नेई ते उद्यान रविवर्माच्या महालाच्या सभोवारचे उद्यानच होते. रविवर्मा दररोज [illegible] नेई. त्याच्या आधी कोणीतरी फुले तोडून नेत असल्याचा संशय त्याला आला. म्हणून एक दिवशी फुले तोडणाऱ्या चोराच्या पाळतीवर तो बसून राहिला.

माहूत पहाटेच्या अंधुक प्रकाशात भिंत ओलांडून उद्यानात आला आणि फुले तोडून निघून गेला. नंतर रविवर्माने भिंतीवरून पलीकडे वांकून माहूत काय करतो ते पाहिले, तेव्हां माहूत फुलांची माळ ओवीत असल्याचे दिसले. नंतर ती माळ घेऊन माहूत काय करतो हे पाहण्यासाठी तो तेथेच बसून राहिला.

पुष्कळशा माळा ओवून तयार झाल्यावर माहूत त्या माळा एकेक करून स्वत:च्या गळयात घालायला हत्तीला शिकवीत असल्याचे रविवर्माने पाहिले. माहूत भिंतीकडे पाठ करून उभा असल्यामुळे त्याला रविवर्मा दिसत नव्हता, परंतु हत्तीला चांगला दिसत होता. म्हणून हत्ती रविवर्माला पाहून त्या बाजूला माळ घेऊन निघाला. माहूताने चकित होऊन पाठीमागे वळून पाहिले. परंतु रविवर्मा त्यापूर्वीच भिंतीवरून उडी मारून निघून गेला. कोणी तरी आपले गुपित पाहिले आहे असा माहूताला संशय आला. म्हणून त्या दिवसापासून त्याला हत्तीला शिकविणे शक्य झाले नाही.

राजाची निवड करण्याचा मुहूर्त जवळ येऊन ठेपला. हत्तीच्या सोंडेत माळ देऊन





माहूत राजवाड्याकडे त्याला घेऊन आला. काही तरी क्षुल्लक कारण काढून माहूत हत्तीच्या समोर येऊन उभा राहिला. परंतु हत्तीने त्याच्या गळ्यात माळ घातली नाही. तो आणखी कोणाची तरी वाट पहात असल्यासारखा दिसला. त्याला एका जागी रविवर्मा दिसताच हत्ती चीत्कार करीत रविवर्मा होता तिकडे निघाला आणि त्याच्या गळ्यात माळ घातली. म्हणून रविवर्माचा राज्याभिषेक झाला.

त्यानंतर एकदा माहूताने रविवर्माला एकांतात भेटून विचारले—"महाराज! आपण क्षमा कराल तर मी एक प्रश्न विचारावा, असे म्हणत आहे!"

"विचार!" रविवर्मा म्हणाला.

"मी स्वतः राजा होण्याच्या इच्छेने अभिषेकाच्या हत्तीला माझ्या गळ्यात माळ घालण्यास शिकवीत असे. परंतु हत्तीने ऐन वेळी माझ्या गळ्यात माळ न घालता आपल्या गळ्यात कशी काय घातली?" माहूताने विचारले.

रविवर्मा स्मित [illegible] म्हणाला—"हे पह[illegible] हत्तीला [illegible] गोष्टी शिकवीत आलास त्या स्वतःला दृष्टीसमोर ठेवून. कधी द्यायच्या घ्यायच्या गोष्टी तू हत्तीला शिकविल्या नव्हत्यास. माळ गळ्यात घालण्याची गोष्टदेखील हत्ती शिकला. परंतु ती माळ तुझ्याच गळ्यात घालावयाची आहे, हे हत्तीला कळले नाही. दुसऱ्याच कोणाला देण्यासाठी तू शिकवीत आहेस असे हत्तीला वाटले असावे. एकदा त्याने तुझ्या गळ्यात माळ घालतांना मला पाहिले होते. माझ्या गळ्यात नेहमीच माळ असते. म्हणून त्याला, माझ्या गळ्यात माळ घालणे सहज नैसर्गिक वाटले असावे आणि त्याने तशी माझ्याच गळ्यात माळ घातली. मी त्याच दिवशी रात्री दुष्ट विचाराने तू हत्तीला आपल्या गळ्यात माळ घालायला शिकवीत होतास हे पाहिले होते. परंतु हत्तीने मला सुद्धा त्या वेळी पाहिले असल्याने माझ्या गळ्यात माळ घालायला तू शिकवीत असावास, हत्तीचा असा समज झाला असण्याची शक्यता आहे.







# काळोखात मेजवानी

तुर्क देशातली ही गोष्ट आहे. एका गावी महंमद आणि झारीना नावाचे नवरा बायको रहात. दोघे गरीब होते. झारीनाला डोहाळे लागले होते. तिला शिरा खावासा वाटला. बिचाऱ्या महंमदला दोन वेळचे पोटभर जेवायला मिळायची मारामार, बायकोला शिरा कोठून आणून देणार? परंतु तरुण बायको आणि त्यात गरोदर होती. तशी तिने फार मोठी इच्छापण दर्शविली नाही. तिने कधी कोणती वस्तु मागितली नव्हती. अगदी पहिल्या प्रथम शिराच मागितला. परंतु तो तयार करून द्यायला शक्ती कोठे होती? तरी त्याने बायकोची तेवढी इच्छा पुरी करण्याचे ठरविले.

आदल्या दिवशी पाऊस पडला होता. म्हणून व्यापाऱ्यांनी ओला झालेला माल रस्त्यावर वाळायला घातला होता. एका जागी रवा वाळत घातलेला होता. तो पाहून महंमद घरी आला. आपला अंगाला बरेचसे तेल लावून त्या गल्लीत परत आला. चालत असतां रवा वाळत घातला होता त्यावर जणुंकाही पाय घसरून तो पडला. त्याने उठण्याचा प्रयत्न करीत सर्वांगाला रवा चिकटवून घेतला आणि घरी आल्यावर अंग झाडून जो रवा मिळाला तो सुपात जमविला. नंतर आंघोळ करून एक पागोटे बांधले आणि तेल्याच्या दुकानात जाऊन महंमदने विचारले—"काय हो, तेल काय भावाने आहे?" असे म्हणत तेलाच्या उघड्या डब्यावर वाकून उभा राहिला. दुकानदाराचे लक्ष दुसरीकडे आहे हे पाहून त्याने चटदिशी थोडे तेल तेलाच्या मापाने काढून आपल्या पागोट्यात ओतून घेतले. दुकानदाराने ओरडून विचारल्यावर त्याची माफी मागून घरी आला. पागोट्यातले तेल एका परातीत पिळून जमा

श्री ग. न. थोरात

केले. आता शिऱ्याला लागणाऱ्या गुळाची व्यवस्था कशी करावयाची या विचारात महंमद गुळाच्या दुकानात गेला. म्हणाला– "आमच्या धन्याला दहावीस ढेपी गुळाच्या घ्यायच्या आहेत. तुमच्या कडचा चांगला माल असेल त्यातला नमुन्यासाठी थोडा गूळ द्या. दोन तीन दुकानातला असाच गूळ मागून घेऊन गरज होती तेवढा ठेवून घेतला आणि बाकी विकून लाकडे घेऊन आला.

शिरा तयार होईहोईतो चांगला काळोख पडला. नवराबायको कोणाला कळू नये या हेतूने दिवा लावल्याशिवाय काळोखातच शिरा खायला बसली. शिऱ्याचे ताट मधोमध होते.

त्याच वेळी नेमका त्यांचा दूरचा बली नावाचा कोणी नातेवाईक आला. घरात काळोख होता तरी नवराबायकोचे बोलणे चालू होते ते ऐकू येत होते. त्याने त्यांच्या बोलण्यावरून परिस्थिती ओळखली आणि बाजूला मुकाट्याने जाऊन बसला आणि ताटातला शिरा खाऊ लागला.

[illegible] हात [illegible] स्परांना लागत होते. परंतु नवराबायकोला वाटले की त्यांचेच हात आहेत. शिरा लवकरच संपला. ताटात चाचपून पाहिले, पण हाताला लागला नाही.

"सर्व शिरा संपला वाटते एवढ्यात?" बायको म्हणाली.

"संपल्यासारखा दिसतो आहे खरा. पण मी सुद्धा कमीच खाल्ला!" नवरा म्हणाला.

"आणि तुमच्याबरोबर मी नाही का खाल्ला?" बली म्हणाला. नवराबायकोने दिवा लावून विचारले–"गृहस्था! तू आल्यावर बोलायचे तरी!"

बायकोला शिरा खायला मिळावा म्हणून महंमदने कायकाय नाही केले? महंमदच्या तोंडी बलीला सर्व कळले तेव्हां त्याला त्या दोघांच्या गरीबीची कींव आली. झारीनाला जे काही हवे होते त्यासाठी पुरेसा पैसा देऊन बली दुसऱ्या दिवशी आपल्या गावी परतला.





# यक्ष पर्वत

[१०]

**[खड्गवर्मा आणि जीवदत्त म्हाताऱ्या पुजाऱ्याला अंधार कोठडीतून सोडवून पडक्या इमारतीतून निघाले. वाटेत पुजारिणीने त्यांना अडविले. खड्गवर्माने तिच्यावर तीर सोडला. त्यानंतर ते मांत्रिक आणि केसाळ भुताच्या बरोबर जंगलात गेले. तेथे त्यांना दुरून डोंगरावरून एक उंट खाली पडत असतांना दिसला. 'पुढे–]**

उंटाला पडत असलेला पाहून खड्गवर्मा व जीवदत्त त्या दिशेने चालू लागले. उंचावरून आदळल्यामुळे उंटाचे पाय मोडलेले होते. बिचारा तडफडत होता. उंटावरचा स्वार आपले गुढगे चोळीत बसला होता. त्याला सुद्धा लागले होते. त्याचे कपडे पाहून खड्गवर्मा व जीवदत्त दोघांना तो लुटेऱ्यांच्या टोळीतलाच असला पाहिजे या गोष्टीबद्दल शंका राहिली नाही.

जीवदत्त त्याच्याजवळ जाऊन म्हणाला– "काय रे चोरा! तुझे नशीब बलवत्तर दिसते आहे एकूण! बिचारा उंट खाली पडला आणि त्याचे पाय मोडले आहेत. तो तडफडतो आहे व थोड्या वेळात मरेल ही. परंतु तू मात्र वांचलास."

लुटेरा गुढगे चोळीत उभा राहण्याच्या प्रयत्नात होता. खड्गवर्मा व जीवदत्तला जवळ येऊन उभे राहलेले पाहून तो थरथर



कांपू लागला. कांपऱ्या आवाजात म्हणाला— "पायां पडतो, मालक! मला जीवदान द्या! गेंडा जातीच्या लोकांची शेते लुटणाऱ्यात मी नव्हतो. माझ्या बोलण्यावर विश्वास नसेल तर स्वर्णाचारीला विचारून खात्री करून घ्यावी."

तो म्हणाला ते ऐकून खड्गवर्मा व जीवदत्त दोघांना आश्चर्य वाटले. त्यावरून स्वर्णाचारी लुटेऱ्यांच्या टोळीतच सुरक्षित असल्याचे त्यांना कळले.

खड्गवर्माने तलवारीचे टोक लुटेऱ्याच्या छातीवर रोखून त्याला दरडावून विचारले— "काय रे! तू खरे बोलणार की या उंटाच्या पाठीवर बसून त्याच्या बरोबर यमलोकी [illegible]णार? गेंडा जातीच्या लोकांची पिके लुटून नेणाऱ्याबरोबर तू नसशील, परंतु ती गोष्ट तुला तुझ्या साथी मित्रांकडून नक्कीच कळलेली असणार. परंतु काय रे आम्हांला पाहील्याबरोबर तू आम्हांला गेंडा जातीच्या लोकांचे मदतगार म्हणून कसे काय ओळखलेस?"

जीवदत्तने खड्गवर्माला तलवार मागे घ्यायला सांगितली. नंतर म्हणाला—"खड्ग-वर्मा! हा आधीच आपल्याला पाहून अर्ध-मेला झाला आहे, त्याला आणखी त्रास कशाला देतोस? शिवाय गेंडा जातीच्या लोकांची गोष्ट आतां फार जुनी झाली आहे." नंतर तो त्या लुटेऱ्याकडे वळून म्हणाला—"काय रे! माझ्या मित्राने तुला विचारले आणि तेच पुन्हां मी विचारतो, तू आम्हांला कसे काय ओळखलेस? म्हणजे तू आम्हांला पूर्वी कोठे पाहिलेस?"

"मालक! मी आपणांला कोठेच पाहिले नाही. माझ्या मित्रांनीं आपल्याला जंगलात पाहिले होते. त्यांनी आपल्या कपड्यांचे वर्णन करून मला सांगितले होते. तुमचे धनुष्य व तलवार वगैरे पाहून मी त्यावरूनच तुम्हांला ओळखले." तो लुटेरा म्हणाला.

"म्हणजे! तू बृहस्पतीच दिसतोस की रे! कोठे तरी एखादे गुरुकुल काढून रहायचे सोडून हा काय धंदा करू लागला आहेस? [illegible] टोळीत कसा काय आलास आणि उंटावर ही शिळा घेऊन कोठे जात होतास?" खड्गवर्माने त्याची थट्टा उडवीत विचारले.

"मालक! आमच्या पुढाऱ्याने एक राजधानी स्थापन करण्याचे ठरवून स्वर्णा-चारीलाच राजधानी निर्माण करण्याचे काम सोंपविले आहे. त्यांच्या आज्ञेने या शिळा आम्ही वर डोंगरावर नेत होतो. वर समतल मैदानात आमच्या राज्याची राजधानी बांधण्याचे काम चालू आहे. आमच्या जवळ उंटच आहेत ह्या शिळा वाहून न्यायला." लुटेरा म्हणाला.



खड्गवर्मा व जीवदत्त दोघे त्या लुटेऱ्याशी बोलण्यात गुंतलेले होते म्हणून त्यांना वर डोंगराच्या शिखराकडे पाहण्याची गोष्ट सुचली नव्हती. शिखरावरच्या लुटेऱ्यांना त्यांचा एक साथी उंटावरून खाली पडलेला दिसला. म्हणून त्यांनी आपापले उंट थांबविले आणि वळून खालच्या बाजूला पाहिले तेव्हां खड्गवर्मा व जीवदत्त उंटा-वरून खाली पडलेल्या त्यांच्या साथीदारा-कडे जात असलेले त्यांना दिसले. दोघां क्षत्रिय तरुणांना पाहून सर्व भीतीने जागच्या जागी थबकले. त्या दोघांनी एकदां त्यांच्या साथीदारांना कसे 'सळो की पळो' करून सोडले होते, ती गोष्ट ते विसरले नव्हते. एका दोघांनी मांत्रिकाला आणि केसाळ भुताला गुहेत कसे पिटाळले होते व त्यांच्या पाठोपाठ दोघे गुहेत कसे शिरले होते, हे देखील प्रत्यक्ष पाहिले होते. म्हणून त्यांच्या पैकी एक जण म्हणाला—"आपला नायक येथे नाही. त्या क्षत्रिय तरुणांनी आपल्याला पाहिले आहे. म्हणून हे दोघे डोंगरावर चढून आपल्यावर हल्ला करतील. तेव्हां स्वतःचा जीव वांचविण्याचा विचार केला पाहिजे."

"स्वतःला वांचविण्याला एक उपाय आहे. स्वर्णाचारीकडे जाऊन त्याला हे सर्व सांगावे आणि तो म्हणेल तसे करावे. स्वर्णाचारी त्यांचाच मित्र आहे, नाही का?



[illegible] करून परतला की त्यांच्याकडून एकेकाची चामडी लोळवितो!"

लुटेऱ्यांपैकी एक जण कांपऱ्या स्वरात म्हणाला—"आमचे नायक नसतात तेव्हां तुम्हीच आमचे नायक! आमचा एक उंट पाय घसरून खाली पडला आणि त्याच्या वरचा स्वार पण खाली आदळला. त्याला पाहून तुमचे जुने मित्र दोघे क्षत्रिय तरुण त्याच्या जवळ गेले आहेत आणि त्याला तलवार दाखवून काही तरी विचारीत आहेत! त्याला आमचा ठाव ठिकाणा विचारून ते आमच्या वर हल्ला चढवायला येतील, अशी आम्हांला भीती वाटते आहे."

क्षत्रिय तरुणांचे नाव ऐकताच स्वर्णाचारीला परमानंद झाल्यासारखे दिसले. तो उठून उभा राहीला. लुटेऱ्यांच्या तोंडून त्यांचे वर्णन ऐकून दोघे त्या प्रदेशात जवळपास कोठे तरी आले असल्याचे त्याला कळले.

स्वर्णाचारी डोंगरावरून खाली उतरतांना लुटेऱ्यांना म्हणाला—"काय रे! तुम्ही मला थोडक्यात तरुण क्षत्रिय आल्याचे सांगितले असतेत तरी चालले असते. बरं तर चला माझ्या पाठोपाठ. तुम्हांला भिण्याचे मुळीच कारण नाही."

[illegible] आम्ही करू! पण काय रे, आमच्या जिवाला त्यांच्यापासून धोका नाही ना?" लुटेऱ्यांनी शंका केली आणि विचारले.

"भित्र्यांनो! तसे भिण्याचे काहीच कारण नाही. त्यांच्याकडून तुमच्या जिवाला मुळीच धोका नाही. मी तुम्हांला वांचविण्यासाठी, पाहिजे तर आपला जीव धोक्यात घालीन. परंतु तुम्ही मी सांगेन तसे सावधगिरीने वागले पाहिजे." स्वर्णाचारीने त्यांना समजावून सांगितले.

स्वर्णाचारीने डोंगराच्या मध्यभागी जाऊन खड्गवर्मा आणि जीवदत्त यांना मोठ्याने हाक मारली. ती हाक ऐकून दोघांनी माना वर करून स्वर्णाचारीकडे पाहिले आणि त्याला ओळखले. त्याच्या पाठीमागे काही लुटेरे उभे असलेले पाहून खड्गवर्मा म्हणाला—"जीवदत्त! मला थोडी शंका वाटते आहे, पद्मपूरचा हा वास्तुशास्त्री आणि यंत्राचा हत्ती बनविणारा स्वर्णाचारी लुटेऱ्यांना सामील तर झाला नसेल? आपण सावधगिरी बाळगली पाहिजे!"

खड्गवर्मा म्हणाला ते ऐकून जीवदत्तला सुद्धा तसेच कदाचित असू शकेल असे वाटले. स्वर्णाचारीला हे लोक त्याच्या इच्छेविरुद्ध उचलून घेऊन आले होते, हे खरे असले तरी, त्यांचा सद्व्यवहार पाहून हा बदलला नसेल कशावरून? असा विचार करून तो म्हणाला—"खड्गवर्मा!

तो कदाचित आपल्याला यांच्या हातातून वांचविण्यास मदत करील. चला!" दुसरा एक जण म्हणाला.

त्यानंतर दहा बारा जण स्वर्णाचारीकडे धावत गेले. त्या वेळी तो किल्लयाचा नकाशा पहात बसला होता. लुटेऱ्यांच्या नायकाने किल्लयाचा एक नकाशा तयार करून त्याला दिला होता व त्याप्रमाणे राजधानीच्या चारी बाजूला कोट तयार करायला सांगितले होते.

आपले काम सोडून लोक वर धांवत येत असलेले पाहून स्वर्णाचारीने त्यांना दरडावून विचारले—"काय रे! काम सोडून वाघ पाठीस लागल्यासारखे इकडे पळत





आपण विन्ध्य पर्वतापर्यंत पोचण्यासाठी निघालो. तेथे पोहचे पावेतो फार सावध राहणे आवश्यक आहे. आपण या बाजूला स्वर्णाचारीला सोडवून आणण्यासाठीच आलो होतो. तरी त्याच्या मनात काय आहे, हे तरी पाहिलेच पाहिजे!" जीवदत्त म्हणाला.

खड्गवर्मा व जीवदत्त परस्परांशी स्वर्णाचारी विषयी तर्कवितर्क करीत असतां तो फक्त तिघांचौघां लुटेऱ्यांना बरोबर घेऊन जवळ आला आणि त्याने दोघांना अत्यंत आदरपूर्वक नमस्कार केला. त्यानंतर त्याच्या बरोबर आलेल्या लुटेऱ्यांनी सुद्धां नमस्कार केला.

जीवदत्तने किंचित हसत स्वर्णाचारीच्या पाठीवर थोपटून म्हटले—"काय रे स्वर्णाचारी! नव्या जागी, नव्या लोकांबरोबर कसे काय चालले आहे तुझे? तू यांच्या नायकासाठी जादूचे हत्ती घोडे तयार करतो आहेस का? आम्हांला वाटले होते की या लोकांच्या कैदेत तुला फार त्रास सोसावा लागत असेल. परंतु तूसुद्धां त्यांचा एक दुय्यम नायक झाल्यासारखा दिसतो आहेस!"

ते ऐकून स्वर्णाचारी एक मिनिटभर आश्चर्यचकित होऊन जीवदत्तच्या मनात काय आहे हे ओळखण्यासाठी त्याच्या तोंडाकडे पहात राहीला. नंतर हात जोडून म्हणाला—"तुम्ही दोघांनी एकदां मला वांचविले होते. मी आयुष्यभर तुमचे ते उपकार विसरणार नाही. आज निरुपाय होऊन यांच्या नायकाच्या आज्ञेने त्यांच्यासाठी एक किल्ला बांधण्याचे काम हाती घेतले आहे. तो पुरा झाल्यावर मी आल्या वाटेने परत जाईन. तेथे विघ्नेश्वर पुजाऱ्याला भेटून आम्ही दोघे पुढील आयुष्य जंगलात कोठे तरी देवाची आराधना करीत घालवू."

विघ्नेश्वर पुजारी गेंडा जातीच्या लोकांबरोबर अरण्यपुरला आहे, अगदी आरामात! येथे तू सुखी आहेस ना? मग आम्ही जातो आपल्या वाटेने आपल्या कामावर?" जीवदत्त म्हणाला.

ते ऐकून स्वर्णाचारी घाबरल्यासारखा झाला व म्हणाला—"म्हणजे तुम्ही एक दिवसदेखील मला तुमची सेवा करायला संधी देणार नाही का? हे नाही मी ऐकणार. आज एक दिवस तुम्ही दोघांनी माझे व समरबाहूचे आतिथ्य ग्रहण केलेच पाहिजे."

"हा समरबाहू कोण रे?" जीवदत्तने चकित होऊन विचारले.

"म्हणजे! तुम्ही यापूर्वी लुटेऱ्यांच्या नायकाचे नाव ऐकले नव्हते तर? सिंधच्या वाळवंटातून उंटावरून आलेल्या लुटाऱ्यांच्या नायकाचे नाव आहे ते. यावेळी तो घरात नाही. दोन अनुयायांना बरोबर घेऊन शिकारीला गेला आहे. बरं तर, चला!" स्वर्णाचारी म्हणाला.

खड्गवर्मा व जीवदत्त निघण्यापूर्वी जखमी होऊन पडलेल्या लुटाऱ्याकडे बोट दाखवून म्हणाले—"याला खांद्यावर उचलून घेऊन यावे लागेल!"

त्यानंतर दोघांनी त्या बिचाऱ्याला उचलून खांद्यावर घेतले आणि सर्व जण डोंगराळ प्रदेशांतल्या लुटारूंच्या राहण्याच्या जागी आले. तेथे अस्वलाचे कातडे अंगात घालून बसलेल्या एका माणसाच्या चारी बाजूला घोळका करून काही लोक बोलत उभे होते. खड्गवर्मा, जीवदत्त आणि



स्वर्णाचारीला येत असलेले पाहून सर्व त्यांच्याजवळ धावत आले.

"हा आरडाओरडा कसला चालला आहे? अस्वलाचे सोंग घेऊन तुम्ही सर्वांनी हा काय खेळ चालविला आहे?" स्वर्णाचारीने सर्वांना दरडावून विचारले.

अस्वलाचे सोंग घेणाऱ्याने स्वर्णाचारीला लवून नमस्कार केला आणि म्हणाला—"स्वर्णाचारी! मी हे सोंग हौशीखातर नाही घेतले. आज सकाळी शिकारीसाठी नायकाबरोबर गेलो होतो. आमच्या नायकाला काही जंगली जातीचे लोक धरून घेऊन गेले आहेत. मी त्यांच्या तावडीतून स्वतःचा बचाव करून पळून आलो आहे."

"समरबाहूला जंगली लोक धरून घेऊन गेले आहेत? म्हणतां काय? अशा शौर्यशाली वीराला बंदी करणारे जंगली लोक कोठे आहेत?" खड्गवर्माने स्मित करून विचारले.

"खड्गवर्मा! तो किती दुष्ट असला तरी त्याच्याहून दुष्ट लोकांच्या हाती सांपडला आहे. तू थट्टा उडविणे बरोबर नाही. तो बिचारा आतां कोणत्या स्थितीत आहे, कोणास ठाऊक?" जीवदत्त म्हणाला.

लुटेऱ्यांचा नायक जंगली लोकांच्या हातात बंदी झाल्याचे कळताच स्वर्णाचारीला काय करावे सुचेना. त्याची वाचाच बंद झाली व सर्वांगाला घाम सुटला. तो लुटेऱ्यांच्या हाती बंदी झाला होता तेव्हां त्याची जी दुर्गत झाली होती ती त्याला आठविली. परंतु सुदैवाने लुटेऱ्यांनी त्याच्याशी हळूहळू औदार्य दर्शविले आणि त्याला नीट वागविले. एवढेच काय पण समरबाहू त्याचा एक चांगला मित्र झाला होता. तो दोघां क्षत्रिय वीरांना म्हणाला–"ही गोष्ट ऐकूनच माझ्या अंगाचा थ[illegible] आहां! काय वाटेल ते करून समरबाहूला सोडवा."

जीवदत्तने खड्गवर्माकडे त्याचा विचार जाणून घेण्यासाठी पाहिले. खड्गवर्मा मान फिरवून उभा राहला व म्हणाला–"जीवदत्त! याविषयी तूच काय ते ठरव. आपला मित्र स्वर्णाचारी, त्याने विनंती केली आहे. त्याला वांचवायचे का? तू म्हणशील तर!"

जीवदत्त क्षणभर विचार केल्यावर अस्वलाचे सोंग करून आलेल्या माणसाला म्हणाला–"काय रे त्या जंगली लोकांनी तुझ्या नायकाला आणि इतर लोकांना कसे काय कैद केले? झाले काय? सर्व नीटनीट सांग!"

अस्वलाचे सोंग करून आलेला लुटेरा म्हणाला–"मालक! सर्व गोष्टी मी थोडक्यात सांगतो. आपण लवकर निघाला नाही आणि आमच्या नायकाला वांचविले नाही तर ते नरभक्षक जंगली लोक नायकाला जिवंत जाळून खातील!" (क्रमशः)





# गरीबीतही गर्व

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ परत आला आणि प्रेत खांद्यावर काढून घेऊन नेहमीप्रमाणे मौनपणे स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा! तुझा हट्ट पाहून मला आनंदच होत आहे. परंतु मी सांगून ठेवतो कधीकधी हा हट्ट जीवघेणा असतो. त्याचे उदाहरण म्हणून मी तुला किशुकची गोष्ट सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

मणिपूर राज्यात किशुक नावाचा एक अत्यंत गरीब मनुष्य रहात असे. त्याला घरदार नव्हते, कोणी नातेवाईकही नव्हते. सामान्यपणे गरीबीत दिवस घालविणारा मनुष्य मेहनत मजुरी करून किंवा भीक मागून आपला उदरनिर्वाह चालवितो. परंतु किशुक या दोन्हींपैकी एकही करीत



नसे. कोणी स्वत: होऊन त्याला काही खायला आणून दिले तरच तो खाई, नाही तर पाणी पिऊन स्वस्थ पडून राही.

त्याच्या या विचित्र वागणुकीला लोक गर्व मानीत. म्हणत, ज्याला स्वत:च्या पोटासाठी दुसऱ्याच्या तोंडाकडे पहावे लागते त्याने इतका गर्व कां करावा? परंतु काही दयाळू लोक त्याला बोलावून घेऊन जात व पोटभर जेवायला वाढीत. म्हणूनच कदाचित किशुक कोणाच्या घरासमोर उभा राहून भीक मागत नसे. कोणी खायला दिले तर खाई, नाही तर उपाशी पडून राही.

किशुक राजवाड्यासमोरून येई जाई तेव्हां राजाचे नोकर त्याच्याकडे बोट दाखवून राजाला सांगत—"तो पहा, गर्विष्ठ भिकारी किशुक!" म्हणून एक दिवशी त्याची परीक्षा घ्यायचा विचार अचानकपणे राजाच्या मनात आला.

एक दिवशी संध्याकाळी राजाला गच्चीतून राजोद्यानातल्या ओट्यावर भुकेने थकलेला आणि दीनवाण्या स्थितीत असलेला किशुक दिसला. तीन चार दिवसात त्याला खायला प्यायला न मिळाल्यामुळे त्याचा चेहरा उतरलेला होता.

राजाने एका नोकराला बोलावून आणि किशुककडे बोट दाखवून आज्ञा केली—"तू उद्यानातल्या त्या गरीब माणसाला पोटभर खायला घालायला सांग!"

राजाच्या आज्ञेप्रमाणे नोकराने किशुकसमोर ताट वाढून नेऊन ठेवले आणि प्यायला एक पेलाभर दूध नेऊन दिले.

किशुकला भूक लागली होती खरी, परंतु तो गर्विष्ठ होता. म्हणून त्याने, अन्नाला हात लावण्यापूर्वी, 'ते कोणी पाठविले आहे?' असे विचारले.

नोकर म्हणाला—"महाराजांनी!" आणि महालाच्या गच्चीकडे बोट दाखविले.

किशुकने महालाच्या गच्चीकडे मान वर करून एकदा पाहिले, परंतु त्याला कोणी दिसले नाही. परंतु त्याला भूक लागली होती, म्हणून ताटांत वाढून आणले होते [illegible] सर्व [illegible] टाकले [illegible] नोकराला म्हणाला— राजाला माझे आभार कळव."

नोकर त्याला राजाने सांगून ठेवल्याप्रमाणे त्या गरीब माणसाला म्हणाला—"उद्यापासून तू उपाशी वणवण फिरण्याचे कारण नाही. राजाचा तुझ्यावर अनुग्रह झाला आहे. म्हणून दररोज किंवा तुला भूक लागली म्हणजे तू राजवाड्यात येऊन पोटभर खाऊन जात जा."

परंतु किशुकचा चेहरा अपमान झाल्यासारखा लाल झाला. काही बोलल्याशिवाय तो तेथून निघून गेला. तरी खोल मनात त्याला थोडा गर्वच झाला की राजाची मर्जी त्याच्यावर झाली आहे. त्या दिवसापर्यंत त्याला जेवायला वाढणारे किंवा खायला देणारे सामान्य लोकच होते. परंतु त्यादिवशी पहिल्याने त्याला महाराजांचे आदरातिथ्य लाभले होते.

दुसऱ्या दिवशी किशुक दिवसभर हिंडत राहिला. परंतु त्याला कोणी बोलावून खायला दिले नाही. तिसऱ्या दिवशी संध्याकाळपर्यंत तो उपाशीच गांवभर हिंडत राहीला.

तिसऱ्या दिवशी अंगात त्याला काही त्राण न उरल्यासारखे झाल्यावर तो पुन्हां राजोद्यानातल्या ओट्यावर जाऊन पडून राहीला.

त्या दिवशी राजाच्या नोकराने ताट वाढून आणले. त्यात मांस, फळफळावळ





व खीर पण होती. किशुकसमोर ताट ठेवीत नोकर म्हणाला–"मी तुला येथे दररोज जेवायला मिळेल असे सांगितले होते ना? मग गेले दोन दिवस तू कां नाही आलास?"

"मला या उद्यानात येऊन पडून राहायला आवडते हे खरे आहे. परंतु मी येत नाही. कारण, राजाला कदाचित वाटेल की मी फक्त पोट भरायला इकडे येतो." किशुक म्हणाला.

त्यानंतर त्याने ताटांत जे काही वाढून आणले होते ते सर्व खाऊन टाकले आणि काही बोलल्याशिवाय निघून गेला. पुन्हां एक आडवडाभर तो त्या बाजूला फिरकला नाही. एका आडवड्याने तो उद्यानात येत होता तेव्हां त्याचे पाऊल पुढे पडत नव्हते, इतका थकलेला होता. या खेपेस राजाने स्वत:साठी जो सैंपाक तयार झाला होता त्याचे ताट वाढून नोकराकरवी किशुककडे पाठविले. ताटातल्या पंचपक्वान्नांचा दुरूनच गोड वास येत होता.

त्या दिवशी खाऊन पिऊन किशुक निघाला तो दहा दिवस त्या बाजूला फिरकला नाही. तो उपाशी मेला तर नाही हे पाहून येण्यासाठी राजाने आपल्या नोकरांना पाठविले. किशुक हाडांचा सापळा होऊन पडलेला एका जागी नोकरांना दिसला. नोकर त्याला उचलून घेऊन आले. त्याला त्या स्थितीत पाहून सर्वांना त्याची दया आली.

राजाचे डोळेदेखील पाणावले. तो किशुकला म्हणाला–"किशुक! मला क्षमा कर!"

तेव्हां किशुक म्हणाला–"महाराज! चूक आपली नाही, माझी आहे!" असे म्हणत त्याने जे डोळे मिटले ते पुन्हां उघडले नाहीत.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला–"राजा! किशुक, राजाने एवढे औदार्य दाखवून दिलेल्या पौष्टिक अन्नावरही मरणाच्या दशेस कसा काय पोंचला? [illegible] सांगितली? किशुकने ती चूक त्याची स्वत:चीच असल्याचे कां सांगितले? या सर्व प्रश्नांची उत्तरे माहीत असून तू दिली नाहीस तर परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

तेव्हां विक्रमादित्य म्हणाला–"गावातले लोक त्याला जे काही खायला देत त्यावर किशुकची भूक भागत असे. परंतु राजवाड्यातली पंचपक्वान्ने खाऊ लागल्यावर त्याला इतरांनी दिलेले सामान्य अन्न आवडेनासे झाले. त्यामुळे तो उपाशी राहून अशक्त होत गेला असावा.

राजा किशुकची परीक्षा घेण्यासाठी त्याला जेवायला वाढीत असे, त्याच्यावर दया करून नाही. किशुकच्या गर्विष्ठपणाची राजाने परीक्षा घेतली होती. त्याला वाटत होते की त्याने दिलेले पंचपक्वान्नाचे जेवण जेवायला किशुक दररोज उद्यानात येईल आणि तो आपला हट्ट सोडील. सुरवातीला तसे वाटू लागले होते. कारण फक्त जेवायलाच किशुक दोनदा उद्यानात आला होता. परंतु आपण वाढू लागलो आहो असे किशुकला वाटल्याबरोबर हट्टाने तो उपाशी मरण्यास तयार झाला. तो इतके साहस करील, असे राजाला कधीच वाटले नाही. राजाने घेतलेल्या परीक्षेमुळेच किशुकचा मृत्यू झाला. ती आपली चूक होती असे वाटल्यावरून राजाने त्याची माफी मागितली. किशुकने स्वत:ची चूक मान्य केली, त्याचे कारण तो दोन तीन वेळां जेवायला आला आणि त्याच्यावर राजाची मर्जी झाली आहे असे त्याला वाटू लागले होते. नाही तर तो संवयीप्रमाणे सामान्य अन्नावर जगू शकला असता. त्याची खरी चूक म्हणजे, राजा त्याच्या गर्विष्ठपणाची व हट्टाची परीक्षा घेत आहे, हे त्याला कळले नव्हते."

अशा तऱ्हेने राजाचे मौनभंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)



# मूर्ख राजा

फार पूर्वी त्रिचनापल्ली येथे शूरसेन नावाचा राजा राज्य करीत असे. तो मूर्ख होता, परंतु त्याचा मंत्री फार चतुर होता.

एकदा राजाने कावेरीनदीच्या काठी जाऊन नदी पूर्वेकडे वाहात असलेली पाहिले. त्याने मंत्र्याला बोलावून आज्ञा केली–"आपल्या राज्याच्या पूर्वेला आपल्या शत्रूचे तंजोरचे राज्य आहे. आपल्या देशातून जाणाऱ्या या नदीवरच त्यांची पिके अवलंबून आहेत. नदीवर आडवा बांध बांधून शत्रूच्या राज्यात दुष्काळ येईल असा उपाय करू या."

मूर्खराजाला समजावून सांगून काही उपयोग नाही, असा विचार करून मंत्र्याने एका महिन्याभरात नदीवर आडवा बांध बांधला. पाणी अडले गेले आणि राजधानीभर पाणीच पाणी झाले. प्रजा घाबरली, परंतु राजासमोर तोंड उघडण्याची कोणाची छाती नव्हती. म्हणून त्यांनी मंत्र्याजवळ त्या संकटातून मुक्त होण्यास काही मार्ग काढण्यास विनंती केली. मंत्र्याने त्यांना धीर देऊन पाठवून दिले. नंतर दिंडी दरवाज्यावर पाहरा देणाऱ्याला बोलावून आज्ञा केली की दर तासाला घंटा वाजविण्याऐवजी दर अर्ध्या तासाला त्याने घंटेचे ठोके द्यावे आणि मध्यरात्रीच्या सुमारास उजाडल्याचा चौघडा वाजवावा.

त्याप्रमाने चौघडा वाजताच उजाडण्याची वेळ झाली असे समजून राजा उठला. परंतु सूर्योदय झाला नव्हता. त्याने मंत्र्याला बोलावून "सूर्योदय कां झाला नाही?" विचारले.

मंत्री म्हणाला–"महाराज! आपण नदीचे पाणी अडवून ठेवण्यासाठी बांध घालून ठेवला आहे, म्हणून रागाने तंजोरच्या राजाने सूर्याला बंदी करून ठेवले आहे."

"अस्सं! तर मग लवकर बांध फोडून पाणी सोडा!" राजाने आज्ञा केली.





# चिक्कू व्यापारी

कुंतीपुर नामक गांवी उपल नावाचा एक व्यापारी रहात असे. त्याचा मुलगा विष्णू सुशिक्षित व सुशील स्वभावाचा होता. त्याला बापाचा सावकारीचा धंदा मुळीच आवडत नसे. म्हणून धान्याचे दुकान काढून तो न्याय्य दराने धान्य विकू लागला.

त्याच गावी दीनू चौधरी नावाचा एक घरंदाज व्यापारी रहात असे. त्याच्या एका साथीदाराने त्याला फसविले आणि त्यामुळे दीनू आपले सर्वस्व घालवून बसला.

दीनूची मुलगी लक्ष्मी गुणी व सुशील होती. तिचे लग्नाचे वय झाले होते. परंतु दीनू चौधरीजवळ मुलीचे लग्न करून देण्या-पुरेसे पैसे नव्हते.

तिकडे उपल आपल्या मुलासाठी गडगंज श्रीमंताच्या मुलीच्या शोधार्थ होता. तसे लक्ष्मी व विष्णू नावाप्रमाणेच परस्परांस योग्य वधूवर होते. लक्ष्मीच्या आईने विष्णूला पाहिले तेव्हांपासून त्यालाच आपला जांवई करून घ्यायचे ठरविले होते.

विष्णूने लक्ष्मीला नदीतलावावरून पाणी भरून घेऊन जातां येतां पाहिले होते आणि तिलाच मनाने वरले होते. एकदा दीनूची बायको नवऱ्याला म्हणाली–"एकदां उपल यांच्या घरी जाऊन त्यांना विचारा की, ते आपल्या लक्ष्मीला नक्कीच आपली सूनबाई करून घेतील. आपल्या लक्ष्मीहून जास्त चांगले स्थळ त्यांना तरी कोठून मिळणार?"

"अग! आपली मुलगी सोन्यासारखी असली तरी उपलला ती शिशासारखीच वाटेल. सोन्याने मढवलेली काळ्या दगडाची सून मिळाली तरी तो करून घेईल. आप-ल्यासारख्या गरिबाला का तो आपला व्याही करून घेणार?" दीनू म्हणाला.

श्री ए. सी. सरकार, जादूगार

परंतु दीनूची बायको स्वस्थ बसली नाही. तिने एक दिवशी विष्णूला आपल्या घरी फराळाला बोलावून "लक्ष्मीशी लग्नाला तयार आहेस का?" विचारले.

"मी कबूल आहे, माझी 'ना' नाही. आपली मुलगी हुशार आहे, चांगली आहे. एका काळी आपले घराणे चांगले श्रीमंत घराणे होते, मला माहीत आहे. मला पैशाची मुळीच फिकीर नाही. आपली मुलगी मला पसंत आहे. परंतु माझ्या बाबांची दृष्टी पैशावर आहे, त्यांचे समाधान झाले की ते लक्ष्मीला आपली सून करून घेतील. परंतु कदाचित त्यांच्या मनाचे समाधान करून देणे तुम्हांला शक्य होणार नाही. म्हणून दुसरा काही तरी मार्ग काढला पाहिजे." विष्णू म्हणाला.

[illegible] संभाषण लक्ष्मीचा मामा श्यामगुप्त आड उभा राहून ऐकत होता. तो हुशार व व्यवहारकुशल होता. तो पुढे येऊन म्हणाला—"मी करतो काहीतरी. विष्णु आणि लक्ष्मीचा विवाह जुळवून देणे माझ्याकडे लागले."

दुसऱ्या दिवशी सकाळी श्यामगुप्त उपलच्या घरी त्याला भेटायला गेला. काही वेळ इकडच्या तिकडच्या गोष्टी झाल्यावर त्याने उपलला विचारले—"तुम्ही माझ्या भाचीला, लक्ष्मीला आपली सून कां नाही करून घेत?"

"हे पहा, जे शक्य नाही ते तुम्ही विचारू नये. ज्या घरच्या लोकांना सकाळची [illegible] मुलीला मी आपली सून कशी करून घेऊ म्हणता?" उपल म्हणाला.

तेव्हां श्यामगुप्त म्हणाला—"म्हणजे तुम्हांला माझ्या भाचीला अवगत असलेली अद्‌भुत मंत्रशक्ती माहीत नाही म्हणायाची, साध्या पाण्याला फुंकर मारून ती ते गोड करून दाखविते!"

उपलने आश्चर्यचकित होऊन विचारले—"काय म्हणता?"

"प्रत्यक्ष पाहूनच घ्या, पाहिजे तर! फक्त हुंडाच नका पहात बसू. पैसे काय आज आहेत उद्यां नाहीत. परंतु लक्ष्मी आपली सून होऊन घरात आली तर एक दमडी खर्च केल्याशिवाय गोड पेय तयार करून देईल ती. लक्षावधी रुपये मिळविता येतील." श्यामगुप्त म्हणाला.

पैशाची गोष्ट ऐकतांच उपल म्हणाला—"हे खरे आहे म्हणता?"

"अहो, हातच्या कांकणाला आरसा कशाला? उद्यां स्वतः येऊन परीक्षा करून घ्या. येतांना स्वतःच्या घरचे स्वच्छ ताजे पाणी घेऊन या पेलाभर!" श्यामगुप्त म्हणाला.

त्या दिवशी संध्याकाळी उपल आपल्या बायकोला व मुलाला बरोबर घेऊन दीनू चौधरीच्या घरी आला. विष्णूच्या आईने लक्ष्मीला पाहिले आणि साक्षात् 'लक्ष्मी'लाच पाहिल्यासारखे तिला वाटले. ही मुलगी





आपली सून होऊन यायला आपले भाग्य केवढे 'मोठे असले पाहिजे, असे मनात म्हटले.

उपलने पेलाभर पाणी लक्ष्मीच्या हातात दिले आणि म्हणाला—"तुझा मामा पाणी गोड करून यायला तुला अद्‌भुत मंत्रशक्ती अवगत असल्याचे म्हणाला होता. बघू या तुला मंत्रबळाने पाणी गोड करतां येते का ?"

लक्ष्मी म्हणाली—"पहिल्याने पाणी स्वच्छ ताजे पाणी आहे की गोड आहे ते पिऊन पाहून घ्या."

उपलने पाणी पिऊन साधे पाणी अस-ल्याचे सांगितले. तेव्हां लक्ष्मीने उपलच्या हातातून पेला मागून घेतला आणि ऊन पाण्याला गार करण्यासाठी फुंकर घालतात तसा फूंकर घालून पेला पुन्हां उपलला देत म्हणाली—"पिऊन पहा आता !"

उपलने पाणी पिऊन पाहिले. छान गोड होते. म्हणाला—"मुली! छान गोड आहे पाणी! हा घे तुला रत्नहार! तू माझी सून झालीस !"

[illegible] लक्ष्मी आणि विष्णूचा विवाह झाला. [illegible] चौधरीला काही खर्च करावा लागला नाही. सर्व खर्च उपलनेच केला.

लग्नसोहळा! उरकल्यावर विष्णूने लक्ष्मीला विचारले—"काय ग, त्या दिवशी तू पाणी गोड करून कसे काय दाख-विलेस?"

"सॅकरीनचे बोट लावले होते, आणखी काय? माझ्या मामांनी माझ्या बोटाला सॅकरीन लावून ठेवले होते. बाबांच्या हातातून मी पेला घेतला तेव्हां पाण्यात ते बोट बुडविले होते. म्हणून पाणी गोड झाले!" लक्ष्मी म्हणाली.

"आणि आतां बाबांनी विचारले तर?" विष्णूने विचारले.

"मी सांगेन लग्न झाल्यावर माझे गोत्र बदलले आणि त्याबरोबर मंत्रबळपण निघून गेले. इतर गोष्टी तुम्ही आणि सासूबाई दोघांनी संभाळून घ्या." लक्ष्मी स्मित करून म्हणाली.





# मृत्युपत्र

जेरुसलेम येथे एक प्रसिद्ध व्यापारी रहात असे. व्यापारी परदेशात व्यापारासाठी जाई येई. त्याला एक मुलगा होता. तो एकटाच घरी राहून विद्याभ्यास करी. व्यापाऱ्याबरोबर परदेशात त्याचा गुलाम जात असे.

एकदां परदेशात असतांना व्यापारी एकाएकी आजारी पडला. जिवंत घरी पोचण्याची आशा उरली नाही. त्याला मुलाचे कसे होणार याची काळजी वाटू लागली. काही लिहून गुलामाच्या हाती पाठवावे तर गुलाम ते दाबून टाकील आणि मुलाला घराबाहेर काढून सर्व संपत्ती लुबाडील. अशा परिस्थितीत मृत्युपत्र लिहून पाठवावे तर कसे, हे त्याला कळेना. परंतु बराच वेळ विचार केल्यावर त्याला एक गोष्ट सुचली व त्याने तसे मृत्युपत्र लिहून गुलाम नोकराच्या हाती घरी पाठवायचे ठरविले. काही तरी मार्ग निघाल्याचा आनंद झाला.

त्याने परदेशातल्याच आपल्या व्यापारी मित्रमंडळींच्या सल्ल्याने मृत्युपत्र लिहायला एका हुशार माणसाला बोलावून घेतले. त्याने त्या माणसाला बोलावून आणायला आपल्या गुलामालाच पाठविले. गुलाम त्याला बोलावून घेऊन आला. त्याने व्यापाऱ्याने सांगितल्याप्रमाणे सुंदर अक्षरात मृत्युपत्र लिहून दिले. मृत्युपत्रात व्यापाऱ्याने असे नमूद करविले की त्याचा गुलाम, जमीन जुमला व जेवढा पैसा अडका होता ती त्याची स्वतः मिळविलेली संपत्ती आहे. सर्व संपत्ती गुलामाच्या नांवे लिहिली आहे. तरी मुलाने मृत्युपत्राप्रमाणे ज्याला जे मिळावयाचे असेल ते मिळण्यापूर्वी संपत्तीतले त्याला हवे असेल ते मागून घ्यावे. पुढे लवकरच व्यापारी हृद्रोगाने मरण

पावला. त्यानंतर मृत्युपत्र घेऊन त्याचा गुलाम नोकर जेरुसलेमला परत आला. त्याने मृत्युपत्रात लिहिल्याप्रमाणे मयत व्यापाऱ्याच्या सर्व संपत्तीवर आपला अधिकार सांगितला.

बाप मेल्याचे दु:ख आणि बापाच्या सर्व इस्टेटीवर आपला काही हक्क नाही या गोष्टीचे दु:ख! मुलाला पुढे काय करावे हे सुचेना. त्याने वारसाहक्काप्रमाणे त्याला बापाची सर्व संपत्ती मिळाली पाहिजे असे गुलाम नोकराला सांगितले. पण त्याने त्याला धुडकावून लावले व मृत्युपत्राप्रमाणे सर्व संपत्तीवर त्याचा हक्क असल्याचे सांगितले व म्हणाला–"त्या संपत्तीत तुला जे हवे असेल ते मागून घे!"

व्यापाऱ्याचा मुलगा आपल्या बापाच्या एका वृद्ध मित्राला जाऊन भेटला. त्याने त्याचा सल्ला घेतला. तो मित्र हुशार व चतुर होता. त्याने मुलाने जे सांगितले ते सर्व लक्षपूर्वक ऐकून घेतले आणि म्हणाला–"बाळ! तू काळजी करू नकोस. तुझ्या [illegible] लिहिले आहे. उद्या, आपण न्यायालयात जाऊ. तेथे न्यायाधीश गुलामाला मृत्युपत्र घेऊन हजर रहायला बोलवील. तेव्हां न्यायाधिशासमोर काय बोलायचे ते मी सांगतो. त्याप्रमाणे कर म्हणजे झाले!"

दुसऱ्या दिवशी गुलाम नोकर व व्यापाऱ्याचा मुलगा न्यायालयात हजर झाले. न्यायाधिशाने सर्वासमक्ष मृत्युपत्र वाचवून घेतले आणि मुलाला विचारले–"तू ऐकलेस ना, तुझ्या बापाने मृत्युपत्रात काय लिहिले आहे ते? तेव्हां बापाच्या संपत्तीतले तुला जे हवे असेल ते मागून घे!"

त्याचे उत्तर काय द्यायचे ते वृद्ध मित्राने मुलाला सांगून ठेवले होते. म्हणून तो म्हणाला–"मला हा गुलाम नोकरच हवा आहे!"

न्यायाधिशाने गुलाम नोकराला व्यापाऱ्याच्या मुलाबरोबर जायला सांगितले. अशा तऱ्हेने संपत्तीबरोबर गुलाम नोकर व्यापाऱ्याच्या मुलाला मिळाला.





# वरशोधन

माळव देशाचा राजा मतिमंत याला चंद्रिका नावाची एक रूपवती कन्या होती. मुलगी एकुलती एक होती, म्हणून ती फार लडात वाढली होती. मतिमंताच्या दरबारात विद्वान पंडितांना आदर मिळे. मुलगी विदुषी व्हावी म्हणून त्याने आपल्या मुलीला शिकविण्यासाठी एका विद्वान पंडिताला नेमले होते. मुलीने विद्याभ्यासातही चांगली उन्नती केली होती. रूपाबरोबर विद्वत्ताही असल्यामुळे तिची कीर्ती जवळपासच्या सर्व राज्यांत पसरली.

चंद्रिका लग्नायोग्य झाली तेव्हां राजाने आपल्या मंत्र्यांशी व प्रधानाशी तिच्या योग्य वरशोधनासंबंधी विचारविनिमय सुरू केला. त्यांनी दूत पाठवून सुंदर राजकुमारांच्या तसबिरी मागवून राजकन्येला दाखविल्या. परंतु राजकन्येचा विचार काही निराळाच होता. ती आपल्या वडिलांना म्हणाली–"बाबा! चित्रे पाहून का कोणाची बुद्धिमत्ता किंवा विद्वत्ता कळणार? माझ्याहून कमी विद्वान मुलाशी मी नाही लग्न करणार. तुम्हांला हरकत नसेल तर मी आपल्या योग्य पतीची परीक्षा घेऊन निवड करीन." मंत्र्यांनी होकार दिल्यावर चंद्रिकाने एक श्लोक लिहून राजाच्या हातात दिला व म्हणाली–"बाबा, या श्लोकाचा गूढार्थ सांगू शकेल अशा तरुणाशींच मी लग्न करीन." तो श्लोक असा–

प्रात द्यूत प्रसंगेन
मध्याह्ने स्त्रीप्रसंगत:,
रात्रौ चोर प्रसंगेन
कालो गच्छति धीमताम्

राजाने तो श्लोक सुवर्णाक्षरांनी एका शिळेवर कोरून ठेवून मुलीच्या स्वयंवराची गोष्ट जाहीर केली.

सौ. अनसूया प. मराठे

स्वयंवराची गोष्ट ऐकून अनेक राजकुमार स्वयंवराला हजर झाले. प्रत्येकाने श्लोक वाचून श्लोकाचा अर्थ थोडक्यात असा सांगितला :–

सकाळी द्यूत खेळण्यात, दुपारी स्त्रियांसंबंधी गप्पागोष्टीत आणि रात्री चोरांसंबंधी बोलण्यात बुद्धिमान लोकांचा दिवस निघून जातो.

परंतु चंद्रिकाने श्लोकाचा गूढार्थ तो नसल्याचे सांगून सर्वांना निरोप दिला. त्या श्लोकाचा आणखी अर्थ काय असू शकेल कोणाला कळेना. राजा व राणी दोघे मुलीच्या त्या विचित्र हट्टामुळे कदाचित तिचे लग्नच होते का नाही या काळजीत पडले.

मालव देशाच्या सेनापतीच्या मुलाचे नाव जयसिंह असे होते. तो हुशार होता. त्याच्या मनांत राजकन्येशी विवाह व्हावा असे फार होते. त्याने राजाच्या परवानगीने श्लोकाचा अर्थ सांगण्याची इच्छा दर्शविली. तो राजा व दरबारी लोकांना नमस्कार करून म्हणाला–

"[illegible] आपल्या वेळेचा कसा उपयोग करतात हे या श्लोकांत सांगितले आहे. द्यूतसंबंधी प्रसंगाचा अर्थ महाभारत वाचन आहे. कारण द्यूत झाले नसते तर महाभारत घडले नसते. तसेच स्त्रियांसंबंधी प्रसंगाचा अर्थ रामायण आहे. मंथरेने कैकेयीला सल्ला दिला म्हणून तिच्या हट्टामुळे रामाला राज्य मिळाले नाही. त्याला वनवासात जावे लागले आणि सीतेचे हरण झाले म्हणून रामरावण युद्ध झाले. स्त्रियांसंबंधी प्रसंगाचा अर्थ रामायणवाचन असा झाला. चोरासंबंधी प्रसंगाचा अर्थ श्रीकृष्ण कथा–म्हणजे कृष्णावताराची भागवत कथा आहे. कारण कृष्णाने 'माखनचोर', 'दधीचोर' अशी अनेक नावे गोपींकडून मिळविली होती. याप्रमाणे सर्व श्लोकाचा अगदी निराळा अर्थ होतो."

जयसिंहने लावलेला अर्थ चंद्रिकेने मान्य केला आणि तिने त्याच्या गळ्यात वरमाळा घातली. त्या दोघांचा विवाह सुमुहूर्तावर राजाराणीने करून दिला.





# उडणारा घोडा

[ ३ ]

सुलतानाला वाटत होते की उजाडल्यावर सर्व सैन्य समोर पाहूनच कमाल भयभीत होईल. सैन्य त्याला घेरून कैद करील किंवा ठार करील. अशा तऱ्हेने शाहजादीवरचे संकट टळेल. म्हणून सुलतानाने एका खुजाच्या हाती वजिराकडे निरोप धाडला की ससैन्य येऊन उजाडतांच राजमहालाला वेढा घालावा आणि [illegible] शाहजाद्याला कैद किंवा ठार करावे.

उजाडल्यावर सुलतानाने शाहजाद्यासाठी एक चांगला घोडा तबेल्यातून घेऊन यायला शिपायाला पाठविले.

ते ऐकून कमाल स्मित करून म्हणाला– "मी ज्या घोड्यावर बसून तुमच्या राज्यात प्रवेश केला त्याच घोड्यावर बसून मी युद्ध करणार आहे. मला दुसऱ्या घोड्याची मुळीच गरज नाही."

"तुझी मर्जी!" सुलतान म्हणाला.

नंतर दोघे महालाबाहेर मैदानात आले. तेथे सुलतानाची फौज युद्धाच्या तयारीने उभी करण्यात आली होती.

सुलतान आपल्या फौजेला समोर उभी पाहून म्हणाला–"सैनिक हो! हा तरुण युवक शाहजादीशी लग्नाच्या इच्छेने आपल्या राज्यात शिरला आहे. हा सुंदर तरुण आहे, शूर व साहसी आहे. हा एकटा सर्वांबरोबर एकदम युद्ध करून सर्वांचा पराभव करणार आहे. तुम्ही एक असा की एक लाख तो म्हणतो सर्वांशी तो युद्धाला तयार आहे. म्हणून तो तुमच्यावर हल्ला करील तेव्हां तुम्ही जरा सुद्धां मागेपुढे न पाहतां याला चारी बाजूने घेरा आणि कैद किंवा ठार करून माझ्यासमोर हजर करा. हा गर्विष्ठ आहे. याचा गर्व उतरला

पाहिजे. परंतु सावधपणे आणि धैर्याने याच्याशी युद्ध करा."

नंतर सुलतान कमालला म्हणाला– "ठीक तर ये आणि आपला शौर्यपराक्रम काय तो दाखव! नाही तर मी तुझ्या समोरच माझ्या सैन्याने काय करायचे ते सांगितले आहे. तू या सैन्याला जिंकले नाहीस तर तुझी जी गत होईल, तुला माहीतच आहे."

कमाल सुलतानाला म्हणाला–"आपण न्याय्य युद्ध करणार आहां की अन्याय्य, तुम्हीच ठरवा. मी पायी एकट्याने तुमच्या सैन्याशी कसा काय युद्ध करू म्हणता?"

"मी तुझ्यासाठी घोडा आणवायला सांगितले होते, पण तूच नकार दिला [illegible] मी [illegible] तयार आहे." सुलतान म्हणाला.

"मला तुमच्या घोड्याची गरजच काय? मी ज्या घोड्यावर बसून तुमच्या राज्यात आलो त्याच घोड्यावर बसून मी युद्ध करणार!" कमाल म्हणाला.

"तो घोडा कोठे आहे, सांग, मागवून देतो." सुलतान म्हणाला.

"आपल्या महालाच्या गच्चीवर आहे!" कमाल म्हणाला.

सुलतान आश्चर्यचकित होऊन काही वेळ कमालकडे पहात उभा राहिला. नंतर त्याने त्याला विचारले–"माझ्या महालाच्या गच्चीवर? अरे तो वर कसा काय जाईल? [illegible] तुझे डोके फिरले तर नाही?"

"मी बरळत नाही की माझे डोके फिरलेले नाही. आपण पाहिजे तर कोणाला गच्चीवर जाऊन पाहून यायला सांगा." कमाल म्हणाला.

"तू म्हणतोस म्हणून मी आपल्या एका नोकराला पाठवून पाहून यायला सांगतो." असे सांगून सुलतानाने सेनापतीला आज्ञा केली–"सेनापती! तुम्ही स्वत: महालाच्या गच्चीत जाऊन पाहून खात्री करून या. तेथे घोडा दिसला तर त्याला घेऊन या."

कमाल म्हणाला ते सर्व शिपाई ऐकत होते. ते चकित होऊन परस्परांशी बोलू लागले–"घोडा जिना चढून वर गच्चीवर कसा काय गेला बुवा! अशक्य! या माणसाचे डोके नक्कीच फिरले आहे."

तिकडे सेनापती जिना चढून गच्चीवर गेला. तेथे त्याला एक अत्यंत सुंदर घोडा दिसला. पण तो लाकडी घोडा होता. त्याच्या अंगावर जागोजागी हस्तीदंती काम केलेले होते. तेव्हां सेनापती आणि त्याच्या बरोबर गेलेले शिपाई आपसांत बोलू लागले–"नक्कीच त्या तरुणाचे डोके फिरलेले आहे. तरी तो घोडा घेऊन गेलेच पाहिजे आणि त्याच्या गोष्टीचा उलगडा करून घेतला पाहिजे. चला तर उचला, घेऊन जाऊ या सुलतानांकडे!"

त्यांनी तो लाकडी घोडा उचलून सुलतानासमोर नेऊन ठेवला. सुलतानाने





चकित होऊन विचारले–"तू म्हणालास तो घोडा हाच का?"

"होय! याच घोड्यावर चढून मी आलो होतो आणि या घोड्यात विशेष काय आहे, हे मी तुम्हांला दाखवितो." कमाल म्हणाला.

"तरमग बस घोड्यावर!" सुलतान म्हणाला.

"तुमचे हे शिपाई मागे सरकले तर ना मी बसणार घोड्यावर!" कमाल म्हणाला.

सुलतानाने जवळ उभे असलेल्या सर्व सैनिकांना दूर उभे रहायला सांगितले.

"सुलतान! पहा आता मी या घोड्यावर बसून आपल्या सैन्यावर कसा हल्ला करतो ते. तुमच्या सैन्याची धुळधाण उडवून देतो!" कमाल म्हणाला.

"तुला वाटेल तसे कर. दया दाखविण्याचे काही एक कारण नाही. ते देखील तुझ्यावर दया दाखविणार नाहीत." सुलतान म्हणाला.

कमाल चटदिशी टांग मारून घोड्यावर बसला. शिपाई वाट पहात होते की कमाल पुढे आला की त्याला भाल्यांनी खोचून ठार करावयाचे. काही शिपाई मनांतल्या मनात म्हणत होते की कमाल किती वेडा आहे, आणि काही शिपाई वेडा दिसत नाही असे ही म्हणत होते.

घोड्यावर बसल्याबरोबर कमालने कळ दाबली आणि घोड्याला थोडे मागेपुढे हलवून त्याच्या अंगात भरपूर वारा भरून घेतला. त्यानंतर एकाएकी घोडा आकाशात उडू लागला. सुलतान ओरडला–"अरे पाहतां काय, धरा, पकडा त्याला." परंतु त्याचे ओरडणे व्यर्थच होते.

वजीर म्हणाला–"जहांपनाह! उडणाऱ्या पक्षाला कसे काय पकडतां येईल? तो सामान्य माणूस दिसत नाही. कोणीतरी जादुगार, मांत्रिक दिसतो आहे. तो पळून गेला, बरे झाले. अल्लाची मेहरबानीच म्हणावयाची! त्यात दुःख करण्याचे कारणच काय?"

परंतु सुलतानाला त्याच्या डोळ्यांवर विश्वास होईना. घोडा उडाला कसा? त्याने महालात जाऊन शाहजादीला तो तोतया शाहजादा आकाशात उडून गेल्याचे सांगितले आणि म्हणाला–"एकदांची पीडा टळली!"

परंतु शाहजादी ते ऐकून रडू लागली आणि "माझ्या प्रियकराला घेऊन या!" म्हणत पलंगावर जाऊन पडून राहली.

सुलतान तिची समजूत घालीत तिला धीर देत म्हणाला–"अग खुळे, त्यात रडायला काय झाले? तो कोणीतरी लुच्चा भामटा होता. त्याने तुझ्यावर मंत्र टाकून तुला वश करून घेतले होते. आम्ही वांचलो व तू पण वांचलीस!"

सुलतानाने मुलीच्या मनाचे सांत्वन करण्याचा अनेक प्रकारे प्रयत्न करून पाहिला. परंतु ते सर्व फुकट गेले. तिच्या मनावर त्याचा काहीएक परिणाम झाला नाही. ती आणखी जास्त मोठ्याने रडू लागली. तिने बापाला सांगून टाकले–"माझा प्रियकर मला पुन्हां भेटेपर्यंत मी अन्नाला हात लावणार नाही."

मुलीचे दुःख दूर करण्याचे दूरच राहले, सुलतानाला दुसरीच काळजी लागली. या मुलीच्या डोक्यातून त्या भामट्याचे खूळ कसे काढायचे?

तिकडे कमाल त्या काळीच्या घोड्यावर बसून स्वदेशी निघाला. त्याच्या मनात देखील शाहजादीचाच विचार होता. स्वदेशी आपण पोहचू याचा आनंद होण्याऐवजी





शाहजादीची पुन्हां कशी भेट होणार, हाच विचार त्याच्या मनात येत होता. आपण सीरिया देशाच्या राजधानीत उतरलो होतो, एवढे त्याला माहीत होते. परंतु परत त्या देशात या घोड्यावर बसून कसे पोंचायचे हे त्याला माहीत नव्हते.

कमालचा घोडा वायुवेगाने उडत आपल्या मालकाला लवकरच स्वदेशी घेऊन आला. कमालने आकाशात काही वेळ घिरट्या घातल्या आणि शेवटी राजवाड्याच्या गच्चीवर उतरला. त्याने घोडा वर गच्चीतच ठेवला आणि जिना उतरून महालात गेला. जिकडे पहावे तिकडे सामसूम होते. सर्व खोल्यात व दालनात राख [illegible] होती. अरब देशाच्या रीतीप्रमाणे कोणी मेल्यावर घरातल्या सर्व खोल्यात राख पाहून शाहजादा कमालला कळेना की मेला कोण? त्याने बापाच्या महालात जाऊन पाहिले. तेथे सुलतान आणि कमालच्या बहिणी शोकवस्त्रे अंगात घालून बसल्या होत्या. सर्वांचे डोळे बराच वेळ रडत राहल्यामुळे सुजलेले होते.

कमालला पाहतांच सुलतान उठून उभा राहला आणि आनंदातिरेकाने घेरी येऊन खाली पडला. नंतर कमालने बापाला हात देऊन उभे केले. सुलतान मुलाला कडकडून भेटला. प्रजा खूष झाली. चहूकडे आनंदी आनंद झाला.

मुलाच्या तोंडी सर्व वृत्त ऐकून सुलतानाने अल्लाला त्याच्या मेहरबानीबद्दल धन्यवाद दिले. एक आठवडाभर राजधानीत उत्सव आणि मेजवान्या चालू होत्या. प्रजेला कळावे की शाहजादा सुखरूप घरी परत आला आहे यासाठी सुलतान मुलाबरोबर घोड्यावर बसून राजधानीत फिरून आला.

उत्सव आणि मेजवान्या संपल्यावर कमालने बापाला विचारले—"तो म्हातारा कोठे आहे कळीचा घोडा तयार करणारा?"

"त्याचे नाव काढू नकोस. त्याचे तोंड पाहिले तेव्हांपासून एकामागून एक किती संकटांना तोंड द्यावे लागले म्हणून सांगू? तू भेटल्याच्या खुशीत मी सर्व कैद्यांना सुटका जाहीर केली, परंतु त्याला नाही सोडले." सुलतान म्हणाला.

परंतु कमालच्या खास विनंतीवरून सुलतानाने त्या कारागिराला सोडले आणि त्याला दरबारी पोशाख देऊन त्याचा सत्कार केला. परंतु आपल्या मुलीविषयी मात्र सुलतान एक चकार शब्द बोलला नाही. या पोराला मी घोड्यावर कां बसू दिले या गोष्टीचा विचार करून म्हातारा पश्चात्ताप करू लागला. आता त्याला घोड्याचे सर्व गुपित कळलेच आहे.

परंतु सुलतानाला त्या घोड्याची दहशत बसल्यासारखी झाली होती. तो मुलाला म्हणाला—"बाळ! तू पुन्हां कधी या घोड्यावर बसण्याचे नाव काढू नकोस. कारण त्या घोड्याला आणखी कोठे व कोणकोणती कळ आहे तुला कोठे माहीत आहे? दुसरेच एखादे संकट ओढवले तर!"

परंतु कमाल बापाची ती इच्छा पुरी करू शकला नाही. कारण त्याच्या मनात शाहजादी शम्स अल नहर कायमचे घर करून बसली होती. एकदां सुलतानाने एक मैफिल ठेवली. मैफिलीत एक गायिका प्रेमगीत म्हणत होती. ते गीत ऐकून कमालला शम्स उल नहरची आठवण झाली. तो देहभान विसरून जिना चढू लागला आणि गच्चीत ठेवलेल्या घोड्यावर बसून त्याने कळ दाबली. दुसऱ्या क्षणाला घोडा आकाशात उडू लागला आणि पाहतां पाहतां दृष्टीआड झाला.

परंतु रात्री घडलेली ती गोष्ट सुलतानाला कळली नाही. शाहजादा राजमहालात कोठे दिसत नसल्याचे ऐकून त्याचा शोध सुरू झाला. गच्चीत घोडादेखील दिसला नाही. तेव्हां आपण घोड्याचा चक्काचूर कां करून टाकला नाही, या गोष्टीचा विचार करून सुलतान पश्चात्ताप करू लागला. पुन्हां घोडा हाती लागला तर तो जाळून टाकायचे त्याने ठरविले. परंतु तूर्त तरी पश्चात्ताप करणेच काय ते त्याच्या पदरात पडले होते. (क्रमशः)



# चलाख इंग्रज

एक डच (हॉलंड निवासी), एक फ्रेंच आणि एक इंग्रज तिघांची परस्पर मैत्री होती. ते तिघे एकदा आपल्या एका मरणासन्न मित्राला भेटायला गेले. आपल्या तिघां मित्रांना भेटल्याचा त्याला परमानंद झाला. आपली एक शेवटची इच्छा म्हणून तो आपल्या मित्रांना म्हणाला–"आतां मरण काही सुटत नाही. तुम्ही माझ्यावर एवढे उपकार करा की मी मेल्यावर माझ्या शवपेटीत पांच पांच पौंड ठेवून द्या.

दुसऱ्याच दिवशी त्याला मरण आले. डच मित्राने मयत मित्राच्या इच्छेप्रमाणे त्याच्या शवपेटीत पांच पौंड ठेवले.

फ्रेंच मित्राने पांच पौंडाचा एक चेक लिहून शवपेटीत ठेवला. तो चेक वटवणे शक्य नाही हे त्याला माहीत होते.

इंग्रज मित्राने चटदिशी आपले चेकबुक खिशांतून काढून पंधरा पौंडाचा चेक लिहून शवपेटीत टाकला आणि डच मित्राने शवपेटीत ठेवलेले पांच पौंड आणि फ्रेंच मित्राने टाकलेला पांच पौंडाचा चेक काढून घेतला.





# फोडा नी झोडा

वेंकटगिरी नावाच्या एका गांवी वीरबाहू नावाचा एक शेतकरी रहात असे. त्याच्याजवळ चार एकर जमीन होती. तो खूप मेहनत करून शेतात निरनिराळी पिके काढी. त्या पिकांवर त्याचा व त्याच्या कुटुंबाचा उदरनिर्वाह चाले.

एक वर्षी पाऊसच पडला नाही आणि दुष्काळ पडला. चोर आणि दरोडेखोरांचे फावले. परंतु दुसऱ्या वर्षी चांगला पाऊस पडला आणि चांगले पीक निघाले. शेतकऱ्यांनी देवाचे आभार मानले.

त्या वर्षी वीरबाहूने ज्वारी पेरली होती आणि ज्वारीची ताटे दीड दोन पुरुष उंचीची वाढलेली पाहून वीरबाहूचे मन कसे उल्हसित होते. कणसे लागली आणि पाहण्यासाठी वीरबाहू रात्रंदिवस मांच्यावर जागून काढी. दिवसां पोपट आणि इतर पक्ष्यांचा सुळसुळाट होता आणि रात्री चोर कणसे कापून नेतील याची भीती होती. एक दिवशी रात्री कांबळे ओढून तो पडून असतां शेतात कोणी शिरल्याचा आवाज ऐकू आला. म्हणून काठी घेऊन तो त्या बाजुला निघाला.

त्याला परस्परांपासून दूर निरनिराळ्या जागी चार चोर कणसे कापून घेत असलेले दिसले. स्वच्छ चांदणे पडले होते. वीरबाहूने त्यांना दुरूनच ओळखले. ते त्याच्या गावातलेच होते. चौघांचा समाचार एकाच वेळी एकट्याने घेणे त्याला धोक्याचे वाटले. तेवढ्यात त्याला एक युक्तीसुचली. त्याने आपली काठी एका खुणेच्या जागी ठेवून दिली. चोरांपैकी एक जण ब्राह्मण होता, दुसरा क्षत्रिय होता, तिसरा वाणी होता आणि चवथा त्याच्याच सारखा एक शेतकरी होता. वीरबाहू सर्व प्रथम ब्राह्मणाजवळ जाऊन त्याला नमस्कार करून



सपने में एक महा पुरुष को देखा। उसके शरीर पर भभूत मला हुआ था। वह बघचर्म धारण किये हुए था, सर पर जटाएँ लटक रही थीं। कंधों पर कपालों की माला और कंठ में लिंग सुशोभित थे। उस महापुरुष ने सपने में तिन्नडु से यों कहा–"बेटा, यहाँ के पहाड़ की तराई में, सुवर्णमुखी के तट पर बरगद के नीचे शिवजी हैं। तुम उनकी पूजा करो।"

तिन्नडु चौंककर उठ बैठा। उसने आश्चर्य के साथ चारों ओर देखा। उसके अनुचर शिकार खेलने में मशगूल थे। इतने में एक जंगली सुअर चिल्लाते उस ओर आ निकला। तिन्नडु ने सुअर का

गया। जहाँ वह सुअर अचानक अदृश्य हो गया था, वहीं पर उसे एक शिव मंदिर दिखाई दिया। सपने में एक महापुरुष ने तिन्नडु को इसी मंदिर के बारे में बताया था। इसलिए तिन्नडु ने सोचा कि यह जो कुछ हुआ है, वह सब शिवजी की लीला और माया है। तब तिन्नडु ने लिंग के सामने साष्टांग प्रणाम किया और कहा–"भगवन, इस पहाड़ी प्रदेश में जहाँ शेर और बाघ घूमा करते हैं, नदी के किनारे तुम क्यों बैठे हुए हो? तुम्हें भूख लगेगी तो खाना-पानी कौन ला देगा? मेरे घर ऊडुमूरु में क्यों नहीं आते? मेरी बड़ी-छोटी बहनें तुम्हें सुअर, हिरण और पक्षियों का माँस भी पकाकर खिलायेंगी! तरह-तरह के चावल से तुम्हें खीर, शहद और फल भी तुम्हें खिलायेंगी। अगर तुम मेरे साथ न चलोगे तो मैं भी यहाँ से हिलूँगा नहीं।"

इतने में बाक़ी शबर लोग तिन्नडु की खोज करते वहाँ आ पहुँचे और बोले–"मालिक, तुमने जिस सुअर का पीछा किया, वह कहाँ गया?" मगर तिन्नडु ने इस सवाल का कोई जवाब नहीं दिया। सब ने उसे घर चलने पर ज़ोर दिया।

"शिवजी मेरे साथ चलेंगे तभी मैं भी चलूँगा, नहीं तो नहीं, तुम लोग चले



फिर शिवजी के ध्यान में निमग्न हो गया, इस पर सभी शबर वहाँ से चले गये।

तिन्नडु ने सोचा–"बेचारे, शिवजी कितने दिनों से भूखे हैं?" यह सोचकर उसने कंधे पर धनुष रखा और चल पड़ा। उसने एक जंगली सुअर को मारा। उसका मांस टुकड़े-टुकड़े करके जलाया, सुवर्णमुखी से पानी लाकर शिवजी के सामने रखा और तब कहा–"भगवन, इन्हें खा लो।"

परंतु शिवजी ने कोई उत्तर न दिया, तब वह रोते हुए बोला–"भगवन, तुम इस मांस को न खाओगे तो मैं तुम्हारे चरणों के सामने अपने प्राण त्याग दूँगा।"

शिवजी ने तिन्नडु की भक्ति पर प्रसन्न हो कहा–"उठो बेटा, मैं मांस खा लेता हूँ।" यों कहकर शिवजी ने सारा मांस खा लिया।

इस प्रकार कुछ दिन बीत गये। एक दिन शिवगोचर नामक एक शैव ब्राह्मण उस मंदिर में आया और बोला–"भगवन, ये झूठी तीलियाँ कैसी? यह बदबू कैसी? तुम्हारे इस पवित्र मंदिर को किसने मलिन बनाया है? तुम नहीं बताओगे तो मैं खाना-पीना छोड़कर यहीं पर अपने प्राण त्याग दूँगा।"

"हे भक्त, तुम घबराओ मत! मेरा एक जंगली भक्त अपने ढंग से मेरी सेवा कर रहा है। मैं उसकी पूजा को स्वीकार कर रहा हूँ। यदि तुम उसकी भक्ति को



देखना चाहो, मेरे पीछे छुपकर बैठ जाओ।" शिवजी ने उसे समझाया।

इतने में तिन्नड्डु मंदिर में आया। लिंग के सामने स्थित झूठे पदार्थों को अपने पैर से एक ओर सरका दिया। अपने मुँह में स्थित पानी को कुल्ला करके लिंग का अभिषेक किया, तब लिंग के सामने एक पत्तल डालकर मांस के टुकड़ों को परोसा।

शिवजी ने तिन्नड्डु की भक्ति की परीक्षा लेनी चाही, इसलिए उसने वह मांस नहीं खाया और अपनी मुँदी आँखों से आँसू गिराने लगा। इसे देख तिन्नड्डु घबरा गया, और आँख का इलाज करने लगा। उसने कई तरह के इलाज किये, पर कोई फ़ायदा न रहा, उल्टे शिवजी की आँख से खून बहने लगा।

तिन्नड्डु की समझ में न आया कि क्या किया जाय। उसने सोचा कि आँख का इलाज आँख ही है। यह सोचकर झट उसने तलवार से अपनी एक आँख निकाली और शिवजी की आँख में लगा दी।

"डरने की कोई बात नहीं। इसका भी इलाज मैं जानता हूँ।" यों कहते तिन्नड्डु अपनी दूसरी आँख निकालने को हुआ, तब शिवजी ने प्रत्यक्ष होकर उसका हाथ पकड़कर रोकते हुए कहा–"ठहर जाओ।"

इसके बाद शिवजी ने ब्राह्मण भक्त से कहा–"शिवगोचर, तुमने इस जंगली भक्त की भक्ति देख ली है न?" इसके बाद दोनों को लक्ष्य कर शिवजी ने पूछा–"मांग लो, तुम दोनों क्या क्या वर चाहते हो?"

"भगवान, आप हमें जो वरदान देना चाहते हैं, वही दीजिये! हम आप से क्या मांग सकते हैं?" यों कहते दोनों शिवजी के सामने साष्टांग प्रणाम करने लगे। शिवजी ने उन दोनों को फिर से सांसारिक मायाजाल में पड़ने न देकर अपने में विलीन कर लिया।



# १३७. राक्षसी चित्र

उत्तर अमेरिका के कालिफ़ोर्निया नामक राज्य में ब्लैत नामक स्थान पर ये चित्र हैं। ज़मीन पर से इन चित्रों का पूर्ण रूप दिखाई नहीं देता। इसलिए इन चित्रों के चित्रकारों को ठीक से यह देखने का मौका मिला न होगा कि वे कैसे चित्र अंकित कर रहे हैं। ऐसे अनेक चित्र उस प्रदेश में कंकड़ों के द्वारा अंकित हैं। इन्हें विमान के द्वारा ही देखना संभव है। १९४३ में पहली बार इनके फ़ोटो लिये गई हैं।

निम्न लिखित चित्र में दो ही चित्र दिखाई दे रहे हैं, मगर उस प्रदेश में और कुछ राक्षसी चित्र हैं। इन चित्रों की गहराई अधिक नहीं है, मगर लंबाई बहुत ज़्यादा है। मनुष्य के चित्र की लंबाई सर से पैर तक १७० फ़ुट है। फैलाये गये दोनों हाथों के बीच की दूरी १५८ फ़ुट है। दूसरा चित्र लंबी पूँछवाले घोड़े का है। ई. सन्. १५४० के पूर्व उस प्रदेश में घोड़े बिलकुल न थे, इसलिए यह अनुमान लगाया जाता है कि इसके बाद ही उन राक्षसी चित्रों को अमेरिकन इंडियनों ने अंकित किया होगा।





# चांदोबा

संस्थापक : नागिरेड्डी
संचालक : 'चक्रपाणी'

गरीब भोळ्याभाबड्या अशिक्षित खेडुतांना फसवून जादूटोणा करणारे भामटे कसे पैसे उकळतात याची उदाहरणे नित्य दृष्टोत्पत्तीस येतात. प्रजेच्या अज्ञानामुळेच भुताटकीचे प्रकार ही खेडोपाडी घडतात. याउलट सुशिक्षित समाजात भुताटकीचे प्रकार त्या मानाने कमी घडतात आणि मांत्रिकांची डाळ शिजत नाही. अशा फसव्या लोकांची लुच्चेगिरी चवाठ्यावर कशी आणता येते, हे या अंकातल्या 'जादूची कांडी' या गोष्टीत अवश्य वाचा.


वर्ष : २३  जुलै १९७३  अंक : १



# अमरवाणी

तृणा दपि लघु स्थूल:,
तूला दपि च याचक:,
वायुना किम् ननीतो सौ ?
त मयम् याचये दिति ! ॥ १ ॥

[ गवतापेक्षा कापूस हलका असतो, कापसापेक्षा भिकारी हलका (हीन) असतो; परंतु वारा किंवा हवा भिकाऱ्याला कां उडवून लावीत नाही ? कारण तो तिच्या जवळ ही भीक मागायला मागेपुढे पहात नाही यासाठी. ]

बालसखीत्व, मकारण हास्यम्,
स्त्रीषु विवाद, मसज्जन सेवा,
गार्दभयान, मसंस्कृतवाणी,
षट्सु नरो लघुता मुपयाति ॥ २ ॥

[ मुलांशी मैत्री, निष्कारण हंसणे, स्त्रियांशी वादविवाद असज्जनाची सेवा, गाढवाचे वाहन करून घेणे, अभद्र बोलणे या तिन्हीमुळे पुरुषाला हलकेपणा (कमीपणा) येतो. ]

किम् पौरुषम् रक्षति यो न वार्तान् ?
किम् वा धनम् नाथिजनाय यत्स्यात् ?
सा किम् क्रिया या न हितानुबद्धा ?
किम् जीवितम् साधु विरोधि यद्वै ? ॥ ३ ॥

[ शरणागताचे रक्षण न करणारे पौरुष कशासाठी ? याचकाला न दिले जाणारे धनच काय कामाचे ? हिताशी ज्याचा संबंधच नाही असे काम कोणत्या उपयोगाचे ? अशाच तऱ्हेने सज्जनांशी शत्रुत्व ज्यामुळे येते ते जीवितच काय कामाचे ?

लघुत्व



# दोन विवाह

चंडीपुर नावाच्या गावी देवनाथ नावाचा एक ब्राह्मण रहात असे. त्याला कमलाक्षी नावाची एक अत्यंत रूपवती कन्या होती. देवनाथकडे कुसुमायुध नावाचा एक विद्यार्थी विद्याभ्यास करीत असे कुसुमायुध व कमलाक्षी बरोबरच लहानाची मोठी झाली आणि वयाबरोबर त्यांचे परस्परांवर प्रेम वाढत गेले आणि दोघांनी परस्परांना मनाने वरले.

मध्यंतरी देवनाथने आपल्या मुलीसाठी एक चांगले स्थळ पाहिले व विवाहाच्या सर्व अटी ठरल्या. ते कळल्यावर कमलाक्षीने आपल्या प्रियकराला ते वृत्त कळविले आणि परस्परांची ताटातूट होण्याचा प्रसंग येऊन ठेपल्याबद्दल फार दुःख व्यक्त करून काही तरी मार्ग काढायला विचारले.

कुसुमायुधने कमलाक्षीला एका जागी गुप्तपणे येऊन भेटायला आणि तेथून त्याच्याबरोबर पळून जाण्याच्या तयारीने यायला सुचविले. त्या जागी तिला घेऊन जायला एक नोकर येईल व त्याच्याबरोबर येऊन तिने भेटावे असे त्याने कळविले.

कमलाक्षी त्याप्रमाणे कुसुमायुधने पाठविलेल्या घोडेस्वाराबरोबर घोड्यावर बसून निघाली. परंतु तो घोडेस्वार कमलाक्षीला ठरलेल्या जागी घेऊन न जाता उजाडण्याच्या सुमारास एका दुसऱ्याच गांवी घेऊन गेला.

कमलाक्षीला संशय आला. तिने नोकराला विचारले–"काय रे! तुझे मालक कोठे आहेत ?"

"माझे मालक? येथे मी मालक आणि तू मालकीण! आपण विवाह करून घेऊ म्हणजे झाले." तो नोकर म्हणाला.

ते ऐकून कमलाक्षी घाबरून गेली नाही. तरी स्वत:ला म्हणाली–"बरं तें कबूल,

सौ. कुसुम ना. जोग

पण लग्नासाठी भटजी व आवश्यक सामुग्री नको का आणायला? घेऊन ये."

कमलाक्षीच्या बोलण्यावर विश्वास ठेवून तो दुष्ट मनुष्य कमलाक्षीला आणि घोड्याला तेथेच सोडून लग्नाकरिता आवश्यक सामुग्री आणण्यासाठी निघून गेला.

नोकर निघून गेल्यावर कमलाक्षी घोड्यावर बसून एका माळ्याच्या घरी गेली. माळी वृद्ध होता. त्याने सर्व गोष्टी विचारून घेऊन कमलाक्षीला आपल्या घरी आश्रय दिला.

तिकडे नोकर सर्व सामुग्री घेऊन आला. कमलाक्षीने त्याला फसविल्याचे कळले. तेव्हां आपल्या मालकाकडे जाऊन त्याने कमलाक्षी विरुद्ध त्याचे कान भरले. म्हणाला—"मालक! आपण सरळ स्वभावाचे आहां. स्त्रीस्वभाव आपल्याला माहीत नाही. मला काही लोकांनी धरून डांबून ठेवले आणि कमलाक्षी त्यांच्याबरोबर आनंदाने घोड्यावर बसून पळून गेली. मी कसाबसा स्वतःचा जीव वांचवून आपणांस ते वृत्त कळविण्यासाठी आलो आहे.

वाटले. म्हणून त्याच्या बापाने दुसऱ्या मुलीशी लग्न ठरविले तेव्हा तो निमूटपणे लग्नाला तयार झाला. वरपक्षातील लोक विवाह झाल्यावर आपल्या गावी परत जात असता कमलाक्षीच्या गावी एका उपवनात उतरले. कुसुमायुध सहज एकदा गावात फिरून यायला म्हणून निघाला. तेव्हां त्याला कमलाक्षीने एका जागी पाहिले व तिला आश्रय देणाऱ्या वृद्ध माळ्याला तिने ती गोष्ट सांगितली. तो वृद्ध माळी कुसुमायुधला भेटून त्याला आपल्या घरी बोलावून घेऊन आला.

कुसुमायुधला कमलाक्षी भेटली. तिच्या तोंडी त्याच्या नोकराची सर्व लबाडी त्याला कळली. त्याने तिच्याबरोबर देखील लग्न करून घेतले. त्याच्या पहिल्या बायकोला कुसुमायुधच्या तोंडी कमलाक्षीवर जो प्रसंग आला होता तो कळला. म्हणून तिने त्याच्या दुसऱ्या लग्नास होकार दिले.





# जादूची कांडी

एका गावी राहणारे सर्व लहान थोर गावकरी अगदी भोळे होते. त्या गावी एक दिवशी एक गिड्डा माणूस आला. तो दिवसभर गावात फिरला आणि संध्याकाळी एका पडक्या निर्जन घरासमोर येऊन ओट्यावर बसला.

त्या घराच्या समोर कोण्या श्रीमंताचे घर होते. त्या घरासमोर एक फकीर ढोपरापर्यंत काळा अंगरखा घालून उभा होता. त्याच्या हातात एक काठी होती. काठीच्या एका टोकाला सिंहाकृती मूठ होती.

फकिर आपली काठी दोराच्या उंबरठ्यावर आपटून म्हणाला—"अग ए फुटक्या नशिबाच्या बाई! मला भिक्षा दे!"

दुसऱ्या क्षणाला त्या घराच्या मालकिणीने भिक्षेचे गाठोडे बाहेर ठेवून दिले. फकीर ते गाठोडे घेऊन निघून गेला.

ते दृश्य पाहून तो गिड्डा मनुष्य चकितच झाला. त्या फकिराला पाहून ती बाई एवढी घाबरली कां? त्याला काहीच कळेना. तो फकीर उर्मटपणे बोलला होता? तरी तिने त्याला भिक्षा कशी काय दिली? तो गिड्डा बाईच्या घरी गेला आणि त्याने तिला विचारले—"काय हो बाई! तुम्ही त्या फकीराला शिव्या देऊन हाकलून लावण्याऐवजी भिक्षा दिलीत, हे कसे काय?"

त्या बाईने, त्या गिड्ड्याकडे आश्चर्यचकित नजरेने एकदा पाहिले आणि विचारले—"तुला माहीत नाही का?"

"मला नाही माहीत. मी आजच तुमच्या गावी आलो." तो गिड्डा मनुष्य म्हणाला.

तेव्हां ती बाई भीतभीत म्हणाली—"तुला काय सांगू बाबा? हा फकीर राक्षसासारखा आमच्या पाठीस लागला आहे. तू त्याच्या हातात एक काठी पाहिलीस ना?



ती जादूची कांडी आहे. तो ती कांडी ज्या कोणाच्या उंबरठ्यावर आपटतो त्याला तो मागेल ती भिक्षा द्यावी लागते. ती कांडी फकीराला तो उंबरठ्यावर आपटल्याबरोबर कोणती तरी अद्भुत शक्ती मानेवर येऊन बसते. तो फकीर भिक्षा घेऊन निघून गेला की डोके ठिकाणावर येते. तो भिक्षा घेऊन गावाबाहेरच्या बागेत बसून खातो.”

तो गिड्डा मनुष्य त्या फकिराचा तो विलक्षणपणा ऐकून थक्क झाला. पण थोडा वेळ विचार करून म्हणाला–“काय हो, मग तो एखाद्या श्रीमंताच्या घरी जाऊन त्याच्यावर कां मंत्र टाकीत नाही? त्याला आयुष्यभराची भिक्षा एकदम मिळेल!”

“मी एकदां सांगितले ना, ती जादूची कांडी भिक्षेसाठी आहे. पोटभर खाण्यापुरती भिक्षा त्या कांडीने मिळते. भिक्षा मिळाल्यानंतर त्या कांडीचा उपयोग दुसऱ्या दिवसापर्यंत होत नाही.” ती बाई म्हणाली.

“गावातल्या एखाद्या माणसाने त्या फकीराच्या हातातली ती काठी हिसकावून कां नाही घेतली?” गिड्ड्या माणसाने विचारले.

ती बाई आश्चर्य आणि भय वाटल्यासारखी थरथर कांपत म्हणाली–“इतकी हिंमत कोण करणार?”

“मी घेऊन येतो ती काठी!” तो गिड्डा मनुष्य म्हणाला.

“या गप्पा माझ्यासमोर नको बोलूस! तुझा काय पराक्रम आहे तो संध्याकाळी रामाच्या देवळात सर्व गावकरी पुराण ऐकायला जमतील तेव्हां सांग.” असे सांगून त्या बाईने त्याला जायला सांगून दार बंद करून घेतले.

त्या दिवशी संध्याकाळी रामाच्या देवळात तो गिड्डा मनुष्य गेला आणि सर्व गावकऱ्यांना त्याने योजलेला कार्यक्रम सांगितला. म्हणाला–“तुमची सर्वांची मदत मिळाली तर मी हे काम करून दाखवीन.”

काही लोकांनी गिड्ड्या माणसाच्या बोलण्याकडे दुर्लक्ष केले. काही लोक त्याचे ते विचित्र रूप पाहून हसले. काही लोकांनी त्याला विचारले–“आमच्याकडून तुला कोणत्या तऱ्हेच्या मदतीची अपेक्षा आहे?”

गिड्ड्या माणसाने थोडक्यात सर्व गोष्टी समजावून सांगितल्या आणि तो उतरला होता तिकडे निघून गेला.

दुसऱ्या दिवशी सकाळी अमराईत फकीर घोरत पडला असता गिड्डा गेला. तो पोचला त्याच वेळी फकिराची झोप मोडली. परंतु गिड्ड्याने झोपेचे सोंग केले आणि पडून राहिला. फकिराने गिड्ड्याला आळशी भिकाऱ्यांपैकी एक समजून त्याच्याकडे दुर्लक्ष केले. उशाशी ठेवलेली आपली कांडी घेऊन गावाकडे निघाला.

फकीर भिक्षा मागून परत आला तरी गिड्डा मनुष्य घोरत पडला होता. त्याच्यासमोर एक मडके उपडे ठेवलेले होते. मडक्याजवळच एक लोखंडाची सळई ठेवलेली होती.

झाडावर बसलेला कावळा ‘कावकाव’ करू लागल्याबरोबर गिड्डा जणुंकाही आतांच झोप मोडल्यासारखा उठला. त्याने फकिराकडे चकित झाल्यासारखे निरखून पाहिले. नंतर सळई घेऊन तीनदा मडके वाजविले. इतक्यात पुष्कळ गावकरी आले आणि त्यांनी त्या गिड्ड्यासमोर निरनिराळे खाद्य-



पदार्थ आणून ठेवले. त्यापैकी गिड्ड्याने त्याला ज्या पदार्थांची गरज होती तेवढे ठेवून घेतले आणि बाकी परत केले.

फकिराला प्रथम गिड्ड्याचा तो विक्षिप्तपणाच वाटला. परंतु त्याच्यासमोर गावकऱ्यांनी निरनिराळे खाद्यपदार्थ आणून ठेवलेले पाहून मात्र आश्चर्यचकित होऊन त्याने तोंडात बोटेच घातली. म्हणजे आपल्या काठीपेक्षा याचे हे मडके आणि लोखंडी सळईच जास्त कामाची दिसतात. आपल्याला उन्हांत वणवण फिरल्यावर काठीच्या मदतीने भिक्षा मिळते आणि या गिड्ड्याला बसल्याजागी सर्व पदार्थ मिळतात. असा विचार करून तो गिड्ड्याला

घेऊन म्हणाला–"काय मित्रा! कसं काय? बरं आहे ना?"

"आमचं सोड! आपलं सांग! तुझं कसं काय?" गिड्डुचाने फकिराला विचारले.

"आता मी काय सांगू मित्रा! वय वाढत चालले आहे आणि गावात वणवण फिरावे लागते आहे." फकीर आशा लावून मडक्याकडे पहात म्हणाला.

गिड्डा सर्व कळले असून ही काही न कळल्यासारखा फकिराच्या तोंडाकडे पहात बसून राहला. मडक्याचे महत्व फार आहे या गोष्टीची खात्री फकिराला पटेपर्यंत त्याने गंभीर मुद्रा करून बसण्याचे ठरविले.

संध्याकाळी पुन्हां मडक्यावर सळईने तीनदां वाजविल्यानंतर गावकरी खाद्यपदार्थ घेऊन आलेले पाहून मात्र ते मडके आणि सळई मंत्रविलेली असल्याची फकिराची खात्री पटली. त्याला राहवले नाही. म्हणाला–"मित्रा, तू आहेस तरुण, चार गल्लचा फिरून येणे तुला जड जाणार नाही. मी आहे म्हातारा. तेव्हां तू माझी जादूची [illegible] दे. अल्ला! तुला दुवा देईल."

गिड्डा म्हणाला–"दुसऱ्या कोणी मागितले असते तर मी दिलेच नसते. परंतु तू मित्राचे नातेच जोडलेस, तेव्हां आतां सुटकाच नाही." असे सांगून त्याने आपले ते मडके आणि सळई फकिराला दिली आणि फकिराची काठी मागून घेतली.

दुसऱ्या दिवशी सकाळी फकीर झोप मोडल्यावर गिड्डा कोठे आहे, पाहू लागला. परंतु अंबराईत तो कोठेच दिसला नाही. तो दुपारपर्यंत अंबराईत बसून राहला. नंतर त्याने तीनदा सळईने मडके वाजविले. परंतु खाद्यपदार्थ घेऊन कोणीच आला नाही. शेवटी रागावून त्याने ते मडके जमिनीवर आपटले आणि गावात भीक मागायला निघाला परंतु गावकऱ्यांनी त्याला कुत्र्यासारखे हाकलून लावले.

त्यानंतर तो ते गांव सोडून कायमचा निघून गेला. ती गोष्ट कळल्यावर गावकऱ्यांना स्वत:च्या मूर्खपणाचे हंसू आले.





# यक्ष पर्वत

[१२]

[लुटेऱ्यांचा पुढारी समरबाहू याच्या रक्षणार्थ जीवदत्त व खड्गवर्मा दोघे निघाले. त्यांना वाटेत अस्वल जातीचे लोक गुलामांकडून काम करवून घेत असलेले दिसले. जीवदत्त व खड्गवर्मा दोघे त्यांच्याजवळ जाऊ लागले तेव्हां त्यांना एका जागी धुराचे लोट आकाशात उडत असलेले दिसले. तो धूर पाहून त्या दिशेनेच दोघे निघाले. पुढे–]

खड्गवर्मा व जीवदत्त त्या झाडांच्या अगदी जवळ जाऊन पोचले. तेथूनच धुराचे लोट आकाशात उडत होते. दोघे एका झाडावर चढून, अस्वल जातीचे लोक काय करीत आहेत, पाहू लागले. धूर येत होता त्याच्या जवळपासच भुयाराचे दार त्यांना दिसले. तेथे अस्वल जातीच्या लोकांनी शिकार करून आणलेली रानटी जनावरे एकेक करून ती भाजण्याचे काम चालू होते. काही लोक डफ वाजवून अस्वलांना नाचवून लोकांची करमणूक करीत होते.

खड्गवर्मा आणि जीवदत्त दोघांना समरबाहू दिसला नाही. भुयाराच्या दारात प्रवेश केल्यावर खाली उतरण्यासाठी पायऱ्या होत्या त्या मात्र त्यांना दिसत होत्या.

"जीवदत्त! या अस्वल जातीच्या लोकांची राहण्याची जागां या भुयारात



असली पाहिजे. पलीकडे जंगलात जायला आणखी एखादी चोरवाट या भुयाराला नक्कीच असली पाहिजे. हे लोक समरबाहूला भाजून खातील असे नाही मला वाटत." खड्गवर्मा म्हणाला.

जीवदत्तने एकदा चारी बाजूला दृष्टी फिरवून पाहिले आणि हळूच म्हणाला—"मला सुद्धा तू म्हणतोस तेच वाटते. हे अस्वल जातीचे लोक नरभक्षक असतील असे नाही मला वाटत. तो स्वर्णाचारी उगाच एवढा घाबरला आहे. हे लोक शेतकी करतात व ज्या कोणाला आपला बंदी करून घेतात त्याला गुलाम करून घेऊन राबवीत असतील. या पलीकडे ते

अनुयायाला हे लोक भाजून खाण्याच्या हेतूने नक्कीच घेऊन गेलेले नाहीत."

खड्गवर्मा झाडाच्या उंच फांदीवर चढून म्हणाला—"हे लोक शिकार करून आणलेली जनावरे भाजण्याचे काम करीत आहेत, माणसांना भाजीत नाहीत."

खड्गवर्मा व जीवदत्त आपसांत अस्वल जातीच्या लोकांविषयी इकडे बोलत असतां तिकडे त्या जातीचा पुढारी समरबाहू व त्याच्या अनुयायाला आपल्या गुरूसमोर धरून घेऊन गेला आणि लवून नमस्कार करून म्हणाला—"गुरु भल्लूक! या दोघांना आम्ही जंगलांत धरले. हे लोक शूर, आणि पराक्रमी दिसतात. यांना आपला गुलाम करून घेणे कठीण दिसते आहे."

गुरु भल्लूक एका गोलाकृती समतल मैदानात एका खडकावर बसला होता. त्याच्या डोक्यावर अस्वलाचे डोके मुकुटासारखे ठेवलेले होते. त्यामुळे त्याचे तोंड स्पष्ट दिसत नव्हते. गुरु भल्लूक बसला होता त्याच्या दोन्ही बाजूला दोन भयंकर लांडगे 'आ' वासून बसलेले होते. अस्वल जातीचे लोक भाले घेऊन आपल्या कंद्यांवर करडी नजर ठेवून उभे होते.

थोड्याच वेळात अस्वल जातीचे लोक समरबाहू व त्याच्या अनुयायाला ठार

कारण ते रानटी लोक लांडग्यांना त्याच्यावर सोडण्याला अगदी तयार दिसत होते.

अस्वल जातीचा नायक जे म्हणाला ते ऐकून गुरु भल्लूक समरबाहू व त्याच्या अनुयायाकडे काही वेळ पहात उभा राहीला व म्हणाला—"तुमचा पेहराव पाहून तुम्ही कोणत्या तरी शहरातले राहणारे असाल असे दिसते आहे; पण काय रे, तुम्ही या जंगलात कसे काय आलात?"

काय उत्तर द्यावे हे समरबाहूला सुचले नाही. म्हणून काही वेळ स्वस्थ राहील्यावर तो म्हणाला—"मी शहरातला राहणारा नाही. सिंधच्या वाळवंटातून या प्रदेशात आलो आहे. माझे अनुयायी शेदोनशे वर आहेत. त्यांना मी तुमच्याकडे कैद झाल्याची गोष्ट केव्हां तरी कळल्याशिवाय राहणार नाही. ते लोक तुझ्या या भुयारातल्या घराचा व तुझा समाचार घ्यायला आल्याशिवाय राहणार नाहीत."

"तुझ्या आवाजावरून तुझे धाडस जे दिसते आहे ते वाखाणण्यासारखेच आहे!" असे म्हणत गुरु भल्लूक हंसला आणि पुढे म्हणाला—"तुझे अनुयायी माझ्या या भुयारातल्या घरापर्यंत येण्यापूर्वीच माझे अस्वल जातीचे सेवक आणि लांडग्यांचे कळप त्यांना ठार करून मेजवानी उडवितील. म्हणून



माझ्यासमोर तुझ्या या फुशारक्या कुचकामाच्या आहेत. तुला व तुझ्या या अनुयायाला पकडून तुमच्या दोघांकडून शेतीची कामें इतर गुलामासारखी कशी करवून घ्यायची हे मला चांगले माहीत आहे."

गुरु भल्लूक बोलायचे थांबला असेल एवढ्यात त्याचे दोघे अनुयायी धावत प्रवेश करून समरबाहू व त्याच्या अनुयायाला पाहून जागच्या जागी थबकले. गुरु भल्लूकने त्यांना विचारले—"काय रे, काय भानगड आहे?"

ते दोघे तो प्रश्न ऐकून समरबाहूकडे पाहू लागले. तेव्हां गुरु भल्लूक रागावून दरडावीत म्हणाला—"किती ही गुप्त गोष्ट



असली तरी सांगा. हे दोघे कैदी आपल्या केसाला ही धक्का लावू शकणार नाहीत. मी या दोघांना लांडग्यांच्या खडकाकडे पाठवितो!"

"गुरु भल्लूक! फक्त आपल्यालाच ही गोष्ट सांगण्यासाठी आम्ही आलो आहो." असे म्हणत दोघांनी अगदी जवळ जाऊन त्याच्या कानात काहीतरी सांगितले.

गुरु भल्लूक ते ऐकून आश्चर्यचकित झाल्यासारखा दिसला. समरबाहूला धरून आणणाऱ्या अस्वल जातीच्या नायकाकडे वळून रागावल्यासारखा तो म्हणाला–"तुझे डोके फिरले आहे वाटते?" नंतर थोडा वेळ थांबून म्हणाला–"ठीक! या दोघां

करा पाहू! यांना पहिल्याने मोकळे करून भाले द्या!"

गुरु भल्लूकाचा हुकूम झाल्याबरोबर त्याच्या अनुयायांनी दोघां कैद्यांना सोडले आणि त्यांच्या हातात भाले देऊन "चला तर!" सभामंडपाच्या बाजूला असलेल्या दरवाज्याकडे चोर असे म्हणत घेऊन गेले.

ते निघून गेल्यावर गुरु भल्लूक आपल्या अनुयायांना सावध करीत म्हणाला–"त्या दोघां नवीन लबाडांनी आपल्या गुहेतल्या सर्व गुप्त गोष्टींची माहिती करून घेतली असावी. त्यांच्यावर करडी नजर ठेवा. त्यांना धरून घेऊन या माझ्यासमोर!"

"गुरु भल्लूकाची आज्ञा!" असे म्हणत दहा बारा अनुयायी त्याला लवून नमस्कार करून भुयाराच्या जिन्याकडे गेले.

झाडाच्या फांदीवर बसून खड्गवर्मा व जीवदत्त दोघांना दिवसां अस्वल जातीच्या लोकांच्या गुहेत शिरण्यात धोका आहे असे वाटले. अस्वल जातीचे लोक अस्वलांना नाचवीत शिकार करून धरून आणलेल्या जनावरांना भाजून त्यांचे मांस खाऊ लागले होते. कडक ऊन पडले होते. जीवदत्त झाडावरून उतरत खड्गवर्माला म्हणाला– "खड्गवर्मा! जे काही पहावयाचे होते,

वेळ घालविणे फुकट आहे. शिवाय पोटात कावळे कोकलू लागले आहेत. जवळपास कोठे तरी तळे असेलच आपण आंघोळ वगैरे उरकून घेऊन झाडांवरची फळे खाऊन घेऊ या. काळोख पडल्यावर गुहेत प्रवेश करावयाचा आहे."

खड्गवर्मा काही बोलल्याशिवाय झाडावरून खाली उतरून आला. सुदैवाने एक तळे त्यांना दिसले. त्या तळ्याच्या चहुंफेर दाट झाडी होती. रानटी जनावरे पाणी पिऊन गेल्याचे त्यांच्या पावलांच्या खुणावरून स्पष्ट दिसत होते.

"खड्गवर्मा! लवकर आंघोळ करून येथून पाय काढला पाहिजे. रानटी जनावरे व रानटी जातीचे लोक याच तळ्याचे पाणी पीत असावेसे दिसते आहे." जीवदत्त म्हणाला.

जीवदत्तचे बोलणे अद्याप संपले नव्हते. त्याच वेळी चारपाच रानटी कोंबडे ओरडत झाडीतून बाहेर आले. त्यांना पाहून खड्गवर्माने एक बाण त्यांना मारला आणि म्हणाला–"रानटी कोंबड्याचे मांस खाऊन बरेच दिवस झाले नाही?"

परंतु बाण कोंबड्याला लागलाच नाही. सर्व कोंबडे ओरडत उडून पळून गेले. परंतु त्याच वेळी एका माणसाची किंकाळी मात्र ऐकू आली–"गुरु भल्लूक! मेलो!"

तो आवाज ऐकून खड्गवर्मा व जीवदत्त परस्परांकडे चकित होऊन पाहू लागले.





जीवदत्त म्हणाला–"खड्गवर्मा! विचित्रच दिसते आहे की रे! तू जो बाण सोडलास तो रानटी कोंबड्याला लागला नाही. झाडीत लपून बसलेल्या कोणत्या तरी जंगली माणसाला लागला. पण हा गुरु भल्लूक कोण आहे?" असे म्हणत जीवदत्त झाडीत शिरला. खड्गवर्मा देखील त्याच्या पाठोपाठ झाडीत शिरला.

खड्गवर्मा व जीवदत्तने झाडीत शिरून अगदी जवळ जाऊन पाहिले, अस्वलाचे कातडे पांघरून आलेला अस्वल जातीचा एक मनुष्य तडफडत पडला होता. खड्गवर्माचा बाण त्याच्या छातीला लागला होता.

जीवदत्त जवळ जाऊन त्याला म्हणाला–"तुझ्या पेहरावावरूनच तू कोण आहेस हे आम्हांला कळले आहे. आम्ही तुला ठार करण्याच्या हेतूने हा बाण सोडला नव्हता. पण काय रे, तू या झाडीत शिरून काय करीत होतास?"

त्या जखमी माणसाने जीवदत्त म्हणाला ते ऐकले; परंतु तो उत्तर देण्याच्या स्थितीत नव्हताच. तो झाडीतच तडफडत बडबडत होता–"गुरु भल्लूक! गुरु भल्लूक!"

"जीवदत्त! हा एक दोन क्षणांचाच पाहुणा दिसतो आहे. हा रानटी कोंबड्यांच्या शिकारीला येऊन दबा धरून कोठे तरी बसला असावा किंवा आपल्यावर नजर ठेवण्यासाठी त्याच्या मालकाच्या आज्ञेने लपून बसला असावा." खड्गवर्मा म्हणाला.

तुझ्या प्रश्नाचे उत्तर देणाऱ्या त्या बिचाऱ्याचा जीव गुरु भल्लूकाच्या आत्म्यात अंतर्धान झाला असावा! असे म्हणत जीवदत्तने एकदां मागे वळून पाहिले.

खड्गवर्माने जवळ जाऊन अस्वल जातीच्या त्या मृत माणसाची प्रत्येक वस्तू व कपडे लक्षपूर्वक तपासून पाहिले. तेव्हां त्याला तो मेला असल्याचे कळले. विशेष कळण्यासारखे आणखी दुसरे काही नाही हे पाहून तो जीवदत्त बरोबर झाडीतून बाहेर तलावाच्या काठी आला.

वरची फळे तोडून पोटभर खाऊन घेतली. काही वेळ दोघे एका झाडाखाली विश्रांती घेत पडून राहले. विचार करतां करतां गुहेत राहणाऱ्या अस्वल जातीच्या लोकांना आपण या प्रदेशात आल्याचे कळले असावे अशी एक शंका त्यांच्या मनाला चाटून गेली. तरी समरबाहूला सोडविल्याशिवाय तिकडून जावयाचे नाही असे दोघांनी मनाशी पक्के ठरविले.

सूर्यास्त झाला आणि हळूहळू काळोख पडू लागला. दोघे गुहेकडे निघाले. कोणी गुप्तपणे पाठीमागून किंवा झाडावरून त्यांना धरायला टपून तर बसला नसेल अशी भीती सारखी त्यांना वाटत होती व ते तितकेच सावधगिरीने पुढे जात होते. थोड्या वेळाने ते त्या गुहेच्या दाराजवळ आले. गुहेच्या वरच्या बाजूला किंवा खाली जिन्याजवळ त्यांना कोणी पहाऱ्याला बसलेला दिसला नाही.

"खड्गवर्मा! तुला येथली जागा व परिस्थिती कळली ना? आपल्याला ते सहजी कैद करणार आहेत व आपण स्वतःच त्यांच्या जाळ्यात पडत आहो, असे त्यांना वाटत असेल. परंतु यानंतर थोड्याच वेळाने त्यांच्या जातीचा सर्वनाश होणार आहे, ही गोष्ट कदाचित यांच्या ध्यानीमनी देखील नसेल!" जीवदत्त असे म्हणत गुहेच्या पायऱ्या उतरू लागला.

खड्गवर्मादेखील त्याच्या पाठोपाठ पायऱ्या उतरू लागला. दोघे पायऱ्या उत-



रून एका वळणावर काळोखातून जाऊ लागले त्याच वेळी दहा बारा अस्वल जातीचे लोक काळोखातून बाहेर आले आणि भाले उगारून म्हणाले–"जागच्या जागी उभे रहा! एक पाऊलदेखील पुढे टाकलेत तर हे भाले तुमच्या अंगात आर-पार जातील."

जीवदत्त त्यांच्याकडे पाहून स्मित करीत म्हणाला–"अरे, तुम्ही या निर्जीव भाल्यांना आमची शिकार करायला कशाला लावता? लांडग्यांसमोर घेऊन जा आम्हांला. परंतु त्यापूर्वी गुरु भल्लूकाचे दर्शन घ्यायची आमची इच्छा आहे."

तेव्हां अस्वल जातीचा एक मनुष्य हळूच म्हणाला–"अरे, मोठ्याने ओरडू नकोस. गुरु भल्लूक आपली इष्टदेवी वृकेश्वरी हिच्या पूजेला बसले आहेत. तुम्हांला आम्ही आधी लांडग्यांच्या खडका-जवळ नेऊन पोचवितो. तेथून तुम्ही जिवंत परतलात तर गुरु भल्लूकाच्या दर्शनास घेऊन जाऊ."

लांडग्यांचा खडक!" जीवदत्त आपले हसू आवरीत म्हणाला.

"घाई करण्याचे कारण नाही, आपण तिकडेच जातो आहो." असे सांगून अस्वल जातीचे लोक खड्गवर्माला घेऊन भुयारात पुढे निघाले. त्यांना दुरून लांडग्यांचे भयंकर ओरडणे ऐकू येत होते. भयभीत होऊन ओरडणाऱ्या माणसांच्या किंकाळ्या गुहेत ऐकू येत होत्या. सर्व गुहा जणुकाही हादरून जात होती.

"खड्गवर्मा! हा आवाज समरबाहूचा व त्याच्या अनुयायांच्या वाटतो आहे. लांडगे त्यांचे लचके तोडायला निघाले आहेत की काय?" जीवदत्त शंका करीत म्हणाला.

खड्गवर्मा त्याचे उत्तर देणार एवढ्यात अस्वल जातीच्या लोकांपैकी एकजण भाला उगारून म्हणाला–"गप्पबस! थोड्याच वेळाने तुम्हांला डोळ्यासमोर लांडगे काय करीत आहेत, ते दिसेल!" (क्रमशः)







# झोपाळू राक्षस

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही.

तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाकडे जाऊ लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा! तू ज्याच्या प्रेरणेने या कामात प्रवृत्त झाला आहेस तो तुझ्या श्रमाचे कौतुक करतो की तुझी थट्टा करतो, कदाचित तुला हे माहीत नसेल. मनुष्याचे विचार निश्चित नसतात, याची साक्ष पटावी म्हणून मी तुला शंख राक्षसाची गोष्ट सांगतो, लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

फार फार प्राचीन काळातील गोष्ट आहे. गोदावरी काठच्या विशाल अरण्य प्रदेशात एका डोंगरात एक राक्षसीण रहात असे. तिला शंख नावाचा एक मुलगा होता. तो मोठा झाल्यावर त्याची आई

## वेताळाच्या गोष्टी



त्याला म्हणाली–"बाळ, मी आपले सर्व आयुष्य या जंगलात काढले. परंतु कोणी कधी माझ्या वाटेला गेले नाही की मी कोणाला कोणत्या ही प्रकारचा त्रास दिला नाही. आता मी चार आठ दिवसाचीच पाहुणी आहे. मी शंकराचे स्मरण करून तपश्चर्या करीन व शिवलीन होऊन जाईन. तू मनुष्य वस्तीत शिरून त्यांना धमकावून अगर अन्य प्रकारे स्वतःचा उदर निर्वाह चालव."

असे सांगून राक्षसीण तपश्चर्या करण्यास निघून गेली. शंखने एका डोंगराच्या शिखरावरून पायथ्याच्या मनुष्यवस्तीकडे पाहिले. मनुष्यवस्तीत जाऊनच आपले पोट भरण्याची व्यवस्था करावी लागणार, असा त्याने विचार केला. प्रथम झोप काढू या, असा विचार करून तो एका गुहेत शिरला. तेथे ऊन लागणार नाही असे त्याला वाटले आणि तो झोपला.

शंखने डोंगराच्या शिखरावरून मनुष्य वस्तीकडे पाहिले तेव्हां गावातल्या लोकांनी सुद्धा त्याला पाहिले आणि म्हणाले–"बाप रे बाप! केवढा मोठा राक्षस आहे!" त्यानंतर कित्येक लोकांनी घराबाहेर येऊन त्या राक्षसाला पाहिले.

सर्वांना वाटले की हा राक्षस गावात शिरून लोकांना खाणार आणि चार पांच महिन्यात गावात एक ही मनुष्य किंवा प्राणी उरणार नाही. त्या गावाच्या राजाने सर्वांना भाले, तलवार, धनुष्य बाण वगैरे शस्त्रास्त्रे स्वरक्षणासाठी दिली. राक्षस गावात शिरला तर त्याला कसे ठार करायाचे याविषयी पुष्कळ उपाय योजले.

त्या दिवशी रात्री त्या गावात कोणी झोपलाच नाही. कोणी दिवादेखील लावला नाही. सर्वांची नजर डोंगराकडे होती.

परंतु राक्षस त्या गावात आला नाही. दिवसामागून दिवस गेले. परंतु राक्षस आला नाही. लोकांना त्या राक्षसाची भयभीती राहली नाही. काही लोकांना वाटले की राक्षस आणखी कोठल्या तरी जंगलात

साहस करून शेतीभातीची कामे करू लागले आणि गुराढोरांना जंगलात चरायला घेऊन जाऊ लागले.

असेच काही महिने लोटले, परंतु राक्षस दिसला नाही की त्याचे चिन्हदेखील लोकांना कोठे आढळले नाही. काही लोक परशु, भाले, तलवारी आणि धनुष्य बाण घेऊन डोंगर चढून गेले. त्यांना एका जागी शंख झोपला होता ती गुहा दिसली. गुहेतून घोरण्याचा आवाज ऐकू येत होता. ती तरुण साहसी मंडळी त्यानंतर डोंगरावरून खाली उतरून आली. त्यांनी गावकऱ्यांना राक्षस कोठे गेला नसल्याचे आणि गुहेत घोरत पडला असल्याचे सांगितले.

काही अनुभवी वडील मंडळी सांगू लागली की राक्षसाचे बळ झोपेतच असते. म्हणजे झोपून उठल्यावर त्यांच्या अंगात इतकी शक्ती येते की त्यांना जिंकणे अगर ठार करणे अशक्य होते.

ते ऐकून लोक जास्तच घाबरले.

राजाने आपल्या मंत्र्याला बोलावून त्याचा सल्ला घेतला. म्हणाला–"राक्षस जंगलातच आहे आणि गुहेत झोपलेला आहे. कदाचित तो झोपला असतांनाच त्याला ठार करणे सोपे जाईल. जागा झाल्यावर त्याला ठार करणे अशक्य होईल."

मंत्री म्हणाला–"राक्षस हा गावाला नेहमीच एक धोका आहे. म्हणून संधी





मिळेल तेव्हां त्याला ठार करणेच शहाण-पणाचे होईल."

परंतु तो सल्ला प्रधानाला रुचला नाही. तो म्हणाला–"महाराज, आपण हत्ती, वाघ, सिंह अस्वल इत्यादि जंगली जना-वरांना पकडून त्यांच्याकडून निरनिराळी कामे करवून घेतो. तेव्हां या राक्षसाला सुद्धा शिकवून त्याच्याकडून कामे करवून घेणे अशक्य नाही. तो फार तर शंभर माणसांचे अन्न भक्षण करील, परंतु हजार माणसांचे काम करील. आपल्या राज्यावर शत्रूची वांकडी नजर फिरकणे शक्य नाही. राक्षसाला पोटभर खायला मिळाले की झाले. तो इमानदार व स्वामिभक्त असतो. कारण राक्षस माणसापेक्षा जास्त विश्वास-पात्र असतो. म्हणून तो झोपून उठला तरी घाबरण्यासारखे काहीच नाही. त्याच्या करवी आपण कामे करवून घेऊ."

तो सल्ला राजाला व इतर लोकांना सुद्धा रुचला. त्यानंतर लोकांच्या मनात देखील त्या राक्षसविषयी सहानुभूती उत्पन्न झाली. त्यानंतर काही काळ लोटल्यावर त्या देशात दुष्काळ आला.

वडीलधारी मंडळी म्हणू लागली–"राक्षस खाली उतरून कां नाही येत बुवा? तो गोदावरी नदीला वळवून आपल्या गावाजवळ आणू शकेल. पाताळगंगेला तो वर आणू शकेल. तो राक्षस आपल्या गावाजवळ रहात असून आपल्याला त्याचा काय उपयोग?"

दुष्काळापाठोपाठ चोऱ्या व मारामाऱ्या सुरू झाल्या. रात्रीच्या वेळी चोर आणि लुटेरे गावात शिरून घरेदारे लुटू लागले. कोणी आडवा आला तर त्याला ते कापून काढू लागले.

तेव्हां गावातली वडीलधारी मंडळी सांगू लागली की राक्षसाला जागा करण्याची तीच खरी वेळ आहे. तरुणमंडळींनी साहस व हिंमत करून त्या राक्षसाला जागे करावे.

"काय म्हणता? झोपणाऱ्या राक्षसाला जागा करायचा? झोपेत एक तर तो ऐक-

मंडली तर तो इतका चिडेल की जो समोर दिसेल त्याला कच्चा खाऊन टाकील." तरुण मंडळी म्हणाली.

त्यानंतर बरोबर एका वर्षाने शत्रूने त्यांच्या राज्यावर स्वारी केली. आतां दुर्लक्ष करणे शक्यच नव्हते. म्हणून सेना-पती काही तरुण मंडळींना बरोबर घेऊन राक्षसाच्या गुहेकडे निघाला. त्यांनी गुहेत डोकावून पाहिले. परंतु गुहेत राक्षस नव्हता. तो गुहेतून कोठेतरी निघून गेला होता. त्या राज्यावर शत्रूने स्वारी करून ते राज्य काबीज केले. राक्षस गावात आला नाही व त्याने प्रजेला मदत केली नाही. म्हणून लोकांनी नानाप्रकारे त्याला शिव्या शाप दिल्या.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला–"राजा! गावातली प्रजा राक्षसाचे नुसते नाव ऐकूनच किती भ्याली होती. नंतर राक्षस जवळ असल्याबद्दल तिला आनंद झाला आणि शेवटी तिने त्याला शिव्या-शाप द्यायलासुद्धा मागेपुढे पाहिले नाही. आतां मला हे कळत नाही की प्रजेच्या मनात त्या राक्षसाविषयी कधी प्रेम उपजले होते की नाही. या शंकेचे समाधानकारक उत्तर माहीत असून तू दिले नाहीस तर तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

तेव्हां विक्रमादित्य म्हणाला–"प्रजेच्या मनात राक्षसाविषयी प्रेम किंवा द्वेष उत्पन्न होण्याचा प्रश्नच उद्भवत नाही. प्रजेच्या मनात राक्षस हा एक फार मोठी शक्ती होता. शक्तिविषयी प्रेम किंवा आदर कोठून असणार? त्याच्यापासून धोका आहे हे कळताच प्रजा भिणार. त्याच्यापासून फायदा आहे हे कळल्यावर लोभ उत्पन्न होईल आणि जरूरीच्या वेळी त्याच्याकडून मदत मिळाली नाही तर लोक निंदा करायला मागेपुढे पाहणार नाहीत."

अशातऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)



# मूर्ख राजा

एकदा अरबस्तानातील काही सौदागरांनी घोडे आणून कोशल देशाच्या राजाला दाखविले. उत्तम जातीचे घोडे पाहून राजा खूष झाला. त्याने ते घोडे मोठी किंमत देऊन विकत घेतले आणि पुन्हा आणखी घोडे आणून देण्यासाठी दोन लाख रुपये त्या सौदागरांना दिले.

ती गोष्ट घडल्यावर राजाने मट्टेथट्टेत प्रधानाला राज्यातल्या मूर्ख लोकांची एक यादी तयार करण्यास सांगितले. प्रधानाने मूर्ख लोकांची यादी तयार करून राजाच्या हातात दिली. राजाने चकित होऊन प्रधानाला विचारले–"माझे नाव पहिले ?"

"महाराज ! अरबस्तानातल्या अनोळखी सौदागरांना दोन लाख रुपये आणखी घोडे आणून देण्यासाठी देणे मूर्खपणा नाही तर शहाणपणा आहे का ?" प्रधानाने विचारले.

"समज, ते घोडे घेऊन आले तर ?" राजाने विचारले.

"तर आपले नाव खोडून आपल्या नांवाच्या जागी त्यांचे नाव यादीत लिहिता येईल." प्रधान म्हणाला.





# खरी मैत्री

एका गावी गोविंद आणि गोपाळ नावाचे दोघे मित्र होते. त्यांच्या मैत्रीत नेहमी उतारच होत असे. दोघांना ते बरोबर वाटेना. परंतु मैत्री पक्की व कायमची असायला काय करावे लागते किंवा केले पाहिजे, हे त्यांना माहीत नव्हते. बराच वेळ विचार करून त्यांनी एक गोष्ट मात्र ठरविली की त्यांची मैत्री नित्य वाढत जाऊन पक्की व्हावी या साठी काशी विश्वनाथासमोर प्रतिज्ञा केली पाहिजे. दोघे काशीयात्रेला निघाले. निघण्यापूर्वी दोघांनी त्यांच्या त्यांच्या बायकांनी बांधून दिलेली शिदोरी घेऊन निघाले. गोविंदच्या बायकोने तुपात भाजून परोठे व रव्याचे लाडू करून दिले. त्याचप्रमाणे गोपाळच्या बायकोने तुपात पुऱ्या तळून दिल्या आणि जिलब्या पण दिल्या. दोघे प्रवासखर्चापुरेसे पैसे घेऊन प्रवासाला निघाले.

दोघे दुपारच्या सुमारास दमून गेल्यावर एका झाडाखाली विश्रांतीसाठी बसले. दोघांच्या पोटात कावळे कोकलत होते. तरी दोघांनी आपापली शिदोरी उघडून पाहिली नाही. गोविंदने विचार केला की गोपाळ कोरडी भाकर घेऊन आला असेल आपण तुपात भाजलेले परोठे त्याला देणे बरोबर नाही. त्याचप्रमाणे गोपाळने विचार केला, तो घेऊन आला असेल फोडणीचा भात. त्याला आपण पुऱ्या व जिलब्या का द्याव्या ?

दोघांना भूक लागली होती, परंतु दोघे परस्परांच्या डोळ्याआड खाऊन घ्यायच्या फिकीरीत उपाशीच राहले आणि पुढे निघाले. संध्याकाळच्या सुमारास दोघे एका पडक्या ओसाड पडलेल्या देवळाच्या धर्मशाळेत उतरले. परंतु दुसऱ्याला झोप लागल्यानंतर खायचे ठरवून दोघे उपाशीच

सौ. निर्मला स. संजगिरी



राहले आणि उपाशी राहल्यामुळे दोघांना झोप लागली नाही. दोघे परस्परांना फसविण्याच्या विचारात उपाशी तळमळत पडून होते. म्हणून दुसऱ्या दिवशी दोघांना एक पाऊल पुढे टाकणे अशक्य झाले.

शेवटी गोविंदने अगदी नाइलाजाने आपली शिधोरी काढून खायचे ठरविले. परंतु शिधोरीतून मुंग्यांची रांग बाहेर येत असलेली पाहून त्याच्या तळपायाची आग मस्तकापर्यंत पोचली. गोविंदला तापल्यासारखा झालेला पाहून गोपाळने विचारले–"काय रे झाले गोविंद? एकाएकी तुला राग कसा काय आला? मला नाही सांगितलेस तर कोणाला सांगणार?"

[illegible] ना, माझ्या बायकोचा प्रकार. परामठ्यां व लाडवांबरोबर तिने मुंग्या बांधून दिल्या होत्या." असे सांगून त्याने पुरचुंडी सोडून पाहिली. परामठे अर्धे अधिक मुंग्यांनी खाल्ले होते.

गोविंदने ती पुरचुंडी दूर फेकून दिली आणि म्हणाला–"ही काय बायको म्हणायची? ही आहे राक्षसीण! घरी गेल्यावर तिचा समाचार घेतो. आयुष्यभर आठवण राहली पाहिजे तिला!"

गोविंदला चिडलेला पाहून गोपाळने स्वतःची शिधोरी सोडून पाहिली. परंतु त्याला सुद्धां त्याच्या पुरचुंडीतून मुंग्यांची रांग बाहेर येत असलेली दिसली. जिलबीचा चुरा होऊन गेला होता आणि आंबट वास येत होता.

गोपाळ गोविंदला म्हणाला–"पाहिलेस का रे, माझ्या बायकोने देखील मला फसविले आहे. मी घरी जाऊन तिची खोड मोडतो."

दोघे बायकांना मारण्याचे ठरवून आपापल्या घरी परतले. दोघांनी घरी पोचतांच काही विचारपूस न करतां आपापल्या बायकोला खूप बडविले. परंतु दोघींना त्यांच्या त्यांच्या नवऱ्याची चूक चांगली कळली. त्यांनी त्यांच्या त्यांच्या नवऱ्यांना चांगला धडा द्यायचे ठरविले.

दोघे [illegible]ली मैत्री कायम पक्की करून घेण्याच्या हेतूने काशीयात्रेला निघाले. याखेपेस त्यांच्या बायकांनी अगदी निराळी कल्पना काढली. प्रत्येकीने काय करायचे ते योजून बिनबोभाट काम पुरे केले.

गोविंद व गोपाळ काशीयात्रेला निघाले तेव्हां त्यांच्या बायका त्यांना सातूच्या पिठाच्या पुरचुंड्या बांधून देत म्हणाल्या–"काशीयात्रेला जाणाऱ्यांनी चांगला दानधर्म करावयाचा असतो. नाही तर तीर्थयात्रेचे पुण्य लागत नाही."

दोघे मित्र एक चांगला मुहूर्त पाहून यात्रेला निघाले. दुपारपर्यंत चालत राहल्यावर ऐन उन्हाच्या वेळी दोघे एका झाडाखाली विश्रांती घेण्यासाठी थांबले. या खेपेस दोघांनी मनांत भेदभाव न बाळगून आपापली पुरचुंडी सोडली आणि खायला बसले. दोघांच्या पुरचुंडीत सातूचे पीठच होते. तरी गोविंदने गोपाळला आपल्या पुरचुंडीतले सातूचे पीठ काढून आणि गोपाळने गोविंदला आपल्या पुरचुंडीतले पीठ काढून दिले.

गोपाळने दिलेले सातूचे पीठ गोविंदने आनंदाने तोंडीत टाकले आणि "बाप रे!" असा ओरडत तो गटागटा पाणी पिऊ लागला. त्याच प्रमाणे गोपाळ गोविंदने दिलेले पीठ खाऊ लागला. पण त्याला ओकारी आली. एकाच्या पिठात फक्त तिखट होते व मीठ मुळीच नव्हते तर



दुसऱ्याच्या पिठात फक्त मीठच होते आणि तिखट मुळीच नव्हते. एकजण "तिखट तिखट" ओरडत जीभ पोळल्याचे सांगत होता तर दुसरा खारट असल्याचे सांगून ओकाऱ्या काढीत होता. दोघांची परस्पर मारामारी सुरु झाली. त्याचवेळी एक वृद्ध वाटसरू तिकडून चालला होता. त्याने त्यांच्या मारामारीचे कारण विचारले.

दोघे म्हणाले—"आम्ही दोघे परस्परांची मैत्री कायम व पक्की व्हावी म्हणून देवासमोर शपथ घेऊन प्रतिज्ञा करण्यासाठी काशीयात्रेला निघालो होतो. दोघे आपापल्या घरून खाण्यापिण्यासाठी सातूचे पीठ घेऊन निघालो होतो. भूक लागल्यावर दोघे खायला बसलो. एकाने दुसऱ्याला आणि दुसऱ्याने पहिल्याला आपल्या पुरचुंडीतले सातूचे पीठ काढून खायला दिले. परंतु त्याने मला असे पीठ कां द्यावे, तुम्हीच सांगा! एका मित्राने दुसऱ्या मित्राशी असा दगा केलेला कोणाला आवडेल का?" अशातऱ्हेने दोघांनी परस्परांविरुद्ध तक्रार केली.

[illegible] असे म्हणत त्याने चिमटी चिमटीभर सातूचे पीठ घेऊन चाखून पाहिले व म्हणाला—"या दोन्ही पिठात चूक काहीच दिसत नाही. फक्त एकच चूक दोघांनी केली. तुम्ही दोघांनी परस्परांचे सातूचे पीठ मिसळून नंतर ते वाटून खायला पाहिजे होते. मैत्रीचे पण असेच आहे. दोघांची मने मिळाली पाहिजेत. तसे झाले नाही आणि देवासमोर तुम्ही आणाशपथा घेतल्या तरी काय फायदा होणार? तुमच्या बायकाच जास्त समजूतदार आहेत असे वाटते. त्यांनी तुमची कानउघाडणीं करण्यासाठी ही युक्ती काढली असावी. ही गोष्ट तुमच्या डोक्यात चांगली शिरून नंतरच तुमची मैत्री कायम राहील."

ते ऐकून गोविंद व गोपाळ परस्परांकडे पाहू लागले आणि परस्परांच्या मूर्खपणाबद्दल त्यांना लाज वाटली. त्यानंतर काशीयात्रेची गरज नसल्याचे त्यांना वाटले आणि घरी परतून मित्रत्वाने राहू लागले.





# उडणारा घोडा

[५]

**शा**हजादी शम्सला इराणचा कारागीर तिला फसवून कमालकडे नेण्याऐवजी आणखी कोठेतरी घेऊन आला असल्याचे कळायला फार वेळ लागला नाही. तेव्हां तिने त्याला विचारले—"तुझ्या मालकांनी तुला काय सांगितले होते रे? आणि तू काय करतो आहेस?"

म्हातारा मिस्किलपणे हसत करून म्हणाला—"माझे मालक? कोण माझे मालक? तो मूर्ख कमाल, तू त्याच्या विषयी विचारते आहेस वाटते? तो तर महा मूर्ख पोरगा आहे!"

"दुष्ट बदमाश म्हाताऱ्या! तू आपल्या मालकाविषयीं असे बोलतो आहेस? तुला लाज नाही वाटत?" शम्सने त्याला विचारले. "तो नाही माझा मालक आणि मी त्याचा नोकर पण नाही. लक्षात असू द्या बेगम साहबा!" म्हातारा म्हणाला.

"तू चोर की लबाड, कोण आहेस, हे मला तरी कोठे आहे माहीत!" शाहजादी शम्स म्हणाली.

"मी खोटे बोलत होतो. तुला खरेखरे सांगितले असते तर तू आली नसतीस माझ्या बरोबर. त्याने मला फसवून माझा घोडा बळकावला होता. मी त्याला फंसविले. मला माझा घोडा परत मिळाला. आता त्याला घोड्याची आठवण काढून मरू दे. परंतु तुला भिण्याचे काहीच कारण नाही. त्या मूर्खापेक्षा मी किती तरी चांगला आहे, हे तुला लवकरच पटेल. मी पराक्रमी आहे, कर्तबगार आहे, धनी आहे आणि दाता आहे. माझे नोकर व गुलाम तुझ्या सेवेला हजर राहतील. ते माझी सेवा करतात



तशीच तुझी सेवा करतील. मी तुला दागिन्यांनी मढवीन, तू मागशील तो पोशाख तुला आणून देईन. सुलतान किंवा शाहजादा काय देईल अशी वस्त्रे मी तुला आणून देईन. आजपासून तू माझी बेगम!"

शाहजादी आपल्या कपाळावर हात मारून आपल्या भाग्याला दोष देत म्हणाली–"मी तरी कशी फुटक्या नशिबाची आहे? प्रथम आईवडिलांपासून माझी ताटातूट झाली आणि आता मी आपल्या प्रियकरापासून वेगळी झाले."

म्हाताऱ्याने घोड्याला तुर्कस्तानाकडे वळविले आणि थोड्याच वेळाने तो घोडा तुर्कस्तानच्या एका मोठ्या शहरावर घिरट्या घालून एका मैदानात उतरला. त्या मैदानात सुंदर वृक्ष लता होत्या व फवारे होते.

त्या शहराचा प्रमुख शासक त्या दिवशी त्या मैदानात फिरायला आला होता. गार वारा सुटला होता आणि वेळ कशी आनंदाची होती. त्याने घोड्यावरून त्या म्हाताऱ्याला व एका तरुण मुलीला आकाशातून उडताना आणि उतरताना पाहिले आणि त्यांना धरून घेऊन यायला आपल्या गुलामांना पाठविले. त्यांनी म्हाताऱ्याला कैद केले आणि शाहजादीला आणि कळीच्या घोड्याला घेऊन येऊन सुलतानासमोर उभे केले.

त्या म्हाताऱ्याचा चेहरा पाहूनच सुलतानाच्या कपाळाला आठ्या पडल्या. सुलतानाने शाहजादीला विचारले–"मुली! तू कशी काय सापडलीस या म्हाताऱ्याच्या हातात? तुझ्या आई वडिलांनी तुला याच्या गळ्यात कसे काय बांधले?"

"ही माझी बायको आहे आणि हिचे माझ्याशी नातेदेखील आहे." म्हातारा म्हणाला.

तेव्हां शाहजादी घाबऱ्या स्वरात म्हणाली–"जहांपनाह! अल्ला की कसम! शंभर वर्षे वयाचा हा म्हातारा कोण आहे, हे मला माहीत देखील नाही. ह्याचा माझा

मांत्रिक असेलसे वाटते. मला फसवून तो या उडणाऱ्या घोड्यावरून या गावी मला घेऊन आला आहे."

ते कळल्यावर सुलतानाने म्हाताऱ्याला खूप बडवून काढायला गुलामांना सांगितले. गुलामांनी त्याला अर्धमेला करून सोडले. नंतर त्यांनी त्याला धरून नेऊन अंधार कोठडीत कोंडून ठेवून दिले आणि कळीचा घोडा व शाहजादी दोघांना राजवाड्यात पोचते केले. सुलतानाला जादूच्या घोड्याचे गुपित कळले नाही.

आकाशातून एका अप्सरेला अल्लाने आपल्यासाठी पाठविली आहे. तिला आपली बेगम करून घेऊन तिच्या सहवासात आनंदाने सर्व आयुष्य जाईल. तिला कोणत्याही गोष्टीची उणीव भासू देता कामा नये. फुलासारखी तिला ठेवीन. परंतु तिच्यावर दुसऱ्या कोणाची नजर देखील पडतां कामा नये. असा तो आणि मी! असे मनातले मांडे सुलतान खाऊं लागला.

तिकडे शाहजादी व कळीचा घोडा अदृश्य झाल्यापासून शाहजादा कमालला काही सुचेनासे झाले. तो नवीन पोशाख करून व प्रवासापुरते आवश्यक पदार्थ बरोबर घेऊन शाहजादीच्या शोधार्थ निघाला. तो अनेक देश फिरत, अनेक



राजधानी व शहरे पहात खूप हिंडला. त्याला जो कोणी भेटे त्याला तो विचारी–"तुम्हांला उडणारा जादूचा घोडा दिसला का?" ते लोक त्याला वेडा समजून हंसत आणि त्याच्या प्रश्नाचे उत्तर दिल्याशिवाय निघून जात.

बरेच दिवस व कित्येक महिने लोटले आणि शाहजादा धीर न सोडता शाहजादीचा शोध काढीत हिंडत राहिला. शेवटी तो सना नगरी येऊन पोचला. त्याला त्याच्या सासऱ्याच्या गावीसुद्धां शम्सविषयी काही कळले नाही. शम्स गेल्यापासून तो तिचा शोध काढीत होता आणि आता शाहजादा कमालसुद्धां ती नाहीशी झाल्याचे



सांगू लागला तेव्हां त्याला जास्तच काळजी वाटू लागली.

शेवटी कमाल फिरत फिरत तुर्कस्तानात आला. तो एका धर्मशाळेत उतरला होता. तेथे एकदिवशी काही सौदागर आपसात बोलत होते. ते त्याने ऐकले. एक जण म्हणाला–"मी एक बातमी ऐकली आहे. सुलतानाने मैदानात फिरायला गेला असतां एका लाकडी घोड्यावरून एका अपरूप सुंदरीला उतरताना पाहिले."

कमालला ज्या बातमीची गरज होती तीच मिळाली. त्याने सर्व गोष्टी त्या सौदागराला विचारून घेतल्या. सौदागराने सांगितल्याप्रमाणे ज्या गावी शाहजादी [illegible] उतरली होती ते त्या गावी गेला. तो त्या शहराच्या महाद्वारापर्यंत जाऊन गावात शिरण्याच्या विचारात असतां पाहरेकऱ्यांनी त्याला कैद करून सुलतानासमोर हजर करण्याचा विचारच केला. सुलतानाने कोणी नवीन परदेशी आला तर त्याला हजर करण्यास सांगून ठेवले होते.

परंतु काळोख पडला होता, म्हणून शिपायांनी कमालला रात्रभर तुरुंगात ठेवले. त्यांनी त्याच्या खाण्यापिण्याची व्यवस्था केली. नंतर त्यांनी कमालला तो कोठून आला व कशासाठी आला वगैरे प्रश्न विचारले. कमालने तो इराण देशातून आला असल्याचे सांगितले.

तेव्हां शिपाई हसून सांगू लागले–"अरे, तुझ्याच देशातला एक म्हातारा आला आहे. इतके खोटे बोलणारा माणूस आज-पर्यंत आम्ही नाही पाहिला. दिसायला तो इतका कुरूप आहे की पाहणाऱ्याला ओका-रीच येईल. पण गप्पा काय मारतो, म्हणे, मोठा वैद्य आणि कारागीर आहे. आमच्या सुलतान साहेबांनी त्याला आकाशांतून तो एका लाकडी घोड्यावरून उडत येत असतांना आणि एका सुंदर मुलीबरोबर उतरताना पाहिले. त्या मुलीला एकाएकी वेड लागले आहे. नाही तर आमच्या सुल-तानाने तिला आपली बेगम करून घेतले असते. तिचा इलाज करण्यासाठी किती हकीम आणि वैद्य आले आणि गेले. तो म्हातारा वैद्य असता तर त्या मुलीचा इलाज करता आला नसता का त्याला? तो म्हातारा आहे तुरुंगात. लाकडी घोडा सुलतानाने खजिन्यात ठेवून दिला आहे."

आपण बरोबर जागी पोचलो आहो, कमालला या गोष्टीची शंका राहली नाही. त्याला शिपायांनी एका अंधार कोठडीत बंद करून ठेवले. आत पाऊल टाकल्या-बरोबर कोणी तरी बरळत असल्यासारखे कमालला वाटले.

"ती पोर माझ्या हातांतून निसटली. माझेच चुकले. मी तिच्या रूपावर भाळलो! मीच फुटक्या नशिबाचा!"

तो म्हातारा कारागीरच तर बरळत नसेल, असे कमालला वाटले. त्याने फारसी भाषेत त्याला विचारले–"काय हो झाले? जगात तुमच्यासारखा फुटक्या नशिबाचा कोणी नसेल, असे तुम्ही कसे काय म्हणता?"

म्हाताऱ्याला जिवात जीव आल्यासारखे झाले. त्याने कमालला काळोखात ओळखले नाही आणि आपले सर्व गुपित सांगून टाकले. दोघे रात्रभर मित्रासारखे परस्प-रांशी परस्परांच्या सुखदुःखाच्या गोष्टी बोलत राहले.



दुसऱ्या दिवशी कमालला शिपाई बोलावून घेऊन सुलतानाकडे गेले. सुलता-नाने त्याला विचारले–"कोण तू? कोठून आलास? काय काम करतोस? आमच्या राज्यात कशासाठी आलास?"

"माझे नाव महंमद हुसेन. मी इराणचा राहणारा आहे. मी हकीम आहे. वेड्यांचा इलाज करतो. त्यात मला विशेष यश मिळाले आहे. मला दूरदुरून वेड्यांचा इलाज करायला लोक बोलावून नेतात. मला मंत्रतंत्र काही माहीत नाही आणि खोटी सोंगे करता येत नाहीत. पण मी हाती घेतलेला रोगी बरा झाला नाही, असे मात्र कधी घडले नाही."

ते ऐकून सुलतानाला फार आनंद झाला [illegible] म्हणाला–"बरं झालं! तू कसा अगदी देवासारखा वेळेवर आला आहेस! आमच्या घरी एका मुलीचे एकाएकी डोके फिरले आहे. तिचे वेड तू बरे केलेस तर तू मागशील ते मी तुला देईन."

"अल्लाची मेहरबानी असेल तर आपली सेवा माझ्या हातून नक्कीच घडेल. बरं तर हे सांगा, त्या मुलीला वेड कसे काय लागले? किती दिवसांपासून आहे?" कमालने विचारले.

सुलतानाने सुरवातीपासून सर्व सांगून म्हटले–"मी त्या थेरड्याला तुरुंगात टाकले आहे आणि घोडा खजिन्यात ठेवविला आहे."

[illegible] कमालला वाटले. तो चांगल्या स्थितीत असला तर काळजी करण्याचे कारणच नाही. पण तो जर मोडला असला तर आली पंचाईत! दुसरा काही तरी उपाय करावा लागेल.

सर्व गोष्टींचा विचार करून कमाल सुलतानाला म्हणाला–"एकदा तो घोडा पाहून घेऊन नंतर त्या मुलीला पहावे, म्हणतो. म्हणजे इलाज करणे सोपे जाईल."

"पहा की!" सुलतान म्हणाला.–सुलतान कमालला स्वतः बोलावून घेऊन खजिन्यापाशी गेला. घोडा चांगल्या स्थितीत आहे, याची खात्री करून घेऊन कमाल आनंदाच्या स्वरात म्हणाला–"आता त्या [illegible] करतांना कदाचित या घोड्याची गरज पडेल."

त्यानंतर सुलतान कमालला शाहजादीला ठेवले होते त्या खोलीत घेऊन गेला. तेथे ती छाती बडवीत, कपडे फाडीत पडून होती. कमालने ती वेडाचे नुसते सोंग करीत असल्याचे ओळखले. तो जवळ जाऊन तिला हळूच म्हणाला–"शाहजादी! तुझ्या सुटकेसाठी आलो आहे मी!"

तिने कमालचा आवाज ओळखून डोळे उघडून पाहिले. ती मोठ्याने ओरडली आणि बेशुद्ध होऊन पडली. सुलतानाला वाटले की हकिमाला पाहून घाबरून ती ओरडत असावी. त्याने तिला शुद्धीवर आल्यावर हळूच कानात सांगितले–"थोडा धीर धर! आपण दोघे संकटात आहो. मानेवर भूत बसल्यासारखे सोंग करीत रहा सुलतानासमोर!"

शाहजादीने कोणाच्या नकळत स्मित करून 'होकार' दिला.

नंतर कमाल दूर बसलेल्या सुलतानाला जवळ जाऊन म्हणाला–"आपल्या मेहरबानीने या मुलीच्या आजाराची कल्पना मला आली आहे. मी इलाज सुरू देखील केला आहे. आपण जवळ जाऊन थोडा वेळ बोलावे. नंतर तिची जी जी इच्छा असेल ती पुरी करण्याचे वचन द्या. त्यानंतर आपण इच्छिल्याप्रमाणेच होईल.







सुलतान शाहजादीच्या जवळ गेला. तिने त्याला सलाम केला व म्हणाली– "आपणाला भेटून मी धन्य झाले!"

त्या मुलीत झालेला बदल पाहून सुलतानाला आनंद गगनात मावेनासा झाले. त्याने आपल्या स्त्रीपुरुष गुलामांना तिच्या आज्ञेप्रमाणे वागायला सांगितले. गुलाम स्त्रिया शाहजादीला नहाणीघरात बोलावून गेल्या. तिला नहायला घालून तिला चांगले कपडे व दागिने घालायला दिले.

नंतर सुलतान कमालला म्हणाला– "हकीमसाहेब! आपले उपकार आम्ही कधी विसरणार नाही. आपल्यावर अल्लाची मेहरबानी अशीच राहो!"

कमाल सुलतानाला म्हणाला– "जहाँपनाह! आपल्याला हा आनंद आयुष्यभर हवा असेल तर आपण एकदां या सुंदरीला आणि त्या उडणाऱ्या घोडयाला घेऊन ती आकाशातून उतरली होती त्या मैदानात गेले पाहिजे. कारण खरी गोष्ट अशी आहे की तो घोडा म्हणजे एक भूत आहे. त्यानेच या सुंदरीच्या मानेवर बसून तिला वेड लावले आहे. मी त्या घोडयाचे भूत पळवून लावायचे म्हणतो. नाही तर ते भूत पुन्हां तिच्या मानेवर बसण्याची शक्यता आहे. याशिवाय दर महिन्याच्या सुरवातीला ते भूत तिच्या मानेवर काही काळ येऊन बसत जाईल. यासाठी त्या भुताला वाटेलाच लावले पाहिजे."

"त्यात काय मोठेसे? आपण तेच प्रथम करू या." सुलतान म्हणाला.

नंतर सुलतान आपले दरबारी नोकर चाकर, कमाल आणि शाहजादी सर्वांना घेऊन आणि तो घोडा नोकराकरवी आणून त्या मैदानात पोचले.

मैदानात पोचतांच कमालने कळीचा घोडा दूर नेऊन उभा केला. त्यावर शाहजादीला बसविले आणि म्हणाला– "मालकांची परवानगी असेल तर मी देखील या घोडयावर बसून त्या भुताकरवी घोडयाला आपल्याजवळ घेऊन येतो."

"[illegible]" सुलता-[illegible] वाटले.

अशातऱ्हेने सुलतानाची परवानगी घेऊन कमाल कळीच्या घोडयावर बसला. त्याने आपल्या पाठीला शाहजादीला घट्ट बांधून घेतले आणि कळ दाबली. त्याबरोबर सर्व पहात असतां कळीचा घोडा आकाशात उडू लागला आणि थोडयाच वेळात दिसेनासा झाला.

सुलतानाला कळेना की काय झाले? दुपार होईपर्यंत तो बसला होता त्याच जागी बसून राहला. त्याला वाटत होते की तो हकीम त्या अपरूप सुंदरीबरोबर परत येईल. त्यानंतर तो निराश होऊन राजवाडयात परत आला. घरी पोंचल्यावर देखील सुलतानाला आशा वाटत होती की तो हकीम त्या सुंदर मुलीला परत घेऊन येईल. परंतु त्याला निराशच व्हावे लागले.

उडणाऱ्या घोडयावर कमाल शाहजादीला घेऊन राजधानीत परत आला आणि सरळ आपल्या महालाच्या गच्चीवर उतरला. सुलतानाच्या कुटुंबातली सर्व मंडळी दुःखसागरात गोते खात होती, ती आनंदाने अक्षरशः नाचू लागली. त्यानंतर सुलतान साबूरने आपल्या मुलाच्या विवाहानिमित्त प्रजेला मेजवानी दिली. पुढे उडणाऱ्या कळीच्या घोडयामुळे नवीन काही संकट ओढवू नये यासाठी सुलतानाने स्वतः आपल्या हाताने तो घोडा तोडून फेकून दिला.

कमालने आपल्या सासऱ्याला घडलेल्या सर्व गोष्टींचे वृत्त कळविले. त्याने जे पत्र लिहून पाठविले होते त्याबरोबर नजराणा म्हणून अनेक मूल्यवान आणि सुंदर सुंदर वस्तू पाठविल्या.

पुढे काही वर्षांनी साबूर पैगंबरवासी झाल्यावर कमाल सुलतान झाला. गादीवर बसल्यावर त्याने आपल्या धाकटया बहिणीचे लग्न आपल्या मेहुण्याशी म्हणजे शम्सच्या भावाशी करून दिले. त्यानंतर कमाल व शम्स यांचा संसार सुखाचा झाला.



# चिक्कू

एका गावी एक श्रीमंत मनुष्य रहात असे. तो पोटभर कधी जेवला नाही की त्याने अंगभर कधी कपडे घातले नाहीत.

एकदा कोणता तरी सण होता. नोकराने आपल्या मालकाच्या अंगावर जुने मळके कपडे पाहून विचारले–"मालक! आज सण आहे! जुने कपडे काय घातले आहेत? नवे कपडे घाला की!"

तो श्रीमंत मनुष्य नोकराला म्हणाला–"अरे सोमू! या गावात मला कोणी ओळखत नाही असे आहे का? मी नवे कपडे घातले काय आणि न घातले काय, एकच!"

नोकराने विचार केला, त्याचा मालक एक नंबरचा चिक्कू आहे. परंतु तो गप्प बसला, काही बोलला नाही.

काही काळ लोटल्यावर तो श्रीमंत शेजारच्या गावी निघताना नोकराला म्हणाला–"सोमू! मी जरा बाहेर गावी जातो आहे. घरात व बाहेर चांगले लक्ष असू दे."

"मालक! आपण परगावी जातांना सुद्धां जुनेच कपडे कसे काय घालून निघालात?"

"अरे वेड्या! तेथे तर मला ओळखणारा कोणीच नाही. मी कोणते ही कपडे घातले तरी सारखेच!" श्रीमंत मनुष्य म्हणाला.






# चंद्रभानु

खत्रपुर येथे राजा उदयभानु राज्य करीत असे. त्याच्या राणीचे नाव रूपमती होते. त्यांना बरेच दिवस मूलबाळ झाले नाही. त्यांनी पुष्कळ नवस केले, व्रतवैकल्ये केली, साधूसंन्याश्यांची सेवा करून आशीर्वाद घेतले. परंतु मूल झाले नाही.

शेवटी अगदी निराश होऊन राजा उदयभानूने वयाच्या चाळीसाव्या वर्षी लावण्यवती नावाच्या एका अत्यंत सुंदर राजकन्येशी विवाह करून घेतला. राजाने राज्यकारभारातले सर्व लक्ष काढून घेतले आणि रात्रंदिवस नव्या राणीच्याच महालात राहू लागला. मधूनमधून तो रूपमतीला भेटून येत असे.

लावण्यवतीशी विवाह होऊन दोन वर्षे लोटली तरी तिला मूल झाले नाही. परंतु राणी रूपमती मात्र वनस्पती द्रव्ये वगैरे घेऊन आपली प्रकृती सुधारत होती आणि ईश्वर कृपेने तिला यश येऊन एक सुंदर मुलगा झाला. राजाला परमानंद झाला. त्याने आपल्या मुलाचे नाव चंद्रभानु असे ठेवले. आपले दिवस पालटल्याचा रूपमतीलासुद्धा फार आनंद झाला. परंतु तो आनंद फार दिवस टिकला नाही. कारण लावण्यवतीच्या सौंदर्यावर भाळून राजा नेहमी तिच्या बोलण्याप्रमाणे वागे.

रूपमतीला मुलगा झाला तेव्हांपासून लावण्यवतीच्या मनात सवतीमत्सर वाढत गेला. रूपमतीविरुद्ध ती राजाचे कान भरू लागली की, मंत्रतंत्र करून एक मुलगा झाला आहे व तो मोठा झाल्यावर राज्याला एक मोठा धोका होऊ शकेल आणि आश्चर्य म्हणजे ज्या राजाने पुत्रप्राप्तीसाठी मंत्रतंत्र स्वत: केले होते तो लावण्यवतीच्या बोलण्यावर विश्वास ठेवून चंद्रभानूला जंगलात पाठवायला तयार झाला.



चंद्रभानु आठच महिन्यांचा झाला असेल, त्याला जंगलात सोडून येण्याचे काम सत्यपाल नावाच्या एका नोकरावर सोपविण्यात आले. सत्यपाल मुलाला घेऊन निघाला, परंतु त्याला जंगलात घेऊन जाण्याऐवजी शेजारच्या सत्यपुरी नामक राज्यात राहणाऱ्या जादुगार जादूपती नामक मित्राच्या घरी घेऊन गेला. त्याने चंद्रभानूला आपल्या घरी ठेऊन त्याच्या लालनपालनादीचा सर्व भार स्वतःवर घेण्याचे मान्य केले. सत्यपालने परत आल्यावर चंद्रभानूला जंगलात सोडून आल्याचे सांगितले.

कित्येक वर्षे लोटली. परंतु राजाला त्यानंतर मुलगा झाला झाला नाही. लावण्यवतीच्या सांगण्यावरून राजाने लावण्यवतीच्या महावीर नावाच्या भाच्याला दत्तक घेऊन त्याला युवराज पद दिले.

उदयभानूची मर्जी दुसऱ्या राणीवरच वाढत गेली. त्याचा गैरवाजवी फायदा घेऊन ती राज्यकारभारात ढवळाढवळ करू लागली. तिने मोठ्या राणीला तिच्या महालातून काढून नोकरांकरिता राखून ठेवलेल्या घरात रहायला सांगितले. दिवसे दिवस तिचा सवतीमत्सर वाढतच गेला. प्रजेलादेखील ती गोष्ट आवडली नाही. प्रजेत असंतोष वाढतच गेला.

राणीने एक दिवशी राजाला समजावून सांगून सर्व राज्यसूत्रेच स्वतःच्या हाती घेतली. तेव्हां कोठे राजाचे डोळे उघडले. आपण इतके दिवस धाकट्या राणीच्या सांगण्याप्रमाणे वागलो, ती आपली चूकच होती, हा ज्ञानबोध त्याला फार उशिरां झाला. परंतु धाकट्या राणीच्या हुकमाप्रमाणे त्याने राज्यसूत्रे पूर्वीच तिच्या हातात दिली होती. पुढे राणीने राजाला देखील थोरल्या राणीबरोबर नोकरांच्या वस्तीत रहायला पाठवून दिले.

अशा तऱ्हेने पुष्कळ दिवसांनी पुन्हां राजा व थोरली राणी एकत्र आले. त्याला फार वाईट वाटू लागले की, त्याने आपल्या एकुलत्या एका मुलाला निर्दयपणाने जंगलात पाठवून दिले. परंतु राणी रूपमतीने राजाचे मन थोडेदेखील न दुखवितां त्याला सर्व जुन्या गोष्टी विसरून जायला सांगितले. हळूहळू दोघांचे दाम्पत्यप्रेम वाढत गेले आणि चंद्रभानूच्या पाठीवर सोळा वर्षांनी रूपमतीला एक मुलगी झाली.

तोपर्यंत चंद्रभानु जादूपतीच्या घरी लहानाचा मोठा झाला. त्याने त्याच्याकडून मंत्रविद्या शिकून घेतली. तो दिसायला सुंदर होता. स्वभावाने हुशार होता आणि शरिराने हृष्टपुष्ट होता.

एक दिवशी चांगलासा मुहूर्त पाहून चंद्रभानु जादूपतीला बरोबर घेऊन लावण्यवतीच्या दरबारी आला आणि म्हणाला—"माझे नाव चंद्रभानु आहे आणि मी या राज्याच्या गादीचा खरा वारस आहे."

लावण्यवती चकित होऊन विचारू लागली—"ते कसे काय? चंद्रभानु तर लहानपणीच जंगलात श्वापदांच्या तोंडी पडून मरण पावला. तू कोणी तोतया दिसतो आहेस. चालता हो, नाही तर शिपायांकरवी तुला अटक करून तुरुंगात पाठविते."

चंद्रभानु शांतपणे म्हणाला—"मला एकदा महाराजांची भेट घ्यायची आहे."

"महाराज आता वृद्ध झाले आहेत व आजारी पण आहेत. ते दरबारात येणार नाहीत." लावण्यवती म्हणाली.



"मी आपल्या आईला भेटावे म्हणतो." चंद्रभानु म्हणाला.

"तुझी आई म्हणतोस? बराच वस्ताद दिसतोस की रे! लबाडी केल्याबद्दल मी तुला फाशीची शिक्षादेखील द्यायला कमी करणार नाही. लक्षात ठेव!" लावण्यवती गरजली. तिने आपल्या नोकरांना चंद्रभानूला अटक करण्यासाठी संकेत केला. परंतु त्यापूर्वीच चंद्रभानु दरबारातून निघून बाहेर गेला होता.

त्या राज्याची प्रजा लावण्यवतीच्या अत्याचाराखाली असंतुष्ट होतीच. राजा उदयभानु आणि त्याच्या दत्तकपुत्राविषयी प्रजेच्या मनात थोडेदेखील प्रेम नव्हते.



दरबारातील मुख्यमुख्य लोकांच्या तोंडी चंद्रभानु जे म्हणाला ते प्रजेला कळले आणि गादीचा खरा वारस जिवंत असल्याचे कळल्यावर प्रजेच्या उत्साहाला ऊत आला.

चंद्रभानु गावातील सर्व थोर सरदार मंडळींना भेटला. त्याच्या तोंडी सर्ववृत्त ऐकून घेऊन सरदार मंडळी म्हणाली— "युवराज! आपण या राज्याचा उद्धार करावा, आम्ही सर्व आपल्या पाठीशी आहो."

त्या सर्वांना बरोबर घेऊन चंद्रभानु दुसऱ्या दिवशी दरबारात गेला. तो आपल्या बरोबर बालपणी त्याला जंगलात नेले होते त्यावेळी त्याला जे कपडे घालण्यात आले होते ते घेऊन गेला होता. ते कपडे

लावण्यवतीला दाखवून चंद्रभानु म्हणाला— "हे पहा. माझे ते बालपणातले कपडे!"

"त्या लहान मुलाला रानटी श्वापदांनी खाऊन टाकल्यावर हे कपडे कोणी उचलून आणून संभाळून ठेवले असतील." लावण्यवती म्हणाली.

प्रमुख नागरिकांनी सल्ला दिला की वृद्ध महाराज व राणी रूपमती हे त्या मुलाला ओळखतात का जरा विचारून चवकशी करून पहावे.

परंतु उदयभानु व आणि रूपमति आपल्या मुलाला ओळखू शकले नाहीत. तेव्हां लावण्यवती चंद्रभानूला म्हणाली— "तू तोतया, चोर आणि लुच्चा आहेस. तुझे बिंग बाहेर पडले आहे. आता तुला फाशीची शिक्षा मी देते."

तेव्हां दूर बसलेला जादूपति म्हणाला— "अशी घाईकरणे बरोबर होणार नाही, महाराणी! दोघे मायलेक आहेत की नाहीत हे ओळखण्यास विशिष्ट व मान्य रीत आहे. आईचे दूध एका तलावात एका कोपऱ्यात टाकायचे असते आणि दुसऱ्या टोकाला मुलाने एका मडक्यात त्याच तलावाचे पाणी भरून घ्यायचे असते. त्या मडक्यात आईच्या दुधाची धार दृष्टीस आली पाहिजे. या पद्धतीने रूपमती आणि चंद्रभानु यांचे परस्परांशी मायलेकांचे नाते आहे की नाही.

आणि दुसऱ्या टोकाला चंद्रभानूने मडक्यात पाणी भरून दाखवावे."

लावण्यवती त्या अशक्य गोष्टीस जादूपतीच्या आग्रहास्तव तयार झाली. परंतु तिने एक अट घातली की या प्रयोगात चंद्रभानु अयशस्वी ठरला तर त्याला मृत्युदंड भोगावा लागेल."

चंद्रभानुने त्या अटीस होकार दिला.

प्रयोगासाठी आवश्यक सर्व तयारी करण्यात आली. दुसऱ्या दिवशी राजवाड्याच्या तलावाच्या काठी दुतर्फा मोठी गर्दी जमली. राणी रूपमतीचे दूध तलावाच्या एका टोकाला पाण्यात सोडण्यात आले आणि दुसऱ्या टोकाला तलावात उतरून एका रिकाम्या मडक्यात थोडे पाणी घेऊन चंद्रभानूने ते धुतले आणि त्यात पाणी भरून घेतले. तो ते मडके घेऊन बाहेर आला तेव्हां पाण्याला दुधासारखा पांढरा रंग आला होता. सर्वलोक ते पाहून चकित झाले.

नगर प्रमुख चंद्रभानूच युवराज असल्याचे सांगून राजा आणि लावण्यवतीला म्हणाला— "आतां महाराणीने गादी महाराजांच्या खऱ्या वारसाला द्यावी. चंद्रभानूचा राज्याभिषेक झाला पाहिजे." लावण्यवतीला ती गोष्ट मान्य करावी लागली.

आतां प्रश्न असा की मडक्यात दूध आले कसे? चंद्रभानूने जादूपतीच्या सांगण्याप्रमाणे एक पांढरे शुभ्र फडके बारा वेळा दुधात बुडवून वाळविले होते आणि ते पाण्यात उतरतांना त्याने आपल्या कंबरेला खोचून ठेवले होते. मडके धुण्याचे सोंग करीत असतां त्याने ते मडक्यातल्या पाण्यात छान खळबळून काढले. त्यामुळे पाण्याचा रंग पालटून दुधासारखा झाला. त्याने ते फडके तलावातच टाकले आणि पायानें चिखलात दाबून टाकले. त्यानंतर पाणी भरण्याचे सोंग करून तो बाहेर आला. अशातऱ्हेने तो यशस्वी होऊन राज्याचा वारस होऊ शकला.





# कुत्र्यांची खरेदी

पाचशें वर्षांपूर्वी हंगेरीमध्ये मात्यास नावाचा एक धर्मात्मा राजा राज्य करीत होता. त्यावेळेस राजधानीपासून थोड्या दूरच्या एका गावात एक श्रीमंत माणूस रहात असे. दुसऱ्यांना फसवणे त्याच्या सहजी अंगवळणी पडले होते. मित्र व जवळची माणसे यांच्यांशी खोटे बोलून त्यांना तो धोका देत असे व लोकपण त्याच्या बोलण्यावर सहजी फसत असत, आणि त्यातच तो आनंद मानीत असे. हा त्याचा नेहमीचा धंदाच झाला होता.

एकदा तो श्रीमंत राजधानीच्या गावी गेला असता, काही विक्री तरी करून सोन्याच्या नाण्यांची थैली भरून घेऊन गावी परत आला व गावातील प्रत्येकाला तो सांगत सूटला की, राजधानीत कुत्री विकून मी एवढी सारी संपत्ती मिळवली आणि राजधानीला कुत्र्यांची मोठी मागणी आहे.

गावातील एका गरीब माणसाने दुसऱ्याच्या तोंडून ती गोष्ट ऐकली व त्याच्या मनांत थोडे फार सोने मिळविण्याची इच्छा उत्पन्न झाली त्या गरीब माणसाने श्रीमंताच्या घरी जाऊन विचारले. साहेब, मी अशी गोष्ट ऐकली आहे, ती खरी आहे काय?

"हो बाबा! खरी आहे. मात्यास राजा वाटेल त्या किंमतीला कुत्र्यांची खरेदी करीत आहे. पैसे पण चांगले देत आहे. ही बातमी माझ्या कानावर आल्याबरोबर मी माझी होती ती संपत्ती कुत्र्यांच्या खरेदीकरिता खर्च करून राजधानीला जाऊन राजाला चांगल्या किंमतीला सर्व कुत्री विकून टाकली. माझ्याजवळ एक थैली भरून सोन्याची नाणी आहेत. खरंच! तुम्ही गरीब आहांत! तुम्हीपण राजाकडे जाऊन कुत्री विका." श्रीमंत माणसाने सांगितले.

वर विश्वास केला. बिचाऱ्याच्या मनांत पैसा मिळवण्याची आशा निर्माण झाली. परंतु त्याच्याजवळ धन म्हणायला एक फुटकी कवडीसुद्धा नव्हती. काही वस्तु विकावी व धन मिळवावे म्हटले तरी सुद्धा त्याच्याजवळ एका हडकुळया गायीशिवाय दुसरे काही नव्हते. पण आलेल्या संधीला फुकट घालवावयास तो तयार नव्हता. आपल्या अशक्त गायीला विकून त्याने काही कुत्री खरेदी केली, व त्यांच्या गळयात दोरी अडकवून त्यांना राजधानीला घेऊन निघाला.

तो गरीब माणूस राजमहालात जेव्हां पोहोचला तेव्हां पाहरेकऱ्यानें त्याला आंत जाऊन दिले नाही. तेव्हां त्याला श्रीमंत माणसाने चांगलाच धोका दिला व वेडा ठरविल्याचे कळले. त्याला बघून जेव्हा पहारेकरी हंसू लागले तेव्हां तो बिचारा रडकुंडीला आला व रडू लागला.

राजमहालाच्या खिडकीतून जेव्हां राजाने पाहिले तेव्हां एक माणूसजवळ कुत्री ठेवून घेऊन रडत आहे, असे दिसले. राजाने खरी गोष्ट काय आहे विचारले व पहारेकऱ्यांना गरीब माणसाला कुत्री घेऊन आत येण्यास सांगितले. गरीब माणसाने राजाला खरी घडलेली गोष्ट व श्रीमंताने आपल्याला कसे फसवले हे सांगितले.

राजाला त्या गरीबाची खूप दया आली. त्याने गरीबाला सांगितले की हे खरे आहे



मी कुत्री विकत घेतो. तेव्हां गरीब माणसाला शंभर सोन्याची नाणी देऊन कुत्र्यांना विकत घेतले. नंतर कुत्र्यांनापण सोडून दिले. त्याने श्रीमंताचे नांव गांव विचारून घेतले. गरीब माणसाला खूप आनंद झाला व त्याने गांवी जाऊन सर्वांना ही गोष्ट सांगितली व सोन्याची नाणी दाखविली.

श्रीमंताने विचार केला की, तो गरीब त्याचे म्हणणे खरे समजून सर्वांसमोर वेडा ठरेल, परंतु त्याने खरोखरी कुत्री विकून सोन्याची नाणी मिळविली. ह्या गोष्टीचे त्याला आश्चर्य सुद्धा वाटले की त्याने गमतीने एक गोष्ट सांगितली व ती खरी ठरली.

आता श्रीमंताला खूप संपत्ती मिळविण्याची खरोखरी इच्छा निर्माण झाली. त्याने आपली सर्व इस्टेट विकली व सर्व धन खर्च करून हजारो कुत्री विकत घेतली व त्या सर्वांना घेऊन तो राजधानीला निघाला. तेथे जाऊन पाहरेकऱ्यांशी त्याने ... त्याच्या कुत्र्यांना आत जाऊ दिले नाही श्रीमंत माणसाने आरडाओरडा केला, धमकी दिली. शेवटी कुत्रीपण भुंकू लागली.

ही सगळी गडबड ऐकून राजाने महालाच्या खिडकीतून पाहिले आणि नोकरांना त्या माणसाला व कुत्र्यांना आत पाठविण्यास सांगितले.

श्रीमंताने सांगितले की, कुत्र्यांना विकायास आणले आहे. श्रीमंताचे नाव ऐकताच राजाला कळले की ह्याच लबाडाने त्या गरीबाला फसवले आहे. तेव्हां राजा श्रीमंताला म्हणाला–"मी एकदाच कुत्री विकत घेतली. आता मला कुत्र्यांची गरज नाही, तुम्ही थोडे उशिरा आलांत!"

श्रीमंत कुत्र्यांना घेऊन राजधानीला गेला होता, तसाच परत पण आला. परंतु त्याची सगळी संपत्ती संपून गेली होती. त्यानंतर कित्येक दिवस लोक श्रीमंत माणूस व कुत्र्यांची खरेदी ह्यावर चर्चा करण्यातच आनंद मानत होते.





# कवीचा आदर

देवगिरी येथे एक प्रसिद्ध आशुकवि रहात असे तो दरवर्षी कोणत्या तरी गावी जाऊन त्या गावच्या राजासंबंधी दरबारात स्तुतिपर कविता म्हणून मोठे पारितोषिक मिळवी. नंतर देवगिरीला परत येऊन वर्षभर आनंदाने घालवी.

एकदा तो कवि सपत्नीक अमरावती गावी गेला. नवराबायकोने राजधानी खूप हिंडून पाहिली. त्या देशाचा राजा राज्यकारभारात फार हुशार असल्याचे आणि कवींचा आदर करणारा असल्याचे कवीला कळले. त्याने बायकोला एका धर्मशाळेत उतरविले आणि स्वतः राजदरबारात जाऊन राजाला आशीर्वाद दिला आणि राजावर एक आशुकविता रचून म्हणून दाखविली.

कवीची प्रतिभा पाहून राजा खूष झाला आणि कवीला म्हणाला–"कविवर्य! आपण आमच्या राज्यात कायमचा निवास करावा."

"नाही महाराज! मी तीर्थयात्रा करीत हिंडतो आणि आपल्या गावी देवगिरीला परततो. मला इतरत्र कोठे राहतां येणार नाही. क्षमा करावी!" कवीने उत्तर दिले.

राजा कवीचे उत्तर ऐकून थोडा निराश झाला. त्याला आपल्या देशातला पैसा परगावी गेलेला आवडत नसे. म्हणून कवीला पारितोषिक देणे त्याला पसंत नव्हते. तरी कवीने इतकी सुंदर कविता रचून म्हटल्यानंतर त्याचा यथोचित सत्कार केल्याशिवाय त्याला निरोप देणेदेखील त्याला बरे वाटेना. म्हणून राजाने कवीला आपल्या पंक्तीस जेवायला बोलवून त्याला आदर सूचक रेशमी धोतर जोडा व उपरणे दिले. परंतु धनप्राप्ती न झालेली पाहून कवि निराश झाला.

धर्मशाळेत आल्यावर कवीला बायकोने विचारले—"आपण महाराजांना कविता म्हणून दाखविली नाही का? कोणते पारितोषिक मिळाले?"

"त्या बिचाऱ्याच्याजवळ द्यायला आहे का काही?" कवि म्हणाला.

"म्हणता काय? राजाजवळ धन दौलत नाही म्हणता?" बायकोने आश्चर्यचकित होऊन विचारले.

"चूक माझी होती, त्याची नाही. अविद्वानाला मी रसिक सम्राटशिरोमणी म्हणालो. मांजराला पाहून भिणाऱ्याला शूर पराक्रमी म्हटले. हे सर्व ऐकून राजा मी काही देणार नाही असे म्हणाला नाही, हे माझे नशीब. त्याने सन्मानपूर्वक मला जेवायला वाढून धोतर उपरणे देऊन मला निरोप दिला." राजा म्हणाला.

"ते अन्नदेखील प्रजेचे धनच नव्हे का?" बायकोने विचारले.

त्या धर्मशाळेत काम करणारे सर्व नोकरचाकर राजाच्या हेर खात्यातले होते.

ऐकले आणि राजाला कळविले.

दुसऱ्या दिवशी सकाळी कवि सपत्नीक देवगिरीला निघाला त्यानंतर थोड्याच वेळाने एक बैलगाडी पाठीमागून येऊन त्यांना भेटली. गाडीवान त्यांना म्हणाला—"मी देवगिरीलाच चाललो आहे. या बसा!" त्याने दोघांना गाडीत बसवून घेतले.

कवि घरी पोचल्यावर थोड्या वेळाने अमरावतीचे दूत कवीला येऊन भेटले आणि म्हणाले—"महाराजांनी ही अल्प भेट आपणांकडे पोचती करण्यास पाठविले आहे आम्हांला. ही भेट येथवर आणणे आपणांला त्रासाचे झाले असते म्हणून आम्ही येथवर घेऊन आलो." कवीने ती भेट म्हणजे एक थैली उघडून पाहिली. पन्नास हजार सुवर्ण-मुद्रिका होत्या.

त्याच वर्षी कवीने देवगिरी सोडली आणि अमरावतीला जाऊन राहू लागला.





# पैशांचे झाड

दामोदरचे वडील वारले तेव्हां दामोदरला नुकतेच दहावे वर्ष लागले होते. म्हणून त्या कुटुंबावर डोंगर कोसळल्या सारखे झाले. तरी दामोदरची आई मेहनत मजुरी करून चार पैसे मिळवी.

दामोदर मोठा झाला. परंतु त्याला काही कामधंदा येत नव्हता. तो थोडा मूर्खच निघाला. तो नेहमी आईकडे पैसे मागे. तेव्हां एकदा त्याची आई रागाच्या भरात म्हणाली—"काय रे तू नेहमी पैसे मागतोस, माझ्याकडे पैशाचे झाड आहे, असं का वाटते तुला?"

ते ऐकून दामोदरने भोळेपणाने विचारले—"तर मग आई, मी पैसे पुरून ठेवतो. झाडाला पैसे लागू लागले म्हणजे..."

"अरे वेड्या पैसे पुरल्याने का झाड उगवते? तू जरा देशभर हिंडून पैशाच्या झाडाचे बी कोठे मिळते, चवकशी करून ये." दामोदरची आई चिडून म्हणाली.

परंतु भोळ्या दामोदरला आई म्हणाली ते सर्व खरेच वाटले. त्याच्या ओळखीची काही श्रीमंत मंडळी होती. त्यांच्याकडे जाऊन त्याने त्यांना विचारले—"काहो? पैशाच्या झाडाचे बी कोठे मिळते?"

दामोदरच्या त्या भोळेपणावर हसून ती मंडळी म्हणाली—"अरे वेड्या, जंगलात!"

दामोदर त्यांच्या बोलण्यावर विश्वास करून जंगलात गेला. त्याला तेथे एक म्हातारी काटक्या गोळा करीत असलेली दिसली. त्याने तिला विचारले—"आजी! पैशाच्या झाडाचे बी कोठे मिळेल हो?"

म्हातारीने दामोदरला पायापासून डोक्यापर्यंत एकदां पाहिले आणि म्हणाली—"बाळा, संध्याकाळ झाली ना? थोड्या काटक्या जमा कर पाहू. नंतर सांगेन."

कु. अ. क. जोशी

त्या आनंदात दामोदरने पुष्कळ काटक्या गोळा केल्या. म्हातारी त्याला म्हणाली– "बाळ! म्हातारपणामुळे कंबर बाकतनाशी झाली आहे. इतक्या काटक्या घरापर्यंत पोचवतोस का?"

दामोदर काटक्यांची मोळी उचलून घेऊन म्हातारीच्या पाठोपाठ निघाला.

"बाळा! गावात जाऊन या काटक्या विकून मिळतील ते पैसे आणून देतोस का?" म्हातारीने विचारले.

दामोदर मोळी उचलून गावात गेला आणि लाकडे विकून मिळाले ते पैसे आणून त्याने म्हातारीला दिले.

"आजी आता सांगता का पैशाच्या झाडाचे बी कोठे मिळेल?" त्याने म्हातारीला विचारले.

"सांगेन! आताच नाही मिळणार. मिळाल्यावर सांगेन!" म्हातारी म्हणाली.

त्या दिवसापासून दामोदर म्हातारीच्या घरीच राहू लागला. तो म्हातारीच्या सांगण्याप्रमाणे दररोज जंगलात जाऊन जे पैसे मिळत ते म्हातारीला देऊ लागला.

कित्येक दिवस, आठवडे आणि महिने लोटले. दामोदर दररोज तेच काम करीत राहिला. तो निराश झाला नव्हता.

एक दिवशी म्हातारीने पैशाची एक थैली त्याच्या हातात दिली व म्हणाली– "हे घे पैसे! हे सर्व तुझे आहेत!" दामोदर आश्चर्यचकित होऊन म्हातारीकडे 'आ' वासून पहात उभा राहिला.

तेव्हां म्हातारी त्याला म्हणाली– "पाहिलेस ना मुला? मेहनत केल्याने पैसे मिळतात. मेहनत हेच पैशांचे 'बी' आहे. आतां तू घरी आपल्या आईकडे जा. मेहनत करून पैसे मिळव व आपल्या आईचा भार हलका कर."

त्या दिवशी दामोदर म्हातारीचा निरोप घेऊन घरी परत आला. मेहनतीने मिळविलेल्या पैशांसह मुलाला घरी परत आलेला पाहून त्या माउलीला परमानंद झाला.





# महाभारत

धृतराष्ट्राला कृष्णाने दिव्य दृष्टी दिली आणि त्याला कृष्णाचे विश्वरूप दिसले. तेव्हां तो कृष्णाला म्हणाला–"देवा! तू माझ्यावर केवढी कृपा करून मला ही दिव्य दृष्टी दिलीस. म्हणून मला तुझे हे दिव्य रूप दिसले. आतां तू ही दृष्टी परत घे. मी ज्या दिव्य दृष्टीने तुझे हे रूप पाहिले त्या दृष्टीने सामान्य मानवाला पाहण्याची इच्छा माझ्या मनात नाही."

दुसऱ्या क्षणात सभाभवन पहिल्यासारखे झाले. कृष्णआपल्या सामान्य रूपात प्रगट झाला आणि सभेत उपस्थित ऋषींचा निरोप घेऊन सात्यकी आणि विदुर यांच्याबरोबर सभाभवनातून बाहेर जायला निघाला. त्यांच्या बरोबरच कौरव व सर्व राजे व महाराजे पण निघाले.

सभाभवनाच्या द्वारासमोरच दारुक रथ घेऊन उभा होता. कृष्ण रथात जाऊन बसला, तेव्हां धृतराष्ट्र त्याला म्हणाला– "कृष्णा! तू माझ्याविषयी गैरसमज करून घेऊ नकोस. पांडवांविषयी माझ्या मनात थोडीदेखील द्वेषबुद्धी नाही. मी तुझ्यासमोरच दुर्योधनाची समजूत घालण्याचा प्रयत्न केला होता."

त्यानंतर कृष्ण धृतराष्ट्र, भीष्म, द्रोण, बाल्हिक, कृप इत्यादिक मंडळींना उद्देश्यून म्हणाला–"आपण सर्व थोर मंडळींनी आज सभेत जे घडले ते प्रत्यक्ष डोळ्यांनी पाहिले आहे. धृतराष्ट्राने स्वतःला सर्व प्रकारे



असमर्थ व असहाय मान्य केले आहे. मी ज्या हेतूने आलो होतो ते कार्य संपले. मला निरोप द्या!"

सर्व थोर मंडळी कृष्णाला निरोप देऊन आपापल्या घरी निघून गेली. तेव्हां कृष्ण रथात बसून कुंतीआतेकडे गेला. कुंतीला त्याने घडलेले सर्व वृत्त सांगितले आणि म्हणाला–"आते! सर्वांनी अनेक प्रकारे दुर्योधनाची समजूत घालण्याचा यत्न करून पाहिला. परंतु त्याने तिकडे दुर्लक्षच केले. कौरवांचा शेवट अगदी जवळ येऊन ठेपला आहे. अर्जुन दावाग्नीसारखा कौरवांचा सर्वनाश करील. मी पांडवांकडे जात आहे. तुला त्यांना काही कळवावयाचे आहे का?"

वर कोणतेही व केवढेही मोठे संकट आले तरी त्यांनी धर्ममार्ग सोडू नये. क्षत्रियाने बाहुबळावर स्वतःच्या अधिकाराचे रक्षण करावयाचे असते. तो क्षत्रियधर्म आहे. त्यासाठी हिंसा करावी लागली तरी कर्तव्य-धर्म समजून त्यांनी ते केले पाहिजे. मी असे ऐकले की फार प्राचीन काळी मुचिकुंद नांवाच्या राजर्षीला कुबेर सर्व पृथ्वीचे राज्य देऊ लागला. परंतु तो ते घेण्यास तयार झाला नाही व म्हणाला–"मी बाहुबळाने जे राज्य मिळवीन तेच त्यातच माझ्या मनाचे समाधान होईल." या वेळी युधिष्ठिर ज्या मार्गाने जात आहे तो माझ्या मना-सारखा नाही. त्याला सांग, दररोज यज्ञ, दान व तप करून शौर्य व बल वाढविणे हे त्याचे कर्तव्य आहे. भिक्षाटन, कृषि व वाणिज्य क्षत्रियाला शोभत नाहीत. पांड-वांनी आपल्या वडिलांचे राज्य परत मिळविलेच पाहिजे, परराज्यात राहून मला सुख कसे काय मिळेल? युधिष्ठिराला जाऊन सांग, त्याने युद्ध करून आपले वडील आणि पितर यांना उत्तम लोक मिळावा यासाठी प्रयत्न करण्यात कसर ठेवू नये."

कृष्ण कुंतीचा निरोप घेऊन कौरव प्रमुखांचा निरोप घेतल्या नंतर सात्यकी आणि कर्णाला आपल्या रथात बसवून घेऊन निघाला. रथ राजधानीच्या बाहेर निर्जन स्थानी येऊन पोचल्यावर कृष्ण कर्णाला एकांतात म्हणाला–"कर्णा! तू वेदशास्त्रांचा अभ्यास केला आहेस म्हणून तुला सर्व गोष्टी छान कळतात. कन्येच्या पोटी जन्मलेल्याला कानीन म्हणतात. अशी कन्या विवाहबद्ध झाली म्हणजे तिचा पतीच कानीनचा पिता होतो. तू कुंती कन्या असताना तिच्या पोटी जन्मलास. म्हणून तू वरील नियमाप्रमाणे पांडूचा सर्वात मोठा मुलगा आहेस. धर्मशास्त्राप्रमाणे तूच राजा होण्यास योग्य आहेस. पित्याच्या नात्याने पांडव आणि मातेकडून वृष्णी वंशीय तुझे नातेवाईक आहेत. तू माझ्या-बरोबर आलास तर सर्व पांडव, पांडवपुत्र आणि त्यांच्या बाजूने आलेले सर्व राजे व महाराजे तुला आपला राजा मानून तुझे वंदन करतील. तुझा राज्याभिषेक होईल. द्रौपदी तुला आपला सहावा पती म्हणून तुला मान देईल. युधिष्ठिर युवराज होईल. तू राज्य स्वीकारलेस तर कुंतीमातेला आनंद होईल."

ते ऐकून कर्ण म्हणाला–"कृष्णा! तू इतक्या प्रेमाने आणि स्नेहभाव दर्शवून जे काही सांगितलेस त्यांतच माझे हित आहे, हे मला कळते. मी पंडुराजाचा पुत्र आहे,



यांत मला शंका नाही. कुंतीमातेने मी जन्मल्याबरोबर मला नदीत टाकून दिले. तेव्हां अतिरथी नावाच्या एका सूताने मला वाचवून लहानाचे मोठे केले. त्याची बायको राधा, हिने मला मातृस्नेहाने वाढविले. त्यांचे श्राद्ध करण्याचा अधिकार मला असू नये असे का तुला वाटते? त्यांनी वसुषेण म्हणून माझे नाव ठेवले. मी त्यांच्या नाते-वाइकांपैकीच एका कन्येशी विवाह केला. मला पुत्र पौत्र झाले. गेली तेरा वर्षे धृतराष्ट्राच्या महालात दुर्योधनाच्या आश्र-याला मी राज्यभोग भोगीत आहे. मी पाठीशी आहे म्हणूनच दुर्योधन पांडवांशी युद्धास तयार झाला. त्याने अर्जुनाशी द्वंद्व



युद्ध करण्यास सांगितले आणि मी ते मान्य केले आहे. म्हणून आता मी भय व लोभ सोडून आपल्या कर्तव्याला जागले पाहिजे. मी दुर्योधनाचा विश्वासघात करू शकणार नाही. मी अर्जुनाशी युद्ध करण्याचे नाकारले तर मी आपले वचन मोडल्यासारखे होईल व आमची दोघांची अपकीर्ति होईल. तुझ्या मदतीने पांडव या युद्धात यशस्वी होतीलच. मी मोठा भाऊ आहे असे युधिष्ठिराला कळले तर तो राज्य परत मिळविण्याचा विचारच सोडून देईल. मी सर्व विश्व जिंकून आणले तरी ते स्वत:साठी न ठेवून मी ते सर्व दुर्योधनाच्या चरणी अर्पण करीन. म्हणून युधिष्ठिरालाच सर्व जग

दुर्योधनाला खूष करण्यासाठी पांडवांविरुद्ध पुष्कळ बोललो. त्याबद्दल मला फार वाईट वाटते. परंतु मी हे जे म्हणालो ते इतर कोणाला सांगू नकोस. अर्जुनाला युद्धास तयार रहायला सांग."

तेव्हां कृष्ण थोडा हंसला व म्हणाला– "तरमग तुला राज्य लोभ नाही म्हणतोस. ठीक, तरमग हाच महिना युद्ध करण्यास योग्य व उचित आहे. एका आठवड्याने अमावास्या येईल. तू भीष्म, द्रोण व कृपाचार्यांना युद्ध आरंभ करण्यास सांग आणि तू स्वत: युद्धाला तयार रहा."

त्यानंतर कृष्ण व कर्णाने परस्पर आलिंगन केले. कृष्ण रथात बसून निघाला.

कृष्ण निघून गेल्यावर विदुर कुंतीजवळ गेला आणि म्हणाला–"मला नको होते तेच होत आहे. या महायुद्धात कौरव आणि पांडवांच्या हाती लक्षावधी लोकांचा संहार होणार. कृष्ण अयशस्वी होऊन पांडवांकडे परतला आहे."

कुंतीला देखील भीष्म, द्रोण आदिकांचा त्या युद्धात वध व्हावा हे आवडत नव्हते. तिला वाटू लागले की तिच्या मुलांच्या हातून अशा ज्ञानवृद्ध लोकांचा वध होण्यापेक्षा त्यांना दारिद्र्यात कष्ट सहन करून

दु:खाच्या व कष्टाच्या मुळाशी कर्ण आहे. त्याने पांडवांशी वैरभाव बाळगून युद्ध भेटून करण्याचे ठरविले आहे. म्हणून तिने कर्णाला त्याचे मन वळविता आले तर वळविण्याचे ठरविले. कर्ण गंगेकाठी तपश्चर्या करीत होता. तेथे ती आली.

कर्णाचा जप संपल्यावर त्याने डोळे उघडून पाहिले तर समोर कुंती होती. त्याने तिला नमस्कार केला व म्हणाला– "माते! मी कर्ण तुझ्या चरणी मस्तक ठेवीत आहे. माझ्या हातून तुझी कोणती सेवा घडण्यासारखी आहे?"

"बाळा! तू माझ्या पोटी जन्मलास, राधेचा मुलगा नाहीस तू! तू सूतवंशी देखील नाहीस. माझ्या बोलण्यावर विश्वास ठेव. तू आपल्या सख्या भावांना ओळखले नाहीस. तू दुर्योधनासाठी एक महापाप करायला निघाला आहेस. ते बरोबर नाही. अर्जुनाने आपल्या शौर्य व पराक्रमाने जे राज्य मिळविले ते कौरवांनी बळजबरीने गिळंकृत केले. तू ते परत मिळवून त्या राज्याचा मालक हो. कृष्ण बलरामासारखे तुम्ही दोघे कर्णार्जुन भ्राता म्हणून प्रसिद्ध व्हा. तुम्ही दोघे एकत्र झालात तर या जगात तुम्हांला कोणतीही गोष्ट अशक्य नाही." कुंती म्हणाली.



ते सर्व ऐकून कर्णाचे मन चलविचल झाले नाही. तो कुंतीला म्हणाला– "माते! मला तुझ्या म्हणण्याप्रमाणे वागतां येणार नाही. तू मला टाकून जे महापाप केले आहेस त्याची फळे तुला भोगावी लागतीलच. माझा शत्रूदेखील इतके घोर पाप माझ्याविरुद्ध करू शकणार नाही. तू जन्मताच मला नदीत फेकून दिलेस. मी क्षत्रिय म्हणून जन्मलो, परंतु एक सूतपुत्र म्हणूनच वाढलो. मला क्षत्रियांचा कुळधर्म माहीत नाही. तुला आजपर्यंत माझ्या क्षेम कल्याणाची फिकीर वाटली नाही. आज तुला स्वत:च्या स्वार्थासाठी मला उपदेश देणे सुचले आहे. आज मी पांडवांच्या



बाजूने लढलो तर लोक मला भितरा, कृतघ्न म्हणतील. युद्धाची सर्व तयारी झाल्यानंतर आज मी हे म्हटले की मी पांडवांचा मोठा भाऊ आहे, तर सर्व लोक माझी 'छी थू' करणार नाहीत का? धृत-राष्ट्र पुत्रांनी मला आश्रय दिला आणि माझा मानमरातब वाढविला. तर आज मी त्यांचा अपमान करून त्यांना सोडून जाऊ? त्यांचे ऋण फेडण्यासाठी मला या देहाचा होम करावा लागला तरी मी करणार. दुर्योधन आणि कौरव यांच्या बाजूने मी व माझे पुत्रपौत्र युद्धात भाग घेणार. तू आपल्या पुत्रांसाठी भिऊन आज माझ्याकडे आली आहेस. म्हणून मी तुला निराश करू मुलांपैकी इतर कोणाच्याही केसाला धक्का लागू देणार नाही. अर्जुनाचा वध करून मी आपल्या पराक्रमाची प्रचीती जगाला पटवून देईन. युद्धात अर्जुन मारला गेला तरी माझ्यासह पांच पांडव राहतील. मी मेलो तर तुझे पांच पुत्र आहेतच. तुला सहा पुत्रांची माता होणे कदापि शक्य होणार नाही."

कुंती दुःखावेगाने कर्णाला आपल्या पोटाशी धरून म्हणाली–"बाळ! भाग्यात जे असते तेच होते. आपण मर्त्य निमित्त मात्र आहोत. कौरवांचा नाश निश्चित आहे. परंतु तू आपल्या चार भावांना वगळून युद्ध करणार आहेस ही गोष्ट विसरू नकोस. तुझे शुभ होवो!" असा कर्णाला आशीर्वाद देऊन कुंती निघून गेली. कर्णाने कुंतीला नमस्कार केला आणि तो आपल्या निवासस्थानी निघून गेला.

हस्तिनापुराहून उपप्लाव्यला परत येताच कृष्णाने जे घडले ते पांडवांना सांगितले. नंतर पुढे काय करावयाचे या संबंधी त्यांनी परस्परांचा सल्ला घेतला. नंतर कृष्ण आपल्या निवासस्थानी निघून गेला.

त्या दिवशी रात्री पांडवांनी युद्धासंबंधी कृष्णाशी बराच वेळ विचार विनिमय केला. पांडवांच्या बाजूने सात अक्षौहिणी सैन्य



युद्धास तयार होते. प्रत्येक अक्षौहिणी सैन्याचा एक सेनापती होता. विराट, द्रुपद, धृष्टद्युम्न, शिखंडी, सात्यकी, चेकितान आणि भीम सात अक्षौहिणी सैन्याचे प्रमुख नेमले गेले. त्या सर्वांचा एक सर सेनापती म्हणून आणि भीष्माचार्यांची बरोबरी करू शकेल असा सेनापती निवडणे आवश्यक होते. युधिष्ठिराने असा सर सेनापती कोणाला नेमावे विचारले. तेव्हां सहेदेवाने विराटाचे, नकुलाने द्रुपदाचे, अर्जुनाने धृष्टद्युम्नाचे आणि भीमाने शिखंडीचे नाव सुचविले. युधिष्ठिराने कृष्ण सांगेल त्याला कोणा दोघांमध्ये सर सेनापती नेमण्याचे सूचना केली. तेव्हां कृष्णाने धृष्टद्युम्नाला सर्वांचा प्रमुख नेमावे असे सुचवून अर्जुनाच्या सूचनेला दुजोरा दिला.

धृष्टद्युम्नाची निवड झाल्याचे सर्व राजांना कळले तेव्हां त्यांना ती निवड योग्य दिसली व त्यांना फार आनंद झाला. आतां सैन्य संचालन सुरू झाले. रथ सर्वांत पुढे निघाले. शंख आणि रणवाद्ये वाजू लागली आणि

सैन्याच्या अग्रभागी भीम, नकुल आणि सहदेव निघाले. त्यांच्या पाठीमागून अभिमन्यु, उपपांडव, धृष्टद्युम्न आणि पांचाल योद्धा निघाले. सैन्याच्या मध्यमागी युधिष्ठिर होता. सैन्याबरोबर अनेक प्रकारची वाहने, रणगाडे, वैद्य आणि इतर सेवक होते. द्रौपदी आपल्या दासींसह उपप्लाव्य नगरीतच राहली. पांडवांनी युद्धाला निघण्यापूर्वी ब्राह्मणांना गोदान व सुवर्णदान केले आणि त्यांचा आशीर्वाद घेतला.

सैन्याच्या शेवटी विराट, कुंतिभोज, धृष्टद्युम्नाचे पुत्र, चाळीस हजार रथ, दोन लाख घोडे, पांच लाख पायदळ सैन्य, साठ हजार हत्ती घेऊन चेकितान, धृष्टकेतु, सात्यकी, कृष्ण आणि अर्जुन होते.

ते अफाट सैन्य कुरुक्षेत्र मैदानावर पोचताच शंख वाजू लागले. सैनिक आनंदाने जयघोष करू लागले. त्यांच्या जयघोषाने सर्व आकाश दुमदुमले.





# शिव लीला

[ ५ ]

दक्षिण भारतात पोत्तपिनाडु नामक प्रदेशात एक फार मोठे अरण्य होते. त्यात शबर जातीचे लोक रहात असत. त्या प्रदेशाची राजधानी ऊडमरु ही होती. शबर लोक शिकार करून किंवा शेतकी करून आपला उदर निर्वाह चालवीत.

शबर जातीच्या राजाचे नाव नादनाथ आणि राणीचे नाव तंडे असे होते. त्यांना तिन्नडु नावाचा मुलगा होता. मोठा झाल्यावर त्याला सर्व शस्त्रास्त्रविद्या शिकविण्यात आली. हळूहळू तो पळणाऱ्या हरणाला व आकाशात उडणाऱ्या पक्ष्याला तो सहज नेम मारून ठार करू लागला.

शबर जातीच्या लोकांनी आपल्या युवराजाला शिकार करण्याची विद्यापण उत्तम प्रकारे शिकवावी असे सुचविले. त्यांनी शंकराजवळ हात जोडून नवस केला, कित्येक जनावरांचा बळी दिला, महुवा नावाच्या फुलाची दारू प्याले आणि नृत्यगान करीत एक मोठी मिरवणूक काढली.

दुसऱ्या दिवशी ते शिकारीसाठी जाळी, दोऱ्या, फास, शिकारी कुत्री इत्यादि घेऊन निघाले. तिन्नडु वाजत गाजत शिकारीला निघाला. ते लोक तिरुपतीच्या डोंगराळ प्रदेशाकडे निघाले. वाटेत अनेक श्वापदांची व पक्ष्यांची शिकार केली. त्यांचे मांस काढून ते विस्तवात भाजले आणि जंगलातल्या मधात बुडवून खाल्ले. अशा तऱ्हेने शिकार करीत ते अनेक दिवस हिंडले व फिरले.

एक दिवशी शिकारीला गेला असतां तिन्नडु दमून गेला आणि बकुळाच्या झाडाखाली झोपला. स्वप्नात त्याला एक



महापुरुष दिसला. त्याच्या सर्वांगावर विभूती लावलेली होती. त्याच्या कंबरेला त्याने व्याघ्रचर्म बांधलेले होते, डोक्याला जटा होती, गळ्यात मुंडमाळ होती आणि त्याच्या मध्य भागी शिवलिंग होते. तो महापुरुष स्वप्नातच तिन्नडूला म्हणाला— "बाळ! या डोंगराच्या पायथ्याशी सुवर्ण-मुखी नदीच्याकाठी वटवृक्षाखाली शंकर निवास करीत आहे. तू त्याची पुजा कर."

तिन्नडु दचकून जागा झाला. त्याने आश्चर्यचकित होऊन चारीबाजूला पाहिले. त्याचे अनुयायी शिकार खेळण्यात मग्न होते. इतक्यात एक रानडुक्कर ओरडत त्या बाजूला आले. तिन्नडूने त्या रानडुकराचा पाठलाग केला. परंतु ते डुक्कर एकाएकी ज्या जागी अदृश्य झाले. त्याच जागी तिन्नडूला एक शिवमंदिर दिसले. स्वप्नात त्या महा-पुरुषाने त्याच शिवलिंगाविषयी सांगितले होते. म्हणून तिन्नडूला ती सर्व शिवलीला आहे असे वाटले. तेव्हां त्याने त्या शिव-लिंगाला साष्टांग नमस्कार केला आणि म्हणाला—"हे प्रभो! या डोंगराळ प्रदेशात ज्या जागी वाघ आणि सिंह विहार करतात अशा या जागी नदीकाठी तू कां राहतोस? तुला भूक लागली तर तुला अन्नपाणी कोण आणून देईल? तू आमच्या गावी ऊडमूर येथे कां येऊन रहात नाहीस? माझ्या वहिणी तुला डुकराचे, हरणाचे व पक्ष्यांचे मांस शिजवून अगर भाजून खायला देतील. भात भाजी, खीर व फळे आणून देतील. परंतु तू आला नाहीस तर मी देखील येथून हलणार नाही."

इतक्यात इतर शबर त्याला शोधीत त्या जागी येऊन पोचले. ते त्याला म्हणाले— "मालक! आपण ज्या रानडुकराचा पाठ-लाग केलात ते डुक्कर कोठे आहे? चला घरी." तिन्नडूने त्या प्रश्नाचे एवढेच उत्तर दिले—"शंकराने माझ्याबरोबर यायचे कबूल केले तरच मी येईन. नाही तर येणार नाही. तुम्ही जा." नंतर तो शंकराचे स्मरण करून ध्यानमग्न झाला. तेव्हां सर्व निराश होऊन तेथून निघून गेले.

शंकराला किती दिवसापासून अन्न-पाण्याविना काढावे लागले असतील कोणास ठाऊक? असा विचार करून तिन्नडु धनुष्य बाण घेऊन शिकारीस निघाला. त्याने एक रानडुक्कर मारले. त्याचे मांस काढून त्याचे बारीकबारीक तुकडे करून ते भाजले. सुवर्णमुखीचे पाणी आणून शंकरासमोर ठेवले आणि म्हणाला—"हा नैवेद्य आहे. थोडे खाऊन घे!"

परंतु शंकराकडून काहीच उत्तर मिळाले नाही. तेव्हां तिन्नडु रडू लागला आणि म्हणाला—"हे प्रभो! तू हे मांसखाल्ले नाहीस तर मी तुझ्यासमोर जीव देईन."

शंकराने तिन्नडूच्या भक्तीवर प्रसन्न होऊन त्याला दर्शन दिले व म्हणाला— "ऊठ बाळ! मी खातो मांस!" असे सांगून शंकराने सर्व मांस खाऊन टाकले.

असेच काही दिवस गेले. एक दिवशी शिवगोचर नावाचा एक नैष्ठिक शिवभक्त ब्राह्मण त्या देवळात आला आणि म्हणाला— "प्रभो या उष्टया काड्या कसल्या? आणि ही घाण कसली? तुझ्या या पवित्र देवळात ही घाण कोणी करून ठेवली. तू सांगितले नाहीस तर मी अन्नपाणी त्याग करून तुझ्या चरणांवरच जीव देईन."

"हे भक्त! तू घाबरण्याचे कारण नाही. माझा एक भक्त जंगलात राहणारा आहे आणि तो भक्ति भावनेने मला जे निवेदन



करतो ते मी प्रेमाने ग्रहण करतो. तुला त्याला पहावयाचे असेल तर तु माझ्या पाठीमागे लपून बस." शंकर म्हणाला.

थोड्या वेळाने तिन्नडु देवळात आला. शिवलिंगासमोर ज्या उष्टया वस्तू पडल्या होत्या त्या त्याने पायाने दूर सरकविल्या आणि आपल्या तोंडात त्याने जे पाणी आणले होते त्याने शिवलिंगावर अभिषेक केला. नंतर शिवलिंगासमोर एक पत्रावळ ठेवून मांसाचे तुकडे त्यावर वाढून ठेवले.

शंकराने तिन्नडूच्या भक्तीची परीक्षा घेण्याचे ठरविले. म्हणून त्याने त्या मांसाला हात देखील लावला नाही. त्याच्या मिटलेल्या डोळ्यातून घळघळा पाणी वाहू लागले. ते पाहून तिन्नडू घाबरून गेला. त्याने अनेक प्रकारे डोळ्याचे काय दुखणे आहे हे पाहून इलाज केले. परंतु शंकराच्या अश्रूधारा बंद व्हायच्या ऐवजी त्यांच्या जागी रक्ताच्या धारा वाहू लागल्या.

आतां काय करावे, तिन्नडूला कळेना. त्याला वाटले की डोळ्याचे दुखणे दूर करण्याचा उपाय दुसरा डोळा त्या जागी बसविणेच आहे. तसा विचार करून त्याने आपल्या सुरीने आपला डोळा काढला आणि शंकराच्या डोळ्याच्या जागी बसविला.

त्यानंतर दुसऱ्या डोळ्यातून रक्ताच्या धारा वहात असलेल्या पाहून तो म्हणाला– "घाबरण्याचे कारण नाही प्रभो!" असे म्हणत त्याने दुसरा डोळा काढण्यासाठी सुरी डोळ्याजवळ नेली. तेव्हां शंकराने प्रगट होऊन त्याला म्हटले–"थांब!"

त्यानंतर त्याने ब्राह्मणभक्ताला हाक मारली व म्हणाला–"शिवडोचर! पाहिलीस तू या जंगली शिवभक्ताची भक्ती?" नंतर शंकराने दोघांना विचारले–"तुम्हांला जो वर पाहिजे तो मागुन घ्या."

"प्रभो! तुला जो द्यावासा वाटेल तोच वर दे. तुझ्याजवळ आम्ही काय मागणार?" असे म्हणत दोघांनी शंकरासमोर साष्टांग नमस्कार केला. शंकराने त्या दोघांना या जगाच्या मायाजालातून कायमचे मुक्त करून शिवलीन करून घेतले.



# १३७. राक्षस चित्र

उत्तर अमेरिकेतील कॅलिफोर्निया नामक राज्यात ब्लॅट नामक स्थानी ही चित्रे आहेत. जमिनीवरून ही चित्रे ठीक ठीक दिसत नाहीत. म्हणून ही चित्रे काढणाऱ्यांना तरी त्यांनी काढलेली चित्रे कशी आहेत हे कसे काय कळले असेल, कोणास ठाऊक? अशी अनेक चित्रे खड्यांची या जागी आहेत. विमानात बसूनच ही चित्रे पाहणे शक्य आहे. १९४२ साली या चित्रांचे फोटो अगदी पहिल्या पहिल्याने काढण्यात आले.

खालच्या चित्रात फक्त दोनच चित्रे दिसत आहेत. परंतु त्या प्रदेशात अशी अनेक राक्षसी चित्रे आहेत. ही चित्रे तितकी खोल नाहीत, परंतु फार मोठी पसरलेली आहेत. मनुष्याच्या चित्राची उंची पायापासून डोक्यापर्यंत १७० फुट आहे. दुसरे चित्र लांब शेपटीच्या एका घोड्याचे आहे. इ. स. १५४० पूर्वी या प्रदेशात घोडेच नव्हते. ही वस्तुस्थिति आहे. म्हणून असे म्हणावे लागते की इ. स. १५४० नंतरच या राक्षसी चित्रांची निर्मीती अमेरिकन रेड इंडियनांनी केली असावी. कारण त्या पूर्वी त्यांना घोड्याच्या रंगारूपाची कल्पनाच नव्हती.





# अमरवाणी

उदये सविता रक्तः,
रक्त श्चास्तमये तथा;
संपत्तौ च विपत्तौ च,
महता मेकरूपता ।। १ ।।

[ सूर्य उदयसमयीं जसा तांबडा लाल असतो, तसाच तो अस्तसमयीं तांबडा लाल असतो. थोर पुरुष संपत्ति असो की विपत्ति, दोन्ही स्थितीत सारखेच असतात.]

यथा चित्तम् तथा वाचः,
यथा वाचः तथा क्रियाः,
चित्ते वाचि क्रियायाम् च,
महता मेकरूपता ।। २ ।।

[ जे मनात असते तेच वाणीत असते; वाणीत असते तेच करणीतही असते. थोरपुरुष मनसा वाचा कर्मणा एक रूप असतात.]

मन स्येकम्, वच स्येकम्
कर्मण्येकम् महात्मनाम्;
वच स्यन्यत्, मनस्यन्यत्
कर्मण्यन्यत्, दुरात्मनाम् ।। ३ ।।

[ थोर पुरुष मनसा वाचा कर्मणा एक रूप असतात. या उलट दुर्जनांचे मन, वचन आणि कर्म निरनिराळे असते.]

थोर पुरुष



# विलक्षण न्याय

एका गावी सोन्या आणि सोनुबाई नावाचे नवराबायको रहात असत. सोन्याजवळ पुष्कळ पैसे होते, परंतु तो स्वभावाने फार चिक्कू होता. त्याची दर महिन्याची प्राप्ती शेकडो रुपयांची होती. तरी दोघां नवरा-बायकोंचा महिन्याभराचा खर्च तो साठ रुपयांहून जास्त होऊं देत नसे उरलेले पैसे तो तिजोरीत ठेवून देई आणि किल्ली कनवटीला अडकवून ठेवी. सोनुबाईने नवऱ्याला घर खर्चासाठी चार पैसे जास्त द्यायला सांगितले. परंतु सोन्याचे आपले ते खरे! सोनुबाई नवऱ्याला मनातल्या मनात खूप शिव्या देई.

एकदां सोन्याला परगांवी जावे लागले. त्याने जातांना बायकोच्या हातावर एक अर्धा रुपया ठेवला आणि म्हणाला—"हा अर्धा रुपया, तुला या वेळच्या जेवणासाठी!" सोनुबाईने तो अर्धा रुपया दोनदां तीनदां फिरवून पाहिला आणि म्हणाली—"आणि रात्रीच्या जेवणाला? कर्म माझे! देवानेच तुमच्या गळयात मला बांधली आहे...!"

"काळोख पडायच्या आत परत येणार आहे. रात्रीच्या जेवणासाठी तेव्हां देईन!" सोन्या म्हणाला.

"तिजोरीत पैसा कुजत राहीला तरी माझ्या नशिबी हेच! हातात फुटकी कवडी-सुद्धां रहात नाही. ज्यांनी तुम्हांला हुडकून तुमच्या हाती माझ्या गळयात मंगळसूत्र बांधविले. आतां मी त्यांनाच विचारते!" असे म्हणत सोनुबाई पदराला डोळे पुसू लागली.

बायको म्हणाली तिकडे दुर्लक्ष करून सोन्या घाईघाईने घराबाहेर पडला.

सोन्या निघून गेल्यावर सोनुबाईने स्वतः-च्या नशिबाला शिव्या दिल्या. अर्ध्या रुपयाला मिळाले ते तांदूळ व पीठ वगैरे

श्री का. न. केसकर



आणून सैंपाक करून जेवली व पत्रावळ बाहेर नेऊन टाकली. परत फिरू लागली नेमका त्या वेळी तिचा बाप आला.

बापाने घरात पाऊल टाकल्याबरोबर विचारले–"काय सोने! कसं काय बरं आहे ना?" सोनुबाई रागातच होती. बापाने विचारलेल्या प्रश्नाने तिच्या अंगाचा भडकाच उडाला. म्हणाली–"मला नरकात आणून टाकलीत तर, माझं बरं नसेल तर वाईट का असणार? तुमचा जांवई माझ्या हातावर फुटकी कवडी कधी ठेवील तर शपथ! तिजोरीवर नागोबासारखी सतत नजर असते. अवेळी कोणी पैपाहुणा आला तर त्याला जेवायला काय वाढायचे?

[illegible]च [illegible] [illegible]?" म्हाताऱ्याला काय बोलावे, सुचेना. म्हणाला– "मला जेवायचे नाही. मी फक्त तुला भेटून जायला आलो होतो." आणि अधिक बोलल्याशिवाय निघून गेला.

ऐन उन्हात वडिलांना उपाशी जाऊ द्यावे लागले, याचे कारण नवरा आहे या विचाराने सोनुबाईला नवऱ्याचा फार राग आला. नवऱ्याशी भांडून आपला हक्क पटवून द्यायचे तिने ठरविले.

काळोख पडल्यावर सोन्या घरी आला आणि कनवटीची किल्ली काढीत म्हणाला– "मी जेवून आलो आहे. तुझी खळगी भरायला अर्धा रुपया देऊ का?"

सोनुबाईने मागेपुढे पाहिले नाही आणि सोन्याच्या हातातली किल्ली हिसकावून घेत म्हणाली–"आतां यापुढे ही माझ्याजवळच राहील. वाटेल तेवढा मी खर्च करणार. तुमचे सासरे आले होते, परंतु त्यांना काय वाढणार मी? म्हणून भर उन्हांत उपाशी परत पाठवावे लागले. लोकांना ही गोष्ट कळली तर काय म्हणतील?"

सोन्या बायकोचे ते वागणे पाहून संतापला. म्हणाला–"पैसे खर्च करणे म्हणजे मोठे काम झाले होय? कोणी मिळवणारा असल्यावर मी सुद्धां खर्च करू शकेन. माझी किल्ली परत कर."

"[illegible] देणार [illegible]" [illegible] तितक्याच करड्या स्वरात म्हणाली.

"कां देणार नाहीस? माझे पैसे खर्च करणारी तू कोण?" असे म्हणत सोन्या बायकोच्या हातातली किल्ली हिसकावून घ्यायला पुढे झाला.

"मी तुझी बायको आहे. तुझे पैसे खर्च करण्याचा अधिकार मला आहे. पैसे खर्चायला नसले तर पैसे हवे तरी कशाला?" असे म्हणत सोनुबाई किल्ली घेऊन धावत बाहेर रस्त्यावर येऊन उभी राहिली.

बाहेर गल्लीत आल्यावर समोरच्या घरात राहणाऱ्या सावकाराने विचारले– "काय, कसला ओरडा तुमचा हा?"

सोनुबाईने घडलेले सर्व वृत्त थोडक्यात सांगितले आणि म्हणाली–"तुम्हीच सांगा हो काका! मला आवडो किंवा नाही, सांगाल तशी वागायला मी तयार आहे."

"तुमचे नवराबायकोचे भांडण आणि मी भांडण सोडवणार?" असे म्हणत सावकार घरात निघून गेला आणि आतून दार लावून घेतले.

चार घरे पलीकडे पाटलांची बायको उभी राहून उत्सुकतेने काय बोलणे चालले आहे ऐकत होती. तिने हांक मारून विचारले–"काय हो, काय भानगड आहे?" सोनुबाईने जवळ जाऊन सावकाराला



सांगितले तेच सांगितले आणि पाटलिणीला सल्ला विचारला.

पाटलिणीने शांतपणे सर्व ऐकून घेतले आणि म्हणाली–"बाई ग बाई! तुम्हां नवराबायकोचे भांडण आणि मध्ये मी कशाला? नाही वेळ!" असे सांगून घाई-घाईने घरात निघून गेली.

आणखी चार घरे टाकून पुढे गेल्यावर त्यांचे भांडण ऐकत एक वृद्ध गृहस्थ उभा होता. त्यांनी त्याला सर्ववृत्त सांगून कोणाचे म्हणणे बरोबर आहे विचारले. तो म्हणाला–"मी निवाडा सांगणार? नवराबायकोच्या भांडणाचा निवाडा करणे त्या परमेश्वराला तरी जमेल की नाही शंकाच!" असे सांगून

आकाशाकडे पहात त्या वृद्ध गृहस्थाने नमस्कार केला आणि गप्प बसून राहीला.

"ठीक, चला तर देवालाच विचारू या!" असे म्हणत सोनुबाई नवऱ्याला ओढीत गल्लीच्या टोकाला देऊळ होते तिकडे घेऊन गेली. देवळात पुजारी नव्हता. परंतु गर्भगृहात नंदादीप तेवत होता आणि मूर्तीवर छान प्रकाश पडला होता.

सोनुबाई नवऱ्याला हात धरून ओढत सरळ गर्भगृहात गेली आणि म्हणाली– "देवा! आता तूच सांग, नवऱ्याने मिळविलेल्या पैशातले काही पैसे बायकोने खर्च केले तर त्यात काही चूक आहे का? तूच न्याय निवाडा कर. हा माझा नवरा मला एक फुटकी कवडीसुद्धां खर्च करू देत नाही." पण तो दगडाचा देव उत्तर काय देणार?

"देवा! बायको झाली म्हणून माझे पैसे खर्च करायला तिला अधिकार काय? मी तिला पोटभर खायला घालतोच की. तिच्या हातात किती पैसे दिले तरी उरतील तर तुझी शपथ!" सोन्या म्हणाला.

कळल्यावर म्हणाला– "तुम्ही प्रथम हे सांगा, गर्भगृहात तुम्ही पाऊल कसे ठेवलेत? पहिल्याने बाहेर व्हा कसे! देऊळ बंद करायची वेळ झाली आहे. तुमचा न्याय-निवाडा करायला देवाला थोडा शांतपणे विचार तरी करू द्याल की नाही?" असे सांगून त्याने दोघांना देवळाबाहेर काढले.

त्यांना हवा असलेला न्याय देवाकडून मिळाला नाही, म्हणून नवराबायको रस्त्यावर येऊन पुन्हां भांडू लागली. चार लोक जमा झाले आणि म्हणाले–"तुम्ही आपल्या घरात जा आणि पोटभर भांडा, रस्त्यावर हा काय गोंधळ? जगाला नसता त्रास!" असे सांगून दोघांना घरी पाठवून दिले.

घरात पाऊल टाकताच दोघे नवरा बायको परस्परांकडे "अरे बाप रे, हे काय झाले?" या अर्थी पहात उभे राहले. तिजोरी रिकामी उघडी पडली होती. सर्व दागदागिने आणि पैसे आंत काहीच नव्हते.





# प्रारब्ध

एका गावी अमरसिंह नांवाचा शेतकरी रहात असे. त्याला एक मुलगी झाली, परंतु ती आंधळी होती. दोघां नवरा-बायकोने आपल्या फुटक्या नशिबाला दोष दिला. त्यांनी त्या मुलीचे नाव मल्लिका ठेवले.

मल्लिकेला बारावे वर्ष लागले, त्या सुमारास अमरसिंहाला आणखी सहा मुले झाली. संसाराचा भार दिवसेदिवस वाढत गेला आणि अमरसिंहाला संसार नकोसा वाटू लागला. मल्लिका मोठी होती तिला कामाला लावावे तर ती आंधळी होती, काय काम करणार?

एके दिवशी अमरसिंह बायकोला म्हणाला–

"या आंधळया मुलीला वाढवून उद्यां तिचे लग्न करून द्यायचे म्हटले तर तिच्याशी लग्न कोण करणार? तिला कोठे तरी पोचवून यावे म्हणतो. तिच्या भाग्यात असेल ते होईल. कोणी दया करून तिला घेऊन गेला तर तिचा उद्धार आणि तिच्या बरोबर आपला पण होईल."

दुसऱ्या दिवशी अमरसिंह मल्लिकेला घेऊन निघाला. वाटभर त्याला त्याचे मन खात होते, 'हे देवाला रुचेल का?'

संध्याकाळी दोघे एका गावी येऊन पोचली. गांव एका ओढयाच्या काठी होते. त्या ओढयात फक्त पावसाळयात पाणी वहात असे. अमरसिंह मल्लिकेला हात धरून घेऊन गेला. दोघे एका जागी बसले. अमरसिंहाने खायला म्हणून बरोबर जे काही आणले होते ते काढून मुलीला प्रथम खायला दिले आणि मग स्वतः खायला बसला. बाजूला एका खड्डयात स्वच्छ पाणी होते ते पिऊन घेऊन मुलीला पण पाणी प्यायला दिले.

श्री गो. ग. दांडेकर

रात्रभर दोघे त्या ओढ्याच्या वाळूतच झोपले. गार वारा होता. दोघांना छान झोप लागली. उजाडल्यावर अमरसिंहाने उठून एकदां मुलीकडे पाहिले. मुलीला सोडून जाताना त्याचा जीव कळवळला. तरी मन घट्ट करून तिला तसाच झोपवून आपल्या गावाच्या दिशेने निघाला.

काही वेळाने मल्लिकेची झोप मोडली. ती उठून बसली आणि "बाबा!" म्हणून कहा मारू लागली. तिचे बाबा तिला एकटीला असे सोडून निघून जातील याची तिला कल्पनादेखील नव्हती. तिने दोन तीनदां 'बाबा' 'बाबा' म्हणून हांक मारली. परंतु काही उत्तर मिळाले नाही, तेव्हां काही तरी खायला घेऊन यायला गेले असतील असा विचार करून ती गप्प बसून राहली.

ती निश्चितपणे वाळूत बसून परकरात खडे गोळा करू लागली आणि सागरगोट्यासारखे खेळू लागली. त्या ओढ्यावरून लोक येत जात होते, परंतु कोणी घेऊन तिला काही विचारले नाही की तिच्याकडे पाहिले नाही.

मुलीला सोडून निघून गेल्यावर अमरसिंहाच्या मनात कालवाकालव होऊ लागली. त्याचे पाऊल पुढे पडेनासे झाले. "बिचारी काय करीत असेल कोणास ठाऊक? कोणी तिला उचलून किंवा बोलावून तर नेले नसेल? बिचारीला काय माहीत, मी तिला टाकून आलो आहे! मला आणखी सहा पोटे भरावयाचीच आहेत, हे एकटे पोट मला ओझे कां वाटावे?"

अमरसिंह जागच्या जागी असा विचार करीत उभा राहिला आणि नंतर झपाझप पावले टाकीत मागे फिरला. मल्लिकेला सागरगोटे खेळत असलेली पाहून चकित झाला. तिच्या सागरगोट्यांपैकी एक दगडाचा खडा नसून हिरा होता.

त्याची छाती उचंबळून आली. "बाळ मल्लिके!" असे म्हणत त्याने तिला उचलून पोटाशी घट्ट आवळून धरले. त्याच्या डोळ्यांतून प्रेमाश्रू घळघळां गळू लागले.





# ऋक्ष पर्वत

[ १३ ]

[ समरबाहूला आणि त्याच्या अनुयायाला अस्वल जातीचे लोक गुहेत धरून घेऊन गेले. खड्गवर्मा आणि जीवदत्त धुराचे लोट पाहून त्याच्या अनुरोधाने जात तोच अस्वल जातीच्या लोकांची गुहा असली पाहिजे असे समजून गुहेत शिरले. तेथून त्यांना गुरु भल्लूकाचे शिष्य धरून लांडग्यांच्या खडकाकडे घेऊन निघाले. पुढे– ]

गुहेतल्या गुप्त व काळोख्या वाटेने अस्वल जातीचे लोक खड्गवर्मा आणि जीवदत्त यांना काही अंतर घेऊन गेल्यावर एका जागी थांबले. अस्वल जातीचा नोकर पुढे जात म्हणाला—"काय रे दादा! आपले हे दोघे कैदी लांडग्यांचा खडक म्हणजे गमतीची जागा असावी असे समजून आनंदाने बेफिकीरपणे चालत आहेत. आपण परवां धरून घेऊन आलो होतो ते दोघे लांडग्यांचे ओरडणे ऐकल्याबरोबर थरथर कांपू लागले होते. यांना मुंगी चावल्यासारखे सुद्धां दिसत नाही. लांडग्यांचा खडक म्हणजे किती भयंकर जागा आहे, यांना कळेल असे सांगू या का?"

ते ऐकून अस्वल जातीचा दुसरा मनुष्य थोडासा रागावल्यासारखा म्हणाला—"येथे फुकट वेळ न घालवितां त्यांना तेथेच प्रत्यक्ष दाखवू या!"



"तसे नव्हे रे! ती भयंकर जागा त्यांना प्रथम दाखविली तर त्यांच्या अंगाचा थर-कांपच उडेल. नंतर त्यांना त्या खडकावर चढवू या." असे म्हणत पहिल्या अस्वल जातीच्या माणसाने काळोखात हात वर करून गुहेच्या छताला चाचपून पाहिले आणि कडीसारखे काहीतरी धरून जोराने ओढले. त्या पाठोपाठ लहानशा खिडकीच्या दारासारखे दार उघडले आणि गुहेत चांदण्याचा उजेड पडला.

त्या उजेडात खड्गवर्मा आणि जीवदत्त दोघांनी गुहेत त्यांना दूरवर जितके पाहतां आले तितके पाहून घेतले. उंच आणि मोठे विशाल भुयार होते ते. त्यात यायला [illegible]

"खड्गवर्मा! ही लहानशी गुहा किंवा भुयार नाही दिसत. यात या अस्वल जातीच्या लोकांनी बाहेरल्या जगाला न दाखवता कित्येक दिवस राहण्यासारखी सर्व खाद्यसामग्री पण जमा करून ठेवलेली दिसते आहे. एक गावच आहे हे पृथ्वीच्या पोटात." जीवदत्त म्हणाला.

जीवदत्त म्हणाला ते ऐकून अस्वल जातीचा एक नोकर म्हणाला–"काय पण तू खूप ओळखलेस! या भुयारात राहण्यासाठी खोल्या व मोठमोठी दालनेच नव्हे, तर खाद्य व शस्त्र सामुग्री सांठवून ठेवलेली कोठरें सुद्धां आहेत. तुम्ही दोघे कसेतरी वाचलात आणि एका आठवड्यानंतर लांडग्यांच्या खडकापासून परत आलात तर गुरु भल्लूकाच्या सेवेत तुमचे पुढील आयुष्य आनंदात नक्कीच जाईल.

"आम्हीसुद्धां तोच विचार करतो आहों." म्हणत जीवदत्त हंसत पुढे म्हणाला–"कोठे आहे तो लांडग्यांचा खडक? ती भयंकर जागा आम्हांला पाहू दे तरी!"

अस्वल जातीचा एक मनुष्य दार उघडले होते त्यातून बाहेर आला. खड्गवर्मा आणि जीवदत्त दोघांनी तेथे एका दगडावर उभे राहून बाहेर पाहिले. चांदणे पडले होते. [illegible] नाच्या मध्यभागी तो दहापंधरा फूट उंचीचा खडक होता. त्यावर दोघेजण भाले घेऊन त्यांच्यावर मैदानातून खडकावर चढण्याच्या प्रयत्नात असलेल्या लांडग्यांना दूर पळविण्याची खटपट करीत होते. एकंदरीत दृश्य भयंकरच होते., भुकेले लांडगे त्यांना फाडून खाण्यासाठी मोठमोठ्याने ओरडत खडकावर चढण्यासाठी धडपडत होते.

"त्या दोघांच्या पेहरावरून त्यांच्यापैकी एक समरबाहूच असावासा वाटतो आणि दुसरा त्याचा अनुयायी असावा." जीवदत्त म्हणाला.

"समरबाहू की कोण 'बाहू' आणि त्याचा तो अनुयायी चारपांच तासात दमून जाणार आणि त्या लांडग्यांना खूप मेजवानी मिळणार. तुम्हांला त्याच खडकावर जायचे आहे आणि तुमचीपण तीच गत होणार आहे. परंतु वृकेश्वरी देवीच्या कृपेने तुम्ही वांचलांत तर गुरु भल्लूकाच्या सेवेत..."

त्या अस्वल जातीच्या माणसाचे बोलणे पुरे होण्यापूर्वीच जीवदत्त त्याला म्हणाला–"पुरे कर तुझ्या गुरु भल्लूकाचे कंटाळवाणे स्तोत्र गान! आम्ही त्या खडकापर्यंत गेले पाहिजे, एवढेच ना? आम्ही जातो. तुम्ही आल्या वाटेने गुपचुप परत जा कसे!"

"एवढे धाडस आहे तुमच्या मध्ये? येथून त्या खडकापर्यंत पोचायचे म्हणजे या दाराबाहेर पडल्यानंतर सुमारे दहा फूट





उंच जागेवरून खाली उडी मारावी लागेल. नंतर आपला बचाव करीत लांडग्यांना बाजूला सारून त्या खडकावर चढावे लागेल. दरम्यान ते तुम्हांला चिरून फाडून खातात की सोडतात, पहा!" अस्वल जातीचा एक नोकर म्हणाला.

"बरे तर तेथे आम्हांला तुम्ही कसे काय पोचविणार?" खड्गवर्माने विचारले.

"तेथपर्यंत जायला आणखी एक भुयारा-तली वाट आहे. त्या वाटेने गेल्यास खडकाच्या आतल्या बाजूने खडकावर पोचायला एक दगडी दार आहे. आम्ही त्या वाटेने खडकावर पोचवणार आहो." अस्वल जातीचा नोकर म्हणाला.

का पाळविता?" जीवदत्तने विचारले. ते दोघे खडकावर पोचण्यापूर्वीच समरबाहू व त्याचा साथी लांडग्यांचा आहार होतात की काय अशी जीवदत्तला भीती वाटू लागली होती. तसे झाले तर भुयारात शिरून येथपर्यंत येण्याची खटपट फुकटच जाणार, असे त्याला वाटू लागले.

अस्वल जातीच्या दोघां नोकरांनी ते दार बंद केले आणि पुन्हा भुयारातल्याच एका वाटेने खड्गवर्मा व जीवदत्त दोघांना काही अंतर चालत घेऊन गेले. नंतर एक लहानसा दगडी जिना चढून ते थोडे वर गेले आणि त्यांनी हात वर करून एका दगडी दाराला बसविलेली लोखंडी मूठ धरून जोराने दार सरकविले. दार सरकताच उभा असलेला समरबाहू व त्याचा साथी दोघे खड्गवर्मा आणि जीवदत्त दोघांना दिसले.

दगड सरकण्याचा आवाज ऐकूनच दोघे दचकून तिकडे पाहू लागले. समरबाहू ओरडला—"अरे चंदू! दगडाच्या पोटातून लांडगे बाहेर येत आहेत रे!"

परंतु खड्गवर्मा आणि जीवदत्त बाहेर येतांच म्हणाले—"आम्ही लांडगे नाही, तुमच्याच पैकी आहों. भिऊ नकोस समर-बाहू! आम्ही तुझे मित्र आहो!"

समरबाहूला व त्याच्या साथीला परमा-वधीचे आश्चर्य वाटले. तो काही बोलणार होता, परंतु त्याच्या तोंडावाटे शब्दच फुटत नव्हता. त्याच वेळी दोघां अस्वल जातीच्या नोकरांनी दगडाचे दार बंद केले. दार बंद करताना ते एवढेच म्हणाले—"म्हणजे तुम्ही मित्रच आहां वाटते? बरं तरमग लांडग्यांना चांगली पोटभर मेजवानी मिळणार!"

खड्गवर्माने ऐकून रागारागाने मागे वळून पाहिले. तेवढ्यात ते दार मोठा 'खण्ण' असा आवाज करीत बंद झाले. जीवदत्त समरबाहूच्या खांद्यावर हात ठेवून त्याला धीर देत म्हणाला—"मित्रा! घाबरू नकोस, बरं का. स्वर्णाचारीच्या तोंडी सर्व गोष्टी आम्हांला कळल्या आहेत. तो तुमचा जुना मित्र आहे, नाही का? आपण सर्व या लांडग्यांच्या खडकावरून सुखरूप स्वस्थानी पोहचू. मी सांगतो आहे त्यावर विश्वास ठेव."

"आपण जिवंत या जागेवरून परत स्वस्थानी जाऊन पोहचू म्हणतोस! ते कसे काय हो? या खडकाच्या पोटात भुयाराचे जे दार आहे ते त्या दुष्टांनी बंद करून टाकले आहे. खडकावरून उतरून पलीकडे जाणे अशक्य, हे भुकेले लांडगे 'आ' वासून फाडून खायला उभे आहेत." समरबाहू म्हणाला.



"ते लांडगे आणि आपणां सर्वांना बंदी करून खाद्य म्हणून लांडग्यासमोर फेंकणारे ते अस्वल जातीचे क्रूर लोक सर्व आपल्याला जायला वाट देतील. आपण भुयारात प्रवेश करून चारी बाजूला किल्ल्यासारखी भिंत असलेल्या खड्ड्याच्या मध्यभागी खडकावर पोचलो आहों. वर चंद्र आकाशात मोकळे-पणे हिंडतो आहे. म्हणजे ते दुष्ट अस्वल जातीचे लोक राहतात त्या भुयाराला या जागेकडे यायलाजायला एक दोन दरवाजे नक्कीच असले पाहिजेत." जीवदत्त म्हणाला.

"तुम्ही म्हणतां ते बरोबर आहे. परंतु आपणांला या लांडग्यांची आणि गुरु भल्लूकाच्या नोकरांची नजर चुकवून कसे



काय पळून जाता येईल?" समरबाहूने शंका केली.

जीवदत्त त्याला काही उत्तर देणार एवढ्यात भुकेने कासावीस झालेला एक लांडगा खडकाच्या सांधीचा आधार मिळतांच खडकावर चढून येत असलेला दिसला. खड्गवर्माने थोडे वांकून चटदिशी तलवारीचा एक वार त्याच्यावर केला आणि त्याचा गळा धरून त्याने त्याला खडकावर आदळले.

"खड्गवर्मा! छान, किती वेळेवर वेटचाला ठार केलेस!" म्हणत जीवदत्त त्याचे कौतुक करीत म्हणाला—"या मेलेल्या लांडग्याची सुद्धा आपल्याला गरज आहे.

खाणे केव्हा घालतात, तुला माहीत आहे का?"

"त्या दुष्ट लोकांना आपसात बोलतांना मी ऐकले आहे. ते या क्रूर जनावरांसमोर सूर्योदयाच्या आणि सूर्यास्ताच्या सुमारास कोणतीतरी जनावरे मारून आणून टाकतात. परंतु त्यांना तेवढे कष्ट करण्याची गरज राहणार नाही, कदाचित. त्या आधी आपणच त्यांचा आहार होऊ." समरबाहू घाबऱ्या घाबऱ्या म्हणाला.

"खड्गवर्मा, आपण पहिल्याने भुयाराचे एक दार पाहिले, त्या दारातून या लांडग्यांना ते लोक खाणे टाकीत असावेतसे मला वाटते." जीवदत्त म्हणाला.

खड्गवर्माला दूर जमिनीपासून दहाबारा फूट उंचीवर भिंतीला एक दार दिसले. ते दाखवीत तो म्हणाला—"लांडग्यांना खाणे घालायला तेच एक दार असावेसे वाटते! काही उपाय सुचतो आहे का?"

"लांडग्यांच्या खडकावरून आपले कैदी कोणत्याही परिस्थितीत जिवंत पळून जाणे शक्य नाही असे समजून गुरु भल्लूकाने आपणां सर्वांना आपापली हत्यारे बरोबर घेऊन चलायला सांगितले. आतां तीच चूक त्याचा आणि त्याच्या नोकरांचा काळ होणार आहे." जीवदत्त म्हणाला.

म्हणून एकाने जागे राहून पहारा द्यावा व इतरांनी पाळीपाळीने झोपावे, असे ठरले आणि तिथे खडकावरच आडवे झाले.

सूर्योदयाची वेळ होतांच सर्व लांडगे खडकाच्या चारी बाजूनी आपापली जागा सोडून ओरडत भुयाराचे जे दार खड्गवर्माने दाखविले होते तिकडे पळू लागले. त्यांच्या ओरडण्यानेच सर्वांच्या झोपा मोडल्या. जीवदत्त खड्गवर्माला दाराकडे बोट दाखवून म्हणाला—"आपला अंदाज खरा ठरला! असल जातीचे लोक ते दार उघडून लांडग्यांसमोर त्यांचे खाणे टाकायला त्या दारासमोर येणार. तर तू

आपले धनुष्य घेऊन त्यावर बाण ठेवून त्या दाराच्या दिशेने नेम धरून तयार रहा."

जीवदत्तने सांगितल्याप्रमाणे खड्गवर्मा नेम धरून बसला. समरबाहू मात्र घाबरून म्हणाला—"अहो! आपण त्यांच्या पैकी एका दोघांना मारले तरी काय होणार? बाकी लोक चिडून जाऊन क्रूरपणे आपल्या अंगाची खांडेखांडे करून टाकतील त्याचा काही विचार?"

समरबाहू म्हणाला ते ऐकून हसत जीवदत्त म्हणाला—"समरबाहू! त्या दुष्टांनी क्रूरपणाने आपल्याला ठार करण्यासाठीच नाही का या लांडग्यांच्या खडकावर चढविले? ते आपल्या अंगाचे लचके तोडून



आपल्याला खातील, त्याहून जास्त भयंकर मरण असे काय असणार?"

जीवदत्तचे बोलणे संपण्यापूर्वीच भुयाराचे ते दार "किर्र-र-" असा आवाज करीत उघडले गेले. दोघां अस्वल जातीच्या नोकरांनी मांसाचे मोठमोठे लोथ भरलेले एक मोठे टोपले वर उचलले आणि वांकून खाली फेकू लागले. त्याच वेळी जीवदत्तने खूण केल्याबरोबर खड्गवर्माने बाण सोडला आणि तो "सु-ई-ई..." असा आवाज करीत नोकराच्या छातीला लागला. तो अखेरची किंकाळी फोडून जमिनीवर कोसळला. त्याच्या पाठोपाठ दुसरा मनुष्य मांसाच्या टोपल्यासह भुयाराच्या वाटेत "मेलो!" असे ओरडत आदळला.

त्या आवाजाने सर्व गुहा हादरली. वृकेश्वरी देवीच्या पुजेत ध्यानमग्न बसलेल्या गुरु भल्लूकाची समाधी भंग झाली. तो तावातावाने उभा राहून म्हणाला—"हा काय गोंधळ आहे! लांडग्यांच्या खडका-जवळून हा काय आरडाओरडा ऐकू येतो [illegible] वाटते? की काल पकडून आणलेल्या कैद्यांना ते खात आहेत?" त्याने तो प्रश्न तितक्यात तिकडून धावत पळत आलेल्या आपल्या एका शिष्याला विचारला.

तो शिष्य म्हणाला—"गुरु भल्लूक! मोठ्या संकटात सांपडलो आहों! खडका-वरच्या एका कैद्याने आपल्या साथीदाराला बाण मारून ठार केले आहे. त्याच्याजवळ आणखी पुष्कळ बाण आहेत. आतां काय करायचे?"

गुरु भल्लूकाचा चेहरा रागाने लाल झाला. डोळे जणुंकाही आग पाखडू लागले. नाकपुड्या टरटरून फुगून आल्या. म्हणाला—"वृकेश्वरी! तुझ्या या प्रिय भक्ताच्या असामान्य शक्तिसामर्थ्यासमोर त्या पामर मानवांचा किती वेळ टिकाव लागणार? मी त्या चौघांचा बळी या पंचशूलाने घेतो आणि तुझ्या चरणी अर्पण करतो." असे म्हणत तो भुयाराच्या वाटेने निघाला.

(क्रमशः)





# प्रजेची राजभक्ति

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही.

प्रेत खांद्यावर काढून घेऊन तो स्मशानाच्या दिशेने मौनपणे चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा, मी तुझ्या प्रयत्नांचे कौतुक करतो. परंतु कधी कधी जे काम प्रयत्न करून ही पूर्ण होत नाही, नशिबाने त्या कामात यश मिळते. उदाहरण म्हणून मी कैकेय देशाचा राजा उपाहारवर्मा याची गोष्ट सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

प्राचीनकाळी कैकेय राज्याच्या गादीवर उपाहारवर्मा नांवाचा एक महापराक्रमी राजा राज्य करीत होता. त्याच्याजवळ फार मोठे सैन्य होते. त्याचा खजिना नेहमी भरलेला असे. म्हणून कोणत्याही शेजारी राजाची वांकडी नजर त्याच्या राज्यावर कधी वळली नाही. परंतु म्हणूनच उपहार-

## वेताळाच्या गोष्टी



वर्माला थोडा गर्व होऊ लागला आणि तो थोडा बेफिकीरसुद्धां होऊ लागला.

एकदां कैकेय देशाच्या दक्षिणेकडील काही बंडखोर लोकांनी बंड केले. ती बातमी कळल्यावर उपहारवर्माने बंडखोरांचा विमोड करण्याचा कडकपणाने प्रयत्न केला नाही; कडक शिक्षा केली जाईल फक्त दवंडी पिटविली.

त्यानंतर राजाला त्याच्या हेरांकडून बंडखोर मोठे सैन्य घेऊन राजधानीवर चालून येत असल्याची बातमी कळली. तरीदेखील त्याला आपल्या सैन्याच्या बळावर इतका विश्वास होता की बंडखोरांची खोड मोडता येईल असे त्याला वाटत होते.

परंतु [illegible] बंडखोरांनी त्याच्या सैन्याला पळवून लावले. त्याचे अनेक सैनिक बंडखोरांच्या हाती कैद झाले आणि त्यांनी राजधानी काबीज केली.

उपाहारवर्माची घमेंड जिरली. त्याला पूर्वी कधी पराभव न झाल्याचा गर्व होता. त्याला उरलेल्या सैन्यानिशी राजवाड्यातून पळून जावे लागले. बंडखोरांच्या सरदाराने राजवाड्यात प्रवेश करून कैकेय देशाचा नवा राजा म्हणून राज्याभिषेक करवून घेतला.

शत्रू विजयोत्सव साजरा करीत असतां राजा उपाहारवर्मा चंद्रभागा नदी पार करून मद्र देशात गेला आणि तेथील राजाच्या आश्रयाला राहू लागला.

मद्रराजाने उपाहारवर्माला सहानुभूती दर्शवून आश्रय दिला आणि म्हणाला–"महाराज, जयपराजय हे नशिबावर अवलंबून असतात. मी आपणांस सर्व प्रकारे मदत करीन. आपण माझे सैन्य घेऊन जाऊन बंडखोरांचा विमोड करावा आणि आपले राज्य परत मिळवावे."

आपल्या मित्र राजाचा सल्ला ऐकून उपाहारवर्माचा आत्मविश्वास वाढला. या खेपेस नक्कीच आपण यशस्वी होऊ असे त्याला वाटले. नंतर तो मद्र देशाचे सैन्य [illegible] झाला. चंद्रभागा नदीच्या काठी दोन्ही सैन्यांचे युद्ध झाले आणि मद्र देशाच्या सैन्याचा पराभव झाला. उपाहारवर्माचा घोडा ठार झाला आणि मोठ्या कष्टाने स्वत:चा जीव वाचवून तो रानावनात पळून गेला.

आता राजा एकटा पडला. सैन्य नाही, शिपाई किंवा नोकरचाकर कोणी नाही. आतां स्वत:चे पोट कसे भरते याचीच काळजी राजाला पडली. अनेक प्रकारच्या हालअपेष्टा सहन करीत तो हिंडत फिरत ब्रह्मावर्त राज्यात पोंचला. ब्रह्मावर्त एक छोटे खानी राज्य होते. कैकेय राज्याच्या तुलनेस तर ते फारच लहान होते. तरी उपहारवर्मा त्या राज्याचा राजा ब्रह्मदत्त याच्या आश्रयास गेला. तो आपली खरी ओळख दिल्याशिवाय राजाला म्हणाला–"महाराज! मी मोठमोठ्या सैन्याचे सेनापतित्व केलेले आहे. आपण मला आपल्या सैन्याचा सेनापती नेमावे."

ब्रह्मदत्त राजाने जास्त हो ना केल्याशिवाय उपाहारवर्माला आपला सेनापती नेमले. एकदा सिंधु देशाचे सैन्य विजय यात्रा करीत ब्रह्मावर्त राज्यातून जाऊ लागले. सैन्याने लुटालूट करून प्रजेला मारहाण करायला सुरवात केली. तेव्हां



ब्रह्मदत्तने उपहारवर्माला सांगून प्रजेच्या मदतीने सिंधु देशाच्या सैन्याची खोड मोडण्याचे ठरविले. प्रथम उपाहारवर्माला आश्चर्य वाटले. कारण सिंधु देशाच्या सैन्यासमोर ब्रह्मावर्त राज्याचे सैन्य फार लहान होते. त्याला वाटत होते की या प्रयत्नात आपल्याला अपयश मिळणार आणि कदाचित हे राज्य देखील सोडून आपल्याला जावे लागणार.

परंतु ब्रह्मदत्त राजा प्रजावत्सल होता. त्याची प्रजा राज्य रक्षणासाठी स्वखुशीने प्राणाहुती देण्यास तयार होती. प्रजेच्या मदतीने ब्रह्मावर्तच्या छोटेखानी सैन्याने सिंधु देशाच्या अफाट सैन्याचे हालहाल



करून त्याला पळवून लावले. गनिमी हल्ला करून ब्रह्मावर्तचे सैन्य त्याच्या अफाट सैन्याची दाणादाण उडवू शकेल असे सिंधु देशाच्या राजाला स्वप्नातदेखील वाटले नव्हते. ब्रह्मावर्तच्या सैन्याने सिंधु देशाच्या तंबू आणि राहुटया जाळल्या, रसद लुटली आणि पळून जाणाऱ्या सिंधु देशीय सैनिकांची कत्तल केली. शेवटी सिंधु देशाचा राजा आपली विजय यात्रा तेथेच संपवून स्वदेशी परतला.

विजयी होऊन ब्रह्मदत्त राजधानीत परत येत असतां उपाहारवर्माने राजाला विचारले–"महाराज! हे अशक्य शक्य कसे झाले? मी आपली खरी ओळख देतो. मी

... आलो होतो. बंडखोरांच्या नायकाने माझी गादी बळकावली आहे!"

तेव्हां ब्रह्मदत्त म्हणाला–"महाराज! युद्धात जय मिळतो तो सैन्याच्या लहान मोठ्या संख्येवर अवलंबून नसतो. प्रजेच्या व सैन्याच्या मनात विजय मिळविण्याचा उत्साह किती आहे त्यावर युद्धात यश किंवा अपयश अवलंबून असते."

त्यानंतर कैकय राजाला दुसऱ्या राजाच्या पदरी नोकरी करण्यात कमीपणा वाटू लागला. आपले राज्य परत मिळविण्याचा उत्साहसुद्धा त्याच्या मनात वाढला. त्याने नाव बदलून आणि वेष पालटून आपल्याच राज्यात राहण्याचे मनाशी ठरविले. तसा विचार करून तो स्वदेशी निघाला. त्याने चंद्रभागा नदी पार करून आपल्या राज्याच्या सीमेवर पाऊल टाकताच त्याला काही सैनिकांनी घेरले आणि विचारले–"तू कोण आहेस?"

"तुम्हांला माझ्या परिचयाची गरज काय? तुम्हांला त्यात काही फायदा आहे का?" राजाने विचारले.

"होय! आमच्या राजा परकीयांनाने धरून आणण्यासाठी आम्हांला राज्याच्या सरहद्दीवर नेमले आहे." सैनिकांचा प्रमुख म्हणाला.

"तुमच्या राजाला परकीयांची इतकी भीती का वाटते?" रा... विचारले.

"आतांच्या राजाला दैववशात हे राज्य सहजी मिळाले. आमच्या प्रजावत्सल राजाला जिंकून या राजाने त्याचे सिंहासन बळकाविले आहे. आमचा खरा राजा वेष पालटून येऊन आपले राज्य परत मिळविण्याची खटपट करील अशी भीती त्याला वाटते आहे." सैनिक म्हणाला.

उपाहारवर्मा ते उत्तर ऐकून चकित झाला. राज्य बळकावून इतके दिवस झाले तरी बंडखोर राजाला आपली भीती वाटावी हे कसे काय हे उपाहारवर्माला कळेना. थोडे साहस करण्याचे ठरवून तो त्या सैनिकांना म्हणाला–"बरं तर ऐका! मीच उपाहारवर्मा, तुमचा खरा राजा आहे. माझ्याजवळ एवढे मोठे सैन्य होते तरी बंडखोर राजा भ्याला नाही आणि आतांच तो कां भितो आहे, हे मला कळत नाही."

उपाहारवर्म्याच्या तोंडी ते ऐकून सैनिक त्याचे पाय धरून म्हणाले–"महाराज! चुकीची माफी असावी! आम्ही आमच्याच मालकाला कैद करणार होतो. आपण येथून लवकर पळून जावे, आपल्या जिवाला या राज्यात धोका आहे!"

"मी जिवंत राहून मेल्यासारखा परदेशात फिरत राहण्यापेक्षां स्वदेशी मरण



आले तरी बरे, असा विचार करून आलो आहे. मी शूरासारखा मरायला तयार होऊनच आलो आहे." उपाहारवर्मा म्हणाला.

ते ऐकून सैनिक परस्परांशी काही बोलून आपल्या राजाला म्हणाले–"महाराज! आमच्यापैकी एकाचा गणवेष आपण धारण करून आमच्या घरी चलावे." त्याप्रमाणे उपाहारवर्मा आपल्या राजधानीत गेला. राजा परत आल्याची गोष्ट सैनिकांना आणि प्रजेला कळली. आपल्या राजाच्या रक्षणार्थ वाटेल तो त्याग करण्यास प्रजा व सैन्य तयार झाले. राजाच्या सल्लचाने बंडखोर राजाचा कांटा काढायचे ठरले.

बंडखोर राजाच्या खास महालात शिरून त्याच्या खास नोकरांनीच त्याचा वध केला. बंडखोर राजाच्या अनुयायांना पुढारी किंवा नायक नव्हता. सर्व बंडखोरांना कैद करून तुरुंगात टाकण्यात आले आणि दुसऱ्याच दिवशी उपाहारवर्मा पुन्हां आपल्या गादीवर बसला.

येथवर गोष्ट सांगून वेताळाने विचारले—"राजा! बंडखोर राजा उपाहारवर्माचा पराभव करून देखील त्याला कां भीत होता? सर्व तऱ्हेचे यत्न करून ही उपाहार-वर्माला अपयशच मिळाले होते, परंतु शेवटी फार कमी खटपट करून ही त्याला पूर्ण यश कसे काय मिळाले? या प्रश्नांची समाधानकारक उत्तरे माहीत असून तू दिली नाहीस तर परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

तेव्हां विक्रमादित्य म्हणाला—"उपाहार-वर्मा युद्धात हारला तरी त्याच्यावर प्रजेचे अपार प्रेम होते व सैन्याचा त्याच्यावर विश्वास होता. बंडखोर राजाने प्रजेवर आणि उपाहारवर्माच्या स्वामिभक्त सैन्य प्रमुखांवर अत्याचार केले असणार. ते काही असो, प्रजेचे प्रेम उपाहारवर्मावर आहे, हे बंडखोर राजाला चांगले कळले होते. म्हणून तो त्याला भीत होता. पूर्वी स्वामिभक्त सैन्य आणि प्रजा यांचा आपल्याच घमेंडीत चातुर्याने उपयोग न करू शकल्यामुळे उपाहारवर्माला दोन्ही वेळा अपयश मिळाले परतु प्रजेचे प्रेम आपल्यावर आहे व सैन्य आपल्या बाजूला आहे हे कळल्यावर उपाहारवर्माचा उत्साह वाढला आणि त्याला यश मिळाले. त्याला यश मिळण्याची मुख्य कारणे म्हणजे प्रजेचे प्रेम आणि सैन्याचा उत्साह ही होत. ब्रह्मदत्त राजाकडून उपाहारवर्माला या गोष्टींची जाणीव झाली होती."

राजाचे मौन अशा प्रकारे भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि पुन्हां झाडाच्या फांदीला लोंबकळू लागला.

(कल्पित)





# सोमदेवाचे दैव

राजकुमार सोमदेव समुद्रपार प्रवासास जात असतां त्याचे गलबत एका खडकावर आदळले आणि तुकडे तुकडे होऊन पाण्यात बुडाले. सुदैवाने सोमदेवला एक जाडजूड ओणकेवजा फळी हाताला लागली आणि त्यावर चढून त्याने स्वतःचा जीव वांचविला. परंतु गलबतातला दुसरा कोणीही वांचला नाही. सर्वांना जलसमाधी मिळाली.

सोमदेव त्या फळीवर पडून लाटेबरोबर वहात एका बेटाच्या किनाऱ्याला लागला. त्याला लाटांनी किनाऱ्यावर फेंकले तेव्हां, तो बेशुद्धावस्थेतच होता.

सूर्यकिरणे त्याच्या अंगावर पडली. तेव्हां त्याची ऊब मिळाल्यावर तो शुद्धीवर आला. आपण जमिनीवर येऊन पडलो आहो व जवळच एक टेकडी आहे, एवढे त्याला अर्ध बेशुद्धावस्थेत कळले तो थोडा प्रयत्न करून उठून उभा राहिला आणि मोठ्या कष्टाने टेकडी चढून गेला. टेकडीच्या उतरणीवर त्याला बटाट्यांची लागवड दूरवर झालेली दिसली जिकडे पहावे तिकडे हिरवळ होती. त्याच्या मनाला बरें वाटलें. परंतु तो इतका दमला होता की त्याला चक्कर आल्यासारखे झाले आणि तो बटाट्यांच्या शेतात घेरी येऊन पडला. शुद्धीवर आल्यावर तो एका सुंदर खोलीत बिछान्यावर पडला असल्याचा त्याला भास झाला समोर त्याला एक क्रूर कुरूप मनुष्य त्याच्याकडे पाहून स्मित करीत असलेला दिसला. त्या माणसाच्या हातात एक भाला होता.

"मी कोठे आहे?" सोमदेवने अर्ध बेशुद्धावस्थेतच विचारले.

"आलूपूरचा राजा पाटूंगा याच्या राज-वाड्यात आहेस!" तो विचित्र मनुष्य म्हणाला.



सोमदेवाने उठून बसण्याचा प्रयत्न केला. परंतु हातपाय बांधले असल्याचे त्याला कळले. "मला असे बांधून कां ठेवले आहे?" त्याने विचारले.

"पाटूंगा महाराजांच्या आज्ञेने. तू आमच्या देशांत आमच्या महाराजांच्या अनुज्ञेशिवाय प्रवेश केलास म्हणून तुला प्राणदंडाची शिक्षा दिली जाणार आहे." तो क्रूर दिसणारा मनुष्य म्हणाला.

आपल्या दुर्दैवाला दोष देत सोमदेवाने सुस्कारा सोडला. कोठे तो मणि द्वीपाच्या राजकन्येशी विवाह करण्याच्या उत्साहाने गलबतात बसून समुद्रपार निघाला होता आणि कोठे एकाएकी त्याच्या सर्व लहान- [illegible] होऊन रानटी लोकांच्या हाती त्याला प्राण दंडाची शिक्षा मिळणार होती. त्याला काही सुचेना. तो अगदी दमून-भागून गेला होता. म्हणून त्याला झोप लागली.

थोड्या वेळाने एक नोकर येऊन, त्याला ज्या दोरखंडाने खाटेला बांधून ठेवले होते तो दोरखंड सोडू लागला. तेव्हां साहजीकच सोमदेवाची झोप मोडली. तेथूनच त्याला उचलून तो नोकर तुरुंगाच्या कोठडीत घेऊन आला.

"मला येथे कशाला आणले आहे?" सोमदेवाने त्या नोकराला विचारले.

"आजपर्यंत तू आजारी होतास, आतां कैदी आहेस." नोकर म्हणाला आणि कोठडीला कुलूप लावून निघून गेला. कोठडीत पडल्या पडल्या सोमदेव आपल्या नशिबाला दोष देऊ लागला.

थोड्या वेळाने त्याला कोठडीच्या भिंती-वर पलीकडून हात मारून कोणीतरी बोलावीत आहे असा त्याला भास झाला. म्हणून त्याने भिंतीवर हाताने एकदांच हात मारून थाप दिली. त्याचे उत्तर म्हणून पलीकडून दोनदां थाप आली.

सोमदेवाला जिवाची आशा वाटू लागली. त्याने भिंतीला कोठे भोक आहे का लक्षपूर्वक हाताने चाचपून पाहिले. पण एकही भोक नव्हते. सोमदेवाने नेहमी कमरेला एक चाकू खोचलेला ठेवीत असे. त्या चाकूने भिंतीच्या विटांपैकी एक वीट पोखरून काढली आणि आश्चर्य म्हणजे त्या भोकांतून पलीकडे एक अत्यंत रूपवती तरुण स्त्री त्याला दिसली. तिचे कपडे व केस अस्त-व्यस्त होते. पण तिच्या रंगारूपावरून ती कोणीतरी राजकन्या असावीसे त्याला वाटले.

"कोण तू?" सोमदेवाने विचारले.

"दुर्दैवाने या संकटात सांपडलेली मणि द्वीपाची राजकन्या आहे मी. पण तू कोण?" तिने आपला परिचय देऊन सोमदेवाला विचारले.

त्या तरुणीचे उत्तर ऐकून सोमदेव थक्कच झाला. आपण ज्या राजकन्येशी विवाहा-साठी आईवडिलांबरोबर निघालो होतो, ती मणि द्वीपाची राजकन्या हीरावती या स्थितीत आपल्याला भेटावी. त्याला काही उलगडाच होईना.

"मीदेखील एक दुर्दैवी राजकुमार आहे. आमचे गलबत खडकावर आदळून फुटले आणि मी एकटा वांचलो आणि या बेटावर येऊन पडलो. पण तू कशी काय इकडे या बेटावर येऊन पोचलीस?" सोमदेवाने विचारले.



"मीसुद्धां, आमचे गलबत फुटल्यामुळे या बेटावर येऊन पडले आहे. मी आपल्या आतेच्या गावी गलबतात बसून जात होते. वादळात आमचे गलबत सांपडले आणि या बेटावर मी बेशुद्ध स्थितीत येऊन पोचले. या देशाचा राजा पाटुंगा कुबडा आहे आणि त्याचा एक डोळा गेला आहे. तो माझ्याशी विवाह करणार होता; परंतु मी नकार दिला म्हणून त्याने मला या कोठडीत डांबून ठेवले आहे. तो काय करणार आहे ते त्या परमेश्वरालाच माहीत. परंतु त्याच्याशी लग्न करण्यापेक्षा मरण आलेले बरे असे मी ठरविले आहे." हीरावती हे सर्व रडत म्हणाली.



इतक्यात कोणीतरी आल्याचा भास झाला. सोमदेवाने भोकात वीट जशीच्या तशी ठेवून दिली आणि बाजूला जाऊन बसला. नोकराने त्याचे खाणे ठेवून देऊन दार बंद केले.

थोड्या वेळाने सोमदेवाने वीट काढून भोकातून राजकुमारीला हाक मारली व म्हणाला—"तुला या देशातल्या लोकांविषयी काही माहिती आहे का ?"

"आहे, थोडे फार माहीत. येथल्या राजाने प्रथम माझ्याशी चांगली वागणूक ठेवली. मी वाटेल तिकडे हिंडले फिरले आणि या देशातल्या लोकांविषयी सर्व माहिती काढून घेतली. या देशाची संपत्ति [illegible] बटाट्याचे पीक. येथली जमीन सुपीक आहे. येथे लागवड अशी करावीच लागत नाही. बटाट्याचे पीक आपोआप खूप होते. बटाट्यांची निर्यात करून येथला राजा खूप गब्रू झाला आहे. येथले लोक बटाट्यांचे निरनिराळे पदार्थ तयार करून खातात. तेच त्यांचे मुख्य अन्न आहे. आपल्याला जे खाद्य पदार्थ खायला देतात ते सर्व बटाट्याचे असतात हे तू ओळखलेच असशील." हीरावती म्हणाली.

"या बेटावर पोंचल्यावर मला बटाट्यांची लागवडच प्रथम दिसली. आता मला असे वाटू लागले आहे की आपण या बटाट्यांच्या मदतीनेच या बेटावरून निसटले पाहिजे. ते शक्य आहे. मला माझ्या मित्राने एक जादू शिकविली आहे. ती यावेळी आपल्याला उपयोगी पडेल. तू थोडी मदद केलीस तर आपणा दोघांची सुटका होऊ शकेल." सोमदेव म्हणाला.

"मी काय करू शकेन, हे सांगशील तर खरे! येथून सुटका मिळवायला मी वाटेल ते करायला तयार आहे." हीरावती म्हणाली.

"या खेपेस राजाचा नोकर तुझ्याकडे येईल तेव्हां तू त्याला तुझे मन बदलल्याचे आणि तू राजाशी लग्नाला तयार असल्याचे सांग. तेव्हां नोकर तुला [illegible] बोलावून [illegible] जाईल. तू राजाकडून विवाहास एक महिन्याचा अवधी मागून घे. म्हणजे तुला हिंडण्या फिरण्यास, एवढेच नव्हे तर या तुरुंगाकडे येण्यास मुभा मिळेल. तू मागशील ते राजा देईल व तू सांगशील ते राजा करील. मी दोनतीन दिवसातच तुझी सुटका करून देण्याचा मार्ग काढतो." सोमदेव म्हणाला.

सोमदेवने सांगितल्याप्रमाणे हीरावतीने राजाला ती गोष्ट कळविली व आपली तुरुंगातून सुटका करून घेतली. त्या घटकेपासून राजा तिचा आदर करू लागला. सोमदेवाच्या सांगण्याकरून तिने राजाजवळ थोडे सोने मागून सोमदेवाला दिले.

सोमदेवने ते सोने पाहरेकऱ्याला दिले. पाहारेकरी सोने पाहून भुरळला. सोमदेव त्याला म्हणाला—"तू मला प्यायला पाणी ज्या पेल्यांत देतोस ते फार लहान आहेत. मला दोन उंच व मोठे पेले भरून पाणी आणून देत जा. तुला पुण्य लागेल."

पाहरेकऱ्याला त्यात काहीच गैर दिसले नाही. त्याने दोन मोठे व उंच कांचेचे पेले भरून पाणी आणून दिले. नंतर कोठे काय झाले वगैरे गोष्टी तो स्वखुशीने सोमदेवला सांगू लागला.

एकदां सोमदेव सहज पाहरेकऱ्याला बोलताना म्हणाला—"तुमचा देश किती सुंदर आहे रे! येथे चांगले बटाटे उत्पन्न होतात तसे इतर कोठे ही उत्पन्न होत नाहीत."





"बरोबर म्हणालात तुम्ही. आम्ही येथे ज्या तऱ्हेचे बटाटे लावतो तसले जगात कोठेच होत नाहीत." तो नोकर गर्वाने म्हणाला.

"हे सर्व खरे असले तरी मी मनात आणले तर एक बटाटादेखील तुमच्या देशात होणार नाही. मी आज्ञा केली तर बटाटे वाढणारच नाहीत. बटाटे माझ्या हुकमाप्रमाणे वागतात. पाहिजेतर मी तुला ते उद्यां दाखवून देईन. तू उद्यां हाताच्या मुठीएवढा एक बटाटा घेऊन ये आणि राजाला सुद्धां गंमत पहायला यायला सांग. मी आपल्या अद्‌भुत मंत्रशक्तीचा प्रयोग करून त्याला थक्क करीन." सोमदेव म्हणाला.

सोमदेव म्हणाला ते राजाला नोकराने जाऊन सांगितले. दुसऱ्या दिवशी राजा आपल्या प्रमुख नोकरांसह तुरुंगात आला.

सोमदेवने पहिल्याने एक उंच कांचेचा पेला (ग्लास)वरं उचलून सर्वांना दाखविला. त्यात पाणी होते. राजाच्या हातातून त्याने हाताच्या मुठीएवढा बटाटा घेतला आणि तो हळूच पाण्यात सोडला. बटाटा हळूहळू पाण्यात बुडू लागला. तो पेल्याच्या मध्यावर पोचत असतां सोमदेव म्हणाला—"थांब!" आणि तो बटाटा तिथे थांबला. सोमदेवने मंद हास्य करीत राजाकडे व इतरांकडे एकदां पाहिले. त्यांच्या चेहऱ्यावर आश्चर्य झळकत होते. नंतर तो सर्वांना म्हणाला—"तुम्ही स्वतःच पाहिलेत की माझ्या आज्ञे-प्रमाणे बटाटा कसा जागच्या जागी थांबला. मी सांगेन तसा तो वागेल. आतां मी मंत्र म्हणून त्याला खाली उतरवितो."

त्यानंतर सोमदेवने कोणता तरी मंत्र म्हटला आणि ग्लासातले पाणी हलविले. बटाटा खाली उतरला आणि शेवटी तळाला जाऊन बसला.

"याला कैदेतून सोडा. हा मागेल ते द्या. याच्याजवळ अद्‌भुत मंत्रशक्ती आहे. हा आपल्या बटाट्याच्या पिकाला फार मोठा धोका उत्पन्न करू शकेल." राजाने घाईघाईने सोमदेवला कैदेतून सोडण्यास सांगितले.

त्यानंतर राजाने व त्याच्या प्रजेने सोम-देवाला अत्यादराने [illegible] आणि नम्रपणे म्हणाला—"तुम्ही आम्हांला क्षमा करा. तुम्हांला पाहिजे ते आमच्या बेटावरून मागून घेऊन जा."

राजा सोमदेवला आदरपूर्वक पालखीत बसवून राजवाड्यात घेऊन गेला. त्याला अनमोल वस्तू भेट म्हणून दिल्या आणि विचारले—"आणखी काय आज्ञा आहे?"

"मला लवकर स्वदेशी जावयाचे आहे. एक चांगलेसे गलबत तयार ठेवा." सोमदेव म्हणाला.

त्यानंतर तो हीरावतीकडे वळून म्हणाला—"तुझे काय मत आहे, तू येथेच राजाशी विवाह करून राहणार की आणखी काही विचार आहे?"

"आपणांला हरकत नसेल तर मी आपल्या बरोबर येऊन आपली गृहीणी होऊन पुढील आयुष्यभर आपली सेवा करावी म्हणते." हीरावती म्हणाली. एका आठवड्याने एका सुंदर गलबतात बसून सोमदेव हीरावतीसह स्वदेशी निघाला. प्रवासात एक दिवशी हीरावतीने सोमदेवला विचारले—"काय हो, मी तुमच्याकडे एक पळीभर मीठ आणि पळी पाठविली होती. मग तुमची ही जादू म्हणता ती काय होती?"

"ती एक सोपी जादू आहे. तू पाठविलेले मीठ मी पाण्यात विरघळवून पाणी तयार ठेवले. पेला साध्या पाण्याने अर्धाच भरला. नंतर हळूच खारे पाणी पळीने पेल्यात ओतले. खारे पाणी थोडे जड होते म्हणून खाली गेले. जेथे खारे आणि गोड पाणी भेटत होते ती जागा लक्षात ठेवली. तेथवर बटाटा पोचताच मी त्याला थाबायला सांगितले व तो थांबला. कारण खाऱ्या जड पाण्यावर तो तरंगत राहीला. नंतर मंत्र म्हणतांना मी ग्लास हलविले. त्यामुळे खारे व गोड पाणी एकत्र झाले. खारे पाणी गोड पाणी मिसळतांच हलके झाले आणि बटाटा खाली तळाशी गेला.

सोमदेवाची ती युक्ती जादू म्हणून खपल्याचे पाहून राजकन्या हीरावती हसली.



# चांगला धडा

एका गावी बंडू नावाचा एक खट्याळ मुलगा होता. अभ्यासाचा त्याला फार कंटाळा. दिवसभर भटकणे हाच त्याचा धंदा होता. तो एकदा एका रस्त्याच्या बाजूला झाडाखाली बसला होता. तेव्हां एक शास्त्रीबुवा त्या रस्त्याने जात होते. गुळगुळीत हजामत करविली होती शास्त्रीबुवांनी.

बंडोबांनी शास्त्रीबुवांच्या डोक्याचा नेम धरून एक खडा मारला. शास्त्रीबुवांनी वळून पाहिले, बंडोबा खाली मान करून हंसत होते.

शास्त्रीबुवा रागावले नाहीत की काही जास्त कमी बोलले नाहीत; परंतु बंडोबांना चांगला धडा मिळेल अशी युक्ती काढली. त्यांनी त्याला जवळ बोलावून पाठ थोपटली आणि म्हणाले–"तुला अचूक नेम मारता येतो की रे!" असे म्हणत त्यांनी बंडोबांच्या हातात एक पावली दिली आणि निघून गेले.

बंडोबांना ते इनाम वाटले आणि आपली नेमबाजी आणखी एकावर अजमावून पाहण्याचा उत्साह वाढला. झाडाखाली जाऊन बसतांच बंडोबांना समोरून एक वृद्ध गृहस्थ जातांना दिसले. याखेपेस त्यांनी त्या बिचाऱ्या म्हाताऱ्याच्या डोक्याचा नेम धरून एक दगडच मारला. दगड बरोबर लागला आणि म्हाताऱ्याने बंडोबांना जवळ बोलाविले. बंडोबा आनंदाने धावत आले आणि बक्षिसासाठी हात पुढे केला. पण म्हाताऱ्याने ताडकन् त्याच्या मुस्कुटात एक लगावली. बंडोबांच्या डोळ्यासमोर काजवे नाचू लागले. बंडोबांना धडा मिळाला.





# गाणारी बकरी

फार जुनी गोष्ट आहे, ब्रह्मदेशावर एक राजा राज्य करीत असे. त्याला संगीत शास्त्राची फार आवड होती.

राजाने स्फटिकाचा एक राजवाडा बांधला. त्या वाटेने जाणारे लोक त्या वाड्याजवळ येऊन तो वाडा पहात रहात. आणि जवळ जाऊन तुळतुळीत भितींवर हात फिरवून कौतुक करीत. म्हणून राजाने त्या वाड्याच्या दिंडी दरवाज्यावर पाहरेकरी नेमले. काही पाहरेकरी वाड्याच्या चारी बाजूला फिरून गस्त देत. कोणी भिंती घाण करू नये हा हेतू.

हिंवाळ्याचे दिवस होते. रात्री एक पाहरेकरी पहारा देत होता. कडक थंडी पडली होती. त्याने विचार केला, मध्यरात्रीची वेळ आहे, सर्व जग निद्रादेवीच्या कुशीत झोपले आहे. अशावेळी जागत बसून पहारा देणे केवळ मूर्खपणा आहे! आयुष्यभर थंडीत असेच का कुडकुडत बसावे लागणार! पुढे त्याच्या मनात असे ही आले की मी राजा होऊन ऊबदार अंथरुणावर पांघरूण घेऊन झोपावे आणि महाराजांनी येऊन पहारा देऊन पहावा, म्हणजे कळेल, कशी थंडी पडली आहे ते.

तेवढ्यात त्याच्या मनात आणखी एक विचार आला. राजाला आपल्या या दयनीय स्थितीची कल्पना यावी यासाठी काही तरी युक्ती काढली पाहिजे. त्याने एक कोळसा घेऊन राजवाड्याच्या भिंतीवर दोन ओळी लिहिल्या.

जग हे आहे श्रीमंतांचे!
गरिबांचे अन् ताट रिकामें!

आपले काव्य वाचून पाहरेकरी मनातल्या मनात खूप आनंदला. त्या आनंदात महाराजांनी त्याला कशासाठी पहारा द्यायला नेमले आहे हेच तो विसरला.

श्री स. का. कोठारी

उजाडल्यावर राजाच्या अधिकाऱ्यांची नजर त्या काव्यावर पडली. पाहरेकऱ्याचे अक्षर ओळखणारांनी त्याच्याविरुद्ध राजाजवळ तक्रार केली. राजाने त्या पाहरेकऱ्याला बोलावून विचारले—“काय रे, तूच का हे लिहून ठेवले आहेस?”

“होय महाराज! मला असे वाटू लागले आहे की या जगात सुखाचे मूळ धन हेच आहे. म्हणून मीच विचार मनात आल्याबरोबर ती कविता लिहून ठेवली आहे.” शिपाई निर्भीडपणे म्हणाला.

“तरमग तुला धन-सोने चांदी-पाहिजे? होय ना?” राजाने विचारले.

“होय महाराज, अगदी बरोबर!” पहारेकरी म्हणाला.

“बर तर मग, तुला पाहिजे तेवढे धन [illegible] आहे. [illegible] का तू. पहा आणि मी पण पाहणार आहे.” राजा म्हणाला.

राजाजवळ मोठमोठे मळे व बागा होत्या. एक बाग शेकडो एकर जमिनीची होती. चारी बाजूला कोटवजा भिंत होती. राजाने त्या भिंतीच्या खाली एका कोठडीत सोने व चांदी आणून ठेवविली आणि त्या खोलीत त्या पाहरेकऱ्याला कैद करू ठेवविले.

राजकुमारीला त्या पाहरेकऱ्याला पाहून त्याची दया आली. तिला त्या बिचाऱ्याचे किती हाल होतील, याच गोष्टीची काळजी वाटू लागली. तिला पाहरेकऱ्याची काही चूक दिसत नव्हती. उलट तो सरळ व [illegible] मदत करण्याचे तिने आपल्याशी ठरविले.

त्या गावात एक सोनार होता. चांगला कारागीर होता. राजकुमारी त्याला जाऊन भेटली आणि पाहरेकऱ्यावर आलेल्या संकटाची गोष्ट सांगून त्याचा सल्ला विचारला. त्यादिवशी रात्री सोनार त्या भिंतीजवळ गेला आणि पाहरेकऱ्याला कैद करून ठेवले होते त्या कोठडीच्या भिंतीचा एक दगड काढून पाहरेकऱ्याकडून थोडे सोने व चांदी मागून घेतली. तो दररोज थोडी थोडी चांदी व सोने मागून आणी आणि पाहरेकऱ्याला अन्न पोचते करी.

राजकुमारीच्या मनात पाहरेकऱ्यावर जी दया होती त्या दयेला प्रेमांकुर फुटू लागले. त्याला त्या कोठडीतून मुक्ती मिळवून देण्याचे तिने मनाशी ठरविले. तिला एक उपाय सुचला. तिने त्या अंधार कोठडीतले सर्व सोने व चांदी सोनाराला देवविली व त्याच्याकडून एक चांदीची बकरी तयार करविली. ती बकरी सुंदर गाणे म्हणत असे. त्याने ती बकरी तयार करून त्या अंधार कोठडीत तिला पोंचते केले. पाहरेकरी निराश व हताश होऊन जाई तेव्हां त्या बकरीचे गायन ऐकून त्याच्या मनाला हलके वाटे.

एके दिवशी राजा त्या बागेत फिरायला आला असता त्याला ते मधुर संगीत ऐकू आले. परंतु संगीत कोठून ऐकू येत आहे, हे मात्र त्याला कळेना.



दुसऱ्या दिवशी राजा आपल्या प्रधानाला बरोबर घेऊन बागेत फिरायला निघाला. त्याला पुन्हा ते संगीत ऐकू आले. त्या संगीताच्या अनुरोधाने जाऊन राजा अंधार कोठडीजवळ आला. त्याने ती कोठडी तोडविली. त्याने त्या कोठडीत पाहरेकऱ्याला कोंडून ठेवले होते, ही गोष्ट सुद्धा राजा विसरला. त्या कोठडीत चांदीच्या बकरीशिवाय राजाला काही आढळले नाही.

राजा ती बकरी घेऊन आपल्या राजवाड्यात गेला. त्याने ती बकरी तोडवून बकरीच्या पोटात जे संगीताचे यंत्र होते ते पहायचा विचार केला. परंतु कोणी बकरीचे पोट फोडून पाहू शकला नाही. त्या सोनाराकरवीच त्याला बकरीचे पोट उघडवावे लागले. त्या बकरीच्या पोटात एक तरुण बसलेला होता. राजाने चकित होऊन त्याला विचारले–"कोण रे तू?"

"महाराज, मी भिंतीवर लिहून नव्हते का ठेवले की हे जग श्रीमंतांचे आहे! आपण त्या अपराधाची शिक्षा म्हणून मला अंधार कोठडीत सोने व चांदी ठेऊन बंद करून ठेवले होते. आता माझ्या विचारात थोडा बदल झाला आहे."

"तर मग हे जग कोणाचे आहे? कोणाचे राज्य असते या जगावर?" राजाने विचारले.

"संकटांत पडलेल्या मित्राला मदत करणे, ही दुसरी महत्वाची गोष्ट आहे." पाहरेकरी म्हणाला.

"तर मग पहीली महत्वाची गोष्ट कोणती?" राजाने पुन्हां विचारले.

"या जगात पुरुषाचे जीवन सुखी व्हायला स्त्रीचे प्रेम हे अत्यावश्यक आहे, हीच पहीली गोष्ट!" पाहरेकरी म्हणाला.

ते ऐकून राजकन्येचा चेहरा लाजल्यासारखा झाला.

तेव्हां राजाला उलगडा झाला आणि त्याने राजकन्येचा विवाह त्या पाहरेकऱ्याशी करून दिला. विवाहासाठी मंगलवाद्याची गरज पडली नाही. ती गाणारी बकरीच मंगलवाद्ये वाजवू लागली.



# जळजळीत अंजन

रामपूर गावी कृष्णदास नावाचा एक सावकार रहात असे. त्याने व्याजबट्टयात पुष्कळ पैसे मिळविले, परंतु त्याच्यामुळे कित्येक सुखी कुटुंबे देशोधडीला लागली. म्हणून गावकरी त्याची निंदा करू लागले आणि त्याला वाळीत टाकले.

कृष्णदासाने जी दौलत संपादन केली होती ती तीन पिढ्यांपर्यंत पुरेल एवढी होती. परंतु त्याला चौथ्या पिढीचे कसे होईल याची काळजी वाटत होती. त्या काळजीने तो खंगत गेला. अनेक डॉक्टरांनी व वैद्यांनी औषधपाणी केले, परंतु गुण पडला नाही. तेव्हां त्याच्या एका जवळच्या नातेवाइकाने सुचविले–"कृष्णदास! तू आयुष्यभर पैसे जोडलेस, पण माणसे जोडली नाहीस. थोडा दानधर्म केलास तर कदाचित देवाला तुझी दया येईल. तुझ्या गावात गोरगरीब इतके आहेत की त्यांना सकाळी खायला मिळते आहे तर संध्याकाळी नाही. तू दररोज एका गरिबाला पोटभर जेवण देत जा, आजार बरा होईल."

कृष्णदासला ते खरे वाटले. त्याने शेजारच्या रामदास नामक एका गरीब माणसाला बोलाविले आणि म्हणाला–"रामदास! मी गरीबांना दररोज जेवायला बोलवून दान करावे म्हणतो. आज तुझ्या घरच्या सर्व लोकांनी माझ्याकडे जेवायला आले पाहिजे."

ते ऐकून रामदास म्हणाला–"सावकार! आज दोन्ही वेळच्या खाण्याची व्यवस्था झाली आहे. उद्याची गोष्ट उद्यां पाहून घेऊ. आज खायला नाही, अशा एका गरीबाला बोलवून आपण जेवण वाढावे." असे सांगून रामदास निघून गेला.

ते ऐकून कृष्णदास चकित झाला. रामदासासारख्या दरिद्री माणसाला उद्यांची फिकीर असू नये, आश्चर्याची गोष्ट आहे! आणि मला काळजी लागली आहे चवथ्या पिढीची! ती कां?

त्या दिवसापासून कृष्णदासाने गरिबांना अन्नदान करून आपले सर्व धन खर्च करण्याचे ठरविले. त्याचा आजार आपोआप बरा झाला.





# विचित्र परीक्षा

एका राजाला दोन राण्या होत्या. दोघींना एकेक मुलगा होता. काही दिवसांनी थोरली राणी मरण पावली. दोघे राजकुमार यथासमयी विद्याध्ययन करून परतले. राजा थोरल्या राणीच्या मुलाला गादीवर बसविणार हे ओळखून आपल्या सावत्र मुलाचा काटा काढण्याचे धाकट्या राणीने मनाशी ठरविले आणि राजाला म्हणाली— " थोरल्या राजकुमाराने रत्नद्वीपाच्या राजकन्येशी विवाह करावा."

रत्नद्वीपातल्या राजकन्येशी विवाह करण्याच्या हेतूने गेलेला कोणी परतला नाही ही गोष्ट राणीला माहीत होती आणि राजाला पण माहीत होती. परंतु राणीचे मन न दुखविण्याचे ठरवून राजाने होकार दिला.

थोरल्या राजकुमाराला रत्नद्वीपाच्या राजकन्येशी लग्न करण्याचा अर्थ स्वतःचा जीव धोक्यात घालण्यासारखा आहे, ही गोष्ट कळली होती. परंतु तो शूर व साहसी होता. म्हणून पित्याची आज्ञा होताच तो रत्नद्वीपास जाण्यास तयार झाला.

रत्नद्वीपात प्रवेश केल्यावर राजकुमार एका धर्मशाळेत उतरला. त्याने राजकुमारीच्या विषयी जे काही ऐकले होते त्यात खरे किती व खोटे किती या गोष्टीची चतुराईने चवकशी केली. राजकन्या विवाहेच्छु राजकुमाराला काही तरी पेय प्यायला देते व ते पेय प्यायल्या बरोबर पिणारा दगडाचा पुतळा होऊन जातो आणि राजकन्या तो पुतळा भुयारात नेऊन टाकते असे त्याने ऐकले.

लोकांनी राजकन्येशी विवाह करण्यात धोका असल्याचे त्याला समजावून सांगून सुचविले की, कोणत्यातरी दुसऱ्या तरुणीशी विवाह करून शतायुषी व्हावे.

परंतु राजकुमाराला तो सल्ला पसंत पडला नाही. या सर्व [illegible] आहेत, मुळात काहीच नसावे, असे त्याला वाटले. राजकन्येने दिलेले पेय राजकुमारांनी प्यावेच कां? राजकुमारीला सर्व राजकुमारांना बोलावून शिला मूर्तीच करण्यात तिचा हेतू तरी काय? अशा अनेक शंका त्याच्या मनात उठल्या आणि समाधानकारक उत्तर कोणी देऊ शकला नाही. त्या शंकांचे समाधान करून घेतल्याशिवाय परत जाणेदेखील राजकुमाराला आवडले नाही. म्हणून तो सरळ राजवाड्यात गेला आणि राजकुमारीला भेटून म्हणाला—" राजकुमारी! मी विवाहाच्या इच्छेने तुझ्याकडे आलो आहे."

" माझ्याशी तुम्हांला विवाह करावयाचा असेल तर एका राक्षसाचे डोके माझ्यासमोर हजर करावे लागेल. मी त्या राक्षसाविषयी सर्व माहिती तुम्हांला सांगते. लक्षपूर्वक ऐकून घ्या. सात समुद्रापलीकडे एक निळा पर्वत आहेत. त्या पर्वताच्या एका गुहेतून तुम्हांला धूर बाहेर येत असलेला दिसेल. त्या धुरात शिरून तुम्ही गुहेत गेलात तर तुम्हांला तो राक्षस दिसेल. त्याचे डोके कापून आणावयाचे आहे. तो झोपला असेल तेव्हांच त्याचे डोके कापता येईल. परंतु एक गोष्ट लक्षात ठेवा, त्या राक्षसाचा जीव एका पोपटाच्या कंठात आहे. तो पोपट त्या जागेच्या पूर्वेस एका लाल किल्लयावर एका झाडाच्या पोकळीत आहे. तो पोपट



श्रीमती कुमुद्वती ठाकूर

धरून त्याचा कंठ चिरला तर तो राक्षस मरेल. त्यानंतर त्या राक्षसाचे डोके कापून आणतां येईल." राजकुमारी म्हणाली.

"मी राक्षसाचे डोके नक्कीच कापून घेऊन येईन." राजकुमार म्हणाला.

"तरमग मी एक पेय प्यायला देते तुम्हांला. ते पेय प्यायल्यावर हे कठीण काम करायला तुमच्या अंगात पुरेशी शक्ती येईल. या पेयाचा तुम्हांला दुसरा कोणत्या ही प्रकारचा त्रास होणार नाही आणि ती शक्ती तुमच्या अंगात नसेल तर तुम्ही एक शिलामूर्ती होऊन जाल. आणि हे पेय प्यायला तुम्ही नकार दिलात तर तुम्हांला भुयारातल्या अंधार कोठडीत कैद करून ठेवण्यात येईल." राजकुमारी म्हणाली.

राजकुमार पेय प्यायला तयार झाला. राजकन्येने ते पेय आणून दिले. राजकुमार ते गटागटा प्याला, परंतु शिलामूर्ती झाला नाही.

"मी शिलामूर्ती झालो नाही याचा अर्थ आपल्या कार्यात मला नक्कीच यश [illegible] बरे तर मी येतो." असे सांगून राजकुमार उठून उभा राहिला.

"आपल्याला कोठे जाण्याची गरज नाही, परीक्षेत आपण यशस्वी झालां आहां. सात समुद्र व त्या पलीकडच्या पर्वतातला राक्षस वगैरे गोष्टी कल्पित आहेत. मी सांगितल्याप्रमाणे साहस करून काम करायला कोण तयार आहे, हे मी पहात होते. आपल्या स्वयंवरासाठी मी शूर राजकुमाराची निवड करण्यास ही अट घातली होती. मी दिलेले पेय आज पावेतो कोणी प्याला नाही. म्हणून ते सर्व राजकुमार भुयारातल्या कैदेत पडलेले आहेत." राजकन्या म्हणाली.

त्यानंतर थाटामाटाने राजकन्येशी राजकुमाराचा विवाह झाला. त्यापूर्वी जे राजकुमार अयशस्वी होऊन कैदेत पडले होते त्यांना सुटका मिळाली. राजकुमार सपत्नीक परत आलेला पाहून सावत्र आईला फार वाईट वाटले. परंतु तिला निराश व्हावे लागले. तिच्या सावत्र पुत्राचा यथासमयी राज्याभिषेक झाला.





# अभ्यासाच्या गोळ्या

**फार** पूर्वीची एक गोष्ट आहे. एका गावी एक गुरुजी रहात असत. त्यांना एक विद्वान पंडित म्हणवून घ्यायची फार हौस होती. म्हणून त्यांनी काही ग्रंथ व पोथ्या जमा करून घरात फळीवर किंवा माळ्यावर ठेवल्या होत्या. फक्त तीनचार पुस्तकेच ते आपल्या शिष्यांकडून पाठ करवून घेत. त्या पुस्तकांतल्या एकाही वाक्याचा सरळ अर्थ स्वत: गुरुजींना माहीत होता की नाही, सांगणे कठीण आहे. तसे गप्पात रंगवून आपल्या विद्वत्तेची छाप अशिक्षित लोकांवर पाडण्याची कला गुरुजींना चांगली अवगत होती. म्हणून लोक त्यांच्याकडे आपल्या मुलांना शिक्षणासाठी पाठवीत व गुरुदक्षिणा देखील भरपूर देत.

एकदां या गुरुजींपाशी रामानंद नावाचा एक विद्यार्थी आला. तो कुशाग्र बुद्धीचा होता. गुरुजी दोनचार ग्रंथ आपल्या शिष्यांकडून पाठ करवून घेत असल्याची गोष्ट रामानंदच्या लक्षात यायला फार दिवस लागले नाहीत. त्याला हेदेखील कळून आले की गुरुजी शिकवितात त्याचा अर्थ देखील त्यांना यथातथाच कळत होता. रामानंद हुशार होता म्हणून गुरुजींनी अध्ययनार्थ दिलेले ग्रंथ त्याने वाचून काढले व स्वाध्यायाने त्या ग्रंथाचा अर्थदेखील त्याला कळू लागला. त्याच्या मनात विद्येची भूक दिवसेदिवस वाढत गेली. काशीला जाऊन विद्याध्ययन करण्यास त्याच्याजवळ खर्चासाठी पुरेसे पैसे नव्हते.

त्याने विचार केला की निदान माळ्यावरचे ग्रंथ व पोथ्या वाचायला मिळाल्या तरी आपल्या विद्येत भर पडेल. परंतु गुरुजी एकाही पुस्तकाला हातलावू देत नसत. पोथ्यांना कसर लागो की वाळवी त्याची फिकीर गुरुजींना नव्हती. कोणी ते

ग्रंथ वाचून काढले तर आपल्याहून जास्त विद्वान होईल ही भीति त्यांना वाटत होती. तरी गुरुजींच्या दृष्टी आड रामानंदने त्याला शक्य झाले तेवढे ग्रंथ सारंत वाचून काढले.

रामानंदला विद्येचा छंदच लागला. परंतु गुरुजींना काळजी वाटू लागली की त्यांचा शिष्य त्यांच्याहून विद्वान निघाला तर त्यांची मान जगासमोर खाली होईल. म्हणून त्यांनी रामानंद वर नजर ठेवण्यासाठी काही शिष्यांना नेमले. तो कोठे जातो काय करतो हे ते गुरुजींना येऊन सांगत.

सुट्टी असली की रामानंद रानात जाऊन झाडाखाली बसून वाचलेले तोंड पाठ करी. [illegible] ज्वारीच्या भाकऱ्यांचे तुकडे करून [illegible] शिष्यांनी दुरून ते पाहिले आणि गुरुजींना जाऊन सांगितले की रामानंद एकांतात काहीतरी मंत्र म्हणतो आणि कसल्या तरी वड्या की गोळ्या खातो.

गुरुजींना वाटू लागले की तो अभ्यासाच्या गोळ्या खातो म्हणून त्याची बुद्धी तीक्ष्ण आहे. त्याचे ते गुपित बाहेर काढले पाहिजे."

काळोख पडल्यावर रामानंद घरी परत येत असे. गुरुजींनी एके दिवशी त्याला एका खांबाला शिष्यांकरवी बांधविले आणि म्हणाले—"मला सर्व कळले आहे, तू काय काय करतोस ते! तू मंत्र म्हणतोस आणि कसल्या तरी गोळ्या चघळतोस. त्या अभ्या- [illegible] गोळ्या खाऊन [illegible] अपमान [illegible] येईल हे तू पाहतो आहेस. तू कोणता मंत्र म्हणतोस आणि त्या अभ्यासाच्या गोळ्या कोठे आहेत हे तू मला सांगितले नाहीस तर पहा. तू मी म्हटल्याप्रमाणे वागलास तर मी तुला माफ करीन."

गुरुजी म्हणाले ते ऐकून रामानंद चकितच झाला. त्याने खरेखरे ते सांगितले. म्हणाला—"मला मंत्रतंत्र येत नाहीत व अभ्यासाच्या म्हणून गोळ्या देखील माझ्याजवळ नाहीत."

परंतु गुरुजींचा राग शांत होण्याऐवजी जास्तच भडकला. ते दरडावून म्हणाले—"तू खोटे बोलतो आहेस. तू रानात जाऊन झाडाखाली मंत्र म्हणत फिरताना आणि गोळ्या खाताना मी तुला पाहिले नाही किंवा मला ते कळले नाही, असे का तुला वाटत आहे? तू गुप्तपणे काय करतोस हे तू मला सांगितले नाहीस तर मी राजाकरवी तुझा शिरच्छेद करवीन."

आता रामानंदला त्याचे गुरुजी त्याला वाटले होते त्याहून जास्त मूर्ख आहेत हे कळले. आपल्या गुरुजींची समजूत घालून आपल्या विद्याध्ययनाची तहान भागविण्याचा मार्ग काढायचे त्याने मनाशी ठरविले. तो गुरुजींना म्हणाला—"गुरुवर्य! आपण माझे गुपित फार चतुराईने ओळखले. आपल्यापासून लपवून ठेवण्यासारखे काय आहे? मला मंत्र येतात ही गोष्ट खरी आहे. परंतु ते मंत्र अभ्यासाच्या





गोळ्या तयार करण्यासाठीच आहेत. तो मंत्र दुसऱ्याला शिकविणे शक्य नाही. जर मी तो मंत्र शिकविला तर मला मरण येईल. परंतु मी मंत्रवलेल्या गोळ्या तयार करून दिल्या तर अभ्यास करणे कोणाला ही शक्य होईल. माझ्याजवळ ज्या गोळ्या होत्या त्यां संपल्या. आतां मला नव्या गोळ्या तयार कराव्या लागणार आहेत."

"बरं तर लवकर तयार करून दे!" गुरुजी म्हणाले.

गोळ्या तयार करायला कमीत कमी एक आठवडा लागेल. चार तोळे सोने लागेल त्यासाठी. तीन दिवस मंत्र म्हणत ते सोने तापविले पाहिजे. त्यानंतर जे ग्रंथ शिकावयाचे असतात त्या ग्रंथांचे भस्म त्या सुवर्ण भस्मात घालून त्याच्या गोळ्या तयार कराव्या लागतात. त्या गोळ्या खाल्ल्या म्हणजे ग्रंथांचे सार बुद्धीत सहजी उतरते." रामानंदने थाप मारली.

"अरे मग त्यात काय? चार तोळे सोने मी तुला देतो. माळ्यावर कित्येक [illegible] [illegible] तयार कर." गुरुजी म्हणाले.

रामानंदने सर्व पोथ्या व ग्रंथ माळ्यावरून काढून घेतले आणि गुरुजींकडून चार तोळे सोने मागून घेऊन जंगलात गेला. त्याचे गुरुजी व शिष्यदेखील जंगलात त्याच्या पाठोपाठ गेले. रामानंदने त्या सर्वांच्या समक्ष सोने एक खड्डा खणून त्यात पुरले आणि म्हणाला—"त्या खड्ड्यावर तीन दिवस सतत विस्तव असला पाहिजे. रात्रंदिवस जागचे हलता कामा नये आणि मंत्र म्हणत राहिले पाहिजे." त्याप्रमाणे संध्याकाळपर्यंत गुरुजी व शिष्य तेथे बसून राहिले. नंतर दुसऱ्या दिवशी उजाडतांच येतो असे सांगून गुरुजी व शिष्य घरी निघून गेले.

सर्व लोक निघून गेल्यावर रामानंदने विस्तव विझविला आणि खड्ड्यातून सोने काढून घेऊन पोथ्यांचे बांड उचलून घेऊन काशीच्या वाटेने निघून गेला.





# बिंग फुटले

एका गावी एक जमीनदार रहात असे. त्याला एकच एक मुलगा होता. त्याला शिकविण्यासाठी जमीनदाराने सिद्धाचार्य नावाच्या गुरूला नेमले. मुलगा बारा वर्षांचा झाल्यावर विद्याध्ययन संपले. जमीनदाराने गुरूचा सत्कार करून गुरुदक्षिणा दिली आणि अनेक मूल्यावान वस्तू भेट म्हणून देऊन गुरूला निरोप दिला.

परंतु सिद्धाचार्य लोभी होता. त्याने गुप्तपणे जमीनदाराच्या मुलाला बोलावून विचारले—"कायरे! आपले स्वतःचे असे गुरुदक्षिणा म्हणून तू काहीच दिले नाहीस. म्हणून तुझी विद्या फळास येणार नाही. मी म्हणालो ते तू कोणाजवळ बोललास तर त्यात ही तुझेच नुकसान आहे. सांग, तुझ्याजवळ तुझे स्वतःचे असे किती पैसे आहेत?" मुलाने त्याला दर वाढदिवसाला खाऊ म्हणून जे पैसे मिळत ते त्याच्याजवळ असल्याचे सांगितले.

"तरमग तू मध्यरात्र उलटल्यावर कालीमातेच्या देवळात येऊन मला ती रक्कम दे. मी तेथे तुझी वाट पाहीन." असे सांगून सिद्धाचार्याने मुलाला पाठवून दिले.

तो होकार देऊन निघून गेला.

गावापासून दूर थोड्या अंतरावर एका निर्जन स्थानी देवीचे देऊळ होते. मध्यरात्र उलटल्यावर गुरु सिद्धाचार्य देवळात येऊन वाट पहात सभामंडपात बसला.

त्याच्या थोडे आधी आणखी एक मनुष्य सभामंडपाच्या आंत एका खांबाआड उपरणे पांघरून पडून राहिला होता. सिद्धाचार्याला ती गोष्ट माहीत नव्हती.

तो झोपलेला मनुष्य शेजारच्या गांवातला एक शेतकरी होता. त्याच दिवशी सकाळी तो एका टोपलीत आंबे घेऊन जमीनदाराच्या गांवी आंबे विकायला आला होता. गावात पाऊल टाकताच त्याला एक



ज्योतिषी भेटला. ज्योतिष्याने त्या शेतकऱ्याचा हात पाहून भविष्य वर्तविले की शेतकऱ्याने थोडे साहस दाखविले तर त्याला खूप लाभ होईल.

शेतकऱ्याने ज्योतिष्याच्या हातात एक पावली ठेवली आणि पुढे गेला.

जमीनदार नित्याच्या संवयीप्रमाणे शाल पांघरून सकाळी फिरायला निघाला होता. त्याने दुरून शेतकऱ्याला व ज्योतिष्याला पाहिले होते. शेतकरी जवळ आल्यावर जमीनदाराने त्याला विचारले–"काय रे, खुशीत दिसतो आहेस, काय विशेष काय?"

"काही नाही हो! आज ज्योतिष्याने चांगले भविष्य वर्तविले आहे. म्हणाला, ... थोडे साहस दाखविले तर मला पुष्कळ लाभ होणार आहे. आता मी साहस काय दाखविणार? चार पैसे मिळाले की पुरे!" शेतकरी म्हणाला. शेतकऱ्याने जमिनदाराला ओळखले नव्हते.

जमीनदाराने शेतकरी थोडा दूर गेल्यावर आपल्या नोकराला जवळ बोलावून काही तरी सांगितले. नोकराने शेतकऱ्याला हाक मारून थांबावला सांगितले आणि म्हणाला– "तू या गावात फळे विकायला आला आहेस. मालक तुला भेटले, तू त्यांच्या हातात चार आंबे सुद्धा ठेवले नाहीस?" असे सांगून नोकराने शेतकऱ्याच्या हातातले आंब्याचे टोपले काढून घेतले आणि निघून गेला.

शेतकऱ्याला फार वाईट वाटले. फायदा काय झाला आपल्याला? जवळ होते तेच हातचे घालवून बसलो. तो ज्योतिषी लबाड लुच्चा आहे. आपण त्याला एक पावली फुकट दिली. वेड्यासारखा दिवसभर ज्योतिष्याच्या शोधार्थ गावात भटकला आणि रात्री तो देवीच्या देवळात मंडपात खांबाला टेकून पडून राहीला.

सर्व लोक झोपल्यावर जमीनदाराचा मुलगा आपल्या खाऊचे रुपये घेऊन कालीमातेच्या देवळात आला. सिद्धाचार्यांनी त्याला विचारले–"किती रुपये आहेत?"

"... एक ...!" मुलगा म्हणाला.

"ठीक, तू रुपयांची थैली माझ्या हातात दे आणि गुपचुप परत निघून जा कसा!" सिद्धाचार्य म्हणाला.

ते ऐकून शेतकरी चकित झाला. त्याने दोघांचे बोलणे ऐकले होते. सिद्धाचार्यांच्या हातातली थैली पाहून तो पुढे होऊन म्हणाला–"काय रे चोरा! तू या मुलाच्या मदतीने चोरीचा धंदा चालू केला आहेस वाटते? ठेव ती थैली!"

सिद्धाचार्य ते ऐकून घाबरला आणि थैली टाकून पळाला.

शेतकरी थैली हातात आल्यावर विचार करू लागला, ज्योतिष्याचे म्हणणे खरे ठरले, मी साहस केले म्हणून शंभर रुपये फुकटात हाती आले. परंतु ते रुपये घेऊन आपल्या गावी जायचे धाडस त्याच्या अंगात नव्हते. तो चोरीचा माल होता आणि तो घेऊन गावी जाणे धोक्याचे होते. त्याने गावच्या जमीनदाराला भेटून चोरीचा माल त्याच्याकडे पोचते करण्याचे ठरविले. उजाडताच तो जमीनदाराच्या घरी गेला. जमीनदाराचे नोकर ज्योतिषी आणि शेतकऱ्यावर नजर ठेवून होते. मध्यरात्रीच्या सुमारास नोकरांनी जमीनदाराला जाऊन मुलाने शंभर रुपये सिद्धाचार्याला नेऊन दिल्याचे व शेतकऱ्याने दरडावून ते त्याच्याकडून काढून घेतल्याचे सांगितले.

शेतकरी जमीनदाराकडे आला थोड्या वेळाने जमीनदाराचे नोकर ज्योतिष्याला व सिद्धाचार्याला धरून घेऊन आले.

जमीनदाराने सिद्धाचार्याला विचारले– "काय हो! मी स्वतः होऊन तुम्हांला गुरुदक्षिणा देवविली आणि तुमचा सत्कार केला. तेवढ्यावर तुमचे समाधान झाले नव्हते तर माझ्याकडून आणखी मागून घ्यायची होती गुरुदक्षिणा! परंतु तुम्ही माझ्या मुलाकरवी असली कामे करविलीत!"

जमीनदाराने शेतकऱ्याला फळांची भरपूर किंमत देवविली आणि ज्योतिष्याला बक्षिस देऊन त्याची पाठ थोपटली.





# विलक्षण चोर

फार प्राचीनकाळची ही गोष्ट आहे, विदिशा नगरीची प्रजा धर्मपरायण म्हणून प्रसिद्ध होती. 'यथा राजा तथा प्रजा' या न्यायाने विदिशा नगरीचा राजा धर्मभीरु होता, म्हणून त्याची प्रजापण धर्मभीरु होती.

शेजारच्या राज्यातून एकदा रामगुप्त नावाचा एक मनुष्य पुष्कळशी संपत्ती घेऊन विदिशा नगरीत आला आणि व्यापार करू लागला. त्याचा मुख्य व्यापार धान्याचा होता. त्याला व्यापारात बरकत मिळू लागली आणि एका वर्षाने त्याने त्याचा व्यापार सुरू होऊन एक वर्ष झाल्याबद्दल सत्यनारायाची पूजा करून एक मोठा उत्सव केला. त्याने आपल्या ग्राहकांना निमंत्रण दिले आणि एक मोठी मेजवानी पण दिली.

जेवणखाण आटोपून ग्राहक आपापल्या घरी निघाले तेव्हां त्यांना गरज असलेले धान्य विकत घेऊन निघाले. परंतु त्या वेळी सर्वांची बुद्धी कशी काय फिरली देवच जाणे. प्रत्येकाने व्यापाऱ्याला पैसे दिले आणि व्यापाऱ्याची नजर चुकवून एकेक शेर धान्य चोरून नेले. एकाने सर्वांची नजर चुकवून मागच्या दारी जाऊन रामगुप्ताची गायच सोडून नेली. इतर पाहुण्यांनी त्यांच्या हाती जे काही लागले तेच उचलून नेले.

रामगुप्ताला चोरी गेलेल्या मालाची थोडीदेखील माहिती नव्हती किंवा त्याने त्या आनंदाच्या दिवशी गिऱ्हाइकाच्या त्या लोभीवृत्तीकडे दुर्लक्ष केले असावे. परंतु त्याच्या बायकोला घराची साफसफाई करीत असतां सोन्याचे एक ताट चोरीला गेल्याचे कळले ती नवऱ्याला म्हणाली– पेटीतून काढलेले सोन्याचे ताट दिसत नाही."

[illegible] दररोज एक न एक वस्तू तो चोरून नेत असे. परंतु आदल्या दिवशी जी मेजवानी झाली त्या गडबडीत सोन्याच्या ताटाची चोरी करायला त्याला चांगली संधी मिळाली.

दुसऱ्या दिवशी सकाळी तो ते ताट एकां सराफाच्या दुकानात विकायला घेऊन निघाला. त्या वेळी शेजारच्या देशातला एक मनुष्य दुकानदाराशी बोलत होता. त्याने ते ताट पाहताच ओळखले आणि दुकानदाराला म्हणाला–"हे ताट माझे आहे हो! फार दिवसांपूर्वी म्हणजे एका वर्षापूर्वी आमच्या घरी मोठी चोरी झाली त्या वेळी दागदागिन्यांबरोबर हे ताट चोरीला गेले. याला विचारा, याला हे ताट कोठे मिळाले?"

तो सराफ रघुनाथला व त्या वृद्ध गृहस्थास बरोबर घेऊन दरबारात गेला. राजासमोर रघुनाथने ते ताट रामगुप्ताच्या घरून चोरून आणल्याचे सांगितले.

राजाने रामगुप्ताच्या घराची झडती घेववून त्याच्या घरून मोठी पेटी आणविली. त्या पेटीत जेवढे दागिने होते ते सर्व त्या वृद्ध माणसाच्या घरून चोरी गेलेल्या मालापैकीच होते.

वस्तुस्थिती अशी होती की, रामगुप्त हाच एक अट्टल चोर होता. त्याने आपल्या गावी चोरी केली होती आणि चोरी लपविण्यासाठी गाव सोडून दुसऱ्या देशात निघून गेला होता. विदिशा नगरीत कोणी चोरी करत नसे. परंतु चोराच्या घरची मेजवानी खाल्यावर सर्वांची बुद्धी फिरली, आणि चोरीची बुद्धी उपजली. मेजवानी झाल्यावर ते घरी गेले आणि नंतर आपण चोरी केल्याबद्दल त्यांना पश्चत्ताप झाला. म्हणून त्यांनी चोरी करून आणलेल्या सर्व वस्तू परत केल्या. परंतु रघुनाथ चोराच्या घरचे खाऊन अट्टल चोर झाला होता.

राजाने शेजारच्या राज्यातल्या वृद्ध माणसाला त्याचा सर्व माल परत केला आणि रामगुप्त आणि रघुनाथला शिक्षा केली.



श्री म. रा. जाधव



# महाभारत

**पां**डवांचे सैन्य कुरुक्षेत्र मैदानावर पोच- ल्यावर सैन्य शिबिरे तयार करण्या- साठी सोयीची जागा निवडून ठरविण्यात आली. तेथे गवत, लाकूड, पाणी मुबलग मिळण्यासारखे होते. जवळ कोठे स्मशान किंवा देवालय किंवा ऋषी मुनींचे आश्रम नव्हते. कृष्ण व अर्जुन दोघांनी, मदतीस आलेल्या काही राजांना बरोबर चलायला सांगून शिबिरासाठी निवडलेली जागा हिंडून नीट पाहून घेतली आणि कोठे कशी शिबिरे तयार करावयाची सांगितले.

धृष्टद्युम्न, सात्यकी, युयुधान यांनी शिबिरांच्या जागा आंखून दिल्या. हिरण्य- वती नदीच्या कांठी पांडव सैन्याची शिबिरे उभी झाली. कृष्णाने त्यांच्या चारी बाजूला एक खंदक खणविला. पांडवांच्या शिबिरा- सारखीच इतर राजांची शिबिरे तयार झाली. सर्व शिबिरात अन्नसामुग्री, पाणी वगैरेची व्यवस्था करण्यात आली. सैन्या- बरोबर सहस्रावधी गवंडी, सुतार, लोहार वगैरे कारागीरपण होते. औषध पाण्याची व्यवस्था करण्याठी वैद्यांची नेमणूक झाली होती. शस्त्रास्त्रे, कवच, शिरस्त्राणे यांची आगारे निर्मिली होती. तूप, मध, धूप सामुग्री वगैरेच्यां डोंगराएवढ्या राशी लागल्या होत्या. धर्मराजाने प्रत्येक शिबिरात स्वतः जाऊन पाहणी केली.

कृष्ण हस्तिनापुराहून निघाल्यावर दुर्यो- धनाने कर्ण, शकुनी, दुःशासन या आपल्या विश्वस्त लोकांना बोलावून म्हणाला—"माझे



पांडवांशी युद्ध झालेच पाहिजे, हीच कृष्णाची इच्छा दिसते आहे. तेव्हां आपण देखील युद्धाची जय्यत तयारी केली पाहिजे. म्हणून तुम्ही युद्धाच्या तयारीला लागा. कुरुक्षेत्रात आपली सैन्य शिबिरे उभी करा. आपल्याला रसद मिळण्याच्या वाटा पांडवांच्या हाती पडता कामा नयेत. रसद आणि शस्त्रपुरवठा भरपूर आणि वेळेवर झाला पाहिजे. लक्षावधी ध्वजा व पताका तयार झाल्या पाहिजेत. शिबिरात हिंडण्या फिरण्या जोगे रस्ते आणि वाटा सोयीच्या असल्या पाहिजेत. उद्याच सर्व सैन्य शिबिरांत पोचते झाले पाहिजे."

हस्तिनापूर राजधानीत सैन्याची येजा सुरू झाली. सर्व पृथ्वी पायदळ सैन्याच्या पदाघाताने हादरत होती. सर्व सैन्य शिबिरांत येऊन दाखल झाले.

आपल्या बांधवांचा सर्वनाश करण्याची पुरी तयारी झाल्यावर धर्मराजाच्या मनात शंका उत्पन्न झाली. तो कृष्णाला म्हणाला— "कृष्णा! आपण करतो आहो, हे नीति- धर्माविरुद्धतर करीत नाही ना?"

कृष्ण म्हणाला—"आपल्याला न्यायाने राज्याचा जो भाग मिळायला हवा तो मिळाला नाही तर आपण संधी तरी कोणत्या आधारावर करणार? अशा परिस्थितीत युद्धाशिवाय दुसरे काय करणार?"

कृष्णाचा सल्ला ऐकून धर्मराजाने युद्ध सुरू झाल्याची घोषणा केली आणि आगे कूचची आज्ञा झाली.

नंतर धर्मराज भीमार्जुनांना आपले दुःख व्यक्त करीत म्हणाले—"वंशनाश होऊ नये यासाठी आपण बारा वर्षे वनवास आणि एक वर्ष अज्ञातवास सहन केला. सर्व हाल- अपेष्टा सहन केल्या. परंतु वंशनाशालाच आपले सर्व प्रयत्न कारणीभूत होत आहेत. आपले गुरु, वडीलधारी मंडळी यांचा वध करून आपण जय मिळविणार तो कोणत्या कामाचा?"

"आपल्या मातोश्रींनी आणि विदुर काकांनी सांगितलेली नीति आणि धर्म त्यांहून जास्त चांगला नीतिधर्म आणखी





काही असू शकेल, असे वाटते का दादा तुम्हांला? युद्ध टळणे अशक्य आहे!" भीमार्जुन म्हणाले, कृष्णाने पण दुजोरा दिला.

दुसऱ्या दिवशी दुर्योधनाने त्याच्या बाजूने युद्धास तयार होऊन आलेल्या अकरा अक्षौहिणी सैन्याचे भाग पाडले. उत्तम बिनीचे सैन्य सर्वांत पुढे, मध्यम दर्जाचे मध्यभागी आणि सर्वांत कनिष्ठ दर्जाचे सर्वांत मागे ठेवले. मोडलेल्या रथांची दुरुस्ती करविण्यासाठी उत्तम लाकूड व सुतार वगैरेची व्यवस्था झाली. सर्व रथ दुरुस्त करून रंगवून तयार झाले. आयुधे व निरनिराळ्या प्रकारची आवश्यक सामुग्री रथात ठेवण्यात आली.

दुर्योधनाने आपल्या अकरा अक्षौहिणी सैन्याचे अकरा भाग पाडून त्यांचे जे सेनापती नेमले त्यांची नांवे अनुक्रमे अशी होती–कृपाचार्य, द्रोणाचार्य, शल्य, जयद्रथ, सुदक्षण, कृतवर्मा, अश्वत्थामा, कर्ण, भूरिश्रवा, शकुनी व बाल्हिक.

राज्यसभेत अकरा अक्षौहिणीचे सेनापती नेमल्यानंतर दुर्योधन भीष्माचार्यांना हात जोडून नमस्कार करून म्हणाला–"आजोबा! किती मोठे कार्य असले आणि ते पार पाडण्यास योग्य नेतृत्व नसले तर ते काम मुंग्यांच्या वारुळासारखे नष्ट होऊन जाते. निरनिराळ्या सेनापतींमध्ये परस्पर स्पर्धा व मत्सर असू शकतो. परस्पर सल्लयाने काम करण्यास ते तयार नसतात. प्राचीन काळी हैहय क्षत्रिय राजांशी युद्ध करण्याचे ठरवून ब्राह्मणांनी स्वारी केली. त्यांच्याबरोबर वैश्य व शूद्र देखील युद्धाला आले. परंतु कित्येक वर्षे युद्ध होत राहले तरी अल्प संख्याक हैहय वंशीय क्षत्रियांनाच जय मिळत गेला. कारण हैहय वंशियांना एक योग्य नायक मिळाला होता. तीन जातींच्या सैन्यांचे नायक व सेनापती अनेक होते. ही गोष्ट ब्राह्मणांनी ओळखली आणि आपल्यापैकी एकाला सरसेनापती नेमून हैहय राजांवर स्वारी केली तेव्हां ते विजयी झाले. आपणांला नीतिधर्म शुक्रासारखा

कळतो. आपण आमचे हितैषी. आपण कधीं धर्माचे उल्लंघन केलेले नाही. म्हणून आपण माझ्या या असंख्य सैन्याचे सरसेनापती होऊन या युद्धांत आम्हांला विजयी करावे, ही विनंती मी आपणांजवळ करीत आहे."

भीष्माचार्यांनी दुर्योधनाच्या सैन्याचे सरसेनापतीत्व दोन अटींवर कबूल केले. एक अट ही की ते पंचपांडवांपैकी कोणाचा वध करणार नांहीत. दुसरी अट अशी होती की ते सरसेनापती असेपर्यंत कर्णाने युद्धभूमीवर पाऊल ठेवू नये. कारण कर्णाच्या मनात भीष्माचार्यांविषयी द्वेषबुद्धी आहे. म्हणून प्रथम कर्णाने तरी युद्धभूमीवर जावे किंवा त्यांना एकट्याने जाऊ द्यावे.

भीष्माचार्यांनी ती अट घातल्यावर कर्ण दुर्योधनाला म्हणाला—"भीष्माचार्य जिवंत असेपर्यंत मी युद्धभूमीवर पाऊल ठेवणार नाही. मी ही प्रतिज्ञा करतो."

त्यानंतर दुर्योधनाने शास्त्रोक्त पद्धतीने भीष्माचार्यांना सेनापती म्हणून नेमले. त्यानंतर तो स्वतः त्याचे बंधू व सैन्य कुरुक्षेत्राच्या दिशेने कूच करीत निघाले.

आता युद्ध निश्चितच होणार हे कळल्यावर बलराम काही यादव वीरांना बरोबर घेऊन पांडवांच्या शिबिरात आला. सर्व पांडवांनी, राजांनी आणि कृष्णाने उठून




त्याचे स्वागत केले. बलराम वडीलधाऱ्या विराट, द्रुपदादिकांस प्रणाम करून व सर्वांना उद्देशून म्हणाला—

"महा भयंकर अशा युद्धाला सुरवात होते आहे. यात लक्षावधी निरपराध लोकांची प्राणहानी होणार. ती चुकेलसे दिसत नाही. तुम्ही सर्व या युद्धातून सुखरूप विकलांग न होतां परताल अशी आशा करतो. आपल्याला पांडव काय किंवा कौरव काय सारखेच हे मी कृष्णाला पूर्वी कितीदां सांगितले होते. पण त्याला अर्जुन हा प्राणाहून प्रिय सखा वाटतो! पांडवांचा त्याला अभिमान. माझे म्हणणे त्याने कधी ऐकलेच नाही. भीम व दुर्योधन हे दोघे माझे पट्टशिष्य. दोघे माझ्याजवळ गदायुद्ध शिकून एकाहून एक गदाधारी वीर झाले. या युद्धांत कृष्णाच्या मदतीने पांडवांनाच जय मिळणार हे निश्चित आहे. परंतु मी कौरवांचा नाश पाहू शकणार नाही. म्हणून सरस्वती नदीच्या तीरावर पुण्यक्षेत्री जाऊन निवास करण्याचे मी ठरविले आहे." असे सांगून बलराम निघून गेला.

त्यानंतर थोड्या वेळाने रुक्मिणीचा मोठा भाऊ रुक्मी एक अक्षौहिणी सैन्यानिशी येऊन पांडवांकडून अतिथिसत्कार वगैर करवून घेऊन सभेत सर्वांसमक्ष अर्जुनाला म्हणाला—"अर्जुना! या युद्धात तुला मदतीची गरज असेल तर मी तुला सांगतो, मी एकट्याने त्या सर्वांचा पराभव करून त्यांच्या मुसक्या बांधून तुझ्यासमोर हजर करतो. माझी बरोबरी करू शकणारा या जगतात कोण आहे? त्या कृपाचार्याला आणि द्रोणाचार्याला ठार करून मी तुला तुझे राज्य आणून देतो."

अर्जुन सर्वांच्या तोंडावर रुक्मीच्या वल्गनांची प्रतिक्रिया कशी झाली हे पहात हंसत म्हणाला—"हे वीरवर्य! मी भिण्याचा प्रश्नच उद्भवत नाही. कोणाच्या मदतीशिवाय मी गंधर्वांच्या हातून दुर्योधनाला सोडविले होते; खांडव वन दहन करविले; विराटाच्या गायी सोडविल्या त्या कौरवसैन्याच्या हातातूनच नव्हे का? तुम्हांला मदत करावयाचीच असेल तर आणखी कोणाला गरज आहे का विचारून पहा. तसे वाटत नसेल तर माझ्या बरोबर येऊन मी युद्ध कसे करतो ते पहा!"

तेव्हां रुक्मी आपले विशाल सैन्य घेऊन दुर्योधनाकडे गेला आणि आपल्या शौर्याच्या वल्गना करू लागला. परंतु दुर्योधनाने त्याच्या मदतीची गरज नसल्याचे सांगून त्याला निरोप दिला.

एकूण, कुरुक्षेत्रावर झालेल्या युद्धातून बलराम व रुक्मी यांनी अंग काढून घेतले. बाकी लोक कोणत्यातरी बाजूने युद्धाला आलेच.

हिरण्वती नदीच्या काठी पांडवांच्या शिबिरात दुर्योधनाने शकुनीमामांचा मुलगा उलूक याच्या हाती धर्मराज, कृष्ण, भीमार्जुन आणि नकुलसहदेव यांना एक उर्मटपणाचा संदेश पाठविला :–

"धर्मराजा! तू रुद्राक्ष बोका आहेस. तू बोक्यासारखा ध्यानमग्न बसून वेद-शास्त्रांच्या गप्पा सांगून गरीब भाबडया लोकांना फसवितोस. अजून तरी उघडया मैदानावर येऊन युद्ध कर. तू पांचच गावे मागितलीस ती बुद्धिपूर्वकच मी नाकारली आणि युद्धाला आह्वान केले.

"कृष्णा! तू आमच्या राज्य सभेत काही तरी जादू टोना करून एक विचित्र रूप दाखविलेस. तेच रूप घेऊन तू रणांगणावर माझ्यासमोर ये. शूरवीरांना असल्या मंत्रातंत्राला पाहून राग येतो, ते वावरून जात नाहीत. युद्धांत पांडवांना विजयी करून देवविती अशा तू वल्गना केल्या आहेस. त्या तू खऱ्या करून दाखव.

"भीमा! तू आहेस खादाड, तू युद्ध काय करणार? मी आपल्या प्रतापाने तुला विराटाच्या घरचा सैपाकी केले. तू कौरव बंधूंना ठार करून विजयी होईन अशी प्रतिज्ञा केली होतीस. ती प्रतिज्ञा पुरी करून दाखव!"



याच धर्तीवर दुर्योधनाने अर्जुनाला, नकुल-सहदेवांना आणि धृष्टद्युम्नाला संदेश पाठविले.

उलूकाने ते संदेश पांडवांच्या शिबिरात येऊन वाचून दाखविले. दुर्योधनाच्या कल्पने-प्रमाणे उर्मट भाषेत पाठविलेले ते संदेश ऐकून सर्वांना रागच आला. ते उलूकाला म्हणाले—"दुर्योधनाला सांग, तुझी इच्छा लवकरच पुरी होईल."

उलूक निघून गेल्यावर धर्मराज आणि धृष्टद्युम्नाने आपल्या सैन्याला कूच करण्यास आदेश दिला. धृष्टद्युम्नाने पांडव सैन्यातले वीर आणि कौरव सैन्यातले वीर यांच्या जोडया अशा तऱ्हेने करून सर्वांना त्यांची [illegible] सांगितले. त्यांच्या जोडया अशा.

कर्णार्जुन, दुर्योधन-भीम, शल्य-धृष्टकेतू, कृपाचार्य-उत्तमौज, अश्वत्थामा-नकुल, कृत-वर्मा-शैब्य, सैंधव जयद्रथ-युयुधान, भीष्म-शिखंडी, शकुनी-सहदेव, त्रिगर्त-उपपांडव आणि द्रोणाचार्यांबरोबर तो स्वतः म्हणजे धृष्टद्युम्न.

अशा तऱ्हेने कौरव सैन्यातील योद्धयां-च्या जोडीला पांडव सैन्यातील योद्धयांचा निर्णय सांगून त्याने पांडव सैन्याचा एक व्यूह रचला. अभिमन्यु हा बापसे बेटा सवाई आहे असे त्याचे मत होते.

तिकडे दुर्योधनाच्या विनंतीला मान देऊन भीष्माचार्यांनी सरसेनापतीचे पदग्रहण केल्यावर दोन्ही पक्षांतील वीर पुरुषांचे त्यांच्या शौर्यसाहसाच्या मानाने गट पाडले.

कौरव सैन्यात कृतवर्मा, शल्य, सैंधव, कृपाचार्य, अश्वत्थामा, द्रोणाचार्य, बाल्हिक वगैरेंना अतिरथी वीर असे घोषित केले. अश्वत्थाम्याला स्वतःचा जीव जास्त प्रिय वाटे हा त्याच्यात दोष होता. नाही तर त्याच्या समान शूर कौरव पांडवांच्या दोन्ही सैन्यात इतर कोणीच नव्हता. वृष-सेन आणि अलंबुस राक्षस हे दोघे महारथी होते. सुदक्षण, नील, शकुनी, विदानुविद वगैरे एकरथी होते. कर्ण कवचकुंडले घालवून बसल्यामुळे आणि शाप असल्यामुळे रथी गटात सामील होण्यालायक ही राहिला नव्हता. तो अर्धरथीच राहला.

पांडव सैन्यात पांच ही पांडव अतिरथी झाले. त्यांच्यापैकी अर्जुन दोन्ही सैन्यात अजिंक्य वीर ठरला. त्याच्याशी बरोबरी करू शकणार भीष्माचार्य व द्रोणाचार्य वयोवृद्ध होते. अभिमन्यु, सात्यकी, उत्तमौज, युधामन्यु, शिखंडी, धृष्टद्युम्न आणि त्याचा धाकटा भाऊ सत्यजीत आणि घटोत्कच अतिरथींहून थोडे कमी दर्जाचेच होते. पांच उपपांडवांना महारथी म्हणतां येईल. तसेच विराट द्रुपद आणि शिशुपालाचा मुलगा धृष्टकेतू वगैरेंदेखील महारथीच होते.





# शिव लीला

[ ६ ]

वीरसंगमय्या नावाचा एक रूपवान तरुण युवक एक शिवभक्त होता. तो शरभरूप शंकराची आराधना करीत असे.

तो वयात आल्यावर त्याचे काका त्याच्या योग्य मुलगी पाहण्यासाठी ओंकारपुरला गेले. तेथे त्यांचा मेहुणा, म्हणजे बायकोचा भाऊ रहात असे. तो फार श्रीमंत होता आणि शिवभक्त देखील होता. दोघे मेहुणे परस्परांना प्रेमाने भेटले. जेवल्यावर मेहुण्याने विचारले—"आज अचानक कसं काय येणे झाले?"

"एका शुभकार्यासाठी आलो आहे. आपला वीरसंगमय्या आहे ना त्याचे लग्न करायचे आहे, म्हणून आलो आहे ओंकारपूरला. तुमची मुलगी चंद्रिणी वीरसंगमय्याला योग्य वधू होऊं शकेल असे मला वाटते आहे. तुम्हांला हरकत नसेल तर दोघांच्या लग्नाचा मुहूर्त ठरवून टाकूया." वीरसंगमय्याचे काका म्हणाले.

त्यांच्या मेहुण्याला परमानंद झाला. ते म्हणाले—"अहो हे विचारण्याची गरजच काय? तुम्ही आमच्या मुलीला वीरसंगमय्याच्या वतीने मागणी घालणार आणि आम्ही नाही म्हणणार, हे शक्य तरी आहे का? वीरसंगमय्याहून जास्त योग्य वर आमच्या मुलीला कोठून मिळणार? तुम्हीच मुहूर्त ठरवून दोन्ही बाजूंची जबाबदारी घ्या आणि हौशीने लग्न उरकून टाका."

लग्नाचा मुहूर्त ठरला.

ओंकारपूरचा राजा भास्कर एकदां शिकारीहून परत येत होता तेव्हां त्याची



नजर चंद्रिणीवर पडली. त्याने तिच्याशीच लग्न करून तिला आपली पट्टराणी करण्याचे ठरविले. तो तिच्याकडे एक टक पहात उभा राहला. ती गोष्ट चंद्रिणीच्या लक्षात येताच ती घरात निघून गेली.

राजा तिच्याविषयी विचार करीत राजवाड्यात गेला. प्रधानाला बोलावून राजा म्हणाला—"चंद्रिणी नांवाच्या मुलीशी कोणत्याही प्रकारे माझा विवाह झाला पाहिजे."

भास्करचा प्रधान चंद्रिणीच्या वडिलांना भेटून म्हणाला—"अरे, तुझे आणि तुझ्या मुलीचे केवढे मोठे भाग्य आहे पहा! स्वतः महाराजांनी तुझ्या मुलीला मागणी घातली आहे."

चंद्रिणीचा बाप म्हणाला—"माझ्या मुलगी महाराणी होऊ शकेल याहून मोठे भाग्य काय असू शकेल? परंतु मुलीचे लग्न ठरले आहे आणि मुहूर्त पण ठरला आहे."

प्रधानाने राजाला ती गोष्ट कळविली. राजाने आपल्या आप्तमित्रमंडळींना बोलावून चंद्रिणीच्या बापाला समजावून सांगण्याची जबाबदारी यांच्यावर टाकली.

आप्तमित्रमंडळी चंद्रिणीच्या वडिलांना भेटून म्हणाली—"तू वेडाच दिसतोस की रे! तुझे नशीब तुझ्या घरी चालून आले आहे आणि तू त्याला पायाने दूर लोटतो आहेस. मुलीचे लग्न करून देऊन महाराजांचा सासरा म्हणून सुखाने पुढील आयुष्य काढ."

"महाराजांसारखा जांवई, याहून मोठे भाग्य ते काय असेल? परंतु माणसाने एकदां शब्द दिल्यावर तो राखला पाहिजे!" चंद्रिणीचा बाप म्हणाला.

ते लोक परत गेले आणि म्हणाले—"तुम्ही या मुलीचा नाद सोडा. हिच्याहून सुंदर मुली उड्या मारतील."

त्या सर्वांना निरोप देऊन राजा स्वतः एकटा चंद्रिणीच्या घरी गेला.

राजाला येत असलेला पाहून चंद्रिणीचे आईवडील घाबरून गेले. चंद्रमणीने त्यांना भिण्याचे काही एक कारण नाही, असे

व चंद्रिणीला वांचविणे अशक्य आहे. म्हणून तो शरभशंकराचे स्मरण करून ध्यान मग्न झाला. तेव्हां शरभशंकर एक भयंकर रूप घेऊन प्रगट झाला आणि आग्नेयास्त्रासारखे एक अस्त्र वीरसंगमय्याला देऊन म्हणाला– "तू या अस्त्राच्या साहाय्याने शत्रूशी युद्ध कर." आपल्या हातात एक तलवार पाहून वीर संगमय्याला परमानंद झाला. त्याने शत्रूवर हल्ला केला आणि शत्रूची कत्तल सुरू केली. एका टेकडीवर उभा राहून राजा ते दृश्य पहात होता. त्याचा स्वतःच्या डोळ्यावर विश्वासच होईना.

त्याच वेळी सैन्यातला एक शिवभक्त पुढे आलेला पाहून वीरसंगमय्याने हातातली तलवार दूर फेंकून दिली आणि त्या शिवभक्ताला नमस्कार केला. ते पाहून राजाने विचार केला की शिवभक्ताचे रूप घेऊन वीरसंगमय्या समोर गेलो तर वीरसंगमय्या आपणांला मारणार नाही. तसा वेष करून तो टेकडीवरून खाली उतरला. त्याला पाहून वीरसंगमय्याने नम्रपणे वांकून त्याला नमस्कार केला. त्याबरोबर राजाने आपली तलवार वीरसंगमय्याच्या मानेवर फेकली. परंतु चमत्कार असा की त्या तलवारीचा एक पुष्पहार होऊन तो वीरसंगमय्याच्या गळ्यात पडला.

त्याच क्षणाला महादेव आपल्या नंदीवर प्रगट झाला आणि वीरसंगमय्याला म्हणाला–"तुला पाहिजे तो वर मागून घे." वीरसंगमय्याने स्वतःला, बायकोला, राजाला आणि वऱ्हाडाला आलेल्या सर्वांना सायुज्य मुक्ति द्यावी असा वर मागितला.

"तुला अपकार करणाऱ्या आपल्या शत्रूला सुद्धा तू सायुज्य मुक्ति कां मागतो आहेस?" महादेवाने वीरसंगमय्याला विचारले.

"महादेवा! या राजाने शिवचिन्हे धारण करून तुझे दर्शन घेतले आणि म्हणून तो पापमुक्त झाला नाही का?" वीर संगमय्या म्हणाला.

ते ऐकून शंकर प्रसन्न होऊन इच्छिल्याप्रमाणे सर्वांना कैलास लोकी घेऊन गेला.





# १३६. ऑस्ट्रेलियातले आदिवासी

जगात पाषाण युगातले जीवन चालवणारे अनेक लोक अद्याप निरनिराळ्या जागी आढळतात.
ऑस्ट्रेलियात असे लोक आजही आहेत. गोरे लोक जात नाहीत किंवा जाऊ शकत नाहीत अशा रानांत व डोंगराळ प्रदेशात पाषाण युगातील सुमारे तीनशे लोकांची वस्ती आहे. त्यांचे जीवन वीस हजार वर्षांपूर्वीच्या मानवाचे आहे. चित्रात एक आदिवासी गुहेत चित्रे काढीत असतांना दिसत आहे.



# चांदोबा


संस्थापक : नागिरेड्डी

संचालक : 'चक्रपाणी'


गेल्या अंकात 'शिवलीला' संपूर्ण झाली. या अंकापासून पंचतंत्रातील 'मित्रभेद' ही कथा सुरू होत आहे. भारतीय कथा वाङ्मयात 'पंचतंत्र' व 'हितोपदेश' या पुस्तकांचे विशिष्ट स्थान आहे. गोष्टी रूपे मुलांस राजनीति, धर्म, आचार विचार आणि लोकव्यवहार शिकविण्यास पंचतंत्रातल्या गोष्टींचा फार उपयोग होतो. तत्वज्ञानातले मोठमोठे सिद्धांत देखील गोष्टीरूपे सोप्या शब्दात शिकविण्याची जुनी रीत प्रसिद्धच आहे. करमणुकीबरोबर शिक्षण अनायास होते.


वर्ष : २३ सप्टेंबर १९७३ अंक : ३



# अमरवाणी

वज्रादपि कठोराणि, मृदूनि कुसुमा दपि
लोकोत्तराणाम् चेतांसि, को हि विज्ञातु मर्हति ॥ १ ॥

[ वज्राहून जास्त कठीण असूनही फुलापेक्षा कोमल अशा त्या लोकोत्तर (थोरपुरुषांच्या) हृदयाला कोण ओळखू शकेल ? ]

अलोक सामान्य, मचित्य हेतुकम्
द्विषंति मंदा श्चरितम् महात्मनाम् ॥ २ ॥
(कालिदास)

[ सामान्य माणसाच्या आकलनाबाहेर आणि कल्पनासुद्धां करतां येणार नाही अशी त्या थोरपुरुषांची कामें पाहून मंदबुद्धी लोक त्याचा द्वेष करतात. ]

अनुगन्तुम् सताम् वर्त्म
कृत्स्नम् यदि न शक्यते
स्वल्प मप्यनुगंतव्यम्
मार्गस्थो नावसीदति ॥ ३ ॥

[ थोरपुरुषांच्या मार्गावर चालणे जर शक्य होत नसेल तर, (निदान) थोडे का होईना, त्यांचे अनुसरण करावे. (कारण) उत्तम सन्मार्गावर चालणाऱ्यांचा कधी नाश होत नाही. ]

थोर पुरुषांची रीत



# दंडीचे चातुर्य

राहुलपुरचा राजा शिलासिंह वारला तेव्हां त्याच्या एकुलत्या एका मुलाचे वय एकवीस वर्षांचे होते. तो पांच महिन्यांचा असतांनाच त्याची आई निवर्तली. परंतु शिलासिंहाने मुलाला आईची उणीव कधी भासू दिली नाही.

म्हणून बाप वारल्यावर वीरसिंहाच्या मनावर जणुकाही वज्रघातच झाला. त्याचे अनेक हितचिंतक होते, तरी त्याला वाटे की आतां तो जगात एकटा आहे, आप्तसंबंधी कोणी उरला नाही. त्याला आपली नित्याची कामे करणे देखील अवघड वाटू लागले, मग तो राज्यकारभाराची कामे काय पाहणार? तो रात्रंदिवस अंथरुणावर पडून राही. हळूहळू तो एक मानसिक रोगीच झाला. वैद्यांनी पुष्कळ औषधपाणी केले. शारीरिक व मानसिक दृष्ट्या तो दिवसेंदिवस खंगत गेला.

राजवैद्यांनी हात टेकल्यावर राजकुमाराच्या तब्येतीची काळजी प्रधानाला व सेनापतीला वाटू लागली. राजकुमार लहानपणापासूनच शूर व साहसी म्हणून ओळखला जाई. त्याने धनुर्विद्येत व शस्त्रास्त्रविद्येत प्राविण्य मिळविले होते. अल्पवयात त्याने एकदा बिबळ्या वाघाची शिकार केली होती. परंतु वडिलांच्या मृत्यनंतर जणुकाही त्याचा सर्व पराक्रम लुप्तच झाला. आता लहानसहान गोष्टींची त्याला भीति वाटू लागली.

देशातले आणि विदेशातले वैद्य आणि हकीम राजकुमाराचा इलाज न करू शकल्या कारणाने हताश होऊन परतले. अशा प्रसंगी दरबारी जादुगाराने प्रधानाकडे जाऊन हात जोडून विनंती केली—"प्रधान! मला वाटते, एकही वैद्य किंवा हकीम राजकुमाराच्या मनात आत्मविश्वास उत्पन्न करू शकला नाही. मी प्रयत्न करून पाहू का?"

श्री ए. सी. सरकार, जादुगार



"हे पहा, दंडी मोठमोठे वैद्य व हकीम इलाज करता येत नाही म्हणून हार मानून परतले. तेव्हां तू जादू करून राजकुमाराची प्रकृती सुधारू शकशील असे का तुला म्हणावयाचे आहे?" प्रधानाने विचारले.

"मला संधी द्यावी, प्रयत्न करून पहावा, म्हणतो! नुकसान तर काहीच नाही!" जादुगार म्हणाला.

प्रधान अविश्वासाने स्मित करून म्हणाला–"बरं तर पहा, प्रयत्न करून. तुला निराश करून परत जाऊ देणे मला आवडणार नाही."

दंडीने लगेच प्रयत्न सुरू केला. तो राजकुमाराच्या खोलीत जाऊन म्हणाला–"युवराजांचा जय असो! युवराजांची तब्येत आज कशी काय आहे?"

वीरसिंह निराशेचे मंदस्मित करून म्हणाला–"माझ्या प्रकृतीची गोष्ट विचारतोस? किती दिवस जीव अडकून राहतो आहे आणि कशासाठी कळत नाही. एकदां लवकर या जगातून सुटका मिळाली तर बाबांची भेट तरी होईल. त्यांच्या बरोबरच माझी सर्व शारीरिक व मानासिक शक्ती निघून गेली. ते गेले आणि मी लुळा होऊन पडलो आहे."

दंडीला युवराजाच्या रोगाचे खरे कारण माहीतच होते. युवराज आपल्या वडिलांवर सर्व प्रकारे अवलंबून होता. ते गेल्यावर त्याला हे जग सुनेसुनेसे वाटू लागले. त्याचा आत्मविश्वास उडाला आणि भितरेपणाचा पगडा मनावर बसला. तो भितरेपणा दूर करता आला तर युवराजांची प्रकृती सुधारेल असे दंडीला वाटले.

दंडी त्या घटकेपासून युवराजाच्या मनातले दुःख व व्यथा दूर करण्याच्या हेतूने त्यांना निरनिराळ्या गमतीच्या गोष्टी सांगू लागला. त्यांना हंसविण्यासाठी निरनिराळे उपाय करू लागला आणि हळूहळू त्याला त्याच्या प्रयत्नाला यश येऊ लागले. दंडीचा उत्साह वाढला.

दंडी मधून मधून संधी मिळेल तेव्हां युवराजला जादूचे प्रयोग दाखवून त्यांची करमणूक करू लागला. अशा तऱ्हेने गमतीदार गोष्टी ऐकून आणि जादूचे प्रयोग पाहून युवराजाच्या मनात इतका बदल झाला की तो आपल्या खोलीच्या बाहेर येऊ लागला आणि दंडीबरोबर उद्यानात किंवा नदीसरोवराकाठी हिंडू फिरू लागला. युवराजात झालेला हा बदल पाहून प्रधान देखील चकित झाला.

आणखी एक महिना लोटला आणि युवराजाच्या मनाला हुशारी व स्वस्थता वाटू लागली. तो मधून मधून दरबारात येऊ जाऊ लागला. एके दिवशी तो दंडीबरोबर दरबारात जात असतां एक बोका छपरावरून ओरडत युवराजाच्या अंगावर पडला. "वाघ, वाघ! मेलों! बाबा धांवा, मला वांचवा!" असा ओरडत वीरसिंह डोळे मिटून ओरडत होता. त्याच्या सर्वांगाला घाम सुटला होता.

दंडी त्याला समजावून सांगत म्हणाला–"युवराज! हा वाघ नाही, बोका आहे, बोका! डोळे उघडून तर पहाल! विनाकारण असे कां भितां?"

वीरसिंहाने भीतभीत डोळे उघडून बोक्याला पाहिले.

दंडी बोक्याला पकडून वीरसिंहाला दाखवीत म्हणाला–"पहा, हात लावुन, बोका आहे! आपण उगाच भ्यालात! आपण विसरलात का आपण हातात खंजीर





नाही तर तलवार घेऊन चित्त्याची शिकार केली होती? आजही आपल्याला चित्त्याची शिकार करतां येईल."

"आता तेवढी शक्ती माझ्या अंगात नाही. बाबा वारल्यानंतर माझ्या अंगातले सर्व बळ नाहीसे झाले आणि साहस लुप्त झाले. आज मी एखाद्या लहान मुलापेक्षा ही अशक्त व दुर्बळ आहे." वीरसिह म्हणाला.

"तुमच्या अंगातले साहस व बळ नाहीसे झाले असेल तर मी जादू करून ते परत आणून दाखवितो. माझे जादूचे प्रयोग तर आपण स्वतःच पाहिले आहेत." दंडी म्हणाला.

"[illegible]" [illegible] म्हणाला.

"मग आपला माझ्या मंत्रबळावर विश्वास नाही का?" दंडीने विचारले.

"कां नाही, तू केलेले अनेक प्रयोग कल्पनेबाहेर अद्भुत होते." वीरसिह म्हणाला.

"होयना, मग पहालच, माझ्या अद्भुत मंत्रबळाने आपण पहिल्यासारखे चित्त्याची शिकार करू लागाल!" दंडी म्हणाला.

दंडीनेच तो बोका छपरावरून ऐन वेळी खाली पडावा अशी व्यवस्था करून ठेवली होती. वीरसिहाच्या मनांतला भितरेपणा काढून टाकण्यासाठी तो एक प्रयत्न होता. आता त्याने वीरसिहाच्या मनांतून चित्त्याची भीती काढून टाकून चित्त्याची शिकार करण्यास आवश्यक साहस त्याच्या मनात उत्पन्न करण्यासाठी प्रयत्न सुरू केला. अशा तऱ्हेनेच त्याच्या मनात आपल्या पराक्रमावर आत्मविश्वास वाढेल अशी वीरसिहाची खात्री होती.

दंडीने लाकडाच्या दोन फळ्या चित्त्याच्या आकृतीच्या कापून अशा तयार करविल्या की त्या जोडल्यावर चित्ता आपल्या मागल्या पायावर उभा आहे असे दिसावे. त्यानंतर दंडीने एक लोखंडी नळी घेतली. ती मधोमध आणि दोन्ही टोकाला वांकविली [illegible] आणि [illegible] ती बाहेर दिसणार नाही अशा तऱ्हेने बसविण्यात आली. तशी बसवून दोन्ही फळ्या जोडून खिळे ठोकल्यावर त्या फळ्यांना चित्त्यासारखा रंग दिला नंतर चित्त्याचे ते खेळणे दोरीच्या मधोमध येईल आणि दोरीचे एक टोक पायाखाली दाबून ठेवून दुसरे टोक हातात धरून ओढता येईल अशा तऱ्हेने नळीत दोरी ओंवली.

दंडी तो लाकडी चित्ता तयार करून युवराजाकडे घेऊन गेला आणि म्हणाला— "युवराज, हा मंत्राचा चित्ता आहे. आतां या निर्जीव वाघावर माझ्या मंत्रबळाचा कसा काय परिणाम होतो ते आपण पहावे. प्राण्यांवर माझ्या जादूचा जो परिणाम होतो तो तर आपण पाहिलाच आहे."

दंडीने पायाखालचे दोरीचे टोक दाबून धरले आणि हातातले टोक धरून ओढले आणि चित्त्याला उभा केला. तेव्हां दोरीवर उभा तो लाकडी चित्ता दोरीबरोबर खाली उतरला. तो दंडीच्या पायापर्यंत पोंचला तेव्हां त्याने दोरीबरोबर तो चित्तावर उचलला आणि फुंकर घालून काही तरी मंत्र म्हणू लागला. तेव्हां चित्ता दोरीबरोबर खाली उतरू लागला.

"पहा, युवराज! या लाकडी चित्त्यावर मी मंत्र टाकला आहे. आतां मी सांगेन तसा तो वागेल. थांब...!" दंडी म्हणाला.

दोरीबरोबर खाली उतरणारा चित्ता मध्येच थांबला. दंडी म्हणाला—"चल!"



तो चालू लागला. ते विचित्र दृश्य पाहून वीरसिंह आश्चर्यचकित झाला आणि म्हणाला–"तुझे मंत्रबळ खरोखरच अत्यद्भुत आहे!"

दंडी शांत स्वरात म्हणाला–"युवराज! ही शक्ती सर्वस्वी माझीच नाही. या यंत्राला जो गंडा बांधला आहे, त्याची मदत मला मिळाली आहे!" असे सांगून आपल्या डाव्या हातात बांधलेला गंडा काढून वीरसिंहाच्या डाव्या हातात बांधीत तो म्हणाला–"या क्षणापासून हे यंत्र आपल्या आज्ञेप्रमाणे वागेल." असे सांगून तो लाकडी चित्ता पहिल्यासारखा वर उचलून धरला. तो दोरीच्या मदतीने उतरू लागला. वीरसिंहाने "थांब" म्हटल्याबरोबर तो चित्ता दोरीच्या मध्यावर थांबला.

वस्तुस्थिती अशी होती की, दंडीने जेव्हां दोरी सैल सोडली तेव्हां चित्ता दोरीबरोबर खाली उतरला, परंतु त्याने दोरी ओढल्यावर लाकडी चित्त्याच्या पोटातल्या वांकड्या नळीमुळे चित्ता थांबला.

[illegible] म्हणून तो आश्चर्यचकित झाला. गंड्यावर त्याच्या मनांत विश्वास बसला. म्हणून त्याचा गमावलेला आत्मविश्वास पुन्हां त्याला मिळाला. मानसिक बळाबरोबर हळूहळू शारीरक बळ पण वाढत गेले.

पूर्वनिश्चित योजनेप्रमाणे राजवाड्याच्या चौकात एका चित्त्याला सोडण्यात आले. दंडीने त्या चित्त्याला अफूसारखा कोणता तरी नशा उत्पन्न करणारा पदार्थ पूर्वीच खायला घातला होता. वीरसिंहाने दंडीबरोबर येऊन चित्त्याशी युद्धाला उभा राहला. चित्ता वीरसिंहाला पाहूनच प्रथम दूर निघून गेला. वीरसिंहाने त्याला खिजविले व त्याने खवळून उडी मारली. नेमकी त्या वेळी चित्त्याच्या छातीत वीरसिंहाची तलवार शिरली आणि चित्ता ठार झाला.

लोकांनी टाळ्या वाजवून जयघोष केला–"महाराज वीरसिंह की जय!" तेव्हां वीरसिंहाचा चेहरा आत्मविश्वासाने तेजस्वी दिसत होता.





# भल्लूक पर्वत

[ १४ ]

[ गुरु भल्लूकाच्या शिष्यांनी जीवदत्त आणि खड्गवर्मा दोघांना भुयारातल्या वाटेने लांडग्यांच्या खडकापर्यंत घेऊन जाऊन त्या खडकावर चढविले. उजाडण्याच्या सुमारास लांडग्यांना त्यांचा आहार घालण्यासाठी गुरु भल्लूकाचे जे शिष्य आले होते त्यांपैकी एकाला खड्गवर्माने बाण मारला. ते कळल्यावर गुरु भल्लूक रागाने पंचशूल घेऊन निघाला. पुढे– ]

खड्गवर्माने मारलेला बाण एका अस्वल जातीच्या नोकराला लागताच तो किंकाळी फोडून भुयारात खाली कोसळला. ते पाहून खड्गवर्मा व जीवदत्त दोघांना त्यांच्यावर एका बाजूने लांडगे धांवणार आणि दुसऱ्या बाजूने त्यांना पाळणारे अस्वल जातीचे लोक हल्ला करणार अशी शंका वाटू लागली. जीवदत्त भुयाराच्या त्या दाराकडे थोडा वेळ लक्षपूर्वक पाहून आणि अस्वल जातीचा दुसरा नोकर येत नाही हे पाहून समरबाहूकडे वळून म्हणाला–"काय रे समरबाहू! आतां आपण मध्ये सांपडणार, एका बाजूने आपण खडकावर चढण्यासाठी आलो त्या दाराने अस्वल जातीचे लोक सूड घ्यायला येणार आणि दुसऱ्या बाजूने भुकेले लांडगे येणार!"

ते ऐकून समरबाहू थरथर कांपू लागला. म्हणाला–"हे पहा, येथे तुम्हीच आमचे



नायक! तुम्हीच आम्हांला वांचविण्याचा उपाय काढला पाहिजे. मी आणि माझा साथी दोघांनी काय करायचे, तुम्ही हुकूम कराल तसे करू."

समरबाहूला थरथर कापत असलेला पाहून खड्गवर्माला हंसू आले. परंतु ते आवरून तो म्हणाला—"अरे समरबाहू! तू सिंध देशातल्या वाळवंटातून या जंगली प्रदेशात एक साम्राज्य स्थापन करण्याच्या महत्वाकांक्षेने आला होतास ना? आम्हांला स्वर्णाचारी आणि विघ्नेश्वर पुजारी दोघांकडून ही गोष्ट कळली. आतां या संकटांतून आपली सर्वांची सुटका कशी करून घ्यायची याचा विचार करून तूच एखादी युक्ती सुचव की?"

"युक्ती आणि उपाय म्हणता? समोर धर्मयुद्ध करायला शत्रू तलवार घेऊन आला तर त्याच्याशी दोन हात करतां येतील आणि त्याला लोळवितां येईल. परंतु या लांडग्यांशी आणि अस्वल जातीच्या लोकांशी आणि मंत्रतंत्र करणाऱ्यांशी कसे काय युद्ध करायचे हो?" समरबाहू कांपऱ्या आवाजात म्हणाला.

जीवदत्त ते ऐकून थोडेसे स्मित करून म्हणाला—"तुझा पराक्रम काय तो दाखवायला संधी चालून आली आहे. आपण उभे आहो त्या खडकाखालच्या चोरवाटेने शत्रू पुढे येणार नाही, ही जबाबदारी तू व तुझा साथी दोघांनी घ्या. बहुतेक आतांपर्यंत त्याचा एक शिष्य बाण लागून ठार झाल्याची गोष्ट गुरु भल्लूकाला नक्कीच कळली असणार. तो कोठे आहे आणि कोठून येणार आहे कोण जाणे?"

जीवदत्ताचे बोलणे पूर्ण होण्यापूर्वीच गुरु भल्लूक भुयाराच्या दारात दिसला आणि खडकावर उभे असलेल्या आपल्या कैद्यांकडे रागाने पहात ओरडला—"ए मूर्खांनो! तुम्ही बाणाने वृकेश्वरी देवीच्या एका भक्ताला ठार केले आहे. आतां माझ्या पंचशूलाने तुम्हांला ठार करून मी लांडग्यांसमोर तुम्हांला टाकतो पहा."

गुरु भल्लूकाचा कर्कश आवाज ऐकून त्या वेळेपर्यंत भुयाराच्या दाराखाली खाद्य मिळेल या आशेने [illegible] पहात बसलेले लांडगे जास्त मोठ्याने ओरडून उड्या मारू लागले. दररोज त्या वेळेवर त्यांना पोटभर आहार खायला मिळत असे. परंतु ते न मिळाल्यामुळे ते जास्तच चिडले आणि तोंड वर करून उड्या मारू लागले.

गुरु भल्लूकाने एक दोनदां दाराबाहेर वांकून लांडग्यांना पाहिले. दहा फूट उंचीवर असलेल्या दारापर्यंत उडी मारून ते कदाचित पोचतील की काय, असे त्याला वाटू लागले. तसे दार बंद करून टाकले तर त्याने खडकावर बंदी करून ठेवलेले लोक ते पाहून आपल्याला भिताऱ्यात काढतील असे ही वाटले.

जीवदत्तने गुरु भल्लूकाच्या मनात चालू असलेली खळबळ ओळखली की काय, त्याने आपल्या हातातली कुबडी उचलेली आणि म्हणाला—"अरे, गुरु भल्लूका! तू स्वतः भल्लूक असून भल्लुकेश्वरीची आराधना करण्याचे सोडून वृकेश्वरीची आराधना कशाला करतो आहेस? मला नाही समजले. बहुतेक ते कळण्याइतकी अक्कल सुद्धां तुला नसावी! बरे तर पहा, मी खडकावरून उतरून तुझ्या समाचाराला त्या दारापर्यंत येतो आहे!"

जीवदत्त म्हणाला ते करून दाखवायला मागे पुढे पाहणार नाही या भीतीने समर-



बाहू त्याला म्हणाला—"बाबा रे! तू या क्रूर लांडग्यांच्या मधून त्या गुरु भल्लूकाकडे जायचे धाडस करतो आहेस? गुरु भल्लूकाला मंत्रतंत्र चांगले अवगत आहेत."

खड्गवर्मा आपली तलवार उपसून वर करून म्हणाला—"समरबाहू! या तलवारीत आणि जीवदत्तच्या हातातल्या कुबडीत जो मंत्र आहे त्याला तोड नाही. म्हणून तू गुरु भल्लूकाच्या मंत्रशक्तीला भिण्याचे मुळीच कारण नाही."

खड्गवर्माचे बोलणे पुरे होण्यापूर्वीच ते उभे होते त्या खडकाच्या तळाजवळ मोठा आवाज झाला. तो ऐकून जीवदत्त त्याच्या जवळ उभे असलेल्या सर्वांना सावध करून



म्हणाला–"सावध रहा, खडकाखालच्या दारातून गुरु भल्लूक आपल्या काही अनुयायांना आपल्या अंगावर पाठविण्याच्या विचारात दिसतो आहे."

ते ऐकून समरबाहू आणि त्याचा अनुयायी दोघे आपापले भाले घेऊन तयार होऊन खडकाखालच्या दाराकडे लक्ष देऊन पहात उभे राहीले. भुयाराच्या दाराशी गुरु भल्लूक उभा होता. त्याने त्यांना पाहिले आणि आपल्या शेजारच्या शिष्यांना खवळल्यासारखा म्हणाला–"अरे ए गाढवा! आपल्या लोकांना गुपचुप जाऊन एकदम हल्ला करायला सांगून पाठविले होते आणि ते मोठमोठ्याने बोलत गेलेले दिसतात. पहा, ते लोक सावध झाले. आता काय उपाय? हे बंदी सामान्य दिसत नाहीत. त्यांना त्यांची शस्त्रे देऊन सशस्त्र खडकावर चढायला सांगितले ते आपले चुकले."

गुरु भल्लूक म्हणाला त्याचा अर्थ कळल्यासारखा जीवदत्त खड्गवर्माला म्हणाला–"खड्गवर्मा! आतां गुरु भल्लूकावर बाण सोडणे फुकट आहे. तू धनुष्यावर बाण ठेवलास की तो भुयारात बाजूला किंवा खाली सरकून स्वतःचा बचाव करील."

"ते खरे आहे रे! परंतु या समरबाहूला वांचवून त्याला स्वर्णाचारीकडे कसे काय पोचवायचे?" खड्गवर्माने विचारले.

जीवदत्त काही वेळ विचार करून नंतर म्हणाला–"त्याला एकच एक उपाय दिसतो आहे. आपण पद्मपूरला सिंहाची शिकार करीत असता राजाची ओळख करून घेतली होती त्याच प्रमाणे या लांडग्यांची शिकार करून या गुरु भल्लूकाच्या भूगर्भातील किल्ल्यात खळबळ उडवून दिली पाहिजे."

"ठीक, तरमग तेच करु या. मग उशीर कां?" खड्गवर्मा उत्साहाने म्हणाला.

"त्या मेलेल्या लांडग्याला उचलून खांद्यावर घे. त्याच्या मांसासाठी लांडगे तुझ्या पाठीस लागतील. म्हणजे तू सांपडलास तर ते तुला खाणार नाहीत असे नव्हे. म्हणून तुझ्या तलवारीची सध्या या वेळी गरज आहे." जीवदत्त म्हणाला.

खड्गवर्माने एकट्याने त्या मेलेल्या लांडग्याला उचलून खांद्यावर घेतले. जीवदत्त काय म्हणाला आणि खड्गवर्माने लांडग्याला खांद्यावर काय घेतले, समरबाहूला काहीच कळले नाही. म्हणून त्याने विचारले–"अरे, पण तुम्ही काय करण्याच्या विचारात आहां?"

"समरबाहू! आपल्याला कोणत्याही प्रकारचा धोका नाही. तू व तुझा साथी दोघे एवढेच करा की अस्वल जातीचा कोणी मनुष्य भुयारातून या खडकावर चढून येतांना दिसला तर त्याला आपल्या भाल्याने वाटेला लावा. आम्ही दोघे लांडग्यांच्या मध्ये उतरून शक्य झाले तर भुयाराच्या त्या दाराने लांडग्यांना गुरु भल्लूकावर सोडण्याचा प्रयत्न करणार आहो!" जीवदत्त म्हणाला.

"मी दोघांना हात जोडून सांगतो, हे साहस किंवा धाडस नसुन दुःसाहस आहे." समरबाहू म्हणाला.

"हे साहसच आहे, दुःसाहस नक्कीच नाही, समरबाहू! तुला ते लवकरच दिसेल सुद्धा!" असे म्हणत जीवदत्त थोडा हंसला.

"जीवदत्ता! गप्पांत वेळ जातो आहे, लांडग्याचे मढे खांद्यावर घेऊन किती वेळ



उभा राहू म्हणतोस रे?" खड्गवर्मा म्हणाला.

"आपण या खडकावरुन खाली उडी मारायची आहे. तू खडकाच्या चारी बाजूला चक्कर मारून शक्य तितक्या लांडग्यांनी जवळ तुझ्याकडे यावे यासाठी प्रयत्न कर. मी तुझ्या पाठीमागून येऊन नंतर..."

जीवदत्ताचे ते वाक्य पुरे होण्या आधीच खड्गवर्मा ओरडून म्हणाला–"अरे गुरु भल्लूका! आम्ही हे आलो, पहा! आपल्या वृकेश्वरी देवीचा जीव वांचवायचा असेल तर हा भुयाराचा किल्ला सोडून पळ काढ!" म्हणत खडकावरुन खाली उडी मारली.



दोघे जण मेलेल्या लांडग्याला खांद्यावर उचलून घेऊन उडी मारून आलेले पाहून भुकेले लांडगे मोठ्याने ओरडत त्या दोघांच्या मागे धांवले. खड्गवर्मा ते जवळ येण्यापूर्वी जोराने खडकाच्या चारी बाजूला धावू लागला. स्वतःच्या बचावासाठीच लागले तर लांडग्यांना ठार करायचे त्याने ठरविले. त्यांना ठार करतां करतांच दुसरा हेतू साधायचा होता त्याला.

भुयाराच्या दारापाशी उभा राहून गुरु भल्लूक हे सर्व पहात होता. त्याला आनंद झाला की आनंदातिरेकाने तो ओरडून टाळ्या वाजवीत म्हणाला—"ही सर्व त्या वृकेश्वरी मातेची लीला आहे. आपल्या

लावून आपल्या या वाहनांना तिने हा आहार घालण्याचा काय पण छान नवा प्रकार काढला आहे! त्या मातेने मनात आणले तर या जगात तिला कोणती गोष्ट अशक्य आहे?"

तोंपर्यंत खड्गवर्मा भुयाराच्या दारापर्यंत पोचला होता आणि गुरु भल्लूक आपल्या इष्ट देवीच्या भक्तीत नशा चढल्यासारखा डोळे मिटून नाचत होता. त्याच वेळी जीवदत्तने खड्गवर्माला संकेत करीत म्हटले—"खड्गवर्मा! हीच संधी आहे, स्वारीला खूप नशा चढला आहे."

खड्गवर्माने दुसऱ्या क्षणाला त्याच्या खांद्यावरचा मेलेला लांडगा डाव्या बाजूला खूप उंचावर उचलून गुरु भल्लूक उभा होता त्या दारातून गुहेत फेकला. त्यांचे खाद्य अशा तऱ्हेने गुहेत फेकलेले पाहून सर्व लांडगे खवळून धावत आले आणि गुहेच्या दारातून त्यांनी आत उड्या मारल्या. काही बाहेरच खाली पडले त्यांना खड्गवर्माने आपल्या तलवारीने आणि जीवदत्ताने आपल्या कुबडीने ठार केले.

गुरु भल्लूक डोळे मिटून भक्तीच्या नशेत उभा होता. त्याच्या अंगावर प्रथम मेलेला लांडगा पडला व त्याच्या पाठोपाठ चार-पांच लांडग्यांनी उड्या मारल्या. ते

ओरडत भुयारात धावू लागले.

गुरु भल्लूक घाबरून उभा आणि थरथर कांपत लांडग्यांकडे पाहूं लागला. ते त्या मेलेल्या लांडग्याला खायला धावले. फक्त एक लांडगा तिकडे जाऊ शकला नाही आणि त्याची नजर गुरु भल्लूकावर पडली. तो गुरगुरत त्याच्या अंगावर उडी मारणार हे पाहताच गुरु भल्लूक आपला पंचशूल उगारीत—"वृकेश्वरी! हे काय, तू आपल्या मुख्य भक्तालाच खाणार का?" असे म्हणत मागे सरकू लागला आणि पळू लागला.

तिकडे खड्गवर्मा आणि जीवदत्तला गुरु भल्लूकाला आत गेलेल्या लांडग्यांनी ठार केले की त्याने त्यांना ठार केले, कळायला काही मार्ग नव्हता. त्यांनी लांडग्यांना ठार करण्याचा सपाटा चालू ठेवला होता. परंतु जीवदत्त थोड्या वेळाने खड्गवर्माला म्हणाला—"आतां येथे राहण्यात काही फायदा नाही. गुरु भल्लूक जिवंत आहे की मेला, हे कळायला मार्ग नाही. परंतु आत शिरलेल्या लांडग्यांनी त्या सर्वांना नक्कीच घाबरवून सोडले असणार."

"मला असे वाटते की त्या सर्वांनी भिऊन भुयाराबाहेर पाय काढला असेल आणि जंगलात फिरत असतील. परंतु त्या गुरु भल्लूकाला जिवंत सोडता कामा नये." खड्गवर्मा म्हणाला.

जीवदत्तने विचार केला की त्यांना भुयाराबाहेर इतक्या लवकर पळून जाणे



शक्यच नाही. एकतर ते लोक चार चौघच नसून पन्नास पाऊणशे जण तरी नक्कीच असतील. इतक्या लोकांनी भुयारातून निघून पळून जाणे शक्य आहे का? कदाचित ते भुयारातच कोठे तरी लपून बसले असतील. लांडग्यांनी त्यांना बेजार करून सोडले असेल. कदाचित त्यांनी लांडग्यांना ठारही केले असेल. परंतु हे सर्व अनुमानच आहे. नक्की काहीच सांगतां येणार नाही येथून. प्रत्यक्ष आत शिरून पाहिल्याशिवाय काहीच कळणार नाही.

"मग उशीर कशाला आपण सर्वच या भुयारात शिरू या. समरबाहू आणि त्याच्या अनुयायाला हाक मार!" जीवदत्त म्हणाला.

नुसते हाक मारल्याने ते दोघे खाली उतरतील का याची शंका जीवदत्तच्या मनात होती. तशीच ती खड्गवर्माच्या मनातपण होतीच. परंतु विचार करीत थांबायला किंवा त्यांना समजावून सांगायला वेळ नव्हता. लांडगे चारी बाजूंनी येत होते व [illegible] पण शक्य नव्हते. सर्व हिंमत करण्यावर अवलंबून होते. म्हणून खड्गवर्माने थोडयाशा कड-कस्वरात बोलावल्याबरोबर ते दोघे लांडग्यांच्या खडकावरून खाली उतरून आले. जीवदत्त त्यांना म्हणाला—"आतां या दारांतून आपण भुयारात शिरायचे आहे, समरबाहू!"

समरबाहू घाबरल्यासारखा त्याच्याकडे पहात म्हणाला—"आपण फक्त चारच जण आहो. आत ते लोक किती जण आहेत कोणास ठाऊक? जंगलात पळून जायला दुसरी एखादी वाट नाही का?"

"हा लांडग्यांचा खडक आहे. बाहेर जायला भुयारातून एकच एक वाट आहे." असे म्हणत जीवदत्त उडी मारून वर चढला आणि त्या दारात शिरला. त्याच्या पाठोपाठ खड्गवर्मा चढला. खाली फक्त समरबाहू आणि त्याचा अनुयायी राहिले. उरलेले लांडगे एकेक करून हळूहळू पुढे येऊ लागले.

(क्रमश:)





# धर्मसंस्थापना

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही.

तो झाडाजवळ गेला प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौनपणे स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा! तू इतकी मेहनत करतो आहेस, परंतु यामुळे तुझ्या हातून नीतिधर्माचे पालन होते आहे की नाही, याचा विचार केला आहेस का? नीतिधर्माप्रमाणे वागणे सोपे नाही. त्याचे उदाहरण म्हणून मी तुला शिब्या बेरडाची गोष्ट सांगतो. रात्रीची वेळ आहे; तेव्हां तुला एकटेपणाने कंटाळा-सुद्धां वाटत असेल. म्हणून मी सांगतो ती गोष्ट, लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

पूर्वी वसंतनगर या गावी मदनवर्मा नावाचा एक राजा राज्य करीत असे. तो ऐषारामात पडून राही. तरुणी आणि

## वेताळाच्या गोष्टी



वारुणी या दोन्ही शिवाय त्याला इतर कोणतीही गोष्ट सुचत नसे. राज्यकारभाराची सर्व कामे त्याचे मंत्री व सेनापती पहात. ते प्रजेला पिळून काढीत.

तरी फार मोठा धर्मपरायण राजा म्हणून मदनवर्माची ख्याती होती. त्याचे कारण असे की तो दरवर्षी दोन यज्ञ करीत असे. ब्रह्मभोज होई आणि ब्राह्मणांना मोठमोठी दाने दिली जात. ब्राह्मण राजाची स्तुती करून त्याला आशीर्वाद देत. या यज्ञांसाठी लक्षावधी रुपये खर्च होत आणि धान्याची कोठारे रिकामी होत. राजाचे अधिकारी अन्नसामुग्री एकत्र करण्यासाठी प्रजेला बेजार करीत. प्रत्येक वेळी यज्ञ म्हणजे देशभर हाहाकार उडून जाई.

त्याच सुमारास शिव्या बेरड नांवाचा एक अट्टल चोर वसंतनगरच्या जंगलात राहून लूटमार करीत असे.

त्या वर्षी सुद्धां वसंतनगरच्या राजाने दरवर्षीप्रमाणे यज्ञ करून ब्रह्मभोज देऊन ब्राह्मणांना दानधर्म केला. रामशर्मा नांवाच्या ब्राह्मणाला राजाकडून त्या यज्ञप्रसंगी दक्षिणा मिळाली होती. तो सुवर्णदानाचे एक गाठोडे बांधून शिव्या बेरड रहात असे त्या अरण्यातून आपल्या गावी निघाला.

रामशर्मा त्या निर्जन स्थानी स्वतःला धीर यावा म्हणून रामरक्षा म्हणत चालत होता. नेमका त्याच वेळी शिव्या बेरड आपल्या सोनेरी टोळीसह आडवा आला आणि म्हणाला—"अहो ब्रह्मर्षी! प्रजेने घाम गाळून मिळविलेला पैसा राजाने यज्ञ करून दानधर्म केला, म्हणे! राजाचा धर्म होतो आहे आणि प्रजा उपाशी मरते आहे. यज्ञयागादि करून पापक्षय कधी होईल का? तुझ्यासारखे लोक दान देऊन त्या पापाचे भागीदारच होणार. ते पापाचे गाठोडे ठेव खाली आणि मुकाट्याने चालू लाग. तू एक गरीब ब्राह्मण आहेस म्हणून मी तुला जिवानिशी सोडतो आहे."

रामशर्मा जीव मुठीत घेऊन धीर करून म्हणाला—"हे चौर्यनायका! तू म्हणालास

तो तरी धर्म आहे का, तुम्हीच विचार करून पहा."

"मी अधर्माविरुद्ध उभा राहलो आहे, म्हणजे मी करतो ते धर्मकार्यच आहे. हा राजा अन्यायी व अयोग्य आहे. त्याचे अधिकारी राक्षस आहेत. चोरी करतांना देखील मी सारासार विचार करतो. त्या राजाला तो नाही." शिव्या बेरड म्हणाला.

"तरमग काय रे चौर्यनायका! तूच धर्मस्थापना कां नाही करीत? प्रजेचे रक्षण करून तूंच राज्यात शांतता कां स्थापन करू नयेस?" रामशर्माने शिव्या बेरडाला विचारले.

"त्या करितां सर्व देशावर माझा अधिकार असायला हवा? म्हणजे मी राजा झाले पाहिजे. ते कसे काय शक्य होईल?" शिव्या बेरडाने रामशर्माला विचारले.

त्याला जास्त चढविण्याच्या हेतूने रामशर्मा म्हणाला—"कां शक्य नाही? 'प्रयत्नांती परमेश्वर' अशी म्हण आहे. चौर्यनायक महाराज चक्रवर्ती कां होऊं शकणार नाही? त्याला उदाहरणे आहेत."

शिव्या बेरड विचारात पडला. त्याच्या मनात हा विचार पूर्वी कधी आला नव्हता किंवा कोणी दुसऱ्याने ही गोष्ट त्याला सुचविलीपण नव्हती. विचार केल्यावर राजा होणे तितकेसे कठीण नाही, असे त्याला वाटूं लागले. रामशर्माचा वार हुकमी पडला होता.





"तू खरोखरच मला चांगला सल्ला दिला आहेस. मी प्रयत्न करून पाहतो. धर्माची स्थापना करण्याचे ध्येय माझ्या-समोर आहे. तू गरीब आहेस. तुझे हे गाठोडे तू घेऊन जा." शिव्या बेरड राम-शर्माला म्हणाला.

'रामशर्मा, तू अमर आहेस रे!' मनात म्हणत रामशर्मा निघून गेला.

शिव्या बेरड समजुतदार होता. राजा होण्यासाठी त्याने काय काय करायचे ते मनाशी ठरविले. त्याने राज्यात चोरांच्या ज्या ज्या टोळ्या होत्या त्या सर्वांना साम-दाम दंड भेद पद्धतीने आपल्या अधिकारा-खाली एकत्रित केले आणि आपल्या जुन्या नव्या अनुयायांना उत्तम सैनिकी शिक्षण दिले.

वाटेल तेव्हां लुटेऱ्यांसारखे येऊन प्रजेला पिळून काढणाऱ्या राजाच्या अधिकाऱ्यांना वाटेला लावून मी प्रजेचे रक्षण करतो. प्रजेने राजाला द्यायचा कर मला द्यावा, असे सांगून त्याने राज्यातल्या अनेक गांवांच्या प्रमुखांना वळवून घेतले. त्या गांवांतली प्रजा शिव्या बेरडाला आपला राजा मान-ण्यास तयार झाली. त्याने, दिलेल्या वचनाचे पालन देखील केले.

शिव्या बेरड आता एक लहानसा राजा झाला होता. त्याने जंगलातच स्वरक्षणा-साठी एक बालेकिल्ला बांधला. आपल्या राज्यांत आणखी एक राजा आपले छोटे राज्य स्थापन करून राज्य करू लागल्याचे ऐकून मदनवर्मा घाबरला. त्याला काय करावे, सुचेना. त्याने सैन्याचे सर्व अधिकार स्वतःच्या हाती घेऊन शिव्या बेरडाच्या जंगलातील राज्यावर स्वारी केली.

परंतु तीच त्याची चूक ठरली आणि पाण्यात शिरून मगरीशी वैर करण्यासारखी त्याच्या आत्मघातास कारण झाली.

जंगलात समोरासमोर युद्धाला कोण येणार? शिव्या बेरडाच्या अनुयायांनी गनीमी हल्ले करून राजाच्या सैन्याची त्रेधा उडविली. कधी झाडावरून तर कधी [illegible] हल्ले [illegible] शिव्या बेरडाने सैन्याची रसद लुटली, त्यांच्या राहुटया व शिबिरे जाळली आणि त्यांना पाणीदेखील मिळू दिले नाही.

दुसऱ्या दिवशीच शिव्या बेरड आपले सैन्य घेऊन राजधानीवर चालून आला. प्रजेने त्याचा अधिकार मान्य केला. मदनवर्माच्या मुलाला राजवाड्यातच कैदेत ठेवून देण्यात आले आणि शिव्या बेरडाचा राज्याभिषेक थाटामाटाने करण्यात आला.

"परंतु शिव्या बेरडाची जात कोणती? हा क्षत्रिय तर नाहीच, मग राजा कसा काय झाला?" असा धर्मसंदेह काही लोकांच्या मनात उत्पन्न झाला.

ते कळल्यावर राजपुरोहिताने एक नवीनच युक्ती काढली. त्याने घोषित केले की वीर शिवशंकर महाराज उत्तम क्षत्रिय वंशीय आहेत. त्यांचा सूर्यवंशात जन्म असून रामचंद्राच्या वंशात एकशे अठ्ठावीसाव्या पिढीत जन्मले आहेत. त्यांचा वंशवृक्ष माझ्याजवळ आहे. त्याने पहिल्यापासून तयार करून ठेवलेला वंशवृक्ष वाचून दाखविला.

ते कळल्यावर शिव्या बेरडाला वाटू लागले की तो खरोखरच उच्च क्षत्रिय कुळात जन्माला आला आहे. त्याच्या मनात मुख्य पुरोहितावर पूर्ण विश्वास बसला. राज्याभिषेक चालू असतां त्यातल्या सर्व चालीरीती व रूढी जणुकाही त्याच्या





चांगल्या परिचयाच्या असल्याचे शिव्या बेरडाने दर्शविले.

त्याच्या दरबारी व मंत्रिमंडळाने त्याला वेळोवेळी जो जो सल्ला दिला त्याप्रमाणे तो वागू लागला. सेनापतीच्या सल्ल्या-प्रमाणे त्याने शेजारपाजारच्या लहान मोठ्या राज्यांवर स्वाऱ्या करून आपले राज्य वाढविले. त्याच सुमारास यज्ञ करण्याचा मुहूर्त आला. मुख्य पुरोहित म्हणाला–"महा-राज, पूर्वी कधी झाला नाही असा यज्ञ आपल्या हस्ते झाला पाहिजे." शिव्या बेरडाला तो सल्ला देखील पटला.

राज्याचे अधिकारी आपल्या पद्धती-प्रमाणे गावोगाव हिंडून प्रजेला त्रास देऊ लागले. यज्ञाला लागणारे अन्न धान्य, सोने, चांदी लुटून घेऊन आले. अभूतपूर्व असे ब्रह्मभोज झाले. शिव्या बेरडाने दानधर्म करून ब्राह्मणांचा सत्कार केला.

त्या ब्राह्मणमंडळीत रामशर्मासुद्धा होता. त्याला पाहून शिव्या बेरडाला त्याला कोठे तरी पाहण्याचा भास झाला. रामशर्मा मोठे दान मिळेल या आशेने म्हणाला– "महाराजाधिराज! आपण माझ्या सल्ल्या-प्रमाणे राज्य मिळवून धर्माची स्थापना केलीत आणि अधर्माचे उच्चाटन केलेत. आपली कीर्तिचंद्रिका नित्य वाढत राहो आणि आपल्या छत्रछायेत आमच्या सारख्या गरिबांना आश्रय मिळत राहो."

शिव्या बेरडाला मुस्कुटात मारल्यासारखे झाले. दानधर्म आदि विधी संपल्यावर तो मदनवर्माच्या मुलाचा राज्याभिषेक करून देण्यास मंत्र्याला गुप्तपणे सांगून रात्रीच्या-रात्री घोड्यावर बसून जंगलात निघून गेला.

महाराजांना इहलोकाचा वीट आल्यामुळे त्यांनी वानप्रस्थाश्रमात प्रवेश केला असल्याचे प्रजेला सांगून मंत्र्याने प्रजेच्या मनाचे समाधान केले.

दुसऱ्या दिवशी मदनवर्माचा राज्या-भिषेक झाला.

[illegible] चांगली कीर्ती मिळविली. श्रीमंतांना लुटून गरिबांचे रक्षण करणारा, चोर झाला म्हणून काय झाले. हा चोर सिंहासनाला लाथ मारून प्रजेची सेवा करणारा खरा राजाच आहे, असे लोक म्हणू लागले.

येथवर गोष्ट सांगून वेताळाने विचारले– "राजा! शिव्या बेरड धर्मस्थापना कर-ण्याच्या हेतूने राजा झाला होता. ते ध्येय व त्यासाठी मिळविलेले राज्य त्याने कां सोडले आणि पुन्हां चोरीचा धंदा कां करू लागला? यज्ञाविरुद्ध तो किती बोलला होता आणि नंतर स्वतः यज्ञ करायला कसा काय तयार झाला? या प्रश्नांची उत्तरे माहीत असून तू दिली नाहीस तर, तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील.

विक्रमादित्य म्हणाला–"अधर्म करणा-ऱ्या राजाला प्रजेच्या सहकाराची गरजच काय? धर्मस्थापना फार कठीण काम आहे. त्याला सर्व तऱ्हेच्या लोकांच्या सहकाराची गरज असते. अधर्म करणाऱ्याचे पारिपत्य करण्याची प्रतिज्ञा करणाऱ्या शिव्या बेरडाला राजा होतांच तो धर्मस्थापना करू शकेल असे वाटले. परंतु राजा झाल्यावर राजाला सुद्धां बंधने असतात. राज्यधर्म निभावण्या-साठी अनेकांवर अवलंबून रहावे लागते. ते एक दुष्टचक्र आहे. त्यात फिरणे जन्माने जो राजा आहे त्यालाच शक्य आहे. नव्याने धर्मस्थापनेच्या उत्साहाने राजा झालेल्या चोरां लुटेऱ्यांना ते शक्य नाही. त्यापेक्षां चोर राहूनच धर्माचे जेवढे पालन करता येईल तेवढे करावे असे त्याला वाटले. यज्ञाचा विरोध त्याने केवढा केला होता. परंतु त्या दुष्टचक्रात सांपडल्यावर त्याला तो यज्ञदेखील करावा लागला. म्हणून राजा परतंत्रच असतो. याउलट तो चोरीचा धंदा करून देखील स्वतंत्रच होता, असा त्याला ज्ञानोदय झाला."

अशातऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)



# परीक्षा

कावेरी नदीच्या काठी शंकरभट नावाचा एक विद्वान पंडित रहात असे. तो आपल्या शिष्यांची जेवणाखाण्याची व्यवस्था करून विद्यादान करीत असे. त्याच्याकडे अनेक शिष्य वेदाध्ययन करीत असत. जगन्नाथ नावाचा एक शिष्य त्याच्याकडे पुष्कळ दिवस विद्याभ्यास करीत होता. त्याचे लक्ष विद्याभ्यासाकडे कमी होऊ लागल्यासारखे शंकरभटाला वाटू लागले. त्याने ती गोष्ट आपल्या बायकोला सांगितली.

ती म्हणाली—"होय, मलासुद्धा तसेच वाटू लागले आहे, त्याचे थोडेदेखील लक्ष अभ्यासाकडे नाही." दुसऱ्या दिवशी तिने जगन्नाथाला नेहमीसारखे जेवायला वाढले आणि भातावर एरंडेल वाढले. जगन्नाथाने भात कालवून घास घेतला आणि संकोच करीत त्याने विचारले—"आई! भातावर आज एरंडेल वाढलेत का?"

"बाळा होय! मी किती दिवस झाले भातावर एरंडेलच वाढीत आले. परंतु अभ्यासात तुझे लक्ष असल्यामुळे भातावर एरंडेल वाढल्याचे तुझ्या लक्षात आले नसेल. आतां तुझा विद्याभ्यास संपला आहे, म्हणून तुला ते कळले." शंकरभटाची बायको म्हणाली.

त्याच दिवशी शंकरभटाने जगन्नाथाला निरोप दिला आणि घरी जायला सांगितले.





# कर्जवसूली

एका गावी धर्मू नावाचा एक धर्मभीरू श्रीमंत मनुष्य रहात असे. तो गावातल्या लोकांना अल्पव्याजाने लहान मोठी कर्जे देत असे. कर्ज वसूल करताना तो कर्जदारांना त्रास देत नसे.

कर्ज वसूल करण्यासाठी त्याने निरनिराळ्या युक्त्या काढल्या होत्या. उदाहरणार्थ त्याने सोमशर्मा नांवाच्या एका प्रतिष्ठित ब्राह्मणाला कर्ज दिले होते. तो ब्राह्मण धर्मूकडून पन्नास रुपये कर्जाऊ रक्कम घेऊन म्हणाला—"धर्मूशेट! तुम्ही, माझ्याकडून कागद लिहवून घेतल्याशिवाय किंवा साक्षीदार ठेवल्याशिवाय मला कर्ज दिलेत, समजा, मी परत केले नाही तर!"

धर्मूशेट स्मित करून म्हणाला—"तुमच्या सारख्यांकडून कागद साक्ष वगैरे कशाला हो करवून घ्यायची? तुम्ही कबूल केलेल्या दिवशी नक्की परत कराल. समजा, तुम्ही परत केलेच नाहीत तर एका भिक्षुक ब्राह्मणाला मी दान केले असे मानून स्वस्थ बसेन, पन्नास रुपये गेल्याने माझे फार मोठे नुकसान होणार, असे थोडेच आहे."

सोमशर्माने तेवढ्याचवर ठरल्या वेळी कर्जाची रक्कम फेडली.

धर्मूशेटच्या शेजारी सुब्बूशेट नावाचा एक लोभी सावकार रहात असे. त्याने कर्जाऊ दिलेली रक्कम किंवा व्याजाची रक्कम वसूल होत नसे. तशी त्याला समजूत बेताचीच होती. धर्मूशेटला कर्जाची रक्कम वसूल करण्याची पद्धत चांगली माहीत आहे, हे त्याला माहीत होते. त्याच्या जवळून ती शिकून घ्यावी असे त्याला वाटले. परंतु सावकारीचे ते गुपित धर्मूशेट त्याला कसे काय कळू देणार, अशी शंका त्याच्या मनात होती. परंतु ते गुपित शिकून घेण्याची युक्ति त्याला सुचली. धर्मूशेटकडे जाऊन कर्जाऊ

सौ. व. स. नाईक



रक्कम मागून घ्यावी आणि ती आपल्या-कडून तो कशी वसूल करतो हे पहावे. ती युक्ती सुचल्याबद्दल त्याला फार आनंद झाला आणि धर्मूशेटकडे जाऊन त्याने शंभर रुपये कर्जाऊ मागितले.

धर्मूशेटने आश्चर्य चकित होऊन विचा-रले–"मी कर्ज देऊ म्हणता, सुब्बुशेट?"

"वेळप्रसंग कोणावर येत नाही! तुमच्या शिवाय मला इतर कोणाकडे जाणं आवडले नाही बघा! एक दोन महिन्यात परत करतो" सुब्बुशेट म्हणाला.

धर्मूशेट क्षणभरच विचार करून म्हणाला–"बरं तर देतो!" आणि घरात जाऊन शंभर रुपये आणि एक दगड घेऊन ब[illegible] आला म्हणाला–"तुम्ही फक्त एकदांच या दगडाला हात लावा."

"कशाला हो?" आश्चर्यचकित होऊन सुब्बुशेटने विचारले.

"असेच, विशेष असे काही नाही!" धर्मूशेट म्हणाला.

सुब्बुशेटने त्या दगडाला स्पर्श करून शंभर रुपये घेतले, तेव्हा धर्मूशेट त्याला म्हणाला–"व्याज महिन्याला दोन रुपये बर का!"

आपल्याकडून धर्मूशेट व्याज जास्त मागतो आहे, हे सुब्बुशेटने पाहिले परंतु कर्जाची रक्कम वसूल करण्याची पद्धत शिकून घेण्यासाठी त्याने शंभर रुपये घेतले असल्याकारणाने व्याजाचा दर जास्त असू-नही त्याने तो मान्य केला.

चारपाच महिने लोटले, परंतु सुब्बुशेटने कर्जाची रक्कम परत करण्याचे नाव काढले नाही की धर्मूशेटने त्याविषयी एका शब्दाने सुब्बुशेटला विचारले नाही.

सुब्बुशेटने पांच महिने शांतपणे वाट पाहिली की, धर्मूशेट कर्जाची रक्कम किंवा व्याजाची रक्कम परत करतोस का, विचा-रील परंतु तसे न झालेले पाहून त्याला वाटू लागले की बहुतेक धर्मूशेट कर्जाची गोष्ट पार विसरून गेला असावा. शेवटी तो स्वत. धर्मूशेटला जाऊन भेटला आणि विचारले–"काय हो ध[illegible] महिने झाले, तुम्ही काहीच विचारले नाही?"

"मी कसा विसरेन? तुम्ही उशीर केलात तर त्यात काय?" धर्मूशेट म्हणाला.

"समजा, मी कर्ज किंवा व्याज नाही दिले, तर?" सुब्बुशेटने विचारले.

"ते शक्यच नाही. तुम्ही पैसे घेताना एका दगडाला स्पर्श केला होतात, ती गोष्ट लक्षात आहे का? तो दगड म्हणजे सामान्य दगड नव्हे. त्या दगडाला हात लावून दिलेले वचन स्पर्श करणारा कधी मोडणेच शक्य नाही. असा महिमा आहे त्या दगडाचा." धर्मूशेट म्हणाला.

धर्मूशेटचे ते गुपित कळतांच सुब्बुशेट म्हणाला–"अस्सं!" आणि मनात म्हणाला, हे याचे गुपित आपल्याला कळले! थोडा वेळ विचार करून म्हणाला–"काय हो धर्मूशेट! मी दिलेली कर्जे, कित्येक वर्षे लोटली, वसूलच होत नाहीत. मला देतां का तो दगड काही दिवस? कर्ज वसूली संपल्यावर मी तो परत आणून देतो."

"काही हरकत नाही. माझ्याजवळ अगदी तसाच महिमा असलेला दुसरा एक दगड आहे. मी तो तुम्हांला विकत देतो, तुम्ही कायमचा ठेवून घ्या. निरुपयोगी ठरला तर मी तो परत घेईन." धर्मूशेट म्हणाला.



सुब्बुशेटला परमानंद झाला. "काय किंमत आहे याची?" त्याने धर्मूशेटला विचारले.

धर्मूशेटने त्या दगडाची किंमत एकशे दहा रुपये सांगितली.

सुब्बुशेट लगेच घरी जाऊन एक पिशवी घेऊन आला. त्याच्या तोंडावरून तो उदास व दु:खी दिसला. म्हणाला–"घरी जाऊन मी पाहिले, आणायला पाहिजे होते, तेवढे पैसे घरात नव्हते. फक्त एकशे दहाच रुपये होते. ने दगड द्या. कर्जाची रक्कम व्याजा-सकट मागाहून देतो आणून."

"काही हरकत नाही. थोडा उशीर झाला म्हणून काय बिघडले! तेवढेच व्याज

[illegible] मिळेल." असे म्हणत धर्मूशेटने पैसे [illegible] घेऊन तो दगड सुब्बुशेटला दिला.

दगड मिळाल्यानंतर सुब्बुशेटचे साहस [illegible]च वाढले. कर्ज मागायला कोणी आले की व्याज चढवून लावून त्याने कर्जाच्या [illegible]मोठ्या रकमा द्यायला सुरवात केली. कोणाकडून कागद लिहून घेणे किंवा साक्ष ठेवणेदेखील त्याला अनावश्यक वाटले. ते कळल्यावर लोक व्याजाचा दर जास्त असूनही कर्ज मागायला येऊ लागले. प्रत्ये-काला त्या दगडाला स्पर्श करायला सांगून सुब्बुशेटने कर्जाची रक्कम दिली.

महिन्यामागून महिने लोटले, सुब्बुशेटकडे कोणी कर्ज मागायला आला नाही की कर्ज परत द्यायला आला नाही. सात आठ महिने वाट पाहून सुब्बुशेट धर्मूशेटकडे गेला आणि विचारले–"हे कसे काय?"

"पुरे एक वर्षभर वाट पहा!" धर्मूशेट म्हणाला.

ते वर्षदेखील लोटले. सुब्बुशेट कर्ज दिलेली रक्कम परत येत नाही हे पाहून [illegible] कर्ज घेणाऱ्यांपैकी एकजण दलाल परत आला नाही. आतांमात्र सुब्बुशेटला धीर धरवेना. तो धर्मूशेटच्या घरी गेला आणि रागाने तो दगड त्याच्यासमोर टाकीत म्हणाला–"सर्व लबाडी आणि लुच्चेगिरी! मी तुझ्या शब्दावर विश्वास ठेवून तो दगड विकत घेऊन गेलो आणि स्वतःचे फार मोठे नुकसान करून घेतले!"

"मला त्या दगडाने नाही बुवा फसविले. चांगला उपयोगी पडला तो!" धर्मूशेट शांतपणे उत्तरला.

"तुझे तोंड, म्हणे चांगला उपयोगी पडला! एक वर्ष लोटले, मला तू कर्जाऊ दिलेल्या रकमेपैकी एक पैदेखील वसूल झाली आहे का? तुझ्या दगडात तरी महिमा कोठे आहे रे?"

"कर्ज वसूल कां नाही होणार? व्याजासकट वसूल झाले! मी तो दगड तुला फुकटात दिला होता. तू दिलेले पैसे मी तुला दिलेल्या कर्जाची रक्कम व व्याज म्हणून जमा करून घेतले." धर्मूशेट म्हणाला.



# ताजा माल

एका दुकानासमोर 'ताजे मासे येथे मिळतील' अशी पाटी लावलेली होती. लोक दुकानात मासे विकत घेत होते. फक्त एकाने एक मासा हातात उचलून प्रथम तो तोंडाजवळ आणि नंतर कानाजवळ थोडा वेळ ठेवून चटईवरच्या माशात टाकून दिला.

मासेवाल्याने ते पाहून त्याला विचारले–"काय हो, येथे जुनी शिळी मासळी मिळत नाही, बरं का! वासच घेऊन पाहायचा झाला तर मासा नाकाजवळ न्यावा लागतो. तोंडाजवळ आणि कानाजवळ नेऊन काय पाहतां?" असे म्हणत मासेवाला हंसला.

"मी वास नाही घेतला माशाचा, मी त्याच्याशी बोललो." मासे घ्यायला आलेला गिऱ्हाईक म्हणाला.

मासे घ्यायला आलेले सर्व चकित होऊन त्याच्याकडे पाहू लागले.

"अस्सं! मासा काय म्हणाला, सांगाल तरी!" मासेवाल्याने विचारले.

"मला समुद्रातून येऊन तीन दिवस झाले. म्हणून समुद्रातल्या ताज्या बातम्या मला माहीत नाहीत हो, असे तो मासा म्हणाला." गिऱ्हाइकाने उत्तर दिले.

त्याचे ते बोलणे ऐकून सर्व गिऱ्हाईक खदखदां हसू लागले. मासेवाला लाजल्यासारखा खाली बघून हंसू लागला.





# पाहिलें म्यां ह्या डोळा

**का**वेरी नदीतीरी नारायणानंद नांवाचे एक संन्यासी आणि अयाचक नांवाचा त्याचा शिष्य रहात असत. दोघे एकदा रामेश्वर यात्रेला निघाले.

वाटेत स्वामीजींना तहान लागली, म्हणून ते एका झाडाखाली बसले आणि शिष्याला तांब्या घेऊन जाऊन कोठे प्यायला पाणी मिळते का पाहून यायला पाठविले. अयाचक तांब्या घेऊन पाण्याच्या शोधार्थ हिंडत असता त्याला एका झाडाखाली एक मनुष्य खाण्यासाठी आपले गाठोडे सोडीत असलेला दिसला. समोर पाणी भरून तांब्या ठेवलेला होता. त्याला विचारले तर तो थोडेसे पाणी देईल, नाहीतर पाणी कोठे मिळेल हे सांगेल असा विचार करून तो त्या माणसाकडे जाऊ लागला.

ते पाहून त्या माणसाने घाईघाईने तोंडात घातलेला घास गिळतच आपले गाठोडे बांधून उचलले आणि तांब्या घेऊन पळून गेला. अयाचक मनातल्या मनात हसला आणि जवळपास कोठे पाणी आहे का पाहू लागला. सुदैवान पाणी मिळाले. ते घेऊन आपल्या गुरुजींना देण्यासाठी तो परतला. वाटेत त्याला एक मनुष्य मरून पडलेला दिसला. शेजारी पडलेल्या तांब्या-वरून आणि गाठोड्यातले अन्न कावळे खात होते त्या गाठोड्यावरून झाडाखालून पळून गेलेला मनुष्य तो हाच हे अयाचकाने ओळखले. घास घशात अडकून हा मनुष्य मेला असावा असे त्याला वाटले.

त्याने आपल्या गुरुजींना प्यायाला पाणी दिले आणि घडलेले वृत्त सांगितले.

"त्याचे ते प्रेत तसे सोडून जाणे बरोबर नाही. आपले कर्तव्य पुरे केले पाहिजे' चल!" असे स्वामी नारायणानंद म्हणाले आणि प्रेत पडले होते तिकडे निघाले.

गोळा करून घेऊन आला आणि चिता पेटवायला विस्तव पण आणला.

चिता जळत असता स्वामी नारायणानंद आकाशात उठणारे धुराचे लोट पहात म्हणाले–"चांगली गती मिळाली बिचा-ऱ्याला, स्वर्ग मिळाला. अगदी अनाथा-सारखा मेला होता, माझा हेतू पूर्ण झाला."

अयाचकाला त्या सर्वाचा काहीच अर्थ-बोध झाला नाही.

"अतिथीला जेवण न द्यावे लागावे म्हणून पळून जाणाऱ्या पापी माणसाची, गुरुवर्य! आपण अन्त्येष्टी काय केलीत आणि त्याला स्वर्ग मिळाला काय म्हणतां?" शिष्य म्हणाला.

"त्याला मरण आले त्याबरोबर त्याचे पाप व पुण्य दोन्हींचा क्षय झाला. त्याने नकळत एखादे पुण्य केले असावे. उदाहर-णार्थ मरते वेळी त्याला कळल्याशिवाय त्याचा आहार पक्ष्यांना किंवा इतर प्राण्यांना मिळाला. त्याच्या या एका पुण्यकर्मामुळे त्याला स्वर्गप्राप्ती व्हायला पाहिजे असे मानून मी त्याची उत्तरक्रिया केली. माझा तो हेतू पूर्ण झालेला मी या डोळ्यांनी पाहिला." स्वामी नारायणानंद म्हणाले.



"तरमग मला कां दिसू नये ते?" अयाचकने गुरुजींना विचारले.

"मी त्याला उत्तर म्हणून तुला एक जुनी घडलेली गोष्ट सांगतो. ऐक!" असे सांगून स्वामी नारायण गोष्ट सांगू लागले.

कित्येक वर्षे, म्हणजे शतके होऊन गेली, कुमारिल भट्ट नांवाचे एक थोर ज्ञानी पुरुष होऊन गेले. त्यांचा वेदांवर आणि त्यात वर्णिलेल्या कर्मकांडावर पूर्ण विश्वास होता. त्या काळात बौद्धधर्मानुयांकडून वेदांचे खंडन होत असे. आपल्या धर्माचा प्रचार करण्या-साठी बौद्ध तसे करीत असत. त्यांच्या प्रचाराचे खंडन करावयाचे झाले तर बौद्ध धर्मात ज्या उणीवा आहेत त्याची माहिती

श्री हनुमंत ना. शिरधोकर

चांगली करून घेतली पाहिजे असे कुमारिल भट्टांना वाटले व ते बौद्ध भिक्षूंचा वेष धारण करून प्रयागला एका बौद्ध विहारात राहून त्यांच्या धर्माविषयी अध्ययन करू लागले.

पुढे काही दिवसांनी विहारातल्या बौद्ध भिक्षूंना कुमारिल भट्ट हा बौद्ध धर्माचा शत्रू आहे या गोष्टीची खात्री झाली. त्याला जिवंत सोडतां कामा नये असे मनाशी ठरवून त्यांनी त्याला सातव्या मजल्यावरून खाली ढकलले. खाली पडत असतां कुमारिल भट्ट मनात म्हणाले–“वेद खरे असतील तर माझ्या केसाला ही धक्का लागणार नाही.” त्याप्रमाणे काही दुखापत झाल्याशिवाय कुमारिल भट्ट जमिनीवर पडले. मात्र डोळ्यात एक बा[illegible] खडा गेल्याने डोळा ठणकत होता.

“माझा वेदावर इतका विश्वास असून ही माझा डोळा कां ठणकतो आहे?” त्यांनी आपल्या गुरुजींना विचारले.

गुरुजी म्हणाले–“तुझा वेदांवर पूर्ण विश्वास नव्हता. कारण तू मनात म्हणालास ‘वेद खरे असतील तर’ म्हणजे तुझ्या मनात थोडी का होईना शंका होती. परंतु जर का तू ‘वेद माझे नक्कीच रक्षण करतील’ असे म्हणाला असतास तर तुला थोडादेखील त्रास झाला नसता.”

स्वामीजींनी तो गोष्ट सांगून अयाचकला विचारले–“मला जे दृश्य दिसले ते तुला कां दिसले नाही, हे आतां कळले असेल?”

“त्या थोर पुरुषाच्या गोष्टीशी या पारधी [illegible] ते कोठे आणि हा कोठे? दोघांची तुलना कशी काय हे नाही मला कळले.” अयाचक म्हणाला.

“अस्सं, तर तुला आणखी एक गोष्ट सांगतो. ती ऐकल्यावर तुला दोन्हींचा परस्पर संबंध काय आहे, हे कळेल.” स्वामी नारायणानंद गोष्ट सांगू लागले.

सनंदन नांवाचा एक भक्त होता. त्याने एका योगेश्वराकडून नरसिंह मंत्र शिकून घेतला आणि नरसिंहाचे दर्शन व्हावे यासाठी जंगलात एकांत स्थानी समाधी धरून बसला. तेव्हां एक पारधी एका हरणाचा पाठलाग करीत तेथे आला आणि त्याने सनंदनाला विचारले–“इकडून एक हरण गेले ते पाहिलेस का रे तू?”

“मी ध्यानमग्न होतो, मला कसे काय दिसणार ते?” सनंदनने विचारले.

“तू या अरण्यात असा कां रे बसला आहेस?” असे पारध्याने विचारले.

पारध्याला मोठमोठ्या गोष्टी काय कळणार? असा विचार करून सनंदन म्हणाला–“मी तुझ्यासारखा एक पारधीच आहे. तू एका हरणासाठी हिंडतो आहेस. मी देखील एक सावज धरण्यासाठी ध्यान धरून बसलो आहे.” सनंदन म्हणाला आणि त्याने नरसिंहावताराचे वर्णन करून सांगितले.

“जंगलातल्या सर्व रानटी जनावरांची मला माहिती आहे. तू म्हणतोस तसे



जनावर या जंगलात कोठेही नाही." पारधी म्हणाला.

"आहे, परंतु तुला ते दिसणार नाही!" सनंदन म्हणाला.

"तू ज्ञानी आहेस आणि तसे जनावर आहे म्हणतोस तर ते मी धरून आणून देतो तुला." असे सांगून तो पारधी तसे जनावर शोधायला निघाला. त्याने सर्व जंगल चाळून काढले. पण ते त्याला कोठे दिसले नाही. वचन दिल्याप्रमाणे करू शकला नाही म्हणून दुःखी होऊन पारधी गळ्याला फास लावून घ्यायला निघाला.

त्याच वेळी एक अर्धासिंह व अर्धा पुरुष असे एक जनावर समोर उभे असलेले त्याला दिसले. त्याने आपल्या गळ्यातला फास काढला आणि ती दोरी त्या जनावराच्या गळ्यात बांधली आणि त्याला ओढत आणून सनंदन समोर उभा करून म्हणाला—"हे पहा रे! तू सांगितलेस ते जनावर शेवटी सांपडले. हे पहा!" परंतु सनंदनला काही दिसले नाही. परंतु त्याच्या कानावर हे शब्द पडले—"सनंदना! पारध्याला गुरुउपदेश मिळाला नाही असे समजून तू त्याला कमी लेखलेस. तुझ्या ध्यानासमाधी पेक्षां त्याची श्रद्धा व विश्वास मोठा दांडगा आहे, हे लक्षात ठेव."

सनंदन पारध्याला म्हणाला—"तू आपल्या विश्वासामुळे त्या जनावराला बांधू शकलास. मी त्याचे ध्यान धरून आणि समाधी लावून बसलो होतो तरी त्याचे दर्शन मला घडले नाही. मला मिळालेला गुरुउपदेश फुकट गेला. तुझा विश्वासच मोठा आहे."

कथा संपवून स्वामी नारायणानंदांनी शिष्याला विचारले—"मला दिसणारे दृश्य तुला कां दिसत नाही, हे कळले का?"

"कळले! त्या माणसाची सर्व पापे धुवून निघाली आणि त्या माणसाला सद्गती मिळाली असेल असा आपला पूर्ण विश्वास होता, म्हणून आपण त्याची अन्त्येष्टी वगैरे केली. म्हणून आपणांला ते दृश्य दिसले. माझ्यात तो विश्वास नसल्यामुळे मला ते दृश्य दिसले नाही." अयाचक म्हणाला.



# फसायला कारण

एकदां एका राजाच्या मनात एक फार मोठी शंका उत्पन्न झाली. मोठमोठी हुशार व चतुर मंडळीसुद्धां फसतात त्याचे कारण काय?

राजाने, त्या शंकेचे निरसन करून देणारास आपले अर्धे राज्य बक्षिस देण्यात येईल, असे जाहीर केले. विनाकारण आपल्याला भंडावून सोडू नये यासाठी त्याने असे देखील जाहीर केले की शंका निरसन न करू शकल्यास शंका निरसनाचा प्रयत्न करणारास फांशीची शिक्षा देण्यात येईल. शिक्षेचे नाव ऐकूनच कोणी धाडस करायला पुढे आला नाही.

एके दिवशी एक तरुण मनुष्य राजाशी एकांतात बोलायचे आहे असे सांगून म्हणाला—"महाराज! मी आपल्या शेजारचा राजा कांचनवर्मा याचा अंतरंग मित्र आहे. आपण त्याला जिंकू शकालसे वाटत नाही. परंतु उद्यां आमचा राजा वनराजेश्वरी देवीच्या दर्शनासाठी एकटा जंगलात येणार आहे. त्याने आमच्या धाकट्या भावाला विनाकारण फांशीची शिक्षा दिली. उद्यां आपण वेष पालटून माझ्याबरोबर जंगलात येऊन त्याला कैद केलेत तर त्याच्यावर सूड उगविल्याचा आनंद मला होईल व आपणांला त्याला जिंकल्याचा."

राजाला फार आनंद झाला आणि दुसऱ्या दिवशी त्या तरुण माणसाबरोबर तो जंगलात गेला. परंतु जंगलात चौघां जणांनी राजावर अचानक हल्ला करून त्याला कैद केले. राजा "लबाडी! लबाडी!" असा ओरडला.

"क्षमा करा महाराज! मी आपलीच प्रजा आहे. लोक फसतात ते आपल्याच स्वार्थीपणामुळे किंवा लोभी वृत्तीमुळे हे आपणांस पटवून देण्यासाठी मी हे सर्व नाटक रचले होते." तो तरुण म्हणाला. ते ऐकून राजाने त्याला अर्धे राज्य दिलेच, त्याचबरोबर राजकन्येशी त्याचे लग्न करून देऊन त्याला आपला जांवई करून घेतले.





# चूक पदरात बांधून दिली

एका गावात एक चिक्कू जमीनदार रहात असे. त्याच्याकडे कोणी मजूर टिकत नसे. कोणी मन लावून पुरे होईपर्यंत काम केलेच तर काम पुरे झाल्याबरोबर जमीनदार त्याच्या कामात काहीतरी दोष काढून मजुरीचे पैसे कापून त्या मजुराला कामावरून काढून टाकीत असे.

फक्त धोंडू नावाचा एक भोळा मजूर त्या जमीनदाराकडे त्याच्या बापाच्या वेळेपासून काम करीत असे. जमीनदाराने त्याला पगार दिला असो किंवा नसो, तो काही बोलल्याशिवाय काम करीत असे. तो एक इमानदार नोकर होता.

एकदां जमीनदाराने काही तरी खोटेनाटे सांगून त्या गरीब नोकराचा एक महिन्याचा पगार उडविला. त्याने त्या महिन्याचा पगार मिळावा म्हणून जमीनदाराजवळ किती विनवण्या केल्या. परंतु त्याला त्या महिन्यात रिकाम्या हातानेच घरी परतावे लागले. म्हणून त्याच्या बायको मुलांना देखील फार वाईट वाटले. त्याला खंडू नावाचा एक सतरा अठरा वर्षांचा मुलगा होता. त्याला ती गोष्ट खपली नाही. तो आपल्या बापाला म्हणाला—"बाबा, तुमचे वय झाले आहे. तुम्ही आता आराम करा. उद्यांपासून मी कामावर जातो."

दुसऱ्या दिवशी खंडू कामावर गेला. जमीनदाराने विचारले—"कोण रे तू?"

"मी धोंडीबाचा मुलगा खंडू." खंडू म्हणाला.

"तुझा बाप कां नाही आला कामावर?" जमीनदाराने विचारले.

"यापुढे मीच येत जाईन. महिनाभर मीच काम करणार आहे, आपल्या घरी. महिना अखेरीला पगार माझ्याच हातात देण्याची कृपा करावी." खंडू म्हणाला.

श्री गो. र. धोपाटे

महिनाअखेर पगार [illegible] दररोज मजुरी घ्यावयाची नाही, स्वतःच खंडू म्हणाला ते ऐकून जमीनदाराला फार आनंद झाला. कारण पगाराचे अगर मजुरीचे पैसे दाबायला महिन्याचा अवधीच बरा. तो म्हणाला—"हे पहा खंडू, मी तुला जे काम सांगेन ते काम कसे का असेना डोळे मिटून करीत जा असेल कबूल तर आजपासूनच कामाला लाग."

खंडूने जमीनदाराच्या इच्छेप्रमाणे काम करण्याचे कबूल केले. त्याने विचार केला, जमीनदाराने सांगितलेले काम करणे आपल्याला शक्य वाटले नाही तर वाटेल तेव्हां ते काम सोडून जातां येईल. जमीनदाराने मक्याच्या शेताला पाणी लावून त्याची राखण करण्याचे काम सांगितले. त्याला महिना अखेरीला कामावरून कसे काढून टाकायचे आणि पगार कसा दाबायचा वगैरे गोष्टी मनात योजून ठेवल्या होत्या.

महिना संपत आला, आणि कापणीची वेळ येऊन ठेपली.

जमीनदार शेताची पाहणी करून खंडूला म्हणाला—"हे पहा खंडू, मक्याच्या कांहीं ताटांना एकेकच कणीस लागले आहे आणि कांहींना दोन दोन आहेत. प्रत्येक ताटाला दोन दोन कणसे असायला पाहिजेत." असे



सांगून स्वतःच्या चातुर्यावर मनातल्या मनात फुलून स्वारी घरी गेली.

खंडूदेखील कमी खूष झाला नाही. दोन तीन दिवसांनी जमीनदार पुन्हां शेताच्या पाहणीला आला. या वेळी प्रत्येक ताटाला दोनदोन कणसे आहेत हे पाहून तो चकित झाला. परंतु दुसऱ्याच क्षणाला खंडूचा उपद्व्याप त्याच्या लक्षात आला. त्याने एकेक कणीस असलेली ताटे उपटून टाकून त्यांवरची कणसे गडप केली होती. परंतु आतां त्याला ती गोष्ट कशी विचारायची? कारण त्याने स्वतःच त्याला एक एक ताटाला दोनदोन कणसे राहतील असे झाले पाहिजे असे सांगितले होते.

याखेपेस जमीनदार खंडूला म्हणाला– "खंडू! मक्याच्या प्रत्येक ताटाला दोन दोन कणसे कशी काय रे? इतरांच्या शेतासारखे आपले शेत असले पाहिजे!" असे सांगून जमीनदार निघून गेला.

खंडूने विचार करीत वेळ घालविला नाही. ताटांवरचे एकेक कणीस तोडून त्याने बाजारात नेऊन विकून टाकले.

दुसऱ्या दिवशी जमीनदाराने येऊन पाहिले तर कांहीं ताटांवर दोन दोन व कांहीं वर एकेकच कणीस दिसले. आतां मात्र तो स्वतःला आवरू शकला नाही. रागाने म्हणाला–"तुला मी यासाठी कामावर नेमले होते का? थांब मी पोलीसाला बोलावून घेऊन येतो." आणि निघाला.

खंडू त्याच्या पाठोपाठ निघाला. म्हणाला–"मालक! आपणच मला नेमतांना ही अट नव्हती का घातलीत की आपण सांगाल ते आणि तसेच काम मी डोळे मिटून केले पाहिजे. आपण सांगितलेत तसे काम नाही का केले. आता तुम्ही पोली-[illegible] या, काही फायदा नाही."

पोलीस आला तरी खंडू जमीनदाराने सांगितल्याप्रमाणे काम केल्याचे सांगून मोकळा होणार आणि कित्येक मजुरांची मजुरी दाबून ठेवल्याची गोष्ट बाहेर पडणार. म्हणून तो गप्प बसला.

दुसऱ्या दिवशी खंडू जमीनदाराच्या घरी जाऊन म्हणाला–"मालक आपली कणसे विकून जे पैसे मिळाले त्यातला बाबांचा पगार व आपला एक महिन्याचा पगार ठेवून घेऊन बाकीचे परत करायला आलो आहे."

खंडूचा तो इमानीपणा पाहून जमीनदार थक्कच झाला. म्हणाला–"खंडू! मला इतक्या दिवसांनी हवा होता तसा चांगला नोकर मिळाला आहे. या पुढे मी तुला दर महिन्याचा पगार महिना अखेरीस नियमितपणे देत जाईन." खंडू नकार देऊ शकला नाही आणि काम सोडून गेला नाही.





# विसराळू

एका गावी सोमू नावाचा एक विसराळू मनुष्य रहात असे. तो लहानपणापासूनच विसराळू होता. एका दुर्दैवी मुलीच्या दुर्दैवी बापाने सोमूला आपला जावई करून घेतले. सोमूच्या गावा शेजारीच त्याचे सासुरवाड होते.

लग्न होऊन एक वर्ष पुरे झाले नव्हते. दिवाळसणासाठी सासरा बोलवायला आला. जाण्यापूर्वी जांवयाला म्हणाला–"परवां आहे दिवाळी. उद्यांच दोघं वस्तीला या."

सासरा गेल्यावर सोमू सासरा कशासाठी आला होता हे विसरून गेला. त्याने बायकोला विचारले–"काय ग? बाबा कशाला आले होते? ते काही म्हणाले का?"

"आतां तुमच्या विसराळूपणाला काय म्हणायचे? उद्यां वस्तीला या म्हणाले. परवा दिवाळसण आहे ना!" बायको थोडीशी चिडल्यासारखीच बोलली.

दुसऱ्या दिवशी बायकोने नवऱ्याला पहाटे उठवून गाडी तयार ठेवायला सांगितले म्हणाली–"आपल्याच गाडीतून जाऊ."

सोमू मागच्या दारी गाडी होती ती समोर ओढून घेऊन आला. गाडीत गवत अंथरून वर सतरंजी अंथरली. दोघे निघायच्या तयारीत होते, परंतु कुलुप मिळेना. सोमू बायकोला कावून म्हणाला–"मला विसराळू म्हणता म्हणता तूच विसराळू निघालीस की. कुलूप काढ हुडकून कोठे आहे ते." असे म्हणत सोमूने हातातले कुलुप कोनाड्यात ठेवले. आणि आश्चर्याची गोष्ट म्हणजे विसरून जाऊ नये म्हणून त्याने हातात कुलूप घतले होते. नेमकी तीच गोष्ट तो विसरून गेला आणि बायको कुलूप शोधायला निघाली तेव्हा कोनाड्यात आपण कुलूपच ठेवीत आहो ही गोष्टदेखील त्याच्या ध्यानीमनी नव्हती.

श्री उदय शं. जोशी

कुलूप कोनाड्यात होते ते उचलतांना बायको म्हणाली–"हे काय येथे कोणी ठेवले?"

"अरे हो मीच तर आतां ठेवले." सोमू म्हणाला.

"माझं कपाळ, आणखी काय? हातात कुलूप ठेवून सारं घर पालथं घालविलेत!" बायको म्हणाली.

घराला कुलुप लागलं. पण बैल जागेवर नव्हते. गाडी तयार करीत असतां नोकर बैलांना घेऊन शेतात निघून गेला होता. त्याला सांगायला सोमू विसरला होता.

शेवटी भाड्याची घोडागाडी करून सोमू बायकोला घेऊन सासुरवाडी निघाला. गाडी जोराने धांवताना पाहून सोमू बायकोला म्हणाला–"पहा, आपली बैलांची जोडी, घोडे काय पळतील यांच्यासमोर?"

"माझं फुटकं कपाळ, म्हणून तुमच्या हातून मंगळसूत्र बांधवून घेतलं! अहो, आपण भाड्याच्या गाडीने, नाही का चाललो आहो?" बायको म्हणाली.

रच्या सुमारास दोघे ठिकाणावर पोंचले. गाडीभाडे द्यायचे विसरून सोमू सरळ घरात गेला. सासऱ्याने भाडे देऊन टाकले आणि जांवयाची विचारपूस करायला घरात गेला.

सोमूची बायको सैंपाकघरात आईला नमस्कार करायला गेली. ओटीवर सासरा व जावई गप्पांत सर्व जग विसरून गेले. घरातून खायला काही आले ते दोघांनी बसून खाऊन घेतले. प्यायला पाणी घेऊन यायला म्हणून सासरा घरात गेला. बाहेर येऊन पाहतो तो जांवई ओटीवर नाहीत. बाहेर धावत अंगणात आला. त्याला एक घोड्याची गाडी जात असलेली दिसली. गाडीत त्याचा जांवई बसलेला होता. सासऱ्याने हांक मारून विचारले–"जांवई बापू! कोठे निघालात?"

गाडीत बसल्याबसल्याच सोमू म्हणाला–"घरी आपली मुलगी वाट पहात असेल. तिला एकटीला घरात भीती वाटेल!" पाहतां पाहतां गाडी डोळ्याआड झाली.





# स्वर्गप्राप्ती

एका माणसाने सर्व संसारसुख उपभोगून वृद्धापकाळी जंगलांत जाऊन ईशचिंतन करण्याचे ठरविले. दुसरा मनुष्य जगाचा वीट आल्याने जंगलात गेला. त्याला तेथे पहिल्याने आलेला मनुष्य तपश्चर्या करीत असलेला दिसला. त्याला पाहून दुसऱ्या माणसाला वाटले की या तपस्वी माणसाची सेवाशुश्रूषा केली तर आपल्याला सहजी स्वर्गप्राप्ती होईल. त्याने पहिल्या व्यक्तीला जाऊन विचारले–"हे महात्मा! आपण मला आपला शिष्य करून घेतां का?"

"मला कोणाच्या सेवेची गरज नाही. माझे ध्यानभंग करू नका!" तो मनुष्य म्हणाला आणि पुन्हां डोळे मिटून ध्यानमग्न झाला. दुसऱ्या व्यक्तीने विचार केला की पहिली व्यक्ती खरोखरच थोर तपस्वी आहे. त्याच्या तपश्चर्येत काही विघ्न येऊ न देणे हेच मोठे पुण्यकार्य आहे. म्हणून तो स्वतः तपश्चर्या करीत असतां, कोणी पशुपक्ष्याने येऊन पहिल्या व्यक्तीच्या तपश्चर्येत विघ्न आणू नये याची फिकीर करू लागला. पहिल्या व्यक्तीला दुसरी व्यक्ती काय करीत आहे याची कल्पनादेखील नव्हती.

एके दिवशी ते दोघे तपश्चर्या करीत होते त्या जागेजवळच्या तलावावर एक धोबी कपडे धुवायला आला. कपडे धुण्याच्या आवाजाने दोघांच्या तपश्चर्येत विघ्न येऊ लागले. पहिल्या व्यक्तीने फक्त एकदांच डोळे उघडून पाहिले आणि पुन्हां एकाग्र चित्ताने तपश्चर्येत मग्न झाला.

परंतु दुसरी व्यक्ती रागाने धोब्याला दरडावून सांगू लागली-"मूर्खा! तुला एवढीसुद्धा अक्कल नाही, येथे दोन व्यक्ती तपश्चर्या करीत आहेत. कपडे धुण्याच्या आवाजाने त्यांच्या तपश्चर्येत विघ्न येऊ शकेल, असे नाही वाटले का तुला? जा, चालता हो!"

सौ. सुगुणा रा. माइणकर

"मला तुमच्या तपश्चर्येशी काय संबंध? माझ्या कुटुंबाचे पोट कसे भरणार, ही मला फिकीर आहे. मी आपले काम करतो, तुम्ही आपले करा." धोबी म्हणाला.

दुसरा तपस्वी दररोज धोब्याशी भांडत असे, परंतु धोब्याने तो तलाव सोडला नाही. दररोज येऊन त्याच तलावावर तो कपडे धूत असे.

काही दिवसांनी तो धोबी वारला. दुसरा तपस्वी काही दिवसांनी इहलोकातला प्रवास संपवून परलोकी निघून गेला. पुढे आणखी काही दिवसांनी पहिला तपस्वी-देखील आपला मानव देह सोडून परलोकी निघाला. त्याला दुसरा तपस्वी नरकलोकात खितपत पडलेला दिसला. दुसऱ्या तपस्व्याने पहिल्याला विचारले–"काय हो, मला-देखील आपल्या बरोबर स्वर्गलोकी कां नाही घेऊन जात?" परंतु पहिला तपस्वी काय उत्तर देणार? तो स्वर्गलोकी पोंचला. तेथे त्याला तो धोबी सुखोपभोग करीत बसलेला दिसला. त्या तपस्व्याने त्याला स्वर्गांत [illegible] रे, माझ्याबरोबर तपश्चर्या ज्याने केली तो नरकलोकांत कसा काय? आणि आमच्या दोघांच्या तपश्चर्येत विघ्न आणणारा धोबी स्वर्गात कसा काय?"

ते ऐकून देवदूत म्हणाला–"या धोब्याने तुला एकाग्र चित्ताने तपश्चर्या करायला भाग पाडून तुला एक प्रकारे मदतच केली. त्याच्या कपडे धुण्यामुळे जो आवाज होई त्यामुळे तुला चित्त एकाग्र करायला बुद्धी झाली. तो आपले कर्तव्य करीत होता. त्याच्यावर कुटुंबपोषणाची जबाबदारी होती, ती त्याने पार पाडली. त्याने काही पाप केले नाही. परंतु तुझ्या साथी तपस्व्याने तपश्चर्या केलीच नाही. त्याचे चित्त चंचल होते. तो चित्त एकाग्र करू शकलाच नाही. तो तुझी तपश्चर्या भंग होऊं नये म्हणून पशुपक्ष्यांना पळवून तुझे रक्षण करीत राहीला. म्हणून त्याला स्वर्गप्राप्ती झाली नाही. त्याचा स्वतःच्या मनावर ताबा नव्हता."





# कुशाग्र बुद्धी

एका गावी राजा दरवर्षी हुशार कुशाग्रबुद्धी तरुणांची निवड करण्यासाठी एक सभा बोलावीत असे. राजाचा प्रधान कुशाग्रबुद्धी तरुणांपैकी सर्वात उत्तम ठरेल त्याची निवड करीत असे. त्यानंतर राजा अशा कुशाग्र बुद्धीच्या तरुणाला आपल्या दरबारी स्थान देत असे.

एकदां राजाने बोलाविलेल्या सभेला गणपती नांवाचा एक तरुण युवक आला. त्याने जी उत्तरे दिली तीं ऐकून त्याच्या हुशारीची साक्ष सर्वांना पटली.

प्रधानाने तरुणांना विचारले–"तुमच्या पैकी कोणी हात असून थोटा असा मनुष्य पाहिला आहे का?"

गणपती म्हणाला–"हो पाहिला आहे. मी येत होतो. वाटेत एक भिकारी भेटला. त्याने गरिबाला दान द्या मालक!" म्हटले.

"मी त्याला चार आणे दिले. त्याने समोर ठेवलेल्या कागदावर लिहिले, "दोन." मी त्याला विचारले–"हे कां लिहिलेस रे!" तो म्हणाला–"तू दुसरादानी! जो दान करीत नाही तो हात असून थोटा होय!"

"तरमग डोळे असून आंधळा कोणाला म्हणशील तू?" प्रधानाने विचारले.

गणपती म्हणाला–"याचे उत्तर म्हणून एक गोष्ट सांगतो. मी एका गावी गेलो होतो. तेथे एका घराला कुलूप होते. परंतु घरात माणसाची चाहूल ऐकू येत होती. मी ओरडून विचारले–"आत कोण आहे?" परंतु आंतून उत्तर आले नाही. मी जवळ-पासच्या लोकांना आरडा ओरडा करून जमा केले. तेव्हां एक चोर पळून जाण्याच्या बेतात दिसला. सर्वांनी मिळून त्याला पकडले. तो माझ्याकडे पाहून म्हणाला–"तु[illegible]सारखे डोळे असून आंधळे नसणारे

कु. चित्रा दिघे

लोक जगात कमी आहेत म्हणून आमचा धंदा चालत राहला." तात्पर्य घराला कुलूप पाहून निघून जाणारे डोळे असून आंधळे. आंतून आवाज येतो का, कानोसा घ्यायला हवा. तसे न करणारे डोळे असून आंधळे होते."

"बोलता येत असून मुका कोणाला म्हणायचे ?" प्रधानाने विचारले.

गणपती म्हणाला—"एकदां मला एका सावकाराकडे कर्ज मागायला जावे लागले. तो सावकार म्हणाला—"बोलता येत असून जे मुके आहेत त्यांच्याकडून मी रुपयाला दरमहा चार आणे व्याज घेतो. परंतु असे नाहीत त्यांच्याकडून मी व्याज घेत नाही." मी अर्थ विचारल्यावर सावकाराने त्याचा सारांश असा सांगितला की जे लोक विशिष्ट अवधीपुरतें कर्ज घेऊन त्या अवधीत देत नाहीत आणि त्याचे काहीतरी खोटेनाटे ते बोलता येत असून ही मुके होत."

प्रधानाने आणखी एक प्रश्न विचारला—"सांगितल्याशिवाय निघून जाणारी किंवा [illegible] कोणती ?"

गणपती म्हणाला—"तारुण्य सांगितल्याशिवाय येते आणि निघून पण जाते. तसेच भाग्यावर भरंवसा ठेवून राहू नये, ते केव्हां येईल आणि केव्हां पाठ फिरवील सांगता येत नाही, असे माझे आजोबा सांगत."

"अनेकदां कधी कोणी मरतो का ?" प्रधानाने शेवटचा म्हणून प्रश्न केला.

त्याचे उत्तर गणपतीने असे दिले—"या गावात मी एका स्त्रीला रडतांना पाहिले. मी तिला विचारले, तेव्हां ती म्हणाली—"मला आयुष्यभर रडावेच लागत आहे, बाबा. माझा एक मुलगा होता, त्याला वीरगती मिळाली म्हणून मला रडावे लागले. माझा नवरा आहे, तो आहे भितरा. तो दिवसांतून दहादां मरतो."

ती उत्तरे ऐकून मंत्र्याने राजाला सल्ला दिला की गणपतीला दरबारात नोकरी द्यायला हरकत नाही. राजाने त्याला आपल्या दरबारात नोकरी दिली.



# ज्ञानोदय

एक विद्वान मनुष्य तत्वज्ञानाचा उपदेश करीत कुमार्गावर जाणारांस सन्मार्गावर आणण्याचा प्रयत्न करीत होता. त्याने एका मध्यवर्ती जागेवर गांवकऱ्यांना एकत्र केले आणि नीति, धर्म, कर्म, भक्ति, मुक्ति आणि सदाचरण म्हणजे काय सांगून त्याप्रमाणे वागणे प्रत्येकाचे कर्तव्य आहे हे सांगितले. लोकांनी तोंडावरच म्हटले, निरुद्योगी माणसालाच या गोष्टी सुचतात.

बिचारा निराश होऊन दुसऱ्या गावी निघून गेला. तेथे देखील लोकांनी त्याच्या उपदेशाची थट्टा उडविली. नंतर तो आणखी एका गावी गेला. तेथे तेच झाले. म्हणून हताश होऊन त्याने उपदेश करण्याचे सोडले आणि जंगलात जाऊन तपश्चर्या करू लागला.

तेथे एका लुटेऱ्याने त्याला सुरा दाखवून धमकावले—"तुझ्याजवळ असेल ते काढून ठेव."

"माझ्याजवळ काढून ठेवण्यासारखे काही नाही बाबा ! मी लोकांना ज्ञानोदय व्हावा म्हणून उपदेश करीत फिरत होतो. परंतु कोणी ऐकायलाच तयार नाही. शेवटी तपश्चर्या करून आत्मोद्धार करायला म्हणून इकडे आलो." विद्वान मनुष्य म्हणाला.

लुटेऱ्याने आपला अंगरखा काढून पाठीवरचे व्रण दाखवून म्हटले—"मी एका घरावर दरवडा पाडला तेव्हां लोकांनी मला बडवून काढले. तरी मी आपला धंदा सोडला नाही. काही काम केले तरी शिव्या देणारे निघतातच. शहाण्याने आपले काम करीत रहावे."

ते ऐकून त्या विद्वान माणसाच्या डोक्यात प्रकाश पडला आणि तो पुन्हां उपदेश करीत हिंडू लागला.





# चोर कोण साव कोण

एका गावी सोमगुप्त नावाचा एक वाणी रहात असे, तो व्यापार आणि वाणिज्य व्यवसायात हुशार होता आणि प्रामाणिकपण होता. म्हणून त्याचा व्यापार चांगला चाले. त्याचे वैभव व कीर्ती ऐकून इतर व्यापाऱ्यांना त्याचा हेवा वाटू लागला.

एकदां सर्व व्यापारी दुसऱ्या गावाला माल खरेदी करून परत आपल्या गावी निघाले.

संध्याकाळच्या सुमारास त्यांनी एका जागी मुक्काम करायचे ठरविले. खाऊन पिऊन घेतल्यावर इतर व्यापारी सोमगुप्तला म्हणाले—"काका, शेजारच्या गावी जत्रा आहे. आम्ही तिकडे जावे, म्हणतो. परत येईपर्यंत आमच्या मालावर पण थोडे लक्ष ठेवा." आणि ते निघून गेले.

सुमारे अर्ध्यापाऊण तासाभराने काही बुरखेवाले लोक धर्मशाळेत शिरले आणि व्यापाऱ्यांचा माल उचलून घेऊन जाऊ लागले. सोमगुप्तने त्यांना अडविल्यावर त्यांनी त्याला खूप बडवून काढले आणि सर्व माल घेऊन पसार झाले.

सोमगुप्तचे सर्व अंग दुखत होते. आपला माल तर गेलाच, इतर व्यापाऱ्यांचा माल चोरीला गेल्याबद्दल त्याची किंमत देखील भरावी लागणार या दुःखाने त्याचे मन जास्तच खचले. परंतु सर्वांवर हे जे संकट एकाएकी येऊन कोसळले आहे त्याची त्यांना वेळेवर बातमी दिली पाहिजे असा विचार करून तो ज्या दिशेने व्यापारी जत्रेला म्हणून गेले होते त्या दिशेने चालू लागला. थोडे अंतर चालून गेल्यावर दुरून आरडाओरडा त्याला ऐकू आला. त्या बाजूला चालत जाऊन एका झाडाआड तो उभा राहला आणि काय भानगड आहे, ऐकू लागला.

[illegible] टोळीला चोरांच्या दुसऱ्या एका टोळीने घेरले होते. त्यांच्या बोलण्यावरून सोमगुप्ताला ती गोष्ट कळली. दुसऱ्या टोळीचा एकजण म्हणाला—"या चोरांना आपण आपल्या नायकाकडे धरून घेऊन जाऊ या. हे आपल्या हद्दीत कसे काय शिरले?"

ते ऐकून बुरखेवाल्या चोरांच्या टोळीपैकी एकजण त्या चोरांच्या पायां पडून म्हणाला—"आमचा जीव नका घेऊ हो. आम्ही चोर नाही. हा सर्व माल आमचाच आहे. आम्ही व्यापारी आहों. आम्ही आमच्याच पैकी एकाशी लबाडी करण्याचे ठरवून आपला व त्याचा माल चोरला आणि त्याचे प्रायःश्चित आतां आम्हांला करावे लागत आहे. तुम्ही हा सर्व माल घेऊन गेलात तरी हरकत नाही, परंतु आम्हांला जिवानिशी सोडा."

चोरांचा त्यांच्या बोलण्यावर विश्वास होत नव्हता. म्हणून एक चोर म्हणाला—"याचे प्रमाण? आहे कोणी साक्षी सांगायला की तुम्ही धंदेवाईक चोर नाही? तुम्हांला जे काही सांगावयाचे असेल ते आमच्या नायकाजवळ येऊन सांगा."

तेव्हां बुरखेवाल्या चोरांनी भराभर आपापले बुरखे काढून फेंकले आणि विचारू लागले—"तुम्हीच सांगा, आम्हांला पाहून आम्ही चोर आहों असे वाटते का तुम्हांला?"



"होय! तुम्ही चोरांसारखेच तर दिसतां आहां. चोराचा चेहरा निराळा असतो का?" चोर म्हणाले.

त्या वेळी सोमगुप्त झाडाआडून पुढे येऊन म्हणाला–"हे चोर नाही आहेत हो! माझ्यासारखे आमच्या गावचे व्यापारी आहेत. माझा हेवा करीत असावेत. म्हणून चोरांचा वेष करून आपला व माझा माल चोरून घेऊन गेले. मला त्यांनी सर्व मालावर लक्ष ठेवायला सांगितले होते. माझ्याकडून चोरी गेलेल्या सर्व मालाची किंमत वसूल करण्याचा विचार असावा यांच्या मनात. परंतु यांचा बेत फसला. यांनी माझ्याशी लबाडी केली असली तरी यांनी तुमच्याशी लबाडी केलेली नाही. तुम्हांला पाहिजे असेल तर हा सर्व माल घेऊन जा. परंतु यांच्यापैकी एकाच्याही जिवाचे वेडेवाकडे करू नका. यांना सोड."

चोर आपसात सल्ला करू लागले. सोमगुप्ताच्या औदार्याचे ते कौतुक करू लागले. परस्पर सल्ला करून चोर सोम- [illegible] चोरी केली हे आम्हांला माहीत नाही व त्याची आम्हांला गरजदेखील नाही. यांनी चोरी केली आहे एवढे खास. तेव्हां हा सर्व माल तू कष्टाचा मोबदला म्हणून आणि तुझ्या औदार्याबद्दल बक्षीस म्हणून आम्ही तुला देत आहों. तू सर्व माल ठेवून घे. यांना मुळीच देण्याची गरज नाही."

सोमगुप्तने चोरांचे आभार मानून त्यांना निरोप दिला आणि आपल्या साथी व्यापाऱ्यांना ज्यांचा माल त्यांना देऊन म्हणाला–"तुमच्याहून हे चोर चांगले. त्यांच्याजवळ दानत आहे. तुम्ही किती दुष्टबुद्धीने चोरी केलीत? माझ्याशी इतका मत्सर कां? आपल्याच मालाची चोरी? तुम्ही व्यापारी नसून चोर आहां आणि ते चोर नसून सज्जन आहेत."

त्यानंतर सर्व व्यापाऱ्यांनी सोमगुप्तची क्षमा मागितलीआणि स्वत:च्या तोडांत मारून घेऊन कान धरून म्हणाले–"यापुढे आम्ही तुझ्या पावलावर पाऊल टाकून चालू!"





# महाभारत

भीष्माचार्यांनी दुर्योधनाला दोन्ही पक्षातील वीरांच्या शौर्यसाहसासंबंधी सांगावयाचे होते ते सांगितल्यावर दुर्योधन त्यांना म्हणाला–"आजोबा! तुम्ही म्हणालात, शिखंडी युद्धाला आला तर मी त्याच्याशी युद्ध करणार नाही. ते कां? सोमकांबरोबर सर्व पांचाल देशीयांना मी ठार करीन असे नव्हते का पूर्वी सांगितले?"

भीष्माचार्यांनी त्याच्या प्रश्नाचे असे उत्तर दिले–"मी शिखंडीशी युद्धास कां तयार नाही हे सांगतो. माझे वडील शंतनु महाराज दीर्घ कालतक राज्य केल्यावर वारले तेव्हां मी चित्रांगदाचा राज्याभिषेक आणि विचित्रवीर्याचा युवराज्याभिषेक करविला. थोडे दिवस राज्य करून चित्रांगद वारला. म्हणून विचित्रवीर्याला गादीवर बसविले व तो तरुण वयात आल्यावर योग्य वधू पाहून मी त्याचा विवाह करून द्यायचे ठरविले. त्याच सुमारास काशीच्या राजाने आपल्या तिघां मुलींच्या विवाहासाठी स्वयंवर रचले असल्याचे मला कळले. तिघी मुली फार सुंदर होत्या. त्यांची नांवे अनुक्रमे अंबा, अंबिका व अंबालिका अशी होती. मी एकटा रथात बसून काशी राजाच्या राजधानीत गेलो. त्या सुंदर मुलींना मी पाहिले. स्वयंवराला आलेल्या राजांना सुद्धा मी पाहिले. मी तिघां राजकन्यांना आपल्या रथात बसविले आणि सर्व राजांना आह्वान करून. म्हणालो–"राजकुमारांनो मी या तिन्ही राजकन्यांना घेऊन जात आहे.



मी शंतनूचा मुलगा, भीष्म. 'शक्य असेल तर तुम्ही या राजकन्यांना अवश्य सोडवून न्या.' त्यांना अर्थातच माझा फार राग आला व ते रथांत, हत्तींवर आणि घोड्यांवर बसून माझ्याशी युद्ध करण्यास आले. मी शरवृष्टी करून त्यांना रणांगणावरून पळवून लावले.

मी काशी राजाच्या राजकन्यांना आणून सत्यवतीला दाखविले. विचित्रवीर्याशी यांचा विवाह करून देण्यासाठी यांना घेऊन आल्याचे सांगितले. तिला फार आनंद झाला. मी विवाहाच्या तयारीस लागलो तेव्हां काशीराजाची मोठी मुलगी अंबा मला म्हणाली की साल्व राजावर

[illegible]

तिच्यावर प्रेम असून दोघांनी परस्पराशी लग्न करून घेण्याची परस्परांना वचने दिली आहेत, परंतु ती गोष्ट काशी राजाला माहीत नाही. म्हणून तिला साल्व राजाकडे पोचते करण्यात यावे. मी सत्यवतीचा आणि प्रधान पुरोहितांचा सल्ला घेऊन अंबाला दासींबरोबर साल्व राजाकडे पाठविले.

"परंतु साल्व राजाने तिचा स्वीकार करण्यास नाकारले की भीष्म बळजबरीने घेऊन गेलेल्या कन्येशी तो विवाह करणार नाही. तिने त्याला किती समजावून सांगण्याचा प्रयत्न केला की 'भीष्माने तिच्याशी लग्न केलेले नाही व ती साल्व राजाशी लग्नास वचनबद्ध आहे,' हे सांगितल्यावर भीष्माने तिला गौरवपूर्वक पाठविले आहे. तिने अनेक प्रकारे त्याचे मनवळविण्याचा प्रयत्न केला, पण साल्व राजाच्या मनात पालट झाला नाही व 'तू वाटेल तिकडे जा, मला तुझ्याशी लग्न कर्तव्य नाही.' असे सांगून त्याने निष्ठुरपणाने तिला परत पाठविले.

"अंबाची ती दुर्गत इतर कारणांमुळे झाली असूनही तिने सगळा राग माझ्यावरच काढला आणि अनेक ऋषींच्या आश्रमांत गेली. तेथे शैखावत्य नावाचे एक ऋषी होते. तिच्या तोंडून तिची सर्व कष्ट-



[illegible]

तुझ्यावरचे हे संकट दूर करणे कसे काय शक्य होईल?' तेव्हां ती त्यांना म्हणाली– 'मला या जीविताचा कंटाळा आला आहे. तेव्हां तपश्चर्या कशी करावयाची हे सांगण्याची कृपा करावी.'

"तेव्हां सर्व आश्रमवासी मुनींनी तिला वडिलांकडे परत जाण्याचा सल्ला दिला. परंतु तिला ते मान्य नव्हते. 'मी तपश्चर्या करणार आहे, मला ती कशी करायची तेवढे सांगा.' असे ती त्यांना म्हणाली.

"त्याच वेळी तेथे होत्रवाहन नावाचे एक राजर्षी आले. ते अंबाचे आईकडून आजोबा होते. त्यांनी अंबाच्या तोंडी सर्व वृत्त ऐकून घेतले व म्हणाले–"'मुली! तुला तपश्चर्या करता येणार नाही. जमदग्नीपुत्र परशुराम यांच्याकडे तू जा. ते तुला भीष्माकडे घेऊन जाऊन त्याला तुझे म्हणणे पटवून देतील. त्यानी तुला नाकारले तर ते त्याचा वध करतील.'

"परशुराम महेंद्र पर्वतावर तपश्चर्या करीत होते. परंतु ते दुसऱ्याच दिवशी त्या आश्रमात येणार होते आणि त्याप्रमाणे ते आले देखील. ऋषी मुनींनी व अंबाने त्यांची सर्व प्रकारे अतिथिपूजा केली. होत्रवाहन ऋषींनी त्यांच्या नातीची कष्ट-



कथा परशुरामाला सांगून तिच्या मनाचे समाधान करण्यास विनंती केली.

"'मुली! तुला भीष्माकडे जावयाचे आहे की साल्वाकडे? तुला जे हवे असेल ते मी करवून देईन.' असे परशुराम अंबाला म्हणाले. 'माझ्या सर्व दुःखाचे मूळ कारण भीष्म आहे, त्याचा वध झाल्याशिवाय माझा क्रोधाग्नी शांत होणे शक्य नाही.' असे अंबा म्हणाली.

"परशुराम माझा वध करण्यास कबूल होईनात, परंतु अंबाला मी स्वीकारले नाही तर माझ्याशी युद्ध करण्याचे त्यांनी वचन दिले. ते अंबाला घेऊन कुरुक्षेत्री आले आणि सरस्वती नदीच्या काठी उतरले.



त्यांनी माझ्याकडे निरोप पाठविला. मी एक गाय आणि काही ब्राह्मणांना बरोबर घेऊन त्यांच्या दर्शनास गेलो आणि त्यांची यथाविधि गुरु पूजा केली.

"मला आलेला पाहून ते म्हणाले– 'भीष्मा! तु कोणत्याही स्त्रीवर प्रेम करीत नाहीस व आजन्म ब्रह्मचर्य व्रत घेतले आहेस, म्हणतोस! मग अंबाला बळजबरीने उचलून कां घेऊन गेलास? आणि नंतर तिला परत कां पाठविलेस? तुझ्यामुळे हिचे सर्व आयुष्य नष्ट झाले. साल्व राजाने हिला नकार दिला आहे, तेव्हां आतां तूच हिचा स्वीकार कर.' परशुराम म्हणाले.



भावाशी तिचे लग्न करून द्यायला निघालो, परंतु ती त्याच्याशी लग्नाला तयार झाली नाही आणि साल्व राजावर तिचे प्रेम असल्यामुळे त्याच्याकडे निघून गेली.'

"ते ऐकून परशुराम म्हणाले की मी त्यांच्या म्हणण्याप्रमाणे वागलो नाही तर मला व माझ्या मंत्र्यांना ठार करायला ते मागे पुढे पाहणार नाहीत. मी त्यांना शांत करण्याचा यत्न करून पाहिला. 'आपण मला काही अस्त्रे शिकवून दिली आहेत, माझे, गुरु आहां!' मी म्हणालो. तेव्हां ते म्हणाले–'तरमग तू गुरूची आज्ञा मान्य केली पाहिजेस!' मी त्यांना एवढेच उत्तर दिले की गुरूच काय, स्वतः इंद्राने येऊन मला माझ्या धर्माविरुद्ध काही करायला सांगितले तरी ते मी करणार नाही.

"दुसऱ्या दिवशीच कुरुक्षेत्रावर आमचे युद्ध होण्याचे ठरले आणि त्यासाठी सर्व व्यवस्था झाली. मी हस्तिनापूरला परतलो आणि सत्यवतीला सर्व वृत्त सांगून व तिचा आशीर्वाद घेऊन युद्धासाठी तयार होऊन कुरुक्षेत्री आलो. परशुराम तिकडे वाटच पहात होते. आमचे द्वंद्वयुद्ध पाहण्यासाठी मुनी एका बाजूला येऊन उभे होते. मी परशुरामांना नमस्कार करून युद्धास तयार



दिवस चालू होते आणि परशुरामांनी त्या द्वंद्वयुद्धात हारल्याचे मान्य केले.

"नंतर ते अंबाला म्हणाले–'तु पाहिलेसच, भीष्माला मी जिंकू शकलो नाही. मी तुला कोणत्याही प्रकारे मदत करू शकलो नाही याबद्दल मला वाईट वाटते. तूच पाहिजे तर भीष्माकडे जाऊन शरण माग.' अंबा त्या गोष्टीस कबूल झाली नाही. माझा वध करण्यासाठी तपश्चर्या करण्याचा निश्चय करून निघून गेली. परशुराम महेंद्रपर्वताकडे निघून गेले. मी अंबाच्या पाठोपाठ काही जणांना पाठविले व ती कोठे जाते व काय करते त्यावर लक्ष ठेवायला सांगितले.

"अंबा यमुना नदीच्या काठी ऋषींच्या आश्रमात गेली. तेथे तिने बारा वर्षे तपश्चर्या केली. तिच्या नातेवाइकांनी येऊन तिला तो हट्ट सोडायला अनेक प्रकारे समजावून सांगितले; परंतु तिने ते ऐकले नाही. काही काळ लोटल्यावर शंकराने प्रसन्न होऊन तिला दर्शन दिले आणि पाहिजे तो वर मागून घेण्यास सांगितले. तिने तिला माझ्या विरुद्ध जय मिळेल असा वर मागितला. शंकराने तिला असा वर दिला, की ती जन्मतः स्त्री होईल, परंतु पुरुष होऊन युद्धात माझा वध करील. शंकर वर





देऊन अंतर्धान होताच तिने अग्नी तयार करून 'मी पुढल्या जन्मी भीष्माचा वध करण्याच्या हेतूने अग्निप्रवेश करीत आहे' असे म्हणत अग्निप्रवेश केला."

येथवर अंबाची कथा सांगून भीष्माने पुढे शिखंडीची कथा सांगितली.

"द्रुपद राजाच्या राणीला मूल बाळ काही झाले नाही. भीष्माच्या हाती त्याचा पराभव झाला होता व सूड भावनेने भीष्माचा वध करण्याच्या हेतूने त्याने शंकराचे स्मरण करून पुत्रप्राप्तीसाठी तपश्चर्या केली होती. शंकराने प्रसन्न होऊन 'भीष्माचा वध करण्यासाठी एक स्त्रीपुरुष संतान होईल,' असा वर दिला.



"द्रुपदाची राणी काही काळ लोटल्यावर प्रसूत होऊन तिला एक मुलगी झाली. परंतु पुत्रप्राप्ती झाली असल्याचे द्रुपदाने दरबारी लोकांस व प्रजेस सांगितले. हे गुपित पुष्कळ दिवस टिकवून ठेवण्यासाठी त्याला फार प्रयत्न करावा लागला. मुलीचे ते गुपित लपविण्यासाठी द्रुपदाला राणीने देखील सर्व प्रकारे मदत केली. द्रुपदाला शंकराचा वर कधी खोटा ठरणार नाही ह्याची खात्री होती. त्याने आपल्या मुलीचे नाव शिखंडी असे ठेवले.

"शिखंडीने चित्रकला व इतर कलांत उत्तम प्राविण्य संपादन केले. ती पुरुषवेश धारण करून द्रोणाचार्यांकडे धनुर्विद्या [illegible]यासाठी गेली. समयानुसार ती वयात आली व स्त्रीसुलभ बदल तिच्या शरिरात दिसूं लागला. द्रुपदाला काय करावे, सुचेना. कारण शंकराने वर दिल्याप्रमाणे तिच्यात पुरुष होण्याची चिह्नेच दिसत नव्हती.

"'शंकराचा वर कदापि खोटा ठरणार नाही. आपण आपल्या मुलीचा विवाह योग्य वधू पाहून तिच्याशी करून टाकावा.' असे द्रुपदाला राणी म्हणाली.

"द्रुपदाने तसे करण्याचे मनाशी ठरवून दशार्णच्या राजाच्या मुलीला शिखंडीची वधू म्हणून निवड केली. दशार्णचा राजा हिरण्यरोम महापराक्रमी होता. त्याच्या मुलीचे नाव देखील शिखंडीच होते. द्रुपदाशी असा संबंध जुळून आल्याबद्दल हिरण्यरोमने आनंदच दर्शविला. दोघां शिखंडींचा विवाह-समारंभ थाटामाटाने पार पडला.

"काही काळ लोटल्यावर दशार्णराजाची मुलगी वयात आली आणि तिला तिचा नवरा पुरुष नसून स्त्री असल्याचे कळून आले. तिने लाजत लाजत ती गोष्ट आपल्या सखीं करवी राजाला कळविली.

"ते ऐकून दशार्णराजाला संताप आला. त्याने एक दूत पाठवून द्रुपदाला या शब्दात आपला निरोप कळविला–'लबाडराजा! तू माझ्याशी लबाडी करून माझ्या मुलीचे आपल्या मुलीशी लग्न करून देऊन माझा अपमान केला आहे. [illegible] मी ससैन्य तुझ्या राज्यावर स्वारी करीत आहे.'

"द्रुपद काय उत्तर देणार? त्याने फक्त एवढेच कळविले–'मी आपल्याशी कोणत्याही प्रकारे लबाडी केलेली नाही.' परंतु दशार्णराजाचे तेवढ्यावर समाधान होणे शक्य नव्हते. 'मी तुझा वंश निर्मूल करण्यासाठी सैन्य घेऊन येत आहे,' असा त्याने निरोप पाठविला.

"द्रुपद राजा घाबरून गेला आणि 'पुढे काय करायचे?' असे त्याने आपल्या राणीला विचारले.

"आपल्या कुटुंबातल्या लोकांना व मंत्र्यांना आणि इतरांना त्याने असे सांगितले की आपल्या मुलीला मुलगाच समजून तो स्वतःच फसल्याबद्दल त्यामुळे सर्वांना फसविल्याबद्दल दुःख होत आहे.

आपल्या आईवडिलांना किती मानसिक व्यथा होत आहे हे पाहून शिखंडीने प्राणत्याग करण्याचे ठरविले आणि घर सोडून ती अरण्यात निघून गेली. ते अरण्य स्थूणाकर्ण नांवाच्या यक्षाचे होते. शिखंडीने त्या अरण्यात काही दिवस उपवास केल्यावर यक्षाने तिला पाहिले आणि विचारले–"तू या अरण्यात कशासाठी प्रवेश केलास? सांग, मी तुला शक्य ती मदत करतो."



"'मला मदत करणे तुला शक्य नाही.' शिखंडी म्हणाली.

"'मी कुबेराचा मित्र आहे, तू मागशील तो वर मी देईन.' यक्ष म्हणाला.

"तिचा जन्म मुलीचा असूनही तिला मुलगा म्हणून वाढवून आईवडिलांनी एका स्त्रीशी तिचे लग्न करून दिले आणि आतां त्यांच्यावर फार मोठे संकट ओढवले असल्याचे तिने यक्षाला सांगितले.

"'मी तुला काही काळ आपले पुरुषत्व देऊन तुझे स्त्रीत्व घेतो. तुझ्या वडिलांवर आलेले संकट टळल्यावर तू माझे पुरुषत्व मला परत करून तू आपले स्त्रीत्व घे.' यक्षाने सूचविले.

"शिखंडीला परमानंद झाला व तिने त्या गोष्टीस कबुली दिली.

"स्त्रीदेहाने गेलेली शिखंडी पुरुष होऊन परत आलेली पाहून तिच्या आईवडिलांना अपरंपार आनंद झाला. "माझा मुलगा पुरुषच आहे, पाहिजे तर येऊन खात्री करून घ्यावी," असा निरोप दूताकरवी द्रुपद राजाने दशार्ण राजाला कळविला. दशार्ण राजाने खात्री करून घेण्यासाठी काही स्त्रियांना पाठविले. त्यांनी शिखंडीला अनेक प्रश्न विचारून खात्री करून घेतली आणि शिखंडी पुरुषच असल्याचे दशार्ण राजाला येऊन सांगितले. दशार्ण राजाने स्वत: येऊन द्रुपदाचा व शिखंडीचा अपमान केल्याबद्दल क्षमा मागून त्यांना गौरवार्थ नजराणा वगैरे दिला आणि स्वदेशी परतला.

"मध्यंतरी कुबेर विमानात फिरत स्थूणाकर्णाच्या वनात आला व स्थूणाकर्ण भेटायला आला नाही याबद्दल त्याला आश्चर्य वाटले. त्याचे दूत स्त्रीरूपात असलेल्या स्थूणाकर्णाला बोलावून घेऊन आले. त्याच्या [illegible] कुबेराला राग आला व त्याने 'आतां तू स्त्री रूपातच कायमचा रहा.' असा शाप दिला. परंतु सर्वांनी स्थूणाकर्णाला शापमुक्त होण्याचा मार्ग सांगावा अशी विनंती केली. कुबेराने शिखंडीला मरण आल्यावर स्थूणाकर्णाला पुन्हां पुरुषरूप प्राप्त होईल असे सांगितले.

"नंतर शिखंडी यक्षाला भेटून म्हणाला— 'बाबा रे! माझ्यावर आलेले संकट टळले आतां तू आपले पुरुषत्व परत घे!' तेव्हां यक्षाने त्याला कुबेराकडून मिळालेल्या शापाची गोष्ट सांगून मरण येईपर्यंत पुरुषत्वाचा उपभोग करण्यास सांगितले.

भीष्माचार्य शिखंडीची कथा सांगून म्हणाले—"अंबाच शिखंडी म्हणून जन्मली आहे. जन्मत: स्त्री असो किंवा स्त्रीचे नांव असणारा पुरुष असो की स्त्रीवेषांत पुरुष असो त्याचा वध न करण्याचे मी व्रत घेतले आहे. म्हणून मी शिखंडीशी युद्ध करणार नाही."





# मित्रभेद

दक्षिण भारतात महिलारूप्य नामक गावी अमरशक्ती नावाचा राजा राज्य करीत असे, तो शूर पराक्रमी, दयाळू, बुद्धिमान, ललितकलांत प्रवीण आणि राजनीतीत चतुर होता. राजाला वसुशक्ती, उग्रशक्ती आणि अनेकशक्ती नावाचे तीन मुलगे होते. तिघांना विद्याभ्यासाची आवड नव्हती आणि व्यवहार कौशल्य पण त्यांच्यात नव्हते. म्हणून राजाला त्यांचे पुढे कसे होणार याची काळजी वाटू लागली.

एके दिवशी राजा अमरशक्तीने आपल्या सर्व मंत्र्यांना बोलावून राजकुमारांच्या शिक्षणाविषयी विचारले—"तुम्हां सर्वांना तिघे राजकुमार कसे आहेत हे माहीतच आहे. ज्ञान आणि विद्या नसलेले पुत्र वांझ गाईसारखे निरुपयोगी असतात. माझे उतारवय झाले आहे व आतां मी वानप्रस्थाश्रमात प्रवेश करायला हवा. तेव्हां तुम्हीच एखादा मार्ग काढा की, त्या योगे यांच्या डोक्यात थोडा तरी ज्ञानोदय होईल आणि यांना राजनीती आणि राज्यकारभार दोन्हींचे चांगले ज्ञान होईल."

तेव्हां एका मंत्र्याने सूचना केली— "महाराज! आपल्या राजधानीत विष्णुशर्मा नावाचे एक वृद्ध गुरु आहेत. ते षोडष शास्त्र आणि चौसष्ट कलांत निष्णात आहेत व विद्याव्यासंगी पण आहेत. एक उत्तम शिक्षक म्हणून ही त्यांची प्रख्याती आहे. त्यांना गुरु म्हणून नेमले तर राजकुमारांना ते अल्प काळात राजनीति आणि व्यवहार दोन्हीत दक्ष करतील."

राजा लगेच दूत पाठवून विष्णुशर्माला बोलावून म्हणाला—"तिघां राजकुमारांना आपण राजनीति कुशल व विवेकी करून द्यावे. गुरुदक्षिणा म्हणून शंभर गावे देण्यात येतील."

शेवटच्या मलपृष्ठावरील चित्र



विष्णुशर्मा म्हणाले–" महाराज! विद्या- विकण्यासाठी नसते. ज्याला विद्येची भूक आहे त्याला ती देणे हे माझे कर्तव्य म्हणून मी करीत आलो आहे. मी सहा महिन्यांत राजकुमारांस उत्तम राजनीति शिकवून विवेकवान करण्याचा प्रयत्न करतो."

विष्णुशर्मा म्हणाले ते ऐकून राजाला परमानंद झाला. त्याने आपल्या तिघां मुलांना गुरुगृही पाठविले. विष्णुशर्माने त्यांना पंचतंत्र नांवाने गोष्टीरूपे राजनीति आणि विवेक पांच महिन्यात शिकविला. पंचतंत्राचे मित्रभेद, मित्रलाभ, काकउलूकीय, लब्ध प्रणाश आणि अपरीक्षित कारक, असे पांच भाग आहेत.

## १. सिंह आणि बैल

दक्षिण प्रदेशात महिलारूप्य. नामक नगरी वर्द्धमान नामक एक व्यापारी रहात असे. तो धनवान, नीतिवान आणि दानशूर होता. धन मिळवावे आणि सत्कार्यी ते खर्च करावे, असा एक नियम त्याने स्वत:च्या जीवनात ठेवला होता.

एकदां वर्धमान आपल्या गाड्यांत मूल्यवान सामान घालून यमुना काठच्या मथुरेला निघाला. त्याच्या अनेक गाड्यांपैकी एका गाडीला नंदीक आणि संजीवक नामक उत्तम जातीचे दोन बैल जोडलेले होते.

काही दिवसांनी व्यापाऱ्यांचा तांडा यमुना नदी काठच्या एका जंगलात पोंचला. त्या जंगलात अनेक रानटी श्वापदे आणि वृक्षलता होत्या. तेथे संजीवकचा पाय चिखलात घसरला आणि तो खाली पडला.

वर्द्धमानने पांच दिवस तेथेच मुक्काम करून संजीवकचा इलाज करविला. परंतु गुण पडला नाही. वर्द्धमानला मथुरेहून व्यापाराची कामे उरकून परतायचे होते. म्हणून संजीवकच्या सेवेला गाडीवानाला ठेवून आणि बैलांसाठी चाऱ्याची व्यवस्था करून देऊन म्हणाला–" तुम्ही दोघे लक्षपूर्वक बैलाची काळजी घ्या. तो बरा झाल्यावर त्याला घेऊन या. जर तो मेलाच तर त्याला मूठमाती देऊन माझ्याकडे परत या."

आपल्या इतर गाड्या घेऊन मथुरेला गेला. तो निघून गेल्यावर गाडीवानाला आणि नोकराला जंगलात निर्जन स्थानी रहायला भीती वाटू लागली. म्हणून बैलाला जंग- लात तसाच सोडून धन्याकडे जाऊन म्हणाले–" बैल मेला म्हणून त्याला मूठ माती देऊन सरळ आपणांकडे येत आहों.

परंतु नशिबाने तो बैल बरा झाला आणि हळूहळू चालत यमुना नदी काठच्या जंगलात आला. नदी काठचे हिरवेगार गवत खाल्ल्याने त्याची प्रकृती सुधारली आणि शंकराच्या नंदीसारखा अंगाने घष्टपुष्ट झाला. तो आनंदाने मनात येईल तिकडे हिंडू फिरू लागला

त्याच जंगलात पिंगलक नावाचा सिंह रहात असे. तो कोल्हे आणि इतर रानटी जनावरांचा एक कळप करून रहात असे. एके दिवशी तो सिंह पाणी प्यायला यमुने- वर गेला असतां त्याला संजीवकचे हंबरणे ऐकू आले. त्यापूर्वी त्याने गायीचे किंवा बैलाचे हंबरणे ऐकले नव्हते. म्हणून इतक्या मोठ्याने डरकाळी फोडणारे जनावर कोण बरे असेल अशी त्याला भीती वाटली. तो पाणी प्यायल्याशिवाय वडाच्या झाडाखाली परतला. तेथेच तो इतर प्राण्यांबरोबर



रहात असे. परंतु त्याच्या मनाला धडकी बसली होती. इतर जनावरे त्याच्या चारीबाजूला घोळका करून बसली होती. चेहऱ्यावर भीती वाटत असल्याचे दिसू नये याची त्याने काळजी बाळगली. वनराजाला राज्याभिषेक सिंहासन व पोशाख इत्यादींची गरज नसते. तो सहजींच जंगलातील प्राण्यांचा राजा असतो.

सिंहाबरोबर राहणाऱ्या प्राण्यांमध्ये कर- टक आणि दमनक नांवाचे दोन कोल्हे होते. ते सिंहाजवळ पूर्वी त्याच्या सेवेस असलेल्या एका कोल्ह्याचे मुलगे (म्हणजे पिल्ले) होते. त्यांची नेमणूक विशिष्ट पदावर अद्याप झालेली नव्हती. सिंह नदीवरून पाणी

प्याल्याशिवाय परत आल्याची गोष्ट दमनकने अंदाजाने ओळखली. तो करटकला एका बाजूला बोलावून घेऊन जाऊन म्हणाला–"कायरे करटका! तू पाहिलेस का, आपला राजा पिंगलक यमुनेवर पाणी प्यायला गेला होता आणि पाणी प्याल्याशिवायच परतला. त्याचा चेहरा उतरलेला दिसतो आहे."

ते ऐकून करटक म्हणाला–"बाबा रे! राजाच्या भानगडीत आपण पडतां कामा नये. अशा तऱ्हेने चित्त चंचल असलेले एक खट्याळ माकड दुसऱ्याच्या भानगडीत पडून स्वतःचा प्राण गमावून बसले होते ती गोष्ट तुला माहीतच असेल."

"नाही बुवा, सांग!" दमनक म्हणाला.

करटकाने खट्याळ माकडाची गोष्ट सुरू केली. म्हणाला–"एका नगराबाहेर एक व्यापारी देऊळ बांधीत होता. दररोज सुतार दुपारी काम थांबवून खायला प्यायला जात. तेथे मोठमोठे ओणके करवतीने चिरण्याचे काम चालू होते.

एक कळप आला. एक मोठा ओणका अर्धाच चिरून झाला होता. जेथवर तो चिरून झाला होता तेथवर फटीत लाकूड चिरणाऱ्यांनी एक खुंटी मारून ठेवली होती. सर्व माकडे उड्या मारीत असता एक माकड त्या ओणक्यावर येऊन बसले आणि ती पाचरवजा खुंटी पाहून विचार करू लागले की ही खुंटी येथे कशाला आहे. ती खुंटी दोन्ही हातांनी धरून खूप हलवून ते काढू लागले आणि खुंटी निघाल्याबरोबर माकड फटीत सांपडून तत्काळ मरण पावले."

करटक ती गोष्ट सांगून म्हणाला–"म्हणून मी तुला सांगत होतो की दुसऱ्यांच्या कामात हस्तक्षेप करणे शहाणपणाचे नाही. अरे वेड्या! आपल्या राजाच्या दरबारी आपणास हुद्दा मिळाला नसला तरी राजाचे उष्टे खाऊन आपले पोट फुकटात भरतेच आहे, नाही का? ते कां घालवून बसतोस?"

(क्रमशः)





# १३९. जगातील सर्वांत मोठे घड्याळ

अमेरिकेतील न्यू जेर्सी राज्याच्या जेर्सी या गांवी "कोल्गेट-पामालिव-पीट" नामक कारखान्यावर हे घड्याळ आहे. त्याच्या 'डायल' म्हणजे मुखाचा व्यास पन्नास फूट आहे. या चित्रांतल्या मनुष्याच्या दोन्ही बाजूला जीं चिन्हे आहेत तीं पांच मिनिटांची आहेत. प्रत्येक चिन्ह सात फूट उंच आहे. या घड्याळाचा मिनिट काटा एका दिवसात सुमारे सहा फर्लांग प्रवास करतो. घड्याळाच्या 'डायल'वर ३४५ बल्ब लावलेले आहेत.

